# औद्योगिक अपशिष्टांवरील उपचारांसंबंधी मूलभूत ज्ञान आणि प्रथा

लेखक — नेल्सन लेओनार्ड नेमेरो
प्रोफेसर ऑफ सिव्हिल इंजनिअरिंग, सायराक्यूज युनिव्हर्सिटी

अनुवादक — वि. ह. केळकर, बी. ई.,
से. नि. मुख्य अभियंता व सहसचिव,
महाराष्ट्र राज्य

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ
मुंबई

# निवेदन

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळातर्फे श्री. वि. ह. केळकर यांनी भाषांतरित केलेला "औद्योगिक अपशिष्टांवरील उपचारांसंबंधी मूलभूत ज्ञान आणि प्रथा" हा ग्रंथ वाचकांच्या हाती सोपविण्यास मंडळाला आनंद होत आहे.

**सुरेंद्र बारलिंगे**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ
मुंबई

मुंबई
दिनांक १ जानेवारी १९८३

# औद्योगिक अपशिष्टांवरील उपचारांसंबंधी मूलभूत ज्ञान व प्रथा या इंग्रजी पुस्तकाच्या भाषांतराच्या संदर्भात अनुवादकाचे मनोगत—

आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञान, तंत्र आणि अभियांत्रिकी इत्यादी वाङ्मयीन क्षेत्रांत तसेच भारतीय प्राचीन संस्कृति, इतिहास, कला संबंधीच्या विषयांत मराठीला पाश्चात्य भाषांचा दर्जा प्राप्त व्हावा, त्या भाषांना जसे विद्यापीठीय क्षेत्रात एक विशिष्ठ स्थान व ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य प्राप्त झाले आहे तसे मराठी भाषेलाही प्राप्त व्हावे हा उद्देश लक्षात घेऊन महाराष्ट्र राज्य साहित्य–संस्कृति मंडळाने वाङ्मय निर्मितीचा विविध कार्यक्रम हाती घेतला आहे.

विज्ञान, तंत्रविज्ञान, तत्वज्ञान आदि विषयांवरील संशोधनात्मक व संपूर्ण माहितीने युक्त अशा एतद्विषयक ग्रंथांची रचना मोठ्या प्रमाणावर झाल्या शिवाय मराठी भाषेला विद्यापीठीय भाषेचे प्रगत स्वरूप प्राप्त होणार नाही, शिवाय मातृभाषेतून ज्ञानदान केल्यास शिक्षणाचा प्रसार झपाट्याने होईल व त्याचवेळी त्या भाषेच्या विकासासही प्रोत्साहन मिळेल. जोपर्यंत आपण परभाषेतून शिक्षण घेऊ तोपर्यन्त ते शिक्षण सकस व स्वावलंबी बनत नाही व भाषिकही वेगाने वाढणाऱ्या ज्ञानविज्ञानापासुन सामान्यतः वंचित होतो म्हणून मराठी भाषेत विज्ञानाचा प्रसार विस्तृत व त्वरित होण्याकरता विज्ञानाच्या शाखांतर्गत निरनिराळ्या विषयांवर मराठीत स्वतंत्र ग्रंथ लिहून अगर परभाषेतील उत्तमोत्तम ग्रंथांची भाषांतरे करून अगर करवून घेऊन हे कार्य उत्तम प्रकारे करणे जरुरीचे आहे.

महाराष्ट्र राज्य साहित्य–संस्कृति मंडळाने बहुविध वाङ्मयीन कार्यक्रम आखला असून विज्ञान क्षेत्रातील अभियांत्रिकी विषयावरील परभाषेतील अभिजात (Standard) ग्रंथांचा अनुवाद करून ते प्रकाशित करणे हा त्यातील एक विभाग आहे.

या कार्यक्रमांतर्गत प्रमाणभूत अशा ज्या ४ इंग्रजी ग्रंथांचा अनुवाद करण्याची जबाबदारी मजवर सोपविली ते असे :

(१) बंधाऱ्याचे स्थापत्य शास्त्र – खंड तीन
(२) कांक्रीटची नियम पुस्तिका–
(३) पाणी पुरवठा आणि टाकाऊ द्रव्याची विल्हेवाट
(४) औद्योगिक अपशिष्टांवरील उपचारांसंबंधी मूलभूत ज्ञान आणि प्रथा

वरील चारीही पुस्तकांचे मराठीतील अनुवाद मी पूर्ण केले असून त्यांची तज्ञांकडून तपासणीही झाली आहे. साहित्य-संस्कृति मंडळाने त्या भाषांतरांचे छपाईचे कामही हाती घेतले आहे. त्यातील क्र. १ च्या पुस्तकाच्या फक्त पहिल्या खंडाची छपाई पुरी झाली आहे, क्र. २ ची छपाई बरीचशी पूर्ण झाली आहे, क्र. ३ ची छपाई पूर्ण होऊन मंडळाने त्याचे प्रकाशनही केले आहे. क्र. ४ च्या छपाईचे काम पुरे होऊन त्याचे प्रकाशन आता होत आहे. या चारही पुस्तकांच्या भाषांतरांची तज्ञ म्हणून श्री. बेडेकर यांनी तपासणी केली व त्यांनी दिलेल्या

महत्वाच्या सूचनांमुळे व सहाय्यामुळेच ही भाषांतरे योग्य प्रकारे माझ्या हातून होऊ शकली हे मी कृतज्ञतापूर्वक नमूद करू इच्छितो.

प्रस्तुत "औद्योगिक अपशिष्टावरील उपचारासंबंधी मूलभूत ज्ञान व प्रथा" या पुस्तकातील ज्या इंग्रजी शब्दांबद्दल मराठी पारिभाषिक शब्द वापरले आहेत ते इंग्रजी शब्द त्या त्या मराठी शब्दाबरोबरच कंसात इंग्रजीत दिले आहेत.

मूळ इंग्रजी शब्दांऐवजी मराठी शब्द वापरताना मला खालील शब्दकोशांची विशेष मदत झाली.

| | |
|---|---|
| १) मराठी विश्वकोश, खंड १८. | |
| २) पारिभाषिक शब्दसंग्रह– | Central Hindi Directorate,<br>Ministry of Education,<br>Govt. of India. |
| ३) वैद्यानिक पारिभाषिक संज्ञा– | डॉ. गो. रा. परांजपे. |
| ४) स्थापत्य शिल्प कोश– | श्री. रा. वि. मराठे. |
| ५) इंजनिअरी शब्दावली, भाग १ व २– | Standing Commission for<br>Scientific & Technical Terminology,<br>Ministry of Education, Govt. of India. |

इंग्रजी पारिभाषिक शब्दांना पर्यायी मराठी शब्द वापरताना जरी संस्कृताधिष्टित शब्दांची प्रामुख्याने निवड करण्याचा प्रयत्न केला असला तरी तसे करताना मराठी भाषेची जडण घडण मी लक्षात घेतली आहे व संस्कृतप्रमाणेच इतर भाषांतील इतकेच काय पण इंग्रजी भाषेतीलही जे शब्द मराठीत रूढ झाले आहेत त्याना मी डावलले नाही. तसेच नवीन शब्द तयार करतांना भाषेतील समतोल बिघडून तीत कृत्रिमपणा न निर्माण व्हावा म्हणून शक्य तो प्रयत्न केला आहे.

प्रस्तुत पुस्तकाचे हस्तलिखित विभिन्न अवस्थातून जात असताना त्याची काळजीपूर्वक तपासणी करण्यात अनेकांची मला मदत झाली. छपाईचे कामही "सन्मित्र प्रिंटर्स," सांगली यानी काळजीपूर्वक व सुबक करून दिले याबद्दल त्या सर्वांचा मी आभारी आहे. व हे एक उपयुक्त कार्य करण्याची संधी महाराष्ट्र राज्य साहित्य–संस्कृति मंडळाने मजवर सोपविल्या-बद्दल मंडळाचा व विशेषतः मंडळाचे पूर्वीचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी व सध्याचे अध्यक्ष श्री. सुरेश बारलिंगे यांचा मी ऋणी आहे.

**सांगली** **वि. ह. केळकर**

**दिनांक २ सप्टेंबर १९८२**

To my dear wife, Joan, and my children
for their love and patience

(माझी प्रिय पत्नी जोन, आणि मुलांच्या
प्रेम आणि संयमाप्रीत्यर्थ)

# उपोद्घात

स्वास्थ्य अभियांत्रिकी शिकविणारा महाविद्यालयीन प्राध्यापक, आपल्या अशिलाच्या समस्या सोडवू इच्छिणारा सल्लागार अभियंता, अपशिष्टा (waste) विषयीच्या समस्या आणि त्यावरील उपाय नागरी अधिकाऱ्यांना समजावून सांगण्याइतके ज्ञान आवश्यकतया असलेला नगरपालिकेचा अभियंता आणि आपल्या कंपनीकडून पाणीपुरवठा दूषित होऊ नये अशी इच्छा असलेला औद्योगिक संयंत्रावरील अभियंता, अशांच्या सारख्या अनेक लोकांच्या गरजा पुऱ्या करणे ह्या या पुस्तकाचा उद्देश आहे.

अनेक भिन्नभिन्न उद्दिष्टे पुरी करू शकेल अशा पुस्तकांतून ते उपयुक्त होण्याकरता अनेक दृष्टिकोनातून या विषयाचा साहजीकच समाचार घ्यावा लागेल. ह्या कामाच्या संबंधीच्या कल्पना मी १९५१ पासून गोळा करू लागलो, व गेल्या दहा वर्षांत त्यांच्या रूपरेखेत अनेक वेळा मला बदल करावा लागला. अंतिम स्वरूपात या विषयाचे चार विभाग पाडण्यात आले आहेत.

पहिल्या विभागात, सभोवतालच्या परिस्थितीवर अपशिष्टाचा होणारा परिणाम, योग्य प्रकारे संयंत्राचे परिचालन करून अपशिष्टाचे प्रमाण कसे कमी करावे, संग्राहक नाल्यात (त्याची) विल्हेवाट होण्यापूर्वी लागणाऱ्या अंतिम उपचारांचे गणन कसे करावे, अपशिष्टावर कराव्या लागणाऱ्या उपचाराची अगर विद्यमान उपचारांच्या कार्यक्षमतेची निश्चित माहिती मिळविण्याकरता नाल्यातून कसे नमुने घ्यावे आणि शेवटी प्रदूषण वाढू नये म्हणून नाल्याचे संरक्षण कसे करावे, ह्या संबंधी औद्योगिक अपशिष्ट–अभियंत्यास अवश्य असणाऱ्या माहितीतील मूलभूत बाबींचा, समावेश केला आहे.

दुसऱ्या विभागात, अपशिष्टावरील उपचारांच्या उपपत्तींची काळजीपूर्वक माहिती गोळा केली आहे. समस्या एकमेकांशी तंतोतंत सारख्या नसल्यामुळे, अभ्यासकात–आणि आम्ही सर्व ह्या विषयाचे अद्यापि अभ्यासकच आहोत,– कोणची उपचारपद्धती आपणास सर्वांत जास्त उपयुक्त होईल हे ठरविता यावे म्हणून औद्योगिक अपशिष्टावरील उपचारांच्या संपूर्ण क्षेत्राचे सुसंगत चित्र प्राप्त करावे लागते. दुसऱ्या विभागात केवळ तरंगणाच्या आणि कलील द्रव्यांच्या निष्कासनासंबंधीच फक्त चर्चा केली नसून त्यांच्या प्रभावलोपन ( neutralization ), समानीकरण, प्रमाणीकरण; आणि विरघळलेल्या अकार्बनिक ( inorganic ) लवणांच्या निष्कासनासंबंधीही चर्चा केली असल्याने अपशिष्ट–जलोपचारावरील रूढ पाठ्यपुस्तकांपासून हा विभाग भिन्न आहे. उपपत्त्यांत फारसा बदल झाला नसल्याने अन्य लेखकांनी अभिव्यक्त केलेल्या उपपत्त्यांच्या सारख्याच त्या आहेत. तथापि विरघळलेल्या कार्बनी घनपदार्थांच्या निष्कासनांसंबंधी नवीन कल्पना या विभागात जरूर सादर करण्यात आल्या आहेत.

तिसऱ्या विभागात अभियांत्रिकी व्यवसाय पद्धतीवर जोर देण्यात आला आहे आणि समस्यांची प्रत्यक्ष उदाहरणे देऊन त्यांचीं उकल करून दाखविली आहे. कागदावर निर्देशित केल्याप्रमाणे प्रत्यक्षात सैद्धांतिकरित्या कार्य क्वचितच होऊ शकते; आणि जागेवर अनेकवेळा त्याप्रमाणे ते होतही नाही. त्याचीं अनेक कारणे असतात. अर्थशास्त्र, जनमत, व्यक्तिगत मतभेद, स्थानीय कायदे आणि रीतिरिवाज, विशिष्ट औद्योगिक अपशिष्टासंबंधीचे सामाजिक पूर्वानुभव, सल्लागार अभियंत्याचा विरोधी सल्ला, स्थानीय औद्योगिक विकास मंडळाचा दृष्टिकोन, आणि अन्य अनेक घटकांची, संकलित केलेले सिद्धान्त उत्तम प्रकारे व्यवहारात आणता येतील अगर कसे हे ठरविण्यास, मदत होते.

तिसऱ्या विभागातील प्रत्येक प्रकरणात मला माहीत आहेत अगर त्या मी स्वत: अंमलात आणल्या आहेत अशा बाबींची मी प्रत्यक्ष नोंद केली आहे. ज्याप्रमाणे वैध बाबींचा कायद्याच्या विद्यार्थ्याला अभ्यास करावा लागतो त्याप्रमाणे वाचकाला त्यांवरून विश्लेषणे आणि निष्कर्ष टप्प्याटप्प्याने समजून घेता येतील. ह्या विभागात अंतर्भूत असलेला मूलभूत प्रश्न, औद्योगिक अपशिष्टावर स्वतंत्रपणे उपचार करावेत अगर नागरी व्यवस्थेच्या जोडीने करावेत, हा आहे. अनेक उदाहरणांत, सैद्धांतिकरीत्या संयुक्तपणे उपचार करण्याची जरूरी असते, पण प्रत्यक्षात स्वतंत्र उपचाराची मागणी केली जाते. म्हणून अपशिष्टावरील उपचाराच्या विशिष्ट पद्धतीची शिफारस करण्याची कारणे आपणास माहीत असली पाहिजेत.

धंद्यातील विस्तार आणि बाजारातील फेरबदल, यांच्यामुळे अलीकडे लागणाऱ्या संयंत्राच्या पुन:स्थापनाच्या बाबतीत जागेच्या निवडीकरता स्वतंत्र प्रकरण असणे विशेष प्रकारे उपयुक्त होईल. देशातील बरीचशी जमीन वापरली जाईल तसतसे उद्योगधंदे, शहरे, राजमार्ग, उपवने, आणि जलाशय, ह्यांच्या जागांच्या निवडीस अधिक महत्व येईल.

महत्वाच्या सर्व द्रवीय औद्योगिक अपशिष्टांच्या संबंधी चौथ्या विभागात स्वतंत्र विवेचन केले आहे. ह्या विषयावर वास्तविक संपूर्ण पुस्तकाची, सामान्यत:, गरज लागेल. नवीन दृष्टिकोन वापरून सर्व उद्योगधंद्यांचे मी पांच प्रकारात वर्णन केले आहे : परिधान (apparel), अन्नप्रक्रिया, द्रव्ये, रसायने, आणि ऊर्जा हे ते प्रकार आहेत. प्रत्येक अपशिष्टाचा सर्वंकष अभ्यास सादर करण्याचा माझा प्रयत्न नाही; कारण त्या प्रत्येकाकरताच केवळ एकेक स्वतंत्र पाठ्यपुस्तक लागेल. त्या ऐवजी प्रत्येक द्रवीय अपशिष्टांचे स्वभावधर्म, मूळ स्वरूप, वैशिष्टचे आणि अधिमान्य उपचार अशा स्वरूपात संघनित मूल्यांकन केले आहे.

याशिवाय, प्रत्येक प्रकारच्या अपशिष्टासंबंधी लागणाऱ्या माहितीचा संदर्भ अतिसहज उपलब्ध होईल अशी विस्तृत ग्रंथसूचि तयार केली आहे. विशिष्ट प्रकारच्या अपशिष्टावर जलद आणि कार्यक्षम संशोधन करू इच्छिणाऱ्यांनाही ती अतिमोलाची होईल.

हृया पुस्तकात सादर केलेली विस्तृत आणि विभिन्न माहिती कोणाही एका लेखकाला गोळा करणे शक्य नसल्याने, हे पुस्तक लिहिताना मी अन्य लेखकांच्या हृया विषयावरील मूळ लिखाणातून ती भरीव प्रमाणात उसनवार घेतली आहे आणि त्याबद्दल हृया लेखकांच्या तसेच डॉ. विलेम रुडॉल्फ्स ( Willem Rudolfs ), डॉ. Hovhannes Heukelekian, आणि डॉ. हेरोल्ड ऑर्फोर्ड ( Harold Orford), हृया माझ्या शिक्षकांच्या ऋणाचा कृतज्ञतेने मनापासून उल्लेख करीत आहे. तसेच शेकडो मूलगामी संशोधक व ज्या कालिकांत त्यांचे संशोधन प्रसिद्ध झाले आहे त्यांचा मी ऋणी आहे. हृया पुस्तकात उतारे उद्धृत करण्याची ज्या खालील प्रकाशकांनी परवानगी दिली त्यांचा आणि "जर्नल ऑफ दी वॉटर पोल्यूशन कंट्रोल फेडरेशन," वॉशिंग्टन, डी. सी; "वेस्ट्स इंजनिअरिंग," न्यूयॉर्क, एन. वाय; "इंडस्ट्रियल वॉटर अॅन्ड वेस्ट्स," शिकॅगो, इलिनॉइस, आणि "प्रोसीडिंग्ज ऑफ दी पडर्यू युनिव्हर्सिटी इंडस्ट्रियल वेस्ट कॉन्फरन्सेस," लफेट ( Lafayette ), इंडियाना, इत्यादि असंख्य संस्थांचा मी गुणगौरव करतो.

सायरॅक्यूज, न्यूयॉर्क.
ऑक्टोबर १९६२.

एन्. एल्. एन्.

# अनुक्रमणिका

## विभाग I

## मूलभूत ज्ञान आणि प्रथा

## विभाग II

## उपपत्त्या

## विभाग III

## प्रयुक्ति

# विभाग IV

## महत्वाची औद्योगिक अपशिष्टे

"संस्कृतीच्या सुरवातीपासून प्रत्येक राष्ट्राची मूलभूत संपत्ति आणि विकासाचा उगम तिच्या नैसर्गिक साधनांतून बऱ्याच प्रमाणात झालेला आहे.

भरपूर पाणीपुरवठ्याचे आपल्या राष्ट्राला वरदान मिळाले आहे; परंतु आपणाला ह्या वरदानावर आत्मसंतुष्ट होऊन चालणार नाही. हल्ली आपण ३०० अब्ज गॅलनपेक्षा जास्त पाणी वापरतो, पण त्यातील बऱ्याचशा पाण्याचा अपव्यय होतो. १९८० सालात आपणास दररोज ६०० अब्ज गॅलन पाण्याची जरुरी लागेल......

आपली लोकसंख्या आणि उद्योग जलदगतीने वाढत आहेत आणि त्यात शीघ्रगतीने बदल होत आहे......

आपल्या देशातील नद्या आणि नाल्यांतील प्रदूषण भीतिदायक परिसीमेला पोहोचले आहे... ..

घरगुती, शेतकीविषयक, औद्योगिक, करमणुकीच्या—अशा सर्व प्रकारच्या गरजा पुऱ्या होण्याकरता आपणाला तेच पाणी पुन: पुन: वापरावे लागेल आणि त्यासाठी त्याचा दर्जा आणि राशी टिकवावी लागेल. देशातील अनेक क्षेत्रात आपणास पाणीपुरवठ्याच्या नवीन स्थानांची जरुरी भासेल, पण सर्व क्षेत्रांत जे पुरवठे आपणापाशी आहेत त्यांचे संरक्षण आपणास करावेच लागेल. सध्याचे सुधारणेचे प्रयत्न पुरेसे नाहीत......स्वत:च्या अपशिष्टांवरील उपचारांच्या बाबतीत उद्योगधंदे फार मागे आहेत."

अध्यक्ष **जॉन एफ. केनेडी**

फेब्रुवारी १९६१ मध्ये महासभेस पाठवलेला संदेश

# : १ : अपशिष्टांचा नाल्यावरील परिणाम आणि अपशिष्ट-जलोपचार-संयंत्रे-

## १–१. नाल्यांच्यावरील परिणाम-

सर्व औद्योगिक अपशिष्टे नाल्याच्या सामान्य जीवनावर कोणच्यातरी स्वरूपात परिणाम करतात (४)* जेव्हा हा परिणाम "सर्वोच्च वापराकरता" नाल्यास स्वीकृती देता न येण्या इतका जास्त होतो तेव्हा तो (नाला) प्रदूषित झाला आहे असे म्हणतात. सर्वोच्च वापर या, शद्बांनी जो आशय व्यक्त केला आहे तोच त्याचा अर्थ आहे. पिण्याकरता, आंघोळीकरता मासेमारीकरता आणि इतर कारणाकरता हा उपयोग केला जातो. ६ व्या प्रकरणात ह्यांच्या उपयोगाचे तपशीलवार विवेचन केले आहे. नाला प्रदूषित अवस्थेप्रत पोहोचण्यापूर्वी, अपशिष्टाची राशि काही प्रमाणात पचवू शकतो. सर्व साधारणपणे, ज्यांचा लोक वापर करीत नाहीत असे मोठे, जलद वाहणारे आणि दूरवर्ती नाले अपशिष्टांची राशी बऱ्याच प्रमाणात सामावून घेऊ शकतात. पण कोणच्याही प्रकारचे प्रदूषक द्रव्य अति प्रमाणात वाढल्यास त्यांचा उपद्रव होतो आणि प्रदूषणाची परिस्थिती निर्माण होते एकादा नाला प्रदूषित झाला आहे असे जेंव्हा बोलले जाते तेव्हा विशिष्ट प्रकारच्या प्रदूषकाने तो **अतिसंपृक्त** झालेला असतो. खालील **द्रव्ये प्रदूषणास कारणीभूत होऊ शकतात** :

| | |
|---|---|
| अकार्बनिक लवणे | तापविलेले पाणी |
| अम्ले आणि/अथवा क्षार | रंग |
| कार्बनिक द्रव्य | विषाक्त ( toxic ) रसायने |
| तरंगते घनपदार्थ | सूक्ष्म जीव |
| तरक ( पाण्यापेक्षा हलके ) | किरणोत्सर्गी द्रव्ये |
| घनपदार्थ | फेस निर्माण करणारे द्रव्य |

बहुतेक औद्योगिक अपशिष्टात, तसेच निसर्गातही अकार्बनिक द्रव्ये आढळून येतात. त्याच्यामुळे पाण्यात "कठोरता" ( hardness ) निर्माण होते आणि औद्योगिक, नागरी, शेतीविषयक कामासाठी अशा नाल्यातील पाण्याचा उपयोग करणे इष्ट असत नाही. कठोर पाण्याच्या वापरामुळे अनेक अडचणी निर्माण होतात पण त्यापैकी कांही थोड्या अडचणींचाच येथे उल्लेख केला आहे.

---

* कंसातील आकडे प्रकरणाच्या शेवटी दिलेल्या संदर्भ ग्रंथ सूचीतील संदर्भ दाखवितात

लवणयुक्त पाण्यामुळे शहरांतील पाण्याचे वितरण होणाऱ्या नळांत पोपडे जमतात, त्यामुळे प्रवाहाला होणाऱ्या प्रतिरोधात वाढ होते आणि नळांची एकंदर क्षमता कमी होते. पाण्यातील कठोरतेमुळे वस्त्र-निर्मिती-उद्योगातील रंगकामास व सुरानिर्मितीमधील सुराकार्यालय आणि कॅनिंग, ह्या उद्योगातून तयार होणाऱ्या पदार्थांच्या दर्जास बाधा येते. कठोर पाण्यात असलेले मॅग्नेशियम सल्फेट विशेषेकरून त्रासदायक असते आणि माणसावर त्याचा विरेचक ( cathartic ) परिणाम होतो. क्लोराइड आयनांच्यामुळे विद्युत्-विसंवाही ( insulating ) कागदाची संवाहिता ( conductance ) अनिष्ट प्रमाणात वाढते. वस्त्र - निर्मिती करणाऱ्या गिरण्यात तयार झालेल्या उच्च प्रतीच्या कागदांवर लोहामुळे ठिपके आणि डाग पडतात; तसेच कॅनरीमध्ये प्रक्रिया केलेल्या मटरच्या दाण्यावर कार्बोनेटमुळे कठीण टरफले तयार होतात. कठोरता असलेल्या बहुतेक प्रकारच्या पाण्यामुळे बॉयलरमधील नळचांवर पापुद्रे तयार होतात आणि ज्वलन कक्षांतून पाण्याकडे होणाऱ्या उष्णतेच्या संक्रामणात ( transfer ) बाधा पडते. ह्या अवस्थेस " बॉयलर स्केल " असे म्हणतात. त्यामुळे बॉयलरची कार्यक्षमता कमी होते आणि परिचालन खर्चात वाढ होते.

आणखी एक तोटा असा असतो कीं, योग्य पर्यावरण– ( environment ) परिस्थितीत, विशेषेकरून, नायट्रोजन आणि फॉस्फरस सारख्या अकार्बनिक द्रव्यांच्या लवणामुळे पृष्ठीय जलातील अतिसूक्ष्म (शेवाळे) वनस्पतींची वाढ होण्याची प्रवृत्ती असते. जरी शेवाळे दुय्यम प्रकारचे प्रदूषण असले तरी त्याला अत्यंत महत्व येऊ शकते. अपशिष्ट - अभियंत्यांनी ह्या अपशिष्ट - द्रवांच्या अकार्बनिक पदार्थांच्याकडे अतिशय कमी लक्ष दिले आहे.

ह्या समस्येचे लक्षात घेण्यासारखे आणखी एक अंग आहे; कठोरतेचा संपूर्ण अभाव असल्यास संक्षारक आणि/अथवा बेचव पाणी निर्माण होते. पाण्यात कांही प्रमाणात लवणे (कठोरता) असली तर पृष्ठभागावरील संरक्षक पटलाच्या विकासात वाढ होते आणि त्यामुळे पाणी अधिक चवदार बनते. उदाहरणार्थ : भट्टीतून माल तयार करणाराना असे वाटते कीं, कॅलशियमच्या विशेष सांद्रणामुळे पावावर सोनेरी पिंगट आवरण तयार होण्यास मदत होते.

म्हणून पाणी पुरवठ्यात काही अकार्बनिक द्रव्ये असणे इष्ट असते. (पाण्यातील अशा, द्रव्याच्या) अस्तित्वापेक्षा त्याची राशि ही महत्वपूर्ण बाब असते.

रासायनिक आणि औद्योगिक संयंत्रातून सोडलेल्या अम्लामुळे आणि / अथवा क्षारामुळे पोहणे आणि नौकानयनासारख्या केवळ करमणुकीकरताच नव्हे तर माशांच्या आणि इतर जलीय जीवांच्या निर्मितीस हे नाले उपयुक्त होत नाहीत. जर पाण्यातील pH चे मूल्य ७ च्या खाली आणण्यास पुरेशी अशी सल्फ्यूरिक अम्ले असली आणि मुक्त क्लोरीन पाण्यात नसले तर

पोहोणारांचे डोळे जळजळण्यास, कोळयांची जाळीं जलदीने खराब होण्यास, जहाजांच्या सांगाडेचावर ( Hull ) गंज जलद चढण्यास ती कारणीभूत होतात. जलीय जीवांच्यावरील सल्फ्यूरिक अम्लाची विषाक्तता ( toxicity ) ही pH चे परिणामी फलन ( function ) असते; म्हणजेच जी मात्रा मृदु पाण्यात हानिकारक होते तीच कठोर अगर उच्चप्रमाणात प्रतिरोधित केलेल्या ( buffered ) पाण्यात अगदी निरुपद्रवी होऊ शकेल. जर मासे जिवंत ठेवावयाचे असले तर नाल्यातील pH, ४·५ पेक्षा कमी असता कामा नये असे सर्वांचे एक मत आहे. तथापि प्रदूषणाच्या ओद्योगिक स्थानापाशी pH चे मूल्य २ इतके कमी आणि ११ इतके जास्त असणे शक्य असते.

क्षाराचे एकादे उदाहरण द्यावयाचे झाल्यास, पाण्यात उच्चप्रमाणात विलेय असलेल्या सोडियम हायड्रॉक्साइडचे देता येईल. त्यामुळे क्षारता आणि pH वर परिणाम होतो. साबण तयार करणे, वस्त्रे रंगविणे, रबराची पुनःप्राप्ती करणे, कातडी कमावणे इत्यादि धंद्यांचा समावेश असलेल्या कारखान्यातील अपशिष्टांत सोडियम हायड्रॉक्साइड आढळून येते. ज्या नाल्यातील पाण्यात दर दशलक्ष भागांस २५ भागांइतके कमी सोडियम हायड्रॉक्साइड असते ते नाले माशांना मारक ठरल्याची नोंद आहे. बॉयलरच्या पोषण - जलातील क्षाराच्या दाहक क्रियेमुळे नळ ठिसूळ होतात. ह्या प्रदूषकांमुळे जलोपचार संयंत्रांवर प्रतिकूल परिणाम होतात. उदाहरणार्थ, ज्या उपचार संयंत्रात तुरटीचा किलाटक म्हणून वापर केला जातो तेथे अम्ल आणि क्षारांचे भार धक्का बसण्याइतके असतात आणि पुंजके बनण्याच्या क्रियेत त्यांचा अडथळा येतो.

**कार्बनिक** द्रव्यामुळे नाल्यातील ऑक्सिजनचा साठा संपुष्टात येतो आणि अप्रिय चव, वास आणि पूतिदूषित ( Septic ) परिस्थिती निर्माण होते. ऑक्सिजनच्या अभावामुळे मासे व बहुतेक जलचर जीव गुदमरून जातात आणि नाल्यातील इतर परिस्थितीसह ऑक्सिजनच्या प्रमाणावर माशांचे जीवन आणि मरण अवलंबून राहते. मासे जिवंत राहण्याकरता विलीन ऑक्सिजनचे प्रमाण दर दशलक्ष भागात ३ ते ४ भाग, ppm, असावे लागते. ही क्रांतिक व्याप्ती असल्याचे मानले जाते. पाण्यात ३ ppm ऑक्सिजन असताना माशांच्या काही जाती जगू शकत नाहीत पण तितकीच ऑक्सिजनची कमी पातळी असताना अन्य जातींच्या माशांवर किंचितही परिणाम होत नाही, हे आपणास माहीत आहे. उदाहरणार्थ, ट्राऊट मासें संवेदनक्षम असतात आणि त्याना ५ ppm च्या जवळपास ऑक्सिजनचे सांद्रण लागते. पण अपमार्जक ( scavanger ) कार्प मासे १ ppm इतका कमी ऑक्सिजन असतांनाही जगू शकतात. कार्बनिक पदार्थांच्यामुळे कमी झालेली ऑक्सिजनची ही त्रुटी स्वयमेव नाल्याच्या प्रदूषणातील एक अत्यंत आक्षेपार्ह घटक आहे असे मानण्यात येते.

फेनॉल्ससारखी काही विशिष्ट कार्बनिक रसायने घरगुती पाणी पुरवठ्यात निर्माण झालेल्या चवीस कारणीभूत असतात. ही वस्तुस्थितीसुद्धा महत्वपूर्ण आहे. फेनॉल्स असलेल्या काही नद्यांतील पाणी विहिरींत झिरपून जाते आणि औषधासारखी आक्षेपार्ह चव निर्माण होते. उघड दिसणाऱ्या चव निर्माण करणाऱ्या प्रदूषकांच्या जोडीला तितकेसे उघड न दिसणारे कार्बनिक द्रव्यही पाण्यात असते व त्यामुळे अस्वस्थता आणि रोगनिर्मितीची शक्यता असते.

**तरक घनपदार्थ** तळाशी बसतात अगर काठावरून वाहून जातात आणि त्यांचे विघटन होते. त्यामुळे दुर्गंधी सुटते आणि नदीच्या पाण्यातील ऑक्सिजन कमी होतो. नाल्यातील ऑक्सिजनचा अंश कमी झाल्याने पुष्कळवेळा मासे मरण पावतात व तळाशी सांचणाऱ्या घन–पदार्थांच्या अंडजनन क्षेत्रांवर ( spawning grounds ) आवरण घालण्याकडे आणि प्रचारणास ( propogation ) अवरोध करण्याकडे प्रवृत्ति निर्माण होते.

दृश्य अवमलामुळे विरूप देखावा निर्माण होतो आणि मनरंजनासाठी नदीचा उपयोग करता येत नाही. ह्या घनपदार्थांच्यामुळे जलमार्गातील गढूळपणाही वाढतो. जरी प्रत्येक नाल्याचा घनपदार्थांची राशि सुरक्षितपणे वाहून नेण्याची क्षमता एकसारखी नसली तरी बहुतेक प्रदूषणावर नियंत्रण घालणाऱ्या प्राधिकरणांचे असे विनिर्देश असतात कीं, नाल्याच्या योग्य वापरास बाधा न येईल अशा प्रकारे योग्य मर्यादेतच तरंगते पदार्थ नाल्यात सोडावेत.

( पाण्यापेक्षा हलके ) तरते घनपदार्थ– तेले, ग्रीज, आणि पृष्ठभागावर तरंगणाऱ्या अन्य द्रव्यांचा ह्यात समावेश होतो. त्यांच्यामुळे नदीचे दृश्य बिघडते; शिवाय पाण्यातून प्रकाश जाण्याच्या मार्गांत अडथळा येऊन वनस्पतीरूपी महत्वाच्या अन्नाची वाढ कमी होते. (१) नैसर्गिक पुनर्वातनास अडथळा येणे; (२) विशिष्ट माशांना व जलजीवाना विषाक्त ठरणे;. (३) जलपृष्ठावर पुरेशाप्रमाणात पसरले असताना आगीचा धोका निर्माण होणे; (४) किनाऱ्यावरील वनस्पतींचा नाश होणे; (५) बॉयलरमध्ये भरण्याकरता आणि प्रशीतनाकरता पाणी वापरता न येणे; (६) पाणी बेचव बनून त्यात दुर्गंधी निर्माण होणे आणि निस्यंदकातील वाळूवर चिवट पटलाचा लेप बसून जलोपचाराच्या रूढ पद्धतीत अडचण निर्माण होणे; (७) पाण्याच्या पृष्ठभागावर विद्रुप पटल निर्माण होणे, हे तेलाच्या नाल्यातील अस्तित्वावरील विशिष्ट आक्षेपांपैकी काही आहेत.

**तापवलेले पाणी–** संघनित्रातील ( Condenser ) पाण्यासारखी अपशिष्टे नाल्यात सोडल्यामुळे पाण्याच्या तपमानात वाढ होऊन अनेक प्रतिकूल परिणाम घडून येतात. उदाहरणार्थ, ज्या नाल्यातील तपमान तासातासाला बदलते त्यातील पाण्यावर नागरी व औद्योगिक जलोपचार संयंत्रात प्रभावीपणे करणे फार अवघड असते. तसेच औद्योगिक प्रशितनात प्रवाहातील

तापवलेल्या पाण्याचे मोल कमी असते. वस्तुतः, एखाद्या उद्योगामुळे नाल्यातील तपमान इतके वाढते कीं, त्याच्या शेजारील अनुप्रवाही दिशेकडील उद्योगात त्या पाण्याचा वापर करता येत नाही; शिवाय, थंड पाण्यापेक्षा गरम पाणी हलके असल्याने त्याचे स्तरीभवन होते आणि परिणामतः बरीचशी मासळी उलट नाल्याच्या तळाशी जाते. थंड पाण्यापेक्षा गरम पाण्यात विरघळलेला ऑक्सिजन कमी असल्यामुळे जलीय जीवांची हानी होते आणि अशा गरम पृष्टजलात सोडलेल्या कोणच्याही कार्बनिक प्रदूषणामुळे नैसर्जिक जैवी अवक्रमणाकरता ( biological degradation ) कमी ऑक्सिजन उपलब्ध होतो तसेच उच्चतम तपमानात जीवाणुक्रिया ( bacterial action ) वाढते आणि परिणामतः नाल्यातील ऑक्सिजनच्या मूलसामग्रीचे त्वरित रिक्तीकरण होते.

**रंग–** वस्त्रनिर्मिती आणि कागद गिरण्या, कातडी कमावण्याचे कारखाने, खाटिकखाने, व अन्य उद्योगात निर्माण होणारा रंग हा प्रदूषणाचा द्योतक असतो. अपशिष्ट–जलातील संमिश्रणे प्रकाशातील विशिष्ट तरंग–लांबींचे शोषण करतात आणि उरलेल्यांचे परावर्तन होते. ही गोष्ट नाल्यांतील रंगनिर्मितीस कारणीभूत असल्याचे सामान्यपणे मान्य करण्यात आले आहे. रंगामुळे नाल्यात सूर्यप्रकाशाचे संक्रामण होण्यास अडथळा येतो व म्हणून प्रकाश–संश्लेषण–( Photo synthesis ) क्रियेत घट होते. तसेच वातावरणातून ऑक्सिजनचे अवशोषण होण्यासही अडथळा येतो– अर्थात यासंबंधी निश्चित पुरावा उपलब्ध नाही.

उद्योगधंद्यात अनेकवेळा अदृश्य प्रदूषणापेक्षा दृश्य प्रदूषणामुळे अधिक अडचणी निर्माण होतात. निरुपद्रवी व अदृश्य असे प्रदूषण शासकीय संस्थांच्या कडून चालू दिले जाते, पण दृश्य प्रदूषणाच्या बाबतीत अशी परिस्थिती असत नाही. खाटिक खान्यातील अपशिष्टांचे लाल अगर गडद तपकिरी रंग, कागद गिरण्यांतील अपशिष्टांचे तपकिरी रंग, वस्त्रनिर्मितीच्या गिरण्यांतील अपशिष्टांचे निरनिराळे भडक रंग, आणि मुलामा देण्याच्या कारखान्यांतील अपशिष्टांचे पिवळे रंग, यांच्यामुळे अशा उद्योगधंद्यावर प्रत्यक्षपणे लोकांचा राग अनेकवेळा केंद्रित होतो. अशा सहज दिसून येणाऱ्या प्रदूषणाविरुद्ध तक्रार होणे स्वाभाविकच आहे. प्रदूषण झाले आहे असे दिसून येत असलेल्या नद्यांच्या बाजूंच्यावरील मालमत्तेचे मूल्य घटते. औद्योगिक अपशिष्ठांनी उच्च प्रमाणात विवर्ण झालेल्या नाल्यांत थोडेच लोक पोहोतील, नौकानयन करतील, अगर मासे पकडतील. याशिवाय औद्योगिक व नागरी अपशिष्टांच्या संयंत्रांना फार अडचणी सोसाव्या लागतात व अनुपचारित पाण्यातून रंग नाहीसा करण्यात अति अल्प यश प्राप्त होते.

**विषाक्त रसायने–** अकार्बनिक आणि कार्बनिक अशी दोन्हीही विषाक्त रसायने, अत्यल्प प्रमाणात सांद्रण झाले असले तरी, गोड्या पाण्यातील माशांना व अन्य जलजीवांना

विषकारक होऊ शकतात. नागरी उपचार–संयंत्रातून ह्या संमिश्रणांपैकी अनेकांचे निष्कासन झालेले नसते आणि माणसाच्या पचन व्यवस्थेवर संचयी परिणाम होतो. टॉक्सॅफेन, डीलड्रिन, आणि डायक्लोरोबेंझेन या कृमिनाशकांच्यामुळे मासे मरून जातात असा त्यांच्यावर आरोप केला जातो. कापूस आणि तंबाकूवर भुकटी फवारण्याकरता वापरण्यात आलेल्या कृमिनाशकांचा भारी पावसानंतर जास्तीत जास्त परिणाम होतो; म्हणून द्रावणात ते अधिक विघातक असतात. तरीसुद्धा कृमिनाशक आणि मूषक नाशक औषधे नाल्यातून शोधून काढणे कठीण असते.

वस्त्रनिर्मिती कारखाने आणि कंपन्यांच्या करता रासायनिक उद्योगांनी तयार केलेली व उच्च प्रमाणात गुंतागुंत असलेली रासायनिक संमिश्रणे मत्स्यजीवनास अत्यंत विषाक्त असल्याचे सिद्ध झाले आहे. नवीन विशिष्ट प्रकारचे संश्लिष्ट तंतू निर्माण करण्या करता वापरण्यात येणाऱ्या कच्चा द्रव्याचे ॲक्रिलोनायट्राइल हे एक उदाहरण आहे.

**कोष्टक– १–१.**

**पाणी पुरवठ्यातील रासायनिक घटक अगर संमिश्रणांच्या अंशावर घातलेल्या मर्यादा (६).**

| | स्वाभाविक अनिवार्य मर्यादा, ppm | शिफारसित मर्यादा, ppm |
|---|---|---|
| शिसे | ०-१ | |
| फ्ल्यूराइड | १-५ | |
| अर्सेनिक | ०-०५ | |
| सेलेनियम | ०-०५ | |
| क्रोमियम (हेक्सॅव्हॅलंट) | ०-०५ | |
| तांबे | | ३-० |
| लोह व मॅंगेनीज एकत्रितपणे | | ०-३ |
| मॅग्नेशियम | | १२५ |
| जस्त | | १५ |
| क्लोराइड | | २५० |
| सल्फेट | | २५० |
| फॅनॉलच्या स्वरुपात फेनालिक संमिश्रणे | | ०-००१ |
| एकूण घनपदार्थ – इष्ट– | | ५०० |
| एकूण घनपदार्थ – अनुज्ञेय– | | १००० |
| स्वाभाविक कार्बोनेट (Ca Co 3) | | १२० |
| कठोरतेवरील अतिरिक्त क्षारता (Ca Co 3) | | ३५ |
| p H (25oc) | | १०-६ |

काही लवणात कमी सांद्रण असले तरी ती बहुतेक विशिष्ट प्रकारच्या जलजीवांना विषाक्त होतात. म्हणून ४०० ppm सांद्रण असलेली क्लोराइडे, तसेच ५ ppm सांद्रणाची हेक्सँव्हॅलंट क्रोमियम संमिश्रणे माशांना विषकारक असतात असे सांगण्यात येते. ०-१ तें ०-५ ppm इतक्या कमी सांद्रणात तांबे जीवाणु व सूक्ष्म जीवांना विषकारक ठरते, आणि जरी ऑयस्टरच्या आळ्यांच्या विन्यासा ( setting ) करता तांब्याचे सांद्रण ०-०५ ते ०-०६ लागले तरी त्यांच्यातील काही जातींना ०-१ ते ०-५ च्या पेक्षा जास्त सांद्रण विषाक्त ठरते. ही तीन्ही लवणे नाल्यात अनेकवेळा आढळतात.

P2 O5 च्या सारखी गुंतागुंतीची अकार्बनिक फॉस्फेटे, जलशुद्धीकरण संयंत्रातील सामान्य किलाटन आणि अवसादन क्रियात, ०-५ ppm इतक्या कमी पातळीत असताना सुद्धा दिसून येण्या इतके अडथळे आणतात. ही समस्या सोडविण्यासाठी किलाटनाची मात्रा वाढवावी लागते व अवसादन कालावधीत वाढ करावी लागते (२). दर दशलक्ष भागांत एक भागापेक्षा जास्त संकेंद्रण असलेली फेनॉल्स नाल्यात असणे आक्षेपार्ह असल्याचे आढळून आले आहे. यूनायटेड स्टेटस सार्वजनिक स्वास्थ्य सेवा कार्यालयाने शिफारस केलेल्या पाण्याच्या दर्जाच्या मर्यादांची यादी कोष्टक १–१ मध्ये दिली आहे (६).

**सूक्ष्म जीव–** कातडी कमावण्याचे कारखाने आणि खाटिक कारखान्यासारख्या काही उद्योगांतून जीवाणू असलेली अपशिष्टे प्रस्रावित होतात. भाज्या आणि फळांची कॅनरीसारखी संयंत्रे नाल्यातील जीवाणु–संगदूषणात ( contamination ) भर घालतात. हे जीवाणु, सामान्यपणे दोन प्रकारचे असतात: (अ) जसजशी अनुप्रवाही दिशेने अपशिष्टे खाली जातात तसतसे कार्बनिक द्रव्याच्या अवक्रमणास ( degradation ) मदत करणारे जीवाणू. ह्या प्रक्रियेत नाल्यात " बीजारोपण " होण्यास व ऑक्सिजनचे पाण्यात अवनमन (sag) त्वरित होण्यास मदत होते. (आ) केवळ अन्य जीवाणूनाच नव्हे तर मनुष्यप्राण्यालासुद्धा रोगमूलक ठरणारे जीवाणू ज्या ठिकांणी कधीकधी अँथॉक्सने संसर्गित (infected) झालेल्या प्राण्यांच्या कातड्यावर प्रक्रिया करण्यात येते तेथील अशा कातडी कमावण्याच्या कारखान्यांत निर्माण झालेला अँथॉक्स जीवाणू हे दुसऱ्या प्रकारचे उदाहरण आहे.

**किरणोत्सर्गी द्रव्ये–** भंजनक्षम ( fissionable ) द्रव्याची निर्मिती, शांततेच्या काळातील अणुशक्तीचा वाढता वापर, अणुशक्तीच्या सुविधांचा प्रक्षेपित विकास यांच्यामुळे स्वास्थ्य– अभियांत्रिकी क्षेत्रात नवीन जटिल समस्या उद्‌भवल्या आहेत. किरणोत्सर्गी अपशिष्टांची विल्हेवाट लावण्याची समस्या अनन्य असते (१), कारण विकिरणाचे ( radiation ) परिणाम तात्कालिक अगर दीर्घकालीन असू शकतात, आणि जिवंत कोशावर संचयी हानीकारक परिणाम करणारे विकिरण हे एक छद्‌मी ( insidious ) संदूषक असते. $Sr^{९०}$ आणि $Cs^{१३७}$ सारख्या

उच्च प्रमाणात क्रियाशील असलेल्या काही विशिष्ठ किरणोत्सारी समस्थानीय द्रव्यांतून ( radio isotopes ) दीर्घकालपर्यंत ( मानवी अवस्थेच्या अनेक पिढ्या ) शक्ती बाहेर पडत असते. पर्यावरणातील ( environment ) संदूषकांचे अस्तित्व निर्धारित करण्याकरता, सामान्यपणे वापरण्यात येणाऱ्या पद्धतीनी ह्या विकिरणाचा सहजा सहजी पत्ता लागत नाहीं. तसेच नाल्याच्या जीवन शास्त्रविषयक आणि जलविज्ञानविषयक वैशिष्ठ्यांचा विकिरणशीलतेच्या ( radio activity ) उद्ग्रहणावर ( uptake ) गाढा प्रभाव पडणे शक्य असते.

सध्या भंजनित मिश्रपदार्थातील आजीव उपयोगाकरता, अणुशक्ति आयोगाच्या मताप्रमाणे, लागणारे कमाल सुरक्षित सांद्रण दर मिलिलिटरला $१ \times १०^{-७}$ मायक्रोक्यूरी इतके असावे लागते म्हणून नियंत्रक संस्थांच्या तसेच लोकांच्या दृष्टीने किरणोत्सर्गी अपशिष्टांमुळे होणाऱ्या नाल्यांच्या पृष्ठभागांवरील संदूषणास प्रतिबंध करणे ही अतिशय काळजीची बाब झाली आहे (५)

**फेस निर्माण करणारे द्रव्य–** वस्त्र निर्मिती करणाऱ्या गिरण्या, लगदा आणि कागदाच्या गिरण्या,आणि रासायनिक संयंत्रे, यांच्यासारख्या कारखान्यांतून प्रस्रावित केलेल्या फेस निर्माण करणाऱ्या द्रव्यामुळे संग्राहक नाल्यात अनिष्ट देखावा दिसू लागतो तो संदूषणाचा सूचक असतो. आणि नाल्यातील ऑक्सिजनच्या अभावापेक्षाही अनेक वेळा तो जास्त आक्षेपार्ह असतो. ( या कारणामुळे) अनेक खटले कोर्टात लढवले गेले आहेत आणि पाण्यातील अदृश्य अंशांच्यापेक्षा नाल्यातील देखावा विषयक पुराव्यावरून ते जिंकले गेले आहेत. फेस निर्माण करणारी अपशिष्टे प्रस्त्रावित करण्याच्या बाबतीत उद्योगधंद्याना ही बाबच प्रत्यक्षपणे मार्गदर्शक म्हणून उपयोगी पडेल.

## १–२. वाहितमलाच्या (sewage) संयंत्रावरील परिणाम–

घरगुती मलव्यवस्थेत आपल्या अपशिष्टांची चांगल्या प्रकारे विल्हेवाट लावणे शक्य असते असे गृहीत धरणे उद्योगधंद्याच्या बाबतीत स्वाभाविकच असते. आपल्या शहरातील निस्सारण व्यवस्थेत वाहून येणारी कोणचीही अपशिष्टे स्वीकारण्याची आपली जबाबदारी आहे असे नागरी अधिकाऱ्यांना बरेचवेळा वाटते. परंतु अपशिष्टांच्या गुणधर्मांविषयीची वस्तुस्थिती, ती हाताळण्याची मलव्यवस्थेची क्षमता, आणि अपशिष्टांचे मलव्यवस्थेवर होणारे परिणाम, हे समजून घेतल्याशिवाय कोणच्याही अपशिष्टाच्या प्रस्त्रावास नागरी अधिकाऱ्यांनी स्वीकृती देऊ नये. शहरी निस्सारण व्यवस्थेच्या **सर्व** घटकांच्यावर होणारे अपशिष्टांचे परिणाम जाणून घेणे अत्यंत महत्वाचे असते.

औद्योगिक अपशिष्टांच्या प्रदूषणाचे निष्कासन करण्यासाठी वाहितमलोपचारी संयंत्र पुरेशा क्षमतेचे– योग्य प्रकारचे– असले पाहिजे. कोणच्याही प्रकारचे औद्योगिक अपशिष्ट

हाताळू शकेल अशा वाहितमलोपचार संयंत्राचे अभिकल्पन करणे सैद्धांतिकरीत्या जरी शक्य असले तरी सध्याची संयंत्रे हे उद्दिष्ट पार पाडू शकत नाहीत.

मलवाहिन्या आणि उपचार संयंत्रावरील परिणाम सहज निश्चित करता येतील अशा अपशिष्टांच्या प्रदूषणविषयक वैशिष्ठ्यांचे स्थूल वर्गीकरणे खाली केले आहे.
१) जीवरसायनी ऑक्सिजन मागणी (Biochemical oxigen demand); २) तरंगते घनपदार्थ; ३) तरती आणि रंगित द्रव्ये; ४) राशि; आणि ५) अन्य हानिकारक घटक.

घरगुती वाहितमलाची प्रदूषणविषयक वैशिष्ठ्ये आणि काही औद्योगिक अपशिष्टांची वैशिष्ये, यांची तुलना कोष्टक १–२ मध्ये केली आहे.

**जीवरसायनी ऑक्सिजन मागणी– (BOD)**

ही मागणी विलीन आणि कलील कार्बनिक द्रव्याकडून सामान्यपणे प्रभावित केली जाते (exerted), व उपचार संयंत्रातील जीवसंबंधीं घटकांवर भारित केली जाते. जीवाणूंची वाढ व्हावी आणि कार्बनिक द्रव्याचे ऑक्सिकरण व्हावे म्हणून ऑक्सिजनची तरतूद करावी लागते. म्हणून कार्बनिक अपशिष्टातील वृद्धीमुळे परिवर्धित झालेल्या BOD करता जीवाणु-विषयक अधिक सक्रियता, अधिक ऑक्सिजन, आणि त्याच्या उपचाराकरता जीवसंबंधी घटकांची अधिक क्षमता असावी लागते. ह्यामुळे, भांडवली खर्च आणि परिचालनाचा रोजचा खर्च, अशा दोन्हीत वाढ करावी लागते.

तथापि, सर्व विलीन अगर कलील कार्बनिक द्रव्यांचे सारख्याच प्रमाणात आणि तितक्याच सहजतेने अगर त्याच मात्रेत ऑक्सिकरण होत नाहीं. उदाहरणार्थ, स्टार्च, प्रथिने, अगर चरबी, यांच्यापेक्षा शर्करांचे ऑक्सिकरण अधिक सहजतेने होते. म्हणून औद्योगिक कार्बनिक द्रव्याच्या विघटनाचा वेग, वाहितमलातील कार्बनिक द्रव्याच्या विघटनाच्या वेगापेक्षा, जास्त अगर कमी असू शकतो, आणि जीवविषयक घटकांचे अभिकल्पन आणि परिचालन, यांचे बाबतीत हा फरक विचारात घेतला पाहिजे. म्हणून खाजगी उद्योग आणि नागरी यंत्रणा, यांनी निस्तारणाची व्यवस्था एकत्रितपणे हाती घेण्यापूर्वी औद्योगिक अपशिष्टांतील ऑक्सिकरण क्षमतेचे निर्धारण केले पाहिजे. ज्यामुळे वापरलेल्या ऑक्सिजनचे आणि अनेक द्रावणांतून प्रस्तुत झालेल्या कार्बन डाय ऑक्साइडचे मापन तात्काळ करता येईल अशा वॉर्बर्ग अगर तत्सम श्वसनमापक– (respirometer) चांचण्या घेऊन हे साधता येते.

एका विशिष्ट औद्योगिक अपशिष्टाचा वाहितमल संयंत्रावर होणारा परिणाम आ. १–१ मधील आरेखात दाखविला आहे.

सारणी १–२.

औद्योगिक अपशिष्टांतील प्रदूषणविषयक भार आणि घरगुती वाहितमल यांची सर्वसाधारण तुलना ७)–

| | समतुल्य * | लोकसंख्या |
|---|---|---|
| | जीवरसायनी ऑक्सिजन मागणी | तरंगते घनपदार्थ |
| घरगुती वाहितमल | १ | १ |
| कागद गिरणीतील अपशिष्टे | १६ – १३३० | ६१०० |
| कातडी कमावण्यातील अपशिष्टे | २४ – ४८ | ४० – ८० |
| वस्त्रनिर्मिती गिरणीतील अपशिष्टे | ०.४ – ३६० | १३० – ५८० |
| कॅनरीतील अपशिष्टे | ८ – ८०० | ३ – ४४० |

* रोजच्या निर्मितीच्या प्रत्येक गटातील माणसे




आ. १-१. वाहितमल, एक विशिष्ट औद्योगिक अपशिष्ट, आणि या दोन्हीच्या एकत्रित ऑक्सिजनीकरणाच्या ऱ्हासाचा वेग.

तरंगते घनपदार्थ– कॅनरी आणि कागद गिरण्यांच्या सारख्या अनेक उद्योगांच्या अपशिष्टात तरंगते घनपदार्थ बऱ्याच प्रमाणात सापडतात. निस्तारण संयंत्राजवळ हे घनपदार्थ वाहितमलातून गाळण्यात येतात आणि अवस्थापित करण्यात येतात. अवस्थापन करून काढून टाकलेल्या घनपदार्थांस अवमल (sludge) म्हणतात. उपचारण या नावाने ज्ञात असलेल्या वातनिरपेक्ष (anaerobic) विघटन–प्रक्रियेतून अवमलास जावे लागते, आणि नंतर शुष्कन स्तरांच्यावर अगर निर्वात निस्यंदकात त्यातील जादा पाणी काढून टाकण्याकरता तो पंप केला

जातो. औद्योगिक अपशिष्टांतील काही अवस्थापनीय तरंगत्या घनपदार्थामुळे अवमलावरील उपचारणात अडथळा येण्याची शक्यता असते. सूक्ष्म कंकर व धातूचे अविलेय अवक्षेप ( precipitates ) हे अशा घनपदार्थांची उदाहरणे आहेत.

औद्योगिक अपशिष्टांतील तरंगते घन पदार्थ, वाहितमलातील तरंगणाऱ्या घनपदार्थाच्या-पेक्षा, अधिक जलद अगर सावकाश अवस्थापित होणे शक्य असते. तथापि, अवस्थापनेचा वेग कसाही असला तरी, उपचार– संयंत्रावरील अवमल उपचारणाच्या सुविधांत पंप केली पाहिजे अशी राशि, असे औद्योगिक अपशिष्ट मिसळल्यामुळे, वृद्धिंगत होते. नागरी वाहितमलापेक्षा औद्योगिक घनपदार्थांचे अवस्थापन जर अधिक जलद होत असेल तर अवमल फार साचून राहू नये म्हणून अवमलाचे निष्कासन अधिक जलद करावे. शिळ्या अवमलाच्या अधिकतम राशी द्रोणींच्या तळातून "खरडून" ( scored off ) टाकल्या म्हणजे मलप्रवाहातील अवमल कमी होतो. जलद गतीने अवस्थापन होणारे औद्योगिक अपशिष्ट वाहितमलातील घनपदार्थाच्या अवस्थापनाची गती वाढवते; सावकास अवस्थापन होणाऱ्या अपशिष्टाला अधिक दीर्घ विश्रामकाल ( detention period ) लागेल आणि अधिक मोठ्या द्रोण्या लागतील. शिवाय अवमलाच्या विघटनाची शक्यता वाढेल व त्यामुळें जेव्हा वाहितमलाचा प्रवाह मंद असतो त्या काळात उपद्रव निर्माण होईल. पाचित्रे ( digestors ), शुष्कन स्तर, आणि निस्यंदक यांचे अभिकल्पन, क्षमतेच्या प्रत्येक एककाकरता घन पदार्थांचे विशिष्ट वजन हाताळू शकतील असे केलेले असल्याने, त्या व्यवस्थेतील मागणीत कोणच्याही प्रकारे वाढ झाल्यास, अवमल हाताळ-ण्यासाठी अधिक मोठी साधने सामान्यतः लागतील, आणि शेवटी संयंत्राच्या क्षमतेत वाढ करण्याची जरुरी लागेल व परिणामतः भांडवली आणि परिचालन खर्च अधिक करावा लागेल.

औद्योगिक अपशिष्टांची अवस्थापन– वैशिष्ट्ये, वाहितमलासह आणि त्याच्याशिवाय अशी दोन्हीही, उद्योग आणि नगर व्यवस्था, यांच्यात करार होण्यापूर्वी निर्धारित करावी. अवमलाची संघनता ( eonsistancy ) एकूण निष्कासित तरंगत्या घनपदार्थांची टक्केवारी आणि त्यांचे वजन, ह्या अवस्थापन – वैशिष्टयांचे मूल्यांकन करण्याच्या कसोट्या आहेत.

### तरती द्रव्ये आणि रंगित पदार्थ–

तेल, ग्रीज, आणि वस्त्रनिर्मितीच्या गिरण्यातील रंग, यांच्या सारखी तरती द्रव्ये आणि रंगित पदार्थ जाणायेणाऱ्याला उपद्रव देणारे न आवडणारे प्रदूषणाचे दृश्य प्रकार आहेत. वसाहत अगर क्षेत्रीय विकासाची गती दृश्य प्रदूषणामुळे कमी होते, कारण शिबिरे घेणे, नौकानयन, पोहणे, मासे पकडणे यांच्या सारख्या शरिराने आणि मनाने सुदृढ असणाऱ्या लोकांच्या जीवनशक्तीस अपरिहार्य असणाऱ्या मनोरंजनास त्यामुळे उत्तेजन मिळत

नाही. तसेच, ज्या नाल्यात दिसून येण्याइतके प्रदूषण झाले आहे तेथे कोणीही उद्योग धंदा काढू इच्छित नाही. उद्योगांच्या अभावामुळे, शहर, जिल्हा आणि राज्यांच्या वाढीची गती आणखी मंदावते, कारण.कराचा पैसा कमी म्हणजे विकास कमी ! म्हणून रंग आणि तरल्या पदार्थांच्यासारखे उपद्रव वाहितमलोपचार-संयंत्राच्यां सहाय्याने दूर करणे अत्यावश्यक असते.

आधुनिक उपचार-संयंत्राने प्राथमिक अवस्थापन टाक्यात ग्रीजच्या सामान्य भाराचे निष्कासन होईल पण पायसीकरण ( emulsified ) झालेली धोबीघरे, खाटिकखाने, जुडाइची ( rendering ) संयंत्रे, कारखान्यातील असामान्य उच्चभारी ग्रीजमुळे ( जाळयां, कंकरकक्ष, आणि अवस्थापन–द्रोण्यांसारख्या ) प्राथमिक घटकातून, ते जीवविषयक संचातून जात असताना, प्रवाह–वितरण–साधने आणि वायु तोटयां चोंदून जातात. हे सच दीर्घकाल बंद पडल्यामुळे नाल्यात संगदूषण होईल आणि मत्स्यजीवनाची आकस्मात हानि होईल.

वाहितमल संयंत्राच्या उपचार संचाने रंगाचे निष्कासन करण्यात गुंतागुंती निर्माण होते आणि ती सोडविण्यासाठी प्रभावी उपायाचे विकसन करण्यात आतापर्यंत फारच कमी श्रम घेतले गेले आहेत. उत्तर कॅरोलायनातील ठिबकणाऱ्या निस्यंदकातून प्रवेशी प्रवाहातील रंगकामाचा रंग ३४ ते ७४ टक्क्यांइतका काढून टाकण्यात येत असल्याचे लेखकाला आढळून आले (२). उलट पक्षी अतिभारित प्राथमिक संयंत्रामुळे त्यांतून अपशिष्ट जात असताना, रंगाची १२ टक्के वाढ झाली. रंगाचे गुणधर्म आणि माप, यांचे ज्ञान असणे अवश्य असते. बहुतेक रंगित पदार्थ अत्यंत विलीन अवस्थेत असल्यामुळे, प्राथमिक रूढ साधनांच्यामुळे, त्याच्यात बदल होत नाही; असे असले तरी, उत्प्रेरित अवमल व ठिबकणाऱ्या निस्यंदकांच्या सारख्या दुय्यम उपचार संचांतून रंगित द्रव्यांच्या काही प्रकारांचे ठराविक टक्केवारीत निष्कासन होते. रंग काढून टाकण्याकरता वाहितमलोपचार संयंत्राचे, सामान्यतः अभिकल्पन केलेले नसते, म्हणून या घटकात काही घट झाल्यास तो एक सुदैवी योगायोग म्हणावा लागेल. पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे नाल्याला हानि पोहोचत असल्याने, विल्हेवाटीच्या नागरी संयंत्रात रंगाचे निष्कासन करण्याच्या बाबतीत भविष्यकालात अधिक विचार झाला पाहिजे. म्हणून अपशिष्टातील रंगद्रव्याचा प्रकार आणि राशि यांचे सुस्पष्ट निर्धारण होणे, उद्योगधंद्यात अनिवार्य असते. तसे झाले म्हणजे अभियंत्याना घरगुती वाहितमलाकरता अभिकल्पित केलेल्या उपचारांतून रंगनिष्कासनाच्या बाबतीत काही प्रमाणात भाकित करता येईल.

**राशि–** विल्हेवाट करण्याच्या संचांच्या अभिकल्पनात राशीचा विचार करणे ही एकच बाबसुद्धा महत्वाची असते. वाहितमल संयंत्रातील संच पुरेसे मोठे असले तर ते संयत्र, प्रवाह कितीही असला तरी तो, हाताळू शकते.

परंतु, जेव्हा एखाद्या नवीन औद्योगिक कारखान्यातून अपशिष्टाच्या प्रवाहास अनुमती मिळण्याकरता विनंति केली जाते तेव्हा, दुर्दैवाने बहुतेक वाहितमल संयंत्रे आधीच कार्यवाहीत आलेली असतात, म्हणून सर्व संचाची जलीय क्षमता विश्लेषित केली पाहिजे. धारण क्षमते करता ( carrying capacity ) मलवाहिन्यांची, क्षैतिज प्रवाह वेगाकरता सळयांच्या जाळयांची, विश्रामकालाकरता पृष्ठीय आणि बांधावरील प्रवाह–वेगांची व ठिबकणाऱ्या निस्यंदकांची तपासणी केलीं पाहिजे.

संघनित्र–जलासारखे (Condenser water) तुलनेने स्वच्छ अपशिष्ट असलेल्या उद्योगाला, सामान्यपणे, अपशिष्ट थंड करून संग्राहक नाल्यात प्रत्यक्षपणे सोडता येईल आणि वाहितमलोपचार संयंत्रावरील अतिभारण टाळता येईल. ह्या अभ्युपायामुळे ( Expedient ) निस्तारण संयंत्रावरील भांडवली आणि परिचालन खर्चात बचत होईल. तथापि, बाह्यतः स्वच्छ दिसणारे पाणी प्रत्यक्षपणे निस्तारित करण्याचे मान्य करण्यापूर्वी विलीन घनपदार्थांच्या बाबतीत त्यांची काळजी पूर्वक तपासणी केली पाहिजे. अपशिष्ट–जलातील मोठ्या प्रमाणात असलेल्या घनपदार्थांचे थोडेसे जरी सांद्रण झाले तरी त्याचा परिणाम कधीकधी घनपदार्थाच्या एकूण भारणावर होतो.

**अन्य हानिकारक घटक** – प्रदूषण भारांच्या अतिरिक्त हानिकारक अंतर्वस्तू औद्योगिक अपशिष्टांत असणे शक्य असते. ह्या अपशिष्टांच्यामुळे मलव्यवस्थेच्या आणि । अगर निस्तारण संयंत्राच्या परिचालनात बिघाड होतो. ह्यातील काही उपद्रव आणि त्यांचे परिणाम खाली दिले आहेत.

(अ) कार्बनिक पदार्थाच्या ऑक्सिकरणाकरता लागणाऱ्या एंझाइम्सचे बंधन करून जीवविषयक ऑक्सिकरणात ( $Cu^{++}$, $Cr^{VI}$, $Zn^{++}$, $Cn^{-1}$ ) ह्या विषाक्त धातूंच्या आयनांचा अडथळा होतो.

(आ) पिसांच्यामुळे तोटचा, चोंदतात, पाचित्रांच्यावर अतिभारण होते, आणि पंपाच्या योग्य परिचालनास अडथळा येतो.

(इ) चिंध्यांच्यामुळे पंप आणि झडपा चोंदून जातात, आणि सळयांच्या अगर विचूर्णकांच्या ( Comminutor ) योग्य परिचालनात अडथळा येतो.

(ई) अम्ले आणि क्षारांच्यामुळे नळ, पंप व उपचार संचावर गंज चढतो, अवसादनास अडथळा येतो, वाहितमलाच्या जीवविषयक शुद्धिकरणास बाधा येते, दुर्गंधी सुटते, आणि रंगात तीव्रता येते.

(उ) ज्वालाग्राही पदार्थांच्यामुळे आगी लागतात आणि स्फोट होतात.

(ऊ) चरबीच्या तुकडयांच्यामुळे तोटया व पंप चोंदतात, आणि पाचित्रे अतिभारित होतात.

(ए) अनिष्टकर वायूंच्यामूळे कामगाराना प्रत्यक्ष धोका असतो.

(ऐ) प्रेक्षालकांच्या ( Detergents ) मुळे वातनसंचात फेस निर्माण होतो.

## संदर्भ ग्रंथ –


१ – गॉर्मन, ए. ई., "वेस्ट डिस्पोजल अँज रिलेटेड टू साइट सिलेक्टेड," ३ रे पूर्वमुद्रित, अमेरिकन इन्स्टिटयुट ऑफ केमिकल इंजनिअर्स, डिसेंबर १२–१६, १९५५.

२ – मॉस, एछ. व्ही., "कंटिन्यूइंग रिसर्च रिलेटेड टू डिटर्जंट्स इन वॉटर अँड स्युवेज ट्रीटमेंट", स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २९, १०, ११०७–१११३, (आक्टोबर १९५७ ).

३ – नमेरो, एन. एल., आणि टी. ए. डॉब्री, "कलर रिमूव्हल इन वेस्ट वॉटर ट्रीटमेंट प्लँट्स" स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, ३०,९,११६० (सप्टेंबर १९५८ )

४ – नेंमेरो, एन. एल., "वॉटर वेस्ट्स ऑफ इंडस्ट्री," ५ व्या क्रमांकाचे प्रकाशन, फॅक्ट्स फॉर इंडस्ट्रीज सीरीज, इंडस्ट्रियल एक्स्पेरिमेंट प्रोग्रॅम, नॉर्थ कॅरोलायना स्टेट कॉलेज, रॅले, नॉर्थ कॅरोलायना, १९५६.

५ – पॅलँज, आर. सी., जी. जी. रोबेक आणि सी. हेंडर्सन., "रेडिओ ॲक्टिव्हिटी अँज ए फॅक्टर इन स्ट्रीम पोल्यूशन," १९० वे पुनर्मुद्रण, अमेरिकन इन्स्टिटयूट ऑफ केमिकल इंजनिअर्स, डिसेंबर १२-१६, १९५५

६ – "ड्रिंकिंग वॉटर स्टँडर्डस्", युनायटेड स्टेट्स पब्लिक हेल्थ सर्व्हिस, पब्लिक हेल्थ रिपोर्टस् ६१, ११, ३७१–३८४, ( मार्च १९४६ ).

७ – "सर्व्हे ऑफ दि ओहिओ रिव्हर," इंडस्ट्रिअल वेस्टस् गाइड्स सप्लिमेंट D, युनायटेड स्टेट्स पब्लिक हेल्थ सर्व्हिस १९४३.




# :२: अपशिष्टाच्या राशी कमी करणे–

संग्राहक नाले आणि उपचार संयंत्रातील औद्योगिक अपशिष्टांच्या राशी कमी करणे ही त्यांच्यावरील अशा अपशिष्टांचा परिणाम कमी करण्याची साधारणपणे पहिली पायरी असते. (१) अपशिष्टांचे वर्गीकरण; (२) अपशिष्ट जलाचे संरक्षण; (३) अपशिष्टे कमी करण्याकरता निर्मितीत बदल करणे; (४) अनुपचारित पाणीपुरवठ्याकरता औद्योगिक आणि नागरी मलनि:स्त्रावांचा पुन: उपयोग करणे; अशा उपायांनी हे साध्य करता येईल.

## २–१. अपशिष्टांचे वर्गीकरण–

विनिर्मिती प्रक्रियेतील पाणी शीतनजलापासून वेगळे करण्या-करता, अपशिष्टांचे वर्गीकरण करून अतिशय उपचारांची जरुरी असलेल्या पाण्याची राशि भरीव प्रमाणात कमी करावी. प्रक्रिया-जलाचे स्वयंही वर्गीकरण करणे आणि ती वेगवेगळी करणे कधीकधी शक्य होते, व त्यामुळे जास्तीत जास्त प्रदूषित झालेल्या पाण्यावरच उपचार करता येतात; आणि तुलनेने संदूषित नसलेले पाणी उपचार न करता सोडून देता येते उद्योगातील अपशिष्टांचे सर्वसाधारण खालीलप्रमाणे तीन वर्ग पाडता येतील.

(अ) विनिर्मिती–प्रक्रियांतील अपशिष्टे– फिरत्या तारांच्या यंत्रावर कागद तयार करणे, धातुरचनांतील मुलाम्याच्या द्रावणातील अपचय, दुग्धव्यवसायाच्या संयंत्रातील दुधाच्या बरण्या धुणे, वगैरेंच्या करता वापरण्यात येणाऱ्या पाण्याचा यात समावेश होतो.

(आ) औद्योगिक प्रक्रियांत शीतन–साधन म्हणून वापरण्यात येणारे पाणी– हे पाणी प्रक्रिया केलेल्या पाण्यातून निष्कासित केलेल्या एकूण Btu वर अवलंबून असते. ह्या अप-शिष्टांची राशि उद्योगाप्रमाणे बदलते. एका मोठ्या परिष्करण शालेतून ( refinery ) दररोज एकूण १५० दशलक्ष पाणी प्रस्त्रावित होते. व त्यातील दर दिवशी ५ द. ल. गॅलन ( mgd ) प्रक्रियेतील अपशिष्ट असते. उरलेल्या प्राण्यात किंचित संदूषित झालेलें अपशिष्ट होते. अल्प गळतीमुळे शीतन–जल जरी संदूषित होण्याची शक्यता असते तरी, संक्षारण पदार्थ व उष्णतेची जोड, यांच्यामुळे या अपशिष्टात, काही असलेच तर, थोडकेच कार्बनिक द्रव्य असले. आणि म्हणून त्या दृष्टिकोनातून ह्या अपशिष्टांचे प्रदूषण न करणारी असे वर्गीकरण करण्यात आले आहे.

(इ) स्वास्थ्यविषयक वापरातील अपशिष्टे ही दर माणशी २५ ते ५० गॅलनच्या

व्याप्तीत साधारणतः असतात. संयंत्राचा आकार आणि फरशीवर धुवून गटारात सोडलेल्या अपशिष्ट - निर्मित द्रव्यांच्या राशींचा समावेश असलेल्या अनेक घटकांवर ही राशी अवलंबून असते.

बहुतेक जुन्या संयंत्रांत प्रक्रिया जल, शीतन जल, आणि स्वास्थ्यविषयक अपशिष्टातील पाणी एकाच नळव्यवस्थेत मिसळलेले असते. १९३० सालापूर्वी, दुर्दैवाने नाल्यात प्रदूषण होण्याचे टाळण्यासाठी अपशिष्टे वेगळी करण्याकडे उद्योगधंद्याने फारच थोडे लक्ष दिले होते.

## २–२– अपशिष्ट-जलाचे संरक्षण (Conservation)

पाण्याचे संरक्षण म्हणजेच अपशिष्टातील बचत होय. जेव्हा " उघड्या व्यवस्थे " ऐवजी उद्योगात "बंदिस्त" व्यवस्था अंमलात आणली जाते तेव्हा संरक्षणास सुरवात होते. उदाहरणार्थ, ( ज्या तारेच्या जाळीवर कागद तयार होतो त्या जाळीमधून जाणाऱ्या ) शुभ्र पाण्याचा कागदगिरणीत पुनः उपयोग (recyeling) करण्यात येतो. त्यामुळे वापरात येणाऱ्या धावन–जलाच्या राशीत घट होते. ही क्रिया म्हणजेच जलसंरक्षण प्रथा होय. सांद्रणित पुनरुपयोगित अपशिष्ट जलांवर, त्यांच्या उपयुक्त कालाच्या अखेरीस, पुष्कळवेळा, उपचार करण्यात येतात, कारण पुनः उपयोग न केलेल्या अपशिष्ट–जलावर सतत उपचार करणे व्यवहार्य आणि काटकसरीचे होत नाही. ह्यात पाण्यावरील खर्च आणि अपशिष्टाच्या उपचारावरील खर्च कमी होत असल्याने दुहेरी बचत होते.

कागदी पुठ्ठ्यांच्या गिरणीत उत्पादन होत असताना दर टनामागे १०००० गॅलन अपशिष्ट – जलाचा प्रस्त्राव होऊ शकतो, पण ह्या प्रस्त्रावात निरनिराळ्या गिरण्यात अनेक प्रकारे तफावत पडते. कागदाच्या गिरण्यांतील कागद – निर्मितीत दर टनामागे १,००,००० गॅलन इतक्या मोठ्या राशीपासून १००० गॅलन इतक्या अल्प राशीपर्यंत अपशिष्ट – जल निर्माण होते. दुसरा आकडा, सामान्यपणे, पाण्याच्या टंचाईचा आणि । अगर नाल्यात होणाऱ्या प्रदूषणाच्या जाणिवेचा परिणाम असतो, आणि ज्या उद्योगात अपशिष्टाचे निर्मूलन व पाण्याचे संधारण करण्याच्या समाधानकारक पद्धती वापरण्यात येतात, ते उद्योग काय साधू शकतात याचे त्यातून प्रत्यंतर मिळते.

एका मोठ्या सूतगिरणीत, नागरीपाण्याच्या टंचाईच्या काळात, आपल्या निर्मितीत किंचितही घट न करता, पाण्याचा वापर पन्नास टक्क्यानी कमी केला. लेखकाला असे दिसून आले कीं, गिरणीला बचत झाली तरी, टंचाई कमी होताच पाण्याचा वापर मूळ राशी इतका पुनः करण्यात आला. ह्या घटनेने जनमानसातील पाण्याच्या "सवंगपणाच्या" कल्पनेला पुष्टी दिली.

धातुपिंडाचे (ingotf) द्रुत शीतलन (quenching) करण्यासाठी पोलाद गिरण्यात शीतलन - जलाचा पुनः उपयोग केला जातो, आणि कोळशावर प्रक्रिया करताना घाण व अन्य ज्वालाग्राही नसणारे पदार्थ कोळशातून काढून टाकण्याकरता पाण्याचा पुनरुपयोग करण्यात येतो, पाण्याचा वापर कमी करता यावा म्हणून अनेक उद्योगांनी प्रतिधाराधावनाची ( Counter Current ) साधने बसविली आहेत.

बहुविध कुंडांचा उपयोग करून, मुलामा देण्याच्या ( plating ) उद्योगात सर्वांत जास्त वापरलेले पाणीच फक्त अपशिष्ट म्हणून सोडण्याकरता, पूरक ( Make up) पाण्याचा उपयोग करण्यात येतो. तसेच, जल-नियामक साधनासारख्या स्वरुपात, स्वयंचलनाचा उपयोग करण्याने पाण्याचे संधारण करण्यास मदत होते.

## २–३ अपशिष्टे कमी करण्याकरता उत्पादनात बदल करणे –

अपशिष्टांच्या राशीवर नियंत्रण ठेवण्याची ही एक पद्धत आहे. पण ती व्यवहारात आणण्यास फार अडचण पडते. केवळ अपशिष्टांचे निर्मूलन व्हावे म्हणून आपल्या परिचालनात बदल करण्यासाठी निर्मिती–कर्त्यांची मने वळविणे कठीण असते. सामान्यतः, रसायन – अभियंत्याकडून अभियांत्रिकी परिचालनाच्या टप्प्यांचे नियोजन केले जाते व त्यातील प्राथमिक उद्दिष्ट खर्चात बचत करणे हे असते. उलटपक्षी, स्वास्थ्य–अभियंत्याला प्रामुख्याने सार्वजनिक स्वास्थ्याचे व नैसर्गिक मूलसाधनांचे संरक्षण करावयाचे असते. असे असले तरीही दोन्ही अभियंत्यांची ही दोन्ही उद्दिष्टे साध्य करता येणार नाहीत असे कोणचेही कारण दिसून आलेले नाही.

विनिर्मितीचा अविभाज्य ( integral ) भाग म्हणून मुळातच अपशिष्टांवर उपचार करण्याचा विचार करावा. जर रसायन अभियंत्याने असा मुद्दा मांडला की मुळातच प्रदूषण कमी करण्याकरता, आपल्या निर्मिती पद्धतीत बदल करण्यासाठी कंपनीला खर्च करावा लागेल तर, स्वास्थ्य–अभियंत्याला केवळ जन पर्यावरणात सुधारणा करण्याचे कारण दाखविण्याशिवाय बरेच काही जास्त सांगता येईल. उदाहरणार्थ, रंग कामात सोडियम सल्फाइड, कल्हई कामात सोडियम सायनाइड, आणि अन्य रसायने विनिर्मितीत प्रत्यक्षात कमी करण्याने परिणामतः अपशिष्टे कमी होतात आणि खर्चात बचत होते असे त्याला दाखवून देता येईल. संयंत्रात वापरल्या जाणाऱ्या क्षार व अम्लांच्या राशींचे संतुलन करण्याने उदासीन अपशिष्ट निर्माण होते व त्यामुळे अपशिष्टावरील उपचारातील रसायने, पैसा, आणि वेळ, यांत बचत होते. ह्या वस्तूस्थितीचाही त्याला उल्लेख करता येईल.

## २-४ अनुपचारित पाणीपुरवठ्याकरता औद्योगिक आणि नागरी अशा दोन्हींतील मलनि:स्त्रावांचा पुनरोपयोग करणे -

ज्या क्षेत्रात पाण्याची टंचाई आहे अगर पाणीपुरवठ्यास खर्च जास्त येतो अशा ठिकाणी प्रचारात आणलेली ही पद्धत लोकप्रिय झाली आहे व तिला संधारण-खर्च कमी येतो. अनुपचारित जलपुरवठ्याकरता मल - नि:स्त्रावांचा पुनरोपयोग करण्यात जरी अनेक समस्या निर्माण होत असल्या तरी नागरी अगर औद्योगिक अशा कोणत्याही पाणी पुरवठ्यात अशा समस्यांना तोंड द्यावे लागते हे लक्षात ठेविले पाहिजे. औद्योगिक जलनि:स्त्रावाच्या पुनरुपयोगात आढळून येणाऱ्या समस्यांच्या सारख्याच समस्या वाहितमल-नि:स्त्रावाच्या पुनरोपयोगात उद्भवत असल्याने, येथे त्यांची एकत्रपणे चर्चा करण्यात येत आहे.

अनुपचारित जलपुरवठ्याकरता मलनि:स्त्रावांचा पुनरोपयोग करण्यात अनेक उद्योग व शहरे (व्यवस्था) कांकू करतात. उद्योग धंद्यांच्या व्यवस्थापकांना पुरेशी माहिती नसणे; नागरी आणि औद्योगिक उपभोक्त्यांना समाधानकारक व योग्य करार घडवून आणण्यात अडचणी येणे; कठोरता रंग वगैरे सबंधी तांत्रिक विशिष्ट समस्या निर्माण होणे; आणि कोणत्याही कारणा करता मलनि:स्त्राव हे पाण्याचे संभाव्य साधन म्हणून स्वीकार करण्यास सौंदर्य दृष्टीने अनिच्छा ( aesthetic reluctance ) असणे; ह्या कारणांचा त्यात समावेश असतो (१). ह्या शिवाय " चालू प्रथांत बदल करण्यास विरोध " ही पुनरुपयोगाला अडथळा आणणारी महत्वाची बाब आहे हे विसरून चालणार नाही.

पुन: वापरता येईल अशा अंतिम औद्योगिक नि:स्त्रावातील कोणच्याही भागा (च्या उपयोगा) मुळे उपचार आणि निस्तारण करावी लागणारी राशि कमी होईल. तसेच नगरपालिकेने प्रस्तावित केलेल्या प्रदूषित राशीतही, वाहितमल- नि:स्त्रावाच्या पुनरुपयोगामुळे घट येईल

निर्मितीकार्यातील पाण्याचा सर्वात मोठा उपयोग शीतनकार्याकरता असतो. ह्या कामी सामान्यत: फार पाणी लागत असल्याने, ज्या क्षेत्रात पाणीपुरवठ्यास फार खर्च येतो तेथे वसविलेल्या उद्योगात नि:स्त्रावाचा पुनरोपयोग करण्यासंबंधी विचार करावा लागतो. सुदैवाने एकाद्या उद्योगासाठी जरी उपचारित नागरी पाणीपुरवठा उपलब्ध असला तरी नि:स्त्रावाच्या पुनरुपयोगास येणाऱ्या खर्चाच्या तुलनेने या पाण्यावरील खर्च बहुतेक खूप जास्त असतो.

कागद कारखान्यांतील यंत्रात फवारा आणि धावन जल म्हणून पुनरुपयोगात आणल्या जाणाऱ्या शुभ्र जलासारखी अनेक उदाहरणे, मध्यस्थ मलनि:स्त्रावाच्या पुनरुपयोगासंबंधीच्या

साहित्यात दिली आहेत. तथापि, उपचारित मलनिःस्त्रावाच्या पुनरुपयोगाची प्रथा — अद्यापही बाल्यावस्थेत आहे; नागरी मलनिःस्त्रावाच्या पुनरुपयोगाची उदाहरणे बरीच आहेत. उदाहरणार्थ, पोलाद गिरणीतील प्रक्रियापरिचालनात वापरण्याकरता दररोज ६५ दशलक्ष गॅलन पाणी लागते व त्यावर उपचार करणाऱ्या एका वाहितमल–निःस्त्राव–उपचार–संयंत्राच्या अभिकल्पनाचे आणि कार्याचे वर्णन वोल्मनने केले आहे (२). तुरटी आणि क्लोरिनीकरणाचा एकत्रित उपयोग, कलीली करणाचा रूढ उपचार म्हणून, त्या संयंत्रात करण्यात आला; अंतिम जलात सरासरी ५ ते १० ppm गढूळपणा होता व कॉलीफॉर्म जीवाणूंचे संदूषण नव्हते व झाले असलेच तर ते अल्पसे होते. तोंड द्यावे लागलेली सर्वांत गंभीर समस्या, उच्च सांद्रण झालेल्या क्लोराइडचे अस्तित्व, ही होती. ज्यात व्याज व परिशोधन ( amortization ) वगळले आहे पण पंपिंगचा खर्च धरला आहे अशा परिचालनाला दर द. ल. गॅलनला १.७५ डॉलर खर्च आला; अर्थात, ह्या आकड्यात अनुपचारित वाहितमलाच्या उपचाराचा खर्च धरलेला नाही. संग्रहण, उपचार, आणि अनुपचारित पाण्याच्या वाटपास येणाऱ्या व ज्यात कायम स्वरुपाच्या खर्चाचा समावेश केलेला नाही अशा पाण्यास दर द. ल. गॅलनला ५० ते २५० डॉलर प्रमाणे लागणाऱ्या नागरी खर्चाशी ह्या खर्चाची तुलना करणे मनोरंजक होईल. अनुपचारित पाण्यावर उपचार करण्याकरता दर द. ल. गॅलनला १५ ते ५० डॉलर इतका खर्च जरी त्यात मिळवला तरी पुनरुपयोगित निःस्त्राव परिणामतः; अनुपचारित पाण्याकरता स्वतंत्र साधनांचा विकास करून आलेल्या पाण्याच्या खर्चाच्या मानाने, कितितरी जास्त काटकसरीचा असतो.

वाहितमलातील बहुतेक निस्त्राव व नमुनेदार पृष्ठीय अगर विहिरीतील जल पुरवठ्यांतील पांच प्रमुख भेद कीटिंग आणि कॅलीज यांनी खालील प्रमाणे दाखविले आहेत. १) उच्चतर रंग; २) उच्चतर नायट्रोजनचा अंश; ३) BOD चा उच्चतर अंश; ४) एकूण उच्चतर विलीन घनपदार्थ; आणि ५) प्रक्षालकांच्यामुळे फॉस्फेट्सचे अस्तित्व. औद्योगिक निःस्त्रावात सुद्धा हे वैशिष्ठ्यपूर्ण भेद असतात, तसेच उच्चतर तपमानासारखे अन्य भेद असतात.

असे असून सुद्धा, युनायटेड स्टेट्सच्या अनेक विभागात, योग्य प्रकारे परिचालन होत असलेल्या दुय्यम वाहितमल–संयंत्रातील मलनिःस्त्राव, पृष्ठीय अगर विहिरीतील उपलब्ध जलपुरवठ्यापेक्षा, प्रत्यक्षात अधिक उच्च दर्जाचा असतो.

### संदर्भ–

१– कीटिंग, आर. जे., आणि व्ही. जे. कॅलीज, "दि ट्रीटमेंट ऑफ सुवेज प्लँट एफ्ल्युअंट

फार वॉटर रीयूज इन प्रोसेस अँड बॉयलर फीड," टेक्निकल रीप्रिंट T-१२९, ग्रेव्हर वॉटर कंडिशनिंग कंपनी, १९५४.

२- वूलमन, आबेल, "इंडस्ट्रियल वॉटर सप्लाय फ्रॉम प्रोसेस्ड स्युवेज ट्रीटमेंट प्लँट एफ्ल्युअंट ॲट बाल्टिमोर, मेरिलँड," स्युवेज वर्क्स जर्नल, २०, १, १५ (जानेवारी १९४८).



# : ३ : अपशिष्टांची शक्ति कमी करणें

औद्योगिक संयंत्राच्या बाबतीत अपशिष्टाची शक्ती कमी करणे हे दुसरे महत्वाचे उद्दिष्ट असते. औद्योगिक अपशिष्टातील प्रदूषणकारी द्रव्याची एकूण राशि कमी करण्याचे साधन शोधून काढण्याने अपशिष्टावरील उपचार कमी करता येतात व त्यामुळे पैशाची बचत होऊन चांगले फळ मिळते. १) प्रक्रियेत बदल, २) उपकरणांत सुधारणा, ३) अपशिष्टांचे वियोजन, ४) त्यांचे समानीकरण, आणि ५) उपपदार्थांची पुनः प्राप्ती करून अपशिष्टांची शक्ती कमी करता येते.

## ३–१. प्रक्रियेतील बदल –

प्रक्रियेत बदल करून अपशिष्टांची शक्ती कमी करण्यास, स्वास्थ्य अभियंत्याचा, प्रदूषणाच्या दृष्टीने अतिशय त्रासदायक असणाऱ्या अपशिष्टाशी संबंध येतो. त्यांच्या समस्या, (म्हणून त्या सोडविण्याचा) मार्ग, संयंत्र अभियंता अगर अधीक्षक यांच्या मार्गाहून, भिन्न असतात. प्रक्रियेत बदल करण्याकरता कधी कधी संयंत्र–अधीक्षकाकडून होणारा अत्यंत कडवा विरोध निष्प्रभ करावा लागतो. अधीक्षकाला परिचित काम चांगल्या प्रकारे करता येत असल्याने त्याला बऱ्याच प्रमाणात सुरक्षा प्राप्त झालेली असते; केवळ नाल्यात प्रदूषण होऊ नये म्हणून तो आपले स्थान कशाला धोक्यात आणील ह्याचे कारण उघड आहे. उद्योगातील प्रगती जेव्हा खुंटते तेव्हा त्या उद्योगाचा विनाश होतो. सातत्याने आणि काटेकोरपणाने आपल्या निर्मिती तंत्राचे पूर्नविलोकन आणि विश्लेषण केल्याशिवाय कोणत्याही निर्मात्यास विद्यमान व्यापारी स्पर्धेस तोंड देता येणार नाही.

प्रक्रियेत बदल करून अपशिष्टविषयक समस्या सोडवलेल्या उद्योगांची अनेक उदाहरणे उपलब्ध आहेत. वस्त्रनिर्मिती आणि धातुरचना यांच्या संबंधीचे उद्योग ही प्रगतीशील व्यवस्थेची दोन उदाहरणे आहेत. पांजणी, कियरिंग ( Kiering ), विपांजणी ( desizing ) व रंगकामांतील प्रक्रियांतील उच्चप्रमाणात प्रदूषण झालेल्या अपशिष्टांच्या विल्हेवाटीस वस्त्रसफाई गिरण्यांना तोंड द्यावे लागते. स्टार्च हे पांजणीद्रव्य विणण्यापूर्वी वापरण्याची प्रथा होती व तयार कापडातून जलविश्लेषण ( hydrolisis) आणि निष्कासन केल्यानंतर ऑक्सिजनची मागणी करणाऱ्या गिरणीतील एकंदर द्रव्यांपैकी स्टार्च हे ३० ते ५० प्रतिशत् द्रव्यांचे मुळ होते. सेल्यूलोज पासून तयार केलेल्या पांजणीद्रव्याकडे उद्योगात औत्सुक्य दिसू लागले, कारण त्या द्रव्याचा BOD विषयक अगर विषाक्त परिणाम नाल्यामध्ये किंचितसा दिसत होता अगर मुळीच

होत नव्हता. कॉर्बॉक्सी–मेथिल सेल्यूलोज सारखे बदली म्हणून उच्च प्रमाणात घातलेले सेल्यूलोजयुक्त मिश्रपदार्थ विकसित करण्यात आले व ह्या गिरण्यांच्यापैकी काहीत वापरण्यात आले. परिणामतः, विपांजणातील अपशिष्टातून मिळणारा BOD, वापरलेल्या सेल्यूलोजयुक्त पांजणीतील मिश्रपदार्थांच्या राशीच्या प्रमाणात, कमी झाला. (१)

धातूवर मुलामा देण्याच्या उद्योगातील प्रक्रियेत अगर द्रव्यात सात बदल सुचविले गेले. म्हणून सायनाइड शक्ति नाहीशी अगर कमी करण्याकरता (१) कॉपर सायनाइडच्या मुलाम्याच्या द्रावणाऐवजी अम्ल–ताम्र द्रावणे; (२) ताम्र मुलामाअवग्राहकाच्या आधी $Cu\ C\ N_2$ च्या आघाता ( strike ) ऐवजी निकेलचा आघात; (३) नेहमीच्या वितळलेल्या सायनाइड अवगाहका ( bath ) करता कार्बूरीकर ( carburizing ) वातावरण आणि अमोनिया वायू वापरणाऱ्या कार्बो नायट्रायडिंग भट्टीची प्रतिस्थापना; असे बदल करावे.

आणि याखेरीज अन्य कारणाकरता, (४) किचकट नसलेल्यां भागावर पोलादावरील अम्लमार्जनाकरता ( pickling ) $H_2\ SO_4$ ऐवजी छऱ्यांच्या माऱ्याचा ( shot blast ) अगर अन्य अपघर्षक उपचारांचा उपयोग करावा; (५) अम्ल मार्जना करता $H_2\ SO_4$ ऐवजी $H_2\ SO_4$ वापरावा, (६) साठवणाच्या काळात चढलेला हलका गंज काढून टाकण्याकरता पूर्वी वापरण्यात येणाऱ्या अम्ल द्रावणांच्या ऐवजी क्षारीय गंजनिष्कासक वापरावा; ह्या प्रक्रियेमुळे एकूण pH मध्ये जवळ जवळ उदासीनते इतकी वाढ होते, आणि नळांवरील व मलवाहिन्यांवरील संक्षारक परिणामाचेही शमन होते; (७) स्वच्छ केलेल्या भागावर लावण्यात येणारी विलेय तेले आणि अन्य अल्पकाल टिकणाऱ्या गंजप्रतिरोधक तेलांच्या ऐवजी "शीत" मार्जकांचा (cleaners) वापर करावा. हे मार्जक धावन द्रावणातच फक्त वापरता येतात असे नसून ते क्षालन ( rinse ) – द्रावणातही वापरता येतात तेलाच्या अगर ग्रीजच्या पटला ऐवजी रासायनिकरीत्या हे मार्जक गंजनिरोध करतात.

२३ व्या प्रकरणातील धातूवरील मुलाम्यातून निर्माण होणाऱ्या अपशिष्टाविषयी केलेल्या चर्चेनंतर वाचकांना प्रक्रियामधील ह्या भेदांचे अधिक ज्ञान होईल.

## ३-२. उपकरणातील बदल –

सामान्यपणे उपकरणात बदल केल्याने अपशिष्टाची राशि कमी करून त्याची शक्ति कमी करता येते. अपशिष्ट कमी करण्याकरता पुष्कळवेळा, सध्यांच्या उपकरणांत किंचित अगर

कधीकधी विस्तृतसुद्धा बदल करता येतात. उदाहरणार्थ, लोणची तयार करण्याच्या कारखान्यात काकडयांच्या टाक्यांतील निकासनळ्यावर ठेवलेल्या जाळ्यांमुळे अपशिष्टाची शक्ति आणि घनता वाढविणारे काकडीचे बी व तुकडे बाहेर पडण्यास प्रतिबंध होतो. तसेच, कुक्कट पालन-संयंत्रातील प्रस्त्रावनलिकांच्यावर बसविलेल्या पाशांमुळे पिसे आणि चरबीचे तुकडे, यांच्या उत्सर्जनास ( emmission ) प्रतिबंध होतो.

दुग्धव्यवसायाच्या एका उद्योगात अपशिष्टाच्या शक्तीत घट झाल्याचे एक प्रकृष्ट ( outstanding ) उदाहरण घडून आले.

शेतकऱ्यांच्या कडून दूध गोळा करण्याकरता डेरीत वापरण्यासाठी दुधाच्या मोठ्या बरण्यांचे ट्रेब्लरने पुनरभिकल्पन केले (२). नवीन बरण्या, त्यांची मान गुळगुळीत राहील अशा प्रकारे तयार करण्यात आल्या व त्या जलदगतीने आणि अधिक पूर्णतया रिकाम्या करता येऊ लागल्या. त्यामुळे दुधाच्या अपशिष्टाची राशि नाल्यात आणि वाहितमलसंयंत्रात मोठ्या प्रमाणात जाण्यास प्रतिबंध झाला. जीवाणुनाशक यंत्रात बरण्या ओतल्यानंतर त्यातून गळणारे दूध गोळा करण्याकरता बसविलेल्या संयोजी नळ्यांवर गवळ्यांनी ठिबकणाऱ्या थाळ्यासुद्धा बसविल्या· ह्या थाळ्यांतील दूध परत टाक्यांत ओतण्यात येते.

## ३–३. अपशिष्टांचे वियोजन –

अपशिष्टांच्या वियोजनामुळे त्यांची शक्ति कमी होते आणि । अगर औद्योगिक संयत्रातील अंतिम अपशिष्टावर उपचार करण्यातील अडचणी कमी होतात. कमी जननक्षम अपशिष्टापासून प्रबल अपशिष्ट वेगळे करण्याने मुख्य राशीची शक्ति कमी होते, आणि प्रबल अपशिष्टाची लहान राशि, तिच्यात निर्माण होणाऱ्या समस्यांचे बाबतील विशिष्ठ पद्धती वापरून, हाताळता येते. सामान्यतः वियोजनामुळे दोन अपशिष्टे प्राप्त होतातः एक प्रबल आणि लहान राशि असलेले व दुसरे जवळ जवळ वियोजन न केलेल्या मुळच्या अपशिष्टाच्या राशीइतके असणारे निबल अपशिष्ट. केवळ राशीच्या घटीच्या बाबतीतच विचार करावयाचा झाल्यास, प्रक्रिया– अपशिष्टातून, शीतन–जल व वादळी जल, यांचे वियोजन करणे म्हणजेच अंतिम उपचार– संयंत्राच्या आकारात बचत करणे होय !

काही अपशिष्टे जेव्हा सांद्रित असतात तेव्हा त्यांच्यावर उपचार करणे अधिक सोपे जाते. उदाहरणार्थ, अनेक रंगसंबंधी अपशिष्टांच्यावर, त्यांची द्रावणे सांद्रित असताना अधिक काटकसरीने आणि प्रभावीपणे उपचार करता येतात. अपशिष्टावर उपचार केले जात

असताना जरी अशा प्रकारच्या वियोजनामुळे त्याच्या शक्तीत वाढ होण्याची शक्यता असली तरी सामान्यत: त्यातून प्रदूषणकारी द्रव्य कमी करणारा अंतिम नि:स्त्राव निर्माण होतो

औद्योगिक संयंत्रातील अन्य प्रक्रिया – अपशिष्टांतून एकादे विशिष्ट अपशिष्ट काढून टाकणे हा वियोजनाचा दुसरा प्रकार आहे. त्यामुळे अपशिष्टांचा मोठा भाग उपचारक्षम होतो. पुढील उदाहरणात हा पैलू निदर्शित केला आहे.

एका तयार कापडाच्या गिरणीतून कोष्टक ३–१ मध्ये नोंद केलेली अपशिष्टे निर्माण होत होती. संयुक्त अपशिष्ट फार तीव्र होते आणि उपचार करणे अवघड जात होते आणि महाग पडत होते. ते अगदी धोबीकामातील अपशिष्टासारखे होते. तथापि, जेव्हा अन्य अपशिष्टांच्यापासून द्रवरूप कियरिंग ( Kiering ) अपशिष्ट अलग करण्यात आले, रासायनिक–तया निष्प्रभ करून अवक्षेपित केले, आणि त्याचे अवस्थापन केले तेव्हा अधिपृष्ठ ( Supernatant ) द्रवावर (अथवा जो भाग पृष्ठभागावर राहिला त्या भागावर ) रासायनिक आणि जैवी ( biological ) उपचार, अन्य तीन अपशिष्टांच्या समवेत, करता आले आणि परिणामी मिश्रणाची तीव्रता पुष्कळच कमी झाली. क्रोमियम आणि सायनाइड हे दोन्ही अंतर्भूत असणारी अपशिष्टे निर्माण करणाऱ्या धातूंच्या तसेच अन्य धातूंच्या सफाई–यंत्रांतसुद्धा नियोजनाचा हा प्रकार वापरण्यात येतो. बहुतेक सर्व बाबतीत, अन्य अपशिष्टांच्या पासून सायनाइड धारक अपशिष्ट अलग करणे आवश्यक असते. त्यांना क्षारीय बनवावे लागते. आणि त्यांचे ऑक्सिकरण करावे लागते. उलट, क्रोमियम अपशिष्टे अम्लीय करावी लागतात आणि त्यांचे अपचयन (reduction) करावे लागते. नंतर दोन्ही अंत:प्रवाह (influents) पुन: एकत्र करून, धातू काढून टाकण्याकरता, क्षारीय द्रावणात अवक्षेपित करता येतात. जर वियोजन केले नाही तर अम्लीकरणाचा परिणाम विषारी हायड्रोजन सायनाइड वायू विकसित होण्यात होतो.

**कोष्टक ३–१.**

**वस्त्रे निर्माण करण्याच्या गिरणीतील अपशिष्टे–**

| | करडे पाणी* | शुभ्र पाणी | रंगाचे* अपशिष्ट | कियर* अपशिष्ट | सयुक्त अपशिष्ट |
|---|---|---|---|---|---|
| pH | ४.० | ७-३ | ११-० | ११.८ | ९-४ |
| एकूण घनपदार्थ, ppm | २६८० | ४२० | २८८० | १८८८० | ३५६० |
| तरंगते घनपदार्थ, ppm | २६४ | ६७ | १४८ | २१८ | १५६ |
| उपभुक्त ऑक्सिजन | १५६० | ३१ | ५५६ | ४९०० | ४६० |

* २१ व्या प्रकरणात यांची व्याख्या केली आहे.

काही अपशिष्टांचे वियोजन करणे सर्वच उद्योगात अतिशय फायद्याचे असते. तथापि, तीव्र व धोकादायक अपशिष्टांचे वियोजन करणे नेहमी इष्ट असते असा सर्वंकश ( blanket ) निष्कर्ष काढणे धोकादायक आहे. काही प्रसंगी याच्या अगदी उलट निर्णय–पूर्णतया समानीकरण –घेणे जरुरीचे असते.

## ३--४. अपशिष्टांचे समानीकरण – (equalization)

अनेक पदार्थ निर्माण करणाऱ्या संयंत्रात प्रक्रियांच्या विशाखनाचा ( diversification ) उपयोग करून अपशिष्टांचे समानीकरण करणे पसंत करण्यात येते. ह्या कामी, काही विशिष्ठ कालपर्यंत अपशिष्ठे साठवून ठेवावी लागतात. द्रोणीतील विश्रामकाल संयंत्रातील पुनरावृत्त ( repetitive ) प्रक्रियांना लागणाऱ्या कालावर अवलंबून असतो. उदाहरणार्थ, जर निर्माण केलेल्या एका पदार्थाला, अशा संयंत्रात, आठ तास कालावधी लागणाऱ्या परिचालनाची मालिका लागत असली तर, त्या संयंत्राला आठ तास अपशिष्ट साठून ठेवता येईल अशा अभिकल्पन केलेल्या समानीकरण–द्रोणीची जरुरी लागते. समानीकरण–द्रोणीतील निःस्त्रावाचा गुणधर्म, त्याच द्रोणीतील प्रत्येक स्वतंत्र अंतःस्त्रावाच्या गुणधर्माच्या पेक्षा, बराच अधिक सुसंगत असतो. pH आणि BOD चे स्थिरीकरण आणि घनपदार्थ व जड धातूंचे अवस्थापन, ही समानी-करणाच्या उद्दिष्टांच्यापैकी काही उद्दिष्टे आहेत. अस्थिर निःस्त्रावांच्यापेक्षा स्थिर निःस्त्रावांवर, औद्योगिक आणि नागरी उपचार–संयंत्रांत, अधिक सुलभतेने उपचार करता येतात. ज्याच्यावर आणखी उपचार करण्याची जरुरी नाही असा निःस्त्राव, कधीकधी समानीकरणातून निर्माण होऊ शकतो. आ. ३–१ मधील आरेखात समानीकरणाचे फायदेशीर परिणाम दिग्दर्शित केले आहेत.




आ. ३–१.

प्रामुख्याने अम्लीय अपशिष्ट निर्माण करणाऱ्या एका मोठ्या रासायनिक निगमाला असे आढळून आले की, आपल्या अपशिष्टांचे एका मातीच्या धारक द्रोणीत २४ तास समानीकरण करणे फायद्याचे आहे. ह्या समानीकरणाच्या मागोमाग, उच्च प्रमाणात क्षारीय अपशिष्ट निर्माण करणाऱ्या जवळच्या संयंत्रात, उदासीनीकरणाकरता, अम्ली अपशिष्ट-निःस्त्रावात स्वतःचे अपशिष्ट पंप करण्यात आले. उदासीनीकरणापूर्वी उच्च प्रमाणातील अम्लीय अपशिष्ट साफ करण्याकरता, जर त्याचे समानीकरण केले नसते तर, बऱ्याच प्रमाणात अतिरिक्त उदासीनिकारक शक्ति लागली असती.

वस्त्र निर्मितीतील सफाई करण्याच्या गिरणींतील अपशिष्ट घरगुती दुय्यम वाहित-मलोपचार संयंत्रात सोडण्यात आले व त्यामुळें त्या संयत्राच्या कार्यक्षमतेत बिघाड उत्पन्न झाला. जरी हे अपशिष्ट उपचार करण्यात येत असलेल्या एकूण अपशिष्टाच्या सुमारे दहा टक्केच होते तरी त्यामुळे मुख्यतः pH व BOD मध्ये चढ-उतार निर्माण झाले. pH व BOD हेच संयंत्रातील अडचणींना जबाबदार होते. त्यांच्यातील चढ उतार कमी करण्यास पुरेसा वेळ मिळेल अशी भरपूर आयतन असलेली समानीकरण-द्रोणी बांधणे हा यावरील उपाय होता. या शिवाय गिरणीच्या संचालकानी प्रवाहाच्या खालील तीन निरनिराळ्या वेगानी समानीकरण केलेले अपशिष्ट नागरी उपचार-संयंत्रात सोडण्याचे ठरविले; ज्यावेळी वाहितमलाची कमाल राशी संयंत्रात जात होती अगर त्याच्या उलट परिस्थिती होती त्यावेळी त्या राशींच्याशी जुळणारे प्रवाहाचे वेग ठेवण्यात आले. त्यामुळे घरगुती वाहितमलात गिरणीतल्या अपशिष्टाचे अधिक स्थिर तनुकरण ( dilution ) करता आले.

## ३-५ उपपदार्थांची पुनःप्राप्ती -

औद्योगिक अपशिष्टावरील उपचाराचा पुनःप्राप्ती हा एक अस्थिरतादर्शी ( utopian ) पैलू ( aspect ) आहे आणि आर्थिक फायदा मिळणे शक्य असलेल्या संपूर्ण समस्येचा तो एक टप्पा असतो. अपशिष्टाची समस्या सोडविण्याच्या ह्या दृष्टिकोनाबद्दल अनेक सल्लागारांनी आपली नापसंती दर्शविली आहे. अपशिष्टातील नष्टशेष-शोधनातून ( salvage ) यशस्वीपणे प्राप्त केलेल्या उपपदार्थांच्या अल्प टक्केवारीच्या आकडेवारीवर प्रामुख्याने त्यांचा रोख आधारलेला असतो. तथापि, उपपदार्थांच्या शोधास उत्तेजन दिले पाहिजे; मग ते प्रक्रिया व अपशिष्टांच्या समस्यांच्याबाबत त्यातून संचालकांना स्पष्ट अंतर्दृष्टि मिळते म्हणून का असेना ! अपशिष्टांची अखेरशेवट विल्हेवाट करावी लागतेच; मग त्याच्यापैकी काहीतील द्रव्यांचा जर कोणच्याही प्रकारे उपयोग झाला तर तेवढ्या भागाचा तरी निरास होतो हे उघड आहे. उपपदार्थांच्या पुनः प्राप्तींकरता अपशिष्टावर उपचार - प्रक्रिया करून निश्चित फल प्राप्ती झाल्याची अनेक उदाहरणे आहेत.

धातूवर मुलामा चढविण्याच्या उद्योगात, मुलाम्याच्या द्रावणातून फॉस्फॉरीक अम्ल, तांबे, निकेल, आणि क्रोमियम, यांची पुनः प्राप्ती करण्याकरता आयन विनिमयकांचा वापर करण्यात येतो. आणखी कोणाचाही उपचार न करता, आयनीभवनरहित पाणी वापरणे हे बॉयलर–पोषणाच्या कामी आदर्श ठरते मौल्यवान क्रोमियम, तांबे, आणि निकेल पुनः प्राप्त करण्यासाठी कारखान्यात मुलाम्याच्या द्रावणाचे निर्वात स्थितीत बाष्पीभवन केले जाते. निकेलच्या तारेचा मुलामा देण्याच्या संयंत्रात, निकेलची टंचाई असताना, सोडा अॅश वापरून मुलाम्याचे अपशिष्ट क्षारीय केले जाते आणि निकेलचे कार्बोनेटच्या स्वरूपात अवक्षेपण करण्यात येते. हा अवमल नंतर कोरडा केला जातो व निकेलच्या पुनःप्राप्तीकरता त्यावर उपचार केले जातात. चांदीचा मुलाम देण्याच्या संयंत्रावर अपशिष्टावरील उपचाराकरता दर वर्षी १,२०,००० डॉलर खर्च करण्यात येतात. त्यापैकी, अपशिष्टातून पुनः प्राप्त केलेल्या चांदीमुळे ६०,००० डॉलर परत मिळतात. विजेच्या धंद्यातून सोने, चांदी, व उपपदार्थ, तसेच पाणी, मौल्यवान धातू, आणि अम्ले, यांची पुनः प्राप्ती करण्यात येते.

विशेष प्रकारच्या कागद गिरण्यात, बहु–परिणामी बाष्पकांचा वापर करून, पाक–द्रवातून कॉस्टिक सोडा पुनः प्राप्त करण्यात येतो. रासायनिक संयंत्रात पातळ अपशिष्ट अम्लाचे, गरम शिशाचे वेंष्टन असलेल्या विटांच्या भिंतीच्या बुरजात, पुनः वापरता यावे म्हणून अम्लांचे सांद्रण करण्याकरता, फवारे मारण्यात येतात निर्वात निस्यंदकातील वडी ( cake ) कोरडी करून, अथवा त्रिपरिणामी बाष्पकात अपयुक्त ( spent ) मांसरसाचे ( broth ) बाष्पीभवन करून, औषध निर्मित कार्यालयात बुरशी पुनः प्राप्त करण्यात येते.

वाहितमल संयंत्रावरसुद्धा उपपदार्थांच्या धंद्यास सुरवात करण्यात आली आहे. वाहितमलाच्या पाचित्रातील मीथेन वायूचा उर्जा व ऊष्णतेकरता सर्रास उपयोग केला जातो आणि काही शहरांत उपचार केलेल्या व सुकविलेल्या वाहितमलातील अवमलापासून खते आणि व्हिटॅमिनचे घटक तयार करण्यात येतात. इंग्लंडमधील बेडफर्ड शहरातील वाहितमल-संयंत्रात, सल्फ्युरिक अम्लाने भंजन करून ( cracking ) आणि तुरटी व लोह-लवणांच्या सहाय्याने अवक्षेपण करून ग्रीजची पुनःप्राप्ती केली जाते.

आसवनीतील रबडी ( slop ) गाळून व दाट करून उपपदार्थांत तिचा वापर करण्यात येतो. यीस्टच्या गिरण्यातील अपशिष्टाच्या काही भागाचे बाष्पीभवन करून त्यातील शेषभाग पशुखाद्य म्हणून विकण्यात येतो.

कागद गिरण्यांतील सल्फाईटच्या अपशिष्ट द्रवापासून तयार केलेले उपपदार्थ ही अपशिष्टांच्या बहुविध उपयोगांची अभिजात उदाहरणे आहेत. इंधन, मार्गबंधक ( road binder ), पशुखाद्यांच्या लहान विटा, खते, विसंवाहनी संयुगे, बॉयलरच्या पाण्यातील संयोज्य ( additive ) पदार्थ, आणि तरंगण–अभिकर्ते ( Agent ) म्हणून आणि अल्कोहोल व कृत्रिम व्हॅनिलीन तयार करण्याकरता अपशिष्टे वापरली जातात. अपशिष्टातील सल्फाइटच्या द्रवापासून तयार केलेल्या उपपदार्थांचीं अमेरिकेत सुमारे २००० एकस्वे ( p tents ) घेण्यात आली आहेत.

पॅकबंदी कार्यालये आणि खाटिक कारखान्यात, टाकाऊ रक्ताची पुनः प्राप्ती केली जाते व पत्तीदार ( laminated ) लाकडी पदार्थ तयार करण्यात बंधक म्हणून आणि सरस तयार करण्यासाठी त्याचा उपयोग करण्यात येतो.

दुग्धव्यवसायात केसीन तयार करण्यासाठी क्रीम काढलेल्या दुधावर तनुकृत ( diluted ) अम्लाचा उपचार करण्यात येतो. त्यानंतर केसीन तयार करण्याच्या उद्योगात, अल्बुमिन अवक्षेपित व्हावे म्हणून, त्यातील अपशिष्टाचा उपयोग केला जातो. अशा प्रकारे प्राप्त झालेले अल्बूमिन – अपशिष्ट, दुग्धशर्करेचे मणिभीकरण ( crystallization ) होण्याकरता, वापरण्यात येते. आणि ह्या प्रक्रियेतील अवशेष कोबडयांचे अन्न म्हणून उपयोगात आणले जाते तसेच, क्रीम काढलेल्या दुधातून कॅल्शियम व सोडियम लॅक्टेटची निर्मिती करण्यात येते. सुकविलेल्या बाष्पीभवन केलेल्या ताकाचा कोंबडयांच्या पिलांचे अन्न म्हणून वापर केला जातो. असेही ऐकिवात आहे की, दुग्ध व्यवसायातील उपपदार्थ म्हणून चॉकोलेट आइस्क्रीमच्या उत्पादनास सुरवात झाली आहे.

जुडाई संयंत्राच्या सारख्या कंपन्यांचा धंदा, मुख्यतः अन्य संयंत्रांतील अपशिष्टातील पदार्थांच्यापासून उपपदार्थांचा विकास करणे हा असतो. अनेक जुडाईच्या संयंत्रांत, कोंबडयांच्या पिलांच्या पायांचा व पिसांचा अन्न आणि खते म्हणून आणि साबण तयार करण्यासाठी उपयोग करण्यात येतो.

एकदा का उपपदार्थाचा विकास झाला व त्यांची निर्मितो सुरू झाली की, अपशिष्टावरील उपचारप्रक्रियेतून नवीन पदार्थांची ओळख पटणे कठीण जाते. उदाहरणार्थ, जेव्हा उसापासून साखर तयार करण्यात येते तेव्हा, ब्लॅक स्ट्रॅप काकवी या नांवाने ज्ञात असलेला घट्ट पाकासारखा द्रव फुकट जातो. ही काकवी इतकी स्वस्तात मिळत असे की, ती जवळ जवळ टाकून दिली जाई. आज तिचे अनेक उपयोग केले जात आहेत. त्यातील सर्वात जास्त माहीत

असलेला उपयोग, व्यापारी अल्कोहोल तयार करण्यातील तिचे महत्व, हा होय. उसाच्या चिपांडांचासुद्धा लोक आता उपयोग करू लागले आहेत. भिंतीच्या विसंवाहनाकरता लागणाऱ्या पुठ्ठ्यांच्या पैकी " सेलोटेक्स " या नांवाने ओळखले जाणारे पुठ्ठे ह्या चिपाडांपासून तयार करण्यात येतात.

उद्योगांतील अपशिष्टांच्यापासून उपयुक्त पदार्थ तयार करण्याच्या अनेक मार्गांपैकी काही थोडे हे मार्ग आहेत आणि उपपदार्थ निर्माण करण्याकरता अपशिष्टांचा उपयोग करून सुद्धा जरी अपशिष्टांच्या विल्हेवाटीची समस्या तशीच चालू राहिली तरी ह्या प्रथेमुळे ती बऱ्याच प्रमाणात कमी झाली आहे.

**संदर्भ ग्रंथ –**

१ – डेव्हिस, लिन., " इंडस्ट्रियल वेस्ट कंट्रोल इन दी जनरल मोटार्स कॉर्पोरेशन," स्युवेज अॅंड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २९, ९,· १०२४ – (सप्टेंबर १९५७ )

२ – ट्रेब्लर. एछ. ए., " वेस्ट सेव्हिंग बाय इंप्रूव्हमेंट्स इन मिल्क प्लॅंट इक्विपमेंट,' प्रोसीडिंग्ज, इंडस्ट्रिअल वेस्ट् कॉन्फरन्स, पडर्यू युनिव्हर्सिटी (नोव्हेंबर १९४४) पानें ६–२१.



# : ४ : नाल्यातील कार्बनिक अपशिष्टांच्या भारांचे संगणन–

आधीच्या दोन प्रकरणांत वर्णन केल्याप्रमाणे अपशिष्टांची राशि आणि शक्ति किमान मर्यादेपर्यंत कमी करण्याच्या औद्योगिक संयंत्राच्या प्रयत्नानंतरसुद्धा काही अपशिष्टांची विल्हेवाट करणे जरूर असते. त्या उरलेल्या अपशिष्टांची राशि आणि गुणधर्म दाखविण्याकरता आणि त्यांच्यावर उपचार किती करावा लागेल हे निर्धारित करण्याकरता तपशिलवार विश्लेषणाची जरूरी असतें. कायदा अगर लोकमताचे समाधान व्हावे म्हणून ह्या बाबींची खात्री करुन घेतली पाहिजें.

ज्या नाल्यात अशी अपशिष्टे सोडावयाची आहेत त्याची परिस्थिती आणि त्याचा उत्तम वापर कसा करता येईल ह्या गोष्टींच्यावर आवश्य असलेल्या उपचारांची मात्रा मुख्यत: अवलंबून राहील. अपशिष्टांवर जर उपचार प्रमाणापेक्षा जास्त केले तर त्याचा परिणाम अनावश्यक आणि जाचक खर्चात होतो. तसेच उपचार कमी करण्याने पैसा आणि प्रयत्न वाया जाणे एवढेच त्याचे फळ मिळेल, कारण त्यामुळे प्रदूषणाची समस्या कमी होत नाही. म्हणून नाल्यातील परिस्थिति धोकादायक न होता प्रदूषणकारक द्रव्य किती सोडता येईल हे शक्य तितके काटेकोरपणे संगणित करणे, मोलाचे होईल हे सहज समजण्यासारखे आहे जरी ह्या पाठ्यपुस्तकात नाल्याच्या स्वास्थ्यासंबंधी संपूर्ण विषयाचा विचार केलेला नसला तरी अपशिष्टांवरील उपचारांच्या लागणाऱ्या मात्रांचे निर्धारण करण्याच्या महत्वाच्या पद्धतींचे विवरण करण्यात येईल.

गेल्या तीन वर्षांत स्ट्रीटर–फेल्प्स सूत्रीकरणे ही पद्धत वापरण्यात येत असून विभिन्न प्रमाणात ती यशस्वी झाली आहे. थॉमसने स्ट्रीटर–फेल्पस सूत्रीकरण प्रत्यक्ष वापरताना सोपी केली आहेत आणखी एक ( चर्चिल ) पद्धत गेल्या सात वर्षात साधारणत: वापरण्यात आली आहे. स्ट्रीटर-फेल्प्स सूत्रीकरणे, थॉमस पद्धत, आणि चर्चिल पद्धत, यांचे काहीसे तपशीलवार वर्णन या प्रकरणात केले आहे. नाल्यातील पुनर्वातन गुणांक ( reaeration coefficient ) आणि फेअरच्या घटकांसारखे नाल्यातील शुद्धीकरण गूणांक निश्चित करण्याकरता अन्य पद्धती उपलब्ध आहेत; पण जागेच्या मर्यादेमुळे ह्या प्रकरणात त्यांची चर्चा करण्यात येणार नाही.

## ४ – १. स्ट्रीटर फेल्प्स सूत्रीकरणे (४).

संगणित करावयाचे विविध प्रचल ( parameter ) दाखविण्याकरता वापरलेल्या संज्ञांची यादी आम्ही प्रथम सादर करीत आहो,—

$K_1$ – ऑक्सिजनीकरण नाहीसे होण्याचा दररोजचा वेग

$\Delta t$ – संचलनाचा (travel) काळ, दिवस

$L_A$ – अपरप्रवाही अंतिम BOD, ppm

$L_B$ – अनुप्रवाही अंतिम BOD, ppm

$K_2$ – पुनर्वातनाचा दर रोजचा वेग.

$\overline{L}$ – नाल्याच्या विभागातील ऑक्सिजनची सरासरी अंतिम मागणी, ppm अथवा पौंड

$\overline{D}$ – नाल्याच्या विभागातील ऑक्सिजनची सरासरी तूट, ppm अथवा पौंड

$\Delta D$ – नमुना घेण्याच्या अपरप्रवाही बिंदूच्या पासून अनुप्रवाही बिंदूच्या पर्यंत ऑक्सिजनच्या तुटीत होणारा फरक, ppm अथवा पौंड

t – नमुना घेण्याच्या अपरप्रवाही बिंदूच्यापासून अनुप्रवाही बिंदूच्या पर्यंत नाल्यातील प्रवाहाला लागणारा वेळ, दिवस

Dt – t या वेळेतील अनुप्रवाही दिशेने होणारी विलीन ऑक्सिजन मधील तूट, ppm अगर पौंड

DA – अपरप्रवाही दिशेने होणारी विलीन ऑक्सिजन मधील तूट ppm अगर पौंड

ऑक्सिजनीकरण नाहीसे होण्याचा वेग ($K_1$), पुनर्वातनाचा वेग ($K_2$), आणि विलीन ऑक्सिजनमधील तूट ($D_t$), ह्यांची संगणने करण्याकरता खालील सूत्रे वापरण्यात येतात.

$$K_t = \frac{L}{\Delta t} \log \frac{L_A}{L_B}$$ = ऑक्सिजनीकरण नाहीसे होण्याचा वेग – – (१)

$$K_2 = K_1 \frac{\overline{L}}{\overline{D}} - \frac{\Delta D}{२.३ \, \Delta t \overline{D}}$$ = पुनर्वातनाचा वेग – –– (२)

$$D_t = \frac{K_1 \quad L_A}{K_2 - K_1} \left[ १०^{-K_1} - १०^{-k_2 t} \right] + D_A १०^{-k_2 t}$$

= अनुप्रवाही दिशेकडील विलीन ऑक्सिजनमधील तूट – – – (३)

आ. ४-१ मध्ये रेखांकित केलेल्या नाल्याकरता अनुज्ञेय कार्बनिक भारणाचे गणन करण्यासाठी आता आपण स्ट्रीटर - फेल्प्स सूत्रीकरणे लागू करूया. कोष्टक ४-१ मध्ये दिलेली माहिती वापरून आपणास खालील संख्यात्मक फलने प्राप्त होतात.

$$K_1 = \frac{\text{१}}{\text{३.५/२४}} \log \frac{\text{७३३२}\times\text{१.४६}\dagger}{\text{४०००}\times\text{१.४६}\dagger} = \text{१.८}; \quad (\text{४})$$

$$\bar{L} = \frac{\text{BOD (केंद्र ४) + BOD (केंद्र ५)}}{2} = \frac{\text{७३३२}\times\text{१.४६}+\text{४०००}\times\text{१.४६}}{2}$$

= दररोज ८२७३ पौंड;

$$\bar{D} = \frac{\left[\begin{array}{l}\text{६.६}\times\text{८.३४}\times\text{३३.४}+\text{५.१}\times\text{८.३४}\times\text{३८.८}\\+\text{७.१}\times\text{८.३४}\times\text{४३}+\text{४.६}\times\text{८.३४}\times\text{३४.९}\end{array}\right.}{\text{४}}$$

= दर रोज १८४३ पौंड;

$$\Delta D = \begin{array}{l}(\text{६.६}\times\text{८.३४}\times\text{३३.४}+\text{७.१}\times\text{८.३४}\times\text{४३})\\-(\text{८५.१}\times\text{८.३४}\times\text{३८.८}+\text{४.६}\times\text{८.३४}\times\text{३४.९})\end{array}$$

= दररोज १३९५ पौंड;

$$\Delta t = \frac{\text{३.५}}{\text{२.४}} = \text{०.१४६ दिवस};$$

$$K_2 = \text{१.८}\cdot\frac{\text{८२७३}}{\text{१८४३}} - \frac{\text{१३९५}}{\text{२.३(०.१४६)(१८४३)}}$$

$$= \text{८.०८} - \text{२.२४} = \text{५.८४};$$

फेअरचे सूत्र वापरून आपणास $\frac{\text{५.८४}}{\text{१.८०}}$ = ३.२४ मिळतात

---

† – ऑक्सिजनीकरण नाहीसे होण्याचा वेग सामान्य आहे असे धरून २०$^0$C तपमाना तील ५ दिवसाच्या BOD चे पहिल्या टप्प्याच्या BOD त अंतिम परिवर्तन करण्यासाठी वापरण्यात आलेला गुणांक –

कोष्टक— ४–१.

| | तपमान $^{o}C$ | प्रवाह, घ. फू. /से * | प्रवाह, द.दि.द.ल गॅलन | ५ दिवसांचा BOD, ppm | विलीन ऑक्सिजन, ppm | ५ दिवसांचा BOD, पौंड/दिवस | विलीन ऑक्सिजन, पौंड/दिवस | संपृक्त विलीन ऑक्सिजन, ppm | विलीन ऑक्सिजन मधील तूट, ppm |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| केंद्र ४ | २० | ६०-१ | ३८.२ | ३६ | ४-१ | ११६५० | १३२५ | ९.२ | ५.१ |
| | १७ | ५४ | ३४.८८ | १०.३५ | ५-२ | ३०१५ | १५१२ | ९.८ | ४.६ |
| | | | | | एकूण | १४६६५ | | | |
| | | | | | सरासरी | ७३३२ | | | |
| केंद्र ५ | २० | ५१.७ | ३३.४० | २१.२ | २.६ | ५९०५ | ७२५ | ९.२ | ६.६ |
| | १६.५ | ६६.६ | ४३.०२ | ५.८३ | २.८ | २०९५ | १०५० | ९.९ | ७.१ |
| | | | | | एकूण | ८००० | | | |
| | | | | | सरासरी | ४००० | | | |

* दर सेकंदास घनफूट.




आ. ४-१. नाल्याच्या परिस्थितीचे उदाहरण.

फेअरच्या वर्गीकरणाप्रमाणे, D च्या गटात पडणाऱ्या नाल्यांचे वैशिष्ठ्य दाखविणाऱ्या म्हणजेच सामान्य वेगाने वाहणाऱ्या नाल्यांना जवळजवळ जलद वाहणारे नाले म्हणता येईल, असा हा निष्कर्ष आहे.

नाल्यातील ( K, व K2 ) हे प्रतिक्रिया–वेग आणि केंद्र ४ (DA व LA ) जवळची सुरवातीची परिस्थिती असताना, केंद्र ४ व ५ मधल्या भागातील कोणच्याही बिंदूजवळ विलीन ऑक्सिजनची तूट ( अवनमन वक्र sag curve ) आलेखित करणे शक्य असते. ह्यात असे गृहीत धरण्यात येते कीं, त्या भागांत प्रक्रिया–वेग स्थिर राहतात. आ. ४–२ हा प्रत्यक्ष अवनमन–वक्राचा लेखाचित्रीय आलेख आहे.

केंद्र २ मध्ये प्रवेश करणाऱ्या अपशिष्टाच्या भारावर प्राथमिक उपचार करण्यात आले आहेत आणि त्यामुळे BOD त ३० टक्के घट झाली आहे असे गृहीत धरून आपणास BOD ची खालील मूल्ये प्राप्त होतात :

९० (केंद्र २ जवळ BOD, ppm ) × ८.३४ × ८-१ घ. फू, /से.
× ०-६५ (द. ल. गॅं / दि.) = ३९५१ पौंड BOD / दिवस

९२ ( केंद्र २ जवळ BOD, ppm ) X ८.३४ × ८.२२ घ. फू. / से.

X ०.६५ (द. ल. गॅं. / दि.) = ४०९९ पौंड BOD / दिवस

एकूण ८०५०

सरासरी ४०२५ पौंड BOD / दिवस.

L = ४०२५×१.४६ = ५८७६ पौंड BOD / दिवस.



आ.४-२. अवनमन-वक्राचा आरेख

म्हणून केंद्र ४ जवळ आपणास

$$Lr = ५८७६ \times ०.७० + ७३३२ \times १.४६ - ५८७६$$

$$= ८९४२.३ \text{ पौंड / दिवस मिळतात.}$$

खालील गणनाने केंद्र ४ जवळची ऑक्सिजन मधील तूट प्राप्त करता येते.

$$D\,४ = \frac{४.६ \times ८.३४ \times ३४.९ + ५.१ \times ८.३४ \times ३८.८}{२}$$

= दररोज १४९४ पौंड, आणि केंद्र ५ जवळ अनुप्रवाही दिशेने विलीन ऑक्सिजन मधील तूट ३ ऱ्या समीकरणाने प्राप्त होते.

$$D\,५ = १.८ \times \frac{८९४२}{५.८४-१.८०}\left[१०^{-१.८\,(०.१४६)} - १०^{-५.८४(०,१४६)}\right] + १४९४ \times १०^{-५.८४\,(०.१४६)}$$

$$= ३९८० \left[१०^{-०.२६३} - १०^{-०.८३५}\right] + १४९४ \times १०^{-०.८३५}$$

$$= ३९८० \left(०.५४४८-०.१४६२\right) + १४९४\,(०.१४६२)$$

$$= ३९८० \left(०.३९९६\right) + २१८$$

= १५९० + २१८

= दररोज १८०८ पौंड (६)

केंद्र ५ जवळ आढळून आलेला किमान प्रवाह ( दररोज ३३.४ द. ल. गॅलन ) असताना आणि निरीक्षण केलेले कमाल तपमान ( २०$^0$c ) असताना ( केंद्र ५ जवळ ) संपृक्त विलीन ऑक्सिजन ९.२ − $\frac{१८०८}{३३.४×८.३४}$ अथवा ९.२ − ६.४९ = २.७१ ppm वि. ऑ.; आणि २५0c तपमानात, ८.४० − ६.४९ = १.९१ ppm वि. ऑ.! प्राप्त होतात.

म्हणून उन्हाळ्यात प्रवाह कमी असताना, तपमान उच्च असते तेव्हा नाल्यातील विलीन ऑक्सिजन किमान ४ ppm ठेवून नाल्याचे संरक्षण करण्यास प्राथमिक उपचार अपुरे पडतील.

## ४–२ नाल्यातील प्रदूषण भारक्षमता निर्धारित करण्याची थॉमस पद्धती नाल्याची भारक्षमता (५)

नाल्यांच्या क्षमतेचे संगणन करण्याकरता थॉमसने स्ट्रीटर–फेल्प्स समीकरण उपयुक्त रीतीने व सुलभतेने विकसित केले आहे. त्याच्या पद्धतींत, नाल्यांच्या K1 व K2 या प्रक्रिया–स्थिरांकांचे संगणन गृहीत धरण्यात येते. ते अनुच्छेद ४–१ मध्ये परिभाषित ( defiined ) केले आहे, तथापि, प्रदूषण-भाराच्या मूळ स्थानापासून अनुप्रवाही दिशेने t ह्या कोणच्याही वेळी विलीन ऑक्सिजनच्या तुटीचे संगणन करण्याकरता सूत्रालेख वापरावा असा प्रस्ताव त्याने केला आहे, या उलट, अनुप्रवाही दिशेने विलीन ऑक्सिजनची क्रांतिक तूट निर्माण करणारा प्रदूषण–भार त्याच सूत्रालेखावरून गणन करता येतो. निरनिराळ्या K2/K1 गुणोत्तरांच्या करता आलेखित केलेला D/LA विरूद्ध K2t हा सूत्रालेख आ. ४.३ मध्ये दाखविला आहे. ३ रे समीकरण पेलण्यासारखे नाही आणि बहुतेक व्यवहारात ते लागू करताना फक्त कंटाळवाण्या प्रयोग प्रमाद पद्धती (trial and error methods ) वापरूनच त्याची उकल करता येते याची थॉमसला जाणीव आहे. आपला सूत्रालेख वापरून ही उणीव भरून काढता येईल असा त्याला विश्वास वाटतो. सूत्रालेखाचा वापर करण्यापूर्वी, K1, K2, DA, व LA यांचे संगणन केले पाहिजे. योग्य त्या (K2/K1) वक्रावरील (K2t) ह्या पूर्ववातन स्थिरांकाने गुणलेला योग्य तो दिवस दाखविणारा बिंदू आणि डाव्या बाजूकडील DA / LA च्या मूल्याला जोडणारी एक सरळ रेषा ( isopleth ) ( जेथे दत्त विचरकाचे विशिष्ठ स्थिर मूल्य असते अशा दोन बिंदूंना जोडणारी रेषा ) सरळ – पट्टीने काढण्यात येते. नंतर आयसोप्लेथच्या अंतर्छेदाजवळ D/LA चे मूल्य वाचण्यात येते, शेवटी, योग्य त्या दिवस अखेरच्या तुटीचे मूल्य, LA ला अंतर्छेदन मूल्याने गुणुन, प्राप्त करण्यात येते.




आ. ४–३. विलीन ऑक्सिजनचच्या नमनाचा सूत्रालेख–

प्रारंभिक BOP व DD आणि स्वयं शुद्धीकरण स्थिरांकापासून अनुप्रवाही ऑक्सिजन त्रुटी प्रदूषण बिंदूपासून निर्धारित कराव्यात–( थॉमसला अनुसरून (५).




आ ४–४. टारहिल, N. C. येथील तर उतारापासून ( ferry ) कार्व्हर्स जवळच्या तर–उतारा पर्यंतचा केप फिअर नदीचा विभाग ( एन. सी. स्वास्थ्य अभियांत्रिकी विभाग राज्य स्वास्थ्य मंडळ, ८–२–५१, डी. एस. जी. )




आ. ४-५.

आ-.४–५. टारहिल, एन. सी, च्या खालील केप फिअर नदीचे ऑक्सिजन–अवनमन–वक्र (एन. सी. राज्य स्वास्थ्य मंडळ, स्वास्थ्य अभि–विभाग, ८-२-५१, एन. एल. एन.)

अनेक वेळा लेखकाने थॉमस सूत्रालेखाचा वापर केला आहे, आणि तो सोयीस्कर अचूक, आणि वेळ वाचविणारा असल्याचे त्याला आढळून आले आहे. ह्या पद्धतीच्या वापराचे निर्देशन करण्यासाठी पुढील प्रमेयाचा उपयोग केला आहे.

एका उद्योगातून २० oC तपमानात ५ दिवसांचा BOD भार ५००० पौंड प्रस्त्रावित करावयाची योजना आहे व उत्तर कॅरोलायनातील केप फिअर नदीवरील केंद्र १ जवळ त्याचे स्थान ठेवण्याचा प्रस्ताव आहे. (आ. ४–४). केंद्र १ च्या खाली असलेल्या नाल्यातील विभागाच्या विद्यमान आणि जर व जेव्हा त्या जागेला मान्यता दिली जाईल त्यावेळी असणाऱ्या भविष्यकालीन परिस्थतीविषयी उत्तर कॅरोलायना प्रवाह–स्वास्थ्य समितीला चिंता वाटत होती.

केंद्र १ पासून केंद्र ५ पर्यंत ३८.१ मैलांच्या अंतरात नदीतून सहा स्थानांवर नमुने घेण्यात आले. नदीच्या प्रत्येक विभागातून अंतिम BOD, विऑक्सिजनीकरण, आणि पूर्ववातन, यांचे वेग संगणित करण्यात आले आणि ऑक्सिजन अवनमन–वक्र प्राप्त करण्यासाठी त्यांचा उपयोग करण्यात आला. केंद्र १ जवळ नदीवर ५ दिवसांच्या BOD चा ५००० पौंड भार टाकण्यात आला आणि तशाच प्रकारच्या प्रतिक्रिया–वेगांवर आधारलेले नवीन ऑक्सिजन–अवनमन–वक्र काढण्याकरता थॉमस पद्धत वापरण्यात आली.

कोष्टक ४–२ पासून कोष्टक ४–८ पर्यंतच्या कोष्टकांत गणने दाखविली आहेत. पादांक ( subscript ) B, प्रयोगशाळेतल्या बाटलीतील मूल्यासंबंधी आहेत आणि str हे नाल्यातील विद्यमान तपमानातील मूल्य आहे. सध्या अस्तित्वात असलेले विद्यमान प्रवाह आणि पंचवार्षिक किमान प्रवाह यांनी प्रक्षेपित केलेले अवनमन – वक्र आ. ४–५ मध्ये दाखविले आहेत.

## नाल्यातील ऑक्सिजनच्या तुटींची गणने–

अन्वेषण करण्याच्या वेळी नाल्यात अस्तित्वात असलेल्या ऑक्सिजनच्या तुटींची गणने आता सादर करण्यात येत आहेत. केंद्रांच्यामधील नाल्यांच्या विभागाकरता $K_2$ ची मूल्ये प्राप्त करण्यासाठी खालीलप्रमाणे सुरवात करण्यात आली. त्यावेळी जास्तीत जास्त प्रातिनिधिक आणि योग्य मूल्य म्हणून $K_1$ चे (०,३३१) हे मूल्य वापरले.

कोष्टक ४–२.

केप फिअर ( नदीवरील ) वेगांची मापे. ( माप १ मैल = ०.३७५ इंच ) तरंगक = ४ मैल / २८० मीटर = ०.८६ मैल / तास × ०.८५‡ = ०.६९ मैल तास.

| केंद्र | मैल | केंद्रांच्या मधील अंतर | | प्रवाह काल, तास | प्रवाह काल, दिवस | एकूण प्रवाह काल, दिवस |
|---|---|---|---|---|---|---|
| | | इंच (नकाशा) | मैल | | | |
| १ | ० | ० | ० | ० | ० | ० |
| २ | ५.३३ | २ | ५.३३ | ७.७३ | ०.३२२ | ०.३२२ |
| ३ | १३.२३ | ३ | ८.०० | ११.६ | ०.४८३ | ०.९०५ |
| ४ | १६.२७ | १.१ | २.९४ | ४.२५ | ०.१७७ | १.०८२ |
| ५ | ३१.१७ | ५.६ | १४.९० | २१.६५ | ० ९०२ | १.९८४ |
| ६ | ३८.११ | २.६ | ६.९४ | १०.०६ | ० ४१९ | २.४०३ |

| केंद्र | oc २० ला L, ppm | KB | वि. ऑ. ppm | oc T | $L_{RI}$ ppm | $K_{Bstr}$ | $K_1$ | $K_2$ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | १.७१ | ०.१०१ | ५.८ | २६.० | १.९२ | ०.१३३ | −०.०९५ | −०.२७८ |
| २ | ३.४० | ०.०५४ | ५.४ | २६.५ | ३.८४ | ०.०७३ | ०.५८५ | ०.४९८ |
| ३ | १.७५ | ०.०९८ | ५.० | २७.२ | २.०० | ०.१३५ | −२.२१ | −१.८१ |
| ४ | ४.१८ | ०.०३५ | ५.९ | २९.० | ४.९३ | ०.०५२ | ०.३३१ | ०.४६१ |
| ५ | २.०९ | ०.१०० | ५.४ | २८.९ | २.४७ | ०.१४९ | ०.३३२ | ०.१०९ |
| ६ | १.५४ | ०.१५१ | ५.१ | २८.२ | १.७९ | ०.२१६ | | |

* हवा आणि अन्य पृष्ठीय परिणामांच्यासाठी दुरुस्त्या करण्याकरता

## कोष्टक ४–३.

### नाल्याच्या विऑक्सिकरण-वेगांची ( $K_1$ ) गणने–

$$K_1 = \frac{1}{t} \log \frac{L_A}{L_B}$$

१ पासून केंद्र २ पर्यंत

$$\frac{१}{०.३२२} \log \frac{१.९२}{३.८४}$$

$$\frac{१}{०.३२२} (०.२८२ - ०.५८४)$$

$$\frac{१}{०.३२२} (-०.३०२)$$

$$- ०.९५$$

ून केंद्र ३ पर्यंत

$$\frac{१}{०.४८३} \log \frac{३.८४}{२.००}$$

$$\frac{०.२८२}{०.४८३} = ०.५८५$$

३ पासून केंद्र ४ पर्यंत

$$\frac{१}{०.१७७} (०.३०१ - ०.६९२)$$

$$\frac{०.३९१}{०.१७७} = - २.२१$$

केंद्र ४ पासून केंद्र ५ पर्यंत

$$K_1 \quad \frac{१}{०.९०२} \log \frac{४.९३}{२.४७}$$

$$= \frac{०.२९९}{०.९०२} = ०.३३१$$

केंद्र ५ पासून केंद्र ६ पर्यंत

$$K_1 \quad \frac{१}{०.४१९} \log \frac{२.४७}{१.७९}$$

$$= \frac{०.१३९}{०.४१९} = ०.३३२$$

केंद्र १ आणि केंद्र २ च्या दरम्मान

$$K2 = \frac{\bar{L}}{\bar{D}} K1 - \frac{\Delta D}{२,३ \Delta t \bar{D}},$$

$$\bar{L} = \frac{११६०० + २५८००}{२} = १८७००,$$

$$\bar{D} = \frac{१८५०० + १४६००}{२} = १६५५०,$$

$$D = १८५५० + १४६०० = ३९००,$$

$$t = ०३२२$$

$$\text{म्हणून } K2 = ३.३३१ \frac{१८७००}{१६६५०} - \frac{३९००}{२.३ \times ०.३२२ \times १६५५०}$$

$$= ०.३८१ - \frac{३९००}{१२२७५}$$

$$= ०.३८१ - ०.३१८$$

$$= ०.३८१ - ०.३१८$$

$$= ०..६७$$

**कोष्टक ४–४**

**नाल्यातील ऑक्सिजनच्या तुटीची गणने**

| केंद्र | तपमान | संपृक्त विलीन ऑक्सिजन ppm | निरीक्षिण विलीन ऑक्सिजन नं. ppm | तूट ppm | गुहीत प्रवाह द. दिवशी द. लक्ष गॅलन | अनुप्रवाही – अप्रवाही ऑक्सिजनची तूट, दररोज पौंड |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २६ | ८ २२ | ५.८ | २.४२ | ७.२४ | (८०७×८.३४×२.७५)-(७२४×८,३४ ×२.४२) १८५००–१४६०० = +३९०० |
| २ | २६.५ | ८.१५ | ५.४ | २.७५ | ८०७ | (११३०×८.३४×३.०४) – (८०७× ८.३४×२ ७५) = २८६००–१८५०० =+१०१०० |
| ३ | २७.२ | ८.०४ | ५.० | ३.०४ | ११३० | (१०६०×८.३४×१.८७)–(११३० ८ ३४×३.०४) १६५००–२८६०० =–१२१०० |
| ४ | २९ | ७.७७ | ५.९ | १.८७ | १०६० | (१०६०×८.३४×२३८)–(१०६०× ८.३४×१.८७) २१००० – १६५०० =+४५०० |
| ५ | २८९ | ७.७८ | ५.४ | २.३८ | १०६० | (१०६०×८.३४×२.७९)–(१०६०× ×८ ३४×२.३८) २४७००–२१००० =+३७०० |
| ६ | २८.२ | ७.७९ | ५.१ | २.७९ | १०६० | |

### कोष्टक ४-५.
### नाल्यातील अंतिम जीवरसायनी ऑक्सिजन मागणीची BOD गणने

| केंद्र | oc L 20, ppm | LR ppm | $\bar{L}$, दररोज पौंड |
|---|---|---|---|
| १ | १७१ | १.९२ | { (१ ९२X७२४X८.३४+३.८४+८०७X८.३४) / २ } = (११६००+२५८००) / २ = १८७०० |
| २ | ३४० | ३.८४ | { (३.८४X८०७X८.३४+२.००X११३०X८.३४) / २ } = (२५८००+१८८००) / २ = २१८०० |
| ३ | १७५ | २.०० | { (२.००X११३०X८.३४+२.००X११३०X८.३४) / २ } = (१८८००+४३५००) / २ = ३११५० |
| ४ | ४१८ | ४ ९३ | { (४.९३X१०६०X८.३४+२.४७X१०६०X८.३४) / २ } = (४३५००+२१८००) / २ = ३२६५० |
| ५ | २.०९ | २.४७ | { (२.४७X१०६०X८.३४+१.७९X१०६०X८ ३४) / २ } = (२१८००+१५८००) / २ = १८८०० |
| ६ | १५४ | १.७९ | |

नाल्याच्या विभागाचा $K_1$ म्हणून ३३१ वापरून आपणास

| $K_2$ | $K_1$ | $K_2 / K_1$ | $D_A$ | $L_A$ | $D_A / L_A$ | $K_2\ t$ = |
|---|---|---|---|---|---|---|
| ०.६७ | ०.३३१ | ० २०२ | २.४२ | १.९२ | १.२६ | ०.०६७×०.३२२ |

= ०.०२२ प्राप्त होतो. सूत्रालेखावरून आपणास $\frac{D}{L_A}$ =१.४६ मिळतो, आणि म्हणून D = १.४६ १.९२ = २.८० ( केंद्र २ जवळ गणन केलेली तूट ) व २७५ निरीक्षण केलेली तूट) असते

केंद्रे २ व ३ च्या दरम्यान :

| $K_2$ | $K_1$ | $K_2/K_1$ | $D_A$ | $L_A$ | $D_A/L_A$ | $K_2 t$ |
|---|---|---|---|---|---|---|
| ०.१५९ | ०.३३१ | ०.४८ | २.७५ | ३.८४ | ०.७१६ | ०.१५९×०.४८३ = =०.०७७ |

कोष्टक ४–६

| केंद्र | $\bar{D}$, दर दिवशी पौंड |
|---|---|
| १ | $\frac{१८५०० + १४६००}{२} = \frac{३३१००}{२} = १६५५५$ |
| २ | $\frac{२८६०० + १८५००}{२} = \frac{४७१००}{२} = २३५५०$ |
| ३ | $\frac{१६५०० + २८६००}{२} = \frac{४५१००}{२} = २२५५०$ |
| ४ | $\frac{२१००० + १६५००}{२} = \frac{३७५००}{२} = १८७५०$ |
| ५ | $\frac{२४७०० + २१०००}{२} = \frac{४५७००}{२} = २२८५०$ |

सूत्रालेखावरून आपणास $\frac{D}{L_A}$ = ०.९ मिळतो. आणि म्हणून D = ०.९ × ३.८४ = ३.२५ ( कें ३ जवळ गणन केलेली तूट ) ३ ०४ (निरीक्षण केलेली तूट ) असते.

केंद्र ३ व ४ च्या दरम्यान

$$K_2 = ०.३३१ \frac{३११५०}{२२५५०} - \frac{( - १२१०० )}{( २.३ \times ०.१७७ \times २२५५०}$$

$$= ०.४५७ + \frac{१२१००}{९१८०} = ०.४५७ + १.३२० = १.७७७$$

| $K_2$ | $K_1$ | D | $L_A$ | $K_2/K_1$ | $D_A/L_A$ |
|---|---|---|---|---|---|
| १.७७७ | ०.३३१ | ३.०४ | २.०० | ५.३६ | १.५३ |

$K_2t$

१.७७७ . (०.१७७) = ०.३१४

सूत्रालेखावरून आपणास $\frac{D}{L_A}$ = ०,८५ मिळतो, आणि म्हणून D = ०.८५ × २.०० = १.७० केंद्र ४ जवळ गणन केलेली तूट ) व १.८७ (निरीक्षण केलेली तूट ) असते.

केंद्र ४ व ५ च्या दरम्यान

| $K_2$ | $K_1$ | $K_2/K_1$ | $D_A$ | $L_A$ | $D_A/L_A$ | $K_2$ t |
|---|---|---|---|---|---|---|
| ०.४६३ | ०.३३१ | १.४. | १.८७ | ४.९३ | ०.३८ | ०४६३ |

(०.९०२) = ०.४१८

कोष्टक ४–७.

नाल्याच्या पूनर्वातन–वेगाची ($K_2$) गणने

| केंद्रांच्या दरम्यान | |
|---|---|
| १ व २ | $K_2 = K_1 \frac{\bar{L}}{\bar{D}} - \frac{\triangle D}{२.३\triangle t\,\bar{D}}$ <br> $= -०.०९५ \cdot \frac{१८७७०}{१६५५५} - \frac{(३९००}{२.३\ (.३२२)\ १६५५५}$ <br> $= -०.१०७ - \frac{३९००}{१२२६५} = -०'.१०७ - ०.३१८ = -०.४२५$ |
| २ व ३ | $K_2 = ०.५८५ \cdot \frac{२१८००}{२३५५०} - \frac{१०१००}{२.३\times ०.४८३\times २३५५०}$ <br> $= ०.५४१ - \frac{१०१००}{२६२००} = ०.५४१ - ०.३८२ = ०.१५९$ |
| ३ व ४ | $K_2 = -२.२१ \cdot \frac{३११५०}{२२५५०} - \frac{-१२१००}{२.३\times ०.१७७\times २२५५०}$ <br> $= -३'०५ + \frac{१२१००}{९१६०} = -३.०५ + १.३२ = -१.७३$ |
| ४ व ५ | $K_2 = ०.३३१ \cdot \frac{३२६५०}{१८७५०} - \frac{४५००}{२.३\times ०.९०२\times १८७१०}$ <br> $= +०.५७९ - \frac{४५००}{३८८५०} = +०.५७९ - ०.११६ = +०.४६३$ |
| ५ व ६ | $K_2 = ०.३३२ \cdot \frac{१८८००}{२२८५०} - \frac{३७००}{२.३\times ०.४१९\times २२८५०}$ <br> $= +०.२७३ - ०.१६८ = ०.१०५$ |

सूत्रालेखावरून आपणास $\frac{p}{LA}$ = ०. ४५ मिळतो आणि म्हणून D = ०.४५ (४.९३) = २.२२ (कें ५ जवळ गणन केलेली तूट ) व २.८३ (निरीक्षण केलेली तूट ) असते. कंद्र ५ आणि ६ च्या दरम्यान

| K2 | K1 | K2/K1 | DA | LA | DA/LA | K2t |
|---|---|---|---|---|---|---|
| ०.१०५ | ०.३२२ | ०.३१६ | २३८ | २.४७ | ०९६ | ०.१०५ |

०.४२ = ०.०४४

**कोष्टक ४–८**

| केंद्रांच्या दरम्यान | K1 | K2 | अनुप्रवाही<br>गणन केलेली तूट, ppm | – ऑक्सिजन<br>निरीक्षण केलेली तूट<br>ppm |
|---|---|---|---|---|
| १ आणि २ | ०.३३१ | ०.०६७ | २.८० | २ ७५ |
| २ आणि ३ | ०.३३१ | ०.१५९ | ३.२५ | ३.०४ |
| ३ आणि ४ | ०.३३१ | १.७७७* | १.७० | १.८७ |
| ४ आणि ५ | ०.३३१ | ०.४६३ | २ २२ | २.३८ |
| ५ आणि ६ | ०.३३२ | ०.१०५ | २.९१ | २.७९ |

*एलिझाबेथ शहर आणि क्र. २ च्या पाशामुळे हे उच्च मूल्य आले आहे.

सूत्रालेखावरून आपणास $\frac{D}{L_A}$ १.१८ मिळतो. आणि म्हणून **D** = १.१८×२.४७ = २.९१ (केंद्र ६ जवळ गणन केलेली तूट) व २.७९ ( निरीक्षण केलेली तूट) येतें.

केंद्र १ जवळ दिवसांचा ५००० पौंड BOD लादल्या नंतर आम्ही आता नवीन ऑक्सिजनचे अवनमन–वक्र प्रस्थापित करणारी गणने सादर करीत आहो थॉमस सूत्रालेखाचा वापर केला होता. आणि नदीत्र पूर्वी निरीक्षण केलेल्या प्रतिक्रियांच्या वेगासारखे वेग राहतील असे गृहीत धरले होते.

द. दि. ७२४ द. ल. गॅ. X ५.८ + १.५ × ० = ७२५.५ × $\frac{४२००}{७२५.५}$ = × =

५.७९ = ( संयंत्रातील अपशिष्टातील सुरवातीचा विलीन ऑक्सिजन )

८.२५ – ५.७९ = २-४३ = ऑक्सिजनची तूट (D)

द. दि. ५००० पौंड ppm = ppm × ८.३४ × १.५ द. ल: गॅ. / दि. ppm = ५ दिवसांचा ४०० BOD

$$\overset{अ}{(७२४ \text{ द. ल. गॅ. / दि} \times १.२३ + १.५ \times ४००)}\frac{१.९२}{१.२३} = ७२५.५\times(\overset{ब}{८९०+६००})\frac{१.९२}{१.२३}$$

= ७२५.५ × $\frac{२३२५}{७२५.५}$ = × = ३२१ ppm L

(अ) = केंद्र १ जवळ २० $^{oC}$ तपमानात नदीतला ५ दिवसांचा BOD

(ब) = L चे मूल्य आणि नाल्यातील तपमानातील बदल यांच्यामुळे झालेली वाढ.

केंद्र १ व २ च्या दरम्यान :

| $K_2$ | $K_1$ | $K_2/K_1$ | $D_A$ | $L_A$ | $D_A/L_A$ |
|---|---|---|---|---|---|
| ० ०६७ | ०.३३१ | ०.२०२ | २.४३ | ३.२१ | ०.७६ |

$K_{2}t$

०.०६७ X ०.३२२ = ०.०२२

सूत्रालेखावरून आपणास $\frac{D}{L_A}$ = १.०६ मिळतो. आणि म्हणून D = १.०६ (३२१) = ३.४० ( कें. २ जवळ गणन केलेली तूट ) येते.

कें. २ व ३ च्या दरम्यान

| $K_2$ | $K_1$ | $K_2/K_1$ | $D_A$ | $L_A$ |
|---|---|---|---|---|
| ०.१५९ | ०.३३१ | ०.४८ | ३.४० | ( $\frac{३.८४}{३.२१ \times १.९२}$ ) ६.४२ |

| $D_A/L_A$ | $K_{2}t$ |
|---|---|
| ०.५३ | ०.१५९ × ०.४८३ = ०.०७७ |

सूत्रालेखावरून आपणास $\frac{D}{LA}$ = ०.७६ मिळतो आणि म्हणून D = ०.७६ (६.४२) = ४.८८ (केंद्र ३ जवळ गणन केलेली तूट) येते.

केंद्र ३ व ४ च्या दरम्यान

| K2 | K1 | K2 / K1 | DA | LA | DA / LA |
|---|---|---|---|---|---|
| १.७७७ | ०.३३१ | ५.३६ | ४.८८ | (६.४२ × २००) / ३.८४ = ३.३४ | १.४६ |

K2t

१.७७७×०.१७७ = ०.३१४

सूत्रालेखावरून आपणास $\frac{D}{LA}$ = ०.८१ मिळतो आणि म्हणून D = ०.८१ (३.३४) = २.७१ (कें. ४ जवळ गणन केलेली तूट येते०)

कें. ४ व ५ च्या दरम्यान

| K2 | K1 | K2/K1 | DA, | LA | DA/LA |
|---|---|---|---|---|---|
| ०.४६३ | ०.३३१ | १.४ | २.७१ | (३.३४× ४.९३ / २.००) = ८.२३ | ०.३३ |

$K_2 t$

०.४६३ × ०.९०२ = ०.४१८

सूत्रालेखावरून आपणास $\frac{D}{LA}$ = ०.४४ मिळतो आणि म्हणून D = ०.४४ (८.२३) = ३.६२ (कें. ५ जवळ गणन केलेली तूट) येते.

कें. ५ व ६ च्या दरम्यान

| K2 | K1 | K2/K1 | DA | LA | ( DA/LA ) |
|---|---|---|---|---|---|
| ०.१०५ | ०.३३२ | ०.३१६ | ३.६२ | (८.२३ × २.४७ / ४.९३ ) = ४.१३ | ०.८८ |

K2t

०.१०५ (०.४२) = ०.०४४

सूत्रालेखावरून आपणास $\frac{D}{LA}$ = १.१६ मिळतो आणि म्हणून D = १.१६ ×४.१३ = ४.८० ( कें. ६ जवळ गणन केलेली तूट) येते.

५ वर्षातील किमान प्रवाह असताना ५ दिवसांचा ५००० पौंड ऑक्सिजन लादणे –

संयंत्रातील अपशिष्टाचा भार, जेव्हा नदीचा ५ वर्षातील किमान प्रवाह असतो त्यावेळच्या परिस्थितीत, आपण तपासूया. ऑक्सिजनच्या तुटीचे मापन करण्याकरता पुनः थॉमस सूत्रालेखाचा उपयोग करूया.

$$३०० \times ५.८ + १.५ \times ० = ३०१.५ \times$$

$$\frac{१७४०}{३०१.५} = X = ५.७७$$ ( प्रवाह कमी असतानाचा विलीन ऑक्सिजन )

८.२२ – ५.७७ = २.४५, कमी प्रवाहाच्या वेळेची ऑक्सिजनची तूट ( **D** )

कमी प्रवाहाच्या वेळी जेव्हा y = L ppm असतो तेव्हा ( ३०० × १.२३ + १.५ × ४००) $\frac{१.९२}{१२३}$ = ३०१.५ y

$$(३६९ + ६००) \frac{१,९२}{१.२३} = ३०१.५y$$

$$\frac{१५००}{३०१.५} = y =$$ प्रवाह कमी असतानाचा ५.०२ **L** ppm

कें १ व २ च्या दरम्यान

| $K_2$ | $K_1$ | $K_2/K_1$ | $D_A$ | $L_A$ | $D_A/L_A$ |
|---|---|---|---|---|---|
| ०.६७ | ०.३३१ | ०.२०२ | २.४५ | ५ ०२ | ०.४८८ |

$K_2t$

०.०९७ × ०.३२२ = ०.०२२

सूत्रालेखावरून आपणास $\frac{D}{LA}$ = ०.८१ मिळतो, आणि म्हणून D = ०-८१(५.०२) = ४ ०७ ( कें २ जवळ गणन केलेली तुट ) येते

कें २ व ३ च्या दरम्यान

| K2 | K1 | K2/K1 | DA | LA | DA/LA |
|---|---|---|---|---|---|
| १.५९ | ०.३३१ | ०.४८ | ४.०७ | $\left(५.०२ \times \frac{३.८४}{१.९२}\right)$ १०.०५ | ०.४०५ |

K2t

०.१५९ × ०.४८३ = ० ०७७

सूत्रालेखावरून आपणास $\frac{D}{L_A}$ = ०.६५ मिळतो आणि म्हणून D = ०.६५ (१०.०५)
= ६.५४ (कें ३ जवळ गणन केलेली तूट) येते.
केंद्र ३ आणि ४ च्या दरम्यान

| $K_2$ | $K_1$ | $K_2/K_1$ | $D_A$ | $L_A$ | $D_A/L_A$ |
|---|---|---|---|---|---|
| १.७७७ | ०.३३१ | ५.३६ | ६.५४ | $\left(१०.०५ \times \frac{२.००}{३.३८}\right)$ ५.२३ | १.२५ |

$K_2 t$
१.७७७ × ०.१७७=०.३१४

सूत्रालेखावरून आपणास $\frac{D}{LA}$ = ०.७१ मिळतो, आणि म्हणून D = ०.७१ ( ५.२३ )
= ३.७१ ( कें. ४ जवळ गणन केलेली तूट) येते.
कें. ४ व ५ च्या दरम्यान :

| $K_2$ | $K_1$ | $K_2/K_1$ | $D_A$ | $L_A$ | $D_A/L_A$ |
|---|---|---|---|---|---|
| ०.४६३ | ०.३३१ | १.४ | ३.७१ | $\left[५.२३ \times \frac{४.९३}{२.००}\right]$ १२.९ | ०.२८८ |

$K_2t$
०४६३ × ०.९०२ = ०.४१८

सूत्रालेखावरून आपणास $\frac{D}{L_A}$ = ०.४ मिळतो. आणि म्हणून D = ०.४ (१२.९)
= ५.१६ ( कें ५ जवळची गणन केलेली तूट ) येते

केंद्र ५ व ६ च्या दरम्यान

| $K_2$ | $K_1$ | $K_2/K_1$ | $D_A$ | $L_A$ | $D_A/L_A$ |
|---|---|---|---|---|---|
| ०.१०५ | ०.३३२ | ०.३१६ | ५.१६ | $\left(१२.९ \times \frac{२.४}{४.९३}\right)$ ६.४५ | ०.८ |

$K_2t$
०.१०५ × ०.४२ = ०.०४४

सूत्रालेखावरून आपणास $\frac{D}{L_A}$ = १.०८ मिळतो, आणि म्हणून D = १.०८ (६.४५)
= ६.९७ (केंद्र ६ जवळ गणन केलेली तूट) येते

कोष्टक ४-९

२५ °C तपमानात केंद्र १ ते ६ जवळ पाण्यात राहिलेला ऑक्सिजन

| केंद्र | संपृक्त विलीन ऑक्सिजन, ppm | ( गणन केलेल्या तुटी ) ppm | | | शेष $O_2$, ppm | | | शेष $O_2$, संपृक्तीची टक्केवारी | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | संयंत्र नसताना | संयंत्रा-सह | प्रवाह कमी असताना, संयंत्र | संयंत्र नसताना | संयंत्रा-सह | प्रवाह कमी असताना संयंत्र | संयंत्र नसताना | संयंत्रा-सह | प्रवाह कमी असताना संयंत्र |
| १ | ८.३८ | २.४२ | २.४३ | २.४५ | ५.९६ | ५.९५ | ५ ९३ | ७१ | ७१ | ७०.५ |
| २ | ८.३८ | २.८० | ३.४० | ४.०७ | ५.५८ | ४.९८ | ४.३१ | ६६.७ | ५९.५ | ५१.४ |
| ३ | ८.३८ | ३.२५ | ४.८८ | ६.५४ | ५.१३ | ३.५० | १.८४ | ६१.३ | ४१.८ | २२.० |
| ४ | ८.३८ | १.७० | २.७१ | ३.७१ | ६ ६८ | ५.६७ | ४.६७ | ७९.८ | ६७.७ | ५५.८ |
| ५ | ८.३८ | २.२२ | ३.६२ | ५.१६ | ६.१६ | ४.७६ | ३.२२ | ७३.६ | ५७.० | ३८.४ |
| ६ | ८.३८ | २.९१ | ४.८० | ६.९७ | ५,४७ | ३.५८ | १.४१ | ६५.३ | ४२.८ | १६.८ |

केंद्र १ व केंद्र ४ जवळील बंधाऱ्याच्या दरम्यानच्या नदीच्या विभागातील आधीच अस्तित्वात असलेल्या ऑक्सिजनच्या अवनमनाचे कारण हॅरिसन क्रीकमधून होणारे निःसारण हे होते हे उघड आहे.

नदीच्या विभागात २५ $^{o}C$ तपमानात घेतलेल्या नमुन्यातील ऑक्सिजनचे क्रांतिक सांद्रण यू. एस. पाश क्र. २ (केंद्र ४) च्या जवळील धरणाच्या किंचित वरील बाजूस ५.१ ppm होते. तथापि, ह्या धरणावरून जाणाऱ्या पाण्याच्या वातनामुळे ऑक्सिजनची पातळी ६.८ ppm पर्यंत (३८ मैलांच्या संपूर्ण विभागात प्राप्त केलेली सर्वोच्च पातळी) आणली गेली. एलिझबेथ शहरातील प्रदूषणामुळे पुनः एकदा केंद्र ५ जवळ ऑक्सिजनचे ६.१ ppm इतके अवनमन झाले, आणि केंद्र ५ व ६ मधील विभागातील पुनर्वातनाचा वेग तुलनेने मंद असल्यामुळे केंद्र ६ च्या विभागाच्या शेवटी ऑक्सिजनच्या पातळीतील अवनमन ५.७५ ppm तसेच चालू राहिले.

नदीत कें. १ जवळ जेव्हा संयंत्रभाराचे अध्यारोपण (Super-imposed) केले तेव्हा, जरासे गंभीर परिणाम घडून आले. टारहिलच्या जवळ असलेल्या ५.९ ppm ऑक्सिजनचे कें. ४ जवळच्या धरणाच्या किंचित वर सुमारे ३.२ ppm इतके अवनमन झाले. ह्या ठिकाणी वातन केल्यामुळे (ऑक्सिजनची) पातळी ५.७ ppm इतकी वर आणली गेली, पण त्या ठिकाणापासून कें. ६ व ४ च्या दरम्यानच्या विभागात त्याचे पुनः एकदा ३.६ ppm इतके अवनमन झाले.

अनुप्रवाही दिशेने ऑक्सिजनचे सांद्रण एका विशिष्ठ मूल्याच्याखाली कमी न होता नाल्यात कमाल BOD सोडता येईल अशा रीतीने अंदाजी $L_A$ इतक्या औद्योगिक अपशिष्टाच्या विश्लेषकास (analyst) परवानगी देणारे एक सूत्रीकरणसुद्धा थॉमसने (५) उपलब्ध केले आहे. हे सूत्र –

$$\log L_A = \log D_C + \left[ १ + \frac{K_1}{K_2 \quad K_1} \left( १ - \frac{D_A}{D_C} \right)^{.४१८} \right] \log \frac{K_2}{K_1}$$

असे आहे.

अनुप्रवाही दिशेने टिकवून ठेवण्याच्या ऑक्सिजनच्या तुटीची मूल्ये, नाल्यातील प्रतिक्रियागुणांक ($K_1$ व $K_2$), आणि प्रदूषणाच्या वृद्धीच्या बिंदूच्या जवळची ऑक्सिजनची प्रारंभिक तूट, वरील समीकरणात घालून नाल्यात मिसळता येईल असा पहिल्या टप्प्यातील कमाल अंतिम BOD संगणित करता येणे शक्य आहे.

नदीत ५ वर्षांतील मंद प्रवाह किमान असताना जेव्हा तिच्यावर संयंत्रभार लादण्यात आला तेव्हा, धरणाच्या किंचित वरच्या बाजूस ऑक्सिजनचे सुमारे १.४ ppm पर्यंत

अवनमन झाले. त्यात जितकी ऑक्सिजनमधील तूट होती तितका पुनर्वातनाचा वेग जास्त होत असल्याने, धरणाजवळ वातनाने ऑक्सिजनची पातळी ४.७ ppm पर्यंत वर आली. ह्या बिंदूपासून, केंद्र ४ जवळ, ऑक्सिजनची पातळी पुनरपि केंद्र ६ पर्यन्त १.४ ppm इतक्या कमी मूल्यापर्यंत अवनमित होऊ लागली.

म्हणून, यू. एस पाश क्र. २ च्या जरा खाली (केंद्र ४), जेथे नाल्यातील परिसंपत्ति ( assets ) कमाल पातळीवर होती तेथे, संयंत्राचे स्थान ठेवावे अशी शिफारस करण्यात आली. केंद्र ४ जवळ स्थान ठेविल्याने नदीत काहीशी घाण निर्माण होईल, पण जर संयंत्राचें स्थान केंद्र १ जवळ ठेविले असते तर ऑक्सिजनची पातळी जितकी खाली गेली असती तितकी खाली जाणार नाही. तसेच केंद्र ४ पासून केंद्र ६ पर्यंत नदीवर ऑक्सिजनचे आधीच अवनमन झालेले असल्याने, ह्या स्वीकार्य जागेवर संयंत्राचे स्थान ठेवण्याकरता किमान गरज म्हणून संयंत्रात प्राथमिक उपचाराची योजना करावी अशी शिफारस करण्यात आली. या शिवाय, संयंत्रावर कार्यक्षम दुय्यम उपचाराची योजना केल्याखेरीज हे संयंत्र केंद्र १ जवळ उभारण्यास परवानगी देऊ नये असे लेखकाचे मत होते.

## ४–३. बहुविध रेखीय सहसंबंधांची चर्चिल पद्धत –

योग्य अशा २४ बिंदूंच्या जवळ घेतलेल्या नमुन्यांच्यावरून BOD, विलीन ऑक्सिजन, तपमान, आणि नाल्यातील प्रवाह, यांच्या दरम्यान सामान्यतः चांगल्या प्रकारचा सहसंबंध असतो असे चर्चिलला (१) आढळून आले. म्हणजेच, नाल्यात घडून येणारे विलीन ऑक्सिजनचे अवनमन, BOD, तपमान, आणि प्रवाह. या फक्त तीन चर घटकांच्यावर अवलंबून असते असे त्याला आढळून आले. किमान – चौरस पद्धतीचा ( Least - square method ) वापर करून, कोणच्याही इच्छित BOD भारणासाठी विलीन ऑक्सिजनच्या अवनमनाचे भाकित करता यावे म्हणून समाश्रयण रेखा ( Line of regression ) संगणित करता येते. केंद्र'च्या दरम्यान प्रवाहाला लागणारी वेळ आणि परिणामी ( $K_1$, $K_2$ व $K_3$ हे) नाल्यातील प्रतिक्रिया – वेग निश्चित करण्याकरता वापरण्यात येणाऱ्या, पुष्कळवेळा संशयास्पद आणि नेहमीच बोजड असलेल्या, कार्यपद्धतीचे ह्या पद्धतीने निरसन होते

जर प्रत्येक नाल्यातील नमुना गोळा केला आणि नाल्यातील तीन चर घटकांपैकी एकाच्या कमाल व किमान अवस्थेत त्याचे निरीक्षण केले तर चर्चिल आणि बकिंगहॅम यांच्या पद्धतींनी एक चांगला सहसंबंध प्राप्त होतो असे लेखकाला (३) आढळून आले. व्यावहारीक आणि विश्वासार्ह निष्कर्ष मिळण्यासाठी अतिरिक्त ६ नमुन्यांची गरज लागली. अतिरिक्त नमुने घेण्याने काही थोडया प्रमाणातच निष्कर्षांचे परिष्करण

कोष्टक ४–१०

**विलीन ऑक्सिजनचे पतन, Bod, तपमान आणि**

| तारीख | विलीन ऑक्सिजन | | $O_2$ तील पतन, ppm | नमनाच्या वेळचा BOD, ppm | तपमान oc | प्रवाह द. से. स. १००० घ. फू. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | केंद्र ३ च्या जवळ, ppm | केंद्र ५ च्या जवळ, ppm | y | $X_1$ | $X_2$ | $X_3$ | $y^2$ | $yx_1$ |
| ६-१८-५८ | १०.० | ७.९ | २.१ | ८.४ | ११.५ | ७.१४ | ४.४१ | १७.६४ |
| ७-१-५८ | ८.२ | ७.२ | १.० | २.६ | २०.५ | ११.७१ | १.०७ | २.६० |
| ७-२२-५८ | ७.२ | २.६ | ४.६ | २१.२ | २०.० | १९.३५ | २१.१५ | ९७.५२ |
| ८-४-५८ | ८.३ | २.८ | ५.५ | ५.८३ | १६ ५ | १५ ०२ | ३०.२५ | ३२.०६ |
| बेरीज | | | १३.२ | ३८.०३ | ६८.५ | ५३.२२ | ५६.८१ | १४९.८२ |
| | | | $\overline{y}$ | $\overline{x}_1$ | $\overline{x}_2$ | $\overline{x}_3$ | | |
| सरासरी | | | ३.३० | ९ ५१ | १७.१२ | १३.३१ | | |
| | | | | | | | $ny^2$ | $nyx_1$ |
| दुरुस्त केलेले घटक | | | - | - | | | ४३.५६ | १२५.५३ |
| दुरुस्त केलेल्या बेरजा | | | - | - | | | १३.२२ | २४.२८ |

कोष्टक ४–१० (चालू)

नाल्यातील प्रस्त्राव (४ नमुने)

| $yx_2$ | $yx_3$ | $x_1^2$ | $x_1 x_2$ | $x_1 x_3$ | $x_2^2$ | $x_2 x_3$ | $x_3^2$ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २४.१५ | १५.०० | ७०.५० | ९६.९० | ५९.९८ | १३२.२५ | ८२.११ | ५०.९८ |
| २०.५० | ११.७१ | ६.७६ | ५३.३० | ३०.४५ | ४२०.२५ | २४०.०५ | १३७.१२ |
| ९२.०० | ८९.०० | ४४९.४४ | ४२४.०० | ४१०.२२ | ४००.०० | ३८७.०० | ३७४.४२ |
| ९०.७५ | ८२.६१ | ३३.९९ | ९६.१९ | ८७.५७ | २७२.२५ | २४७.८३ | २२५.६० |
| २२७.४० | १९८.३३ | ५९०.७० | ६७०.१० | ५८८.२० | १२२४.७५ | ९५६.९५ | ७८८.१२ |
| $nyx_2$ | $nyx_3$ | $nyx_1^2$ | $nx_1x_2$ | $nx_2 x_3$ | $nx_2^2$ | $nx_2x_3$ | $nx_3^2$ |
| २२५.९८ | १७५.६९ | ३६१.६० | ६५१.२४ | ५०६.३२ | ११७२.३६ | ९११.४७ | ७०८.६२ |
| १.४२ | २२.६४ | १९८,९३ | १८.८५ | ८१.९० | ५२.४४ | ४४.४८ | ७९.५० |

( refinement ) होणे शक्य असले तरी आयोजन, संग्राहण, आणि नमुन्यांचे विश्लेषण व निष्कर्षांचे गणन, यांच्यावर घेतलेले परिश्रम, ह्या परिष्करणामुळे बहुधा वाया जाणार नाहीत.

आ. ४–६ मध्ये रेखाटन केलेल्या नाल्याची परिस्थिति दाखविणाऱ्या पुढे दिलेल्या आधारसामग्रीवरून, उत्तम तऱ्हेने जुळणारी रेषा आणि परिणामी ऑक्सिजनचे अवनमन प्राप्त करण्याकरता चर्चिलपद्धतीचा उपयोग कसा करावा याचे, निर्देशन होते. वेगवेगळ्या मंद ते मध्यमगति प्रवाहांच्या कालांतील चार निरनिराळ्या दिवशी जमविलेल्या आधार-सामग्रीवरून कोष्टक ४–१० त दाखविलेली केंद्र ३ व ५ च्या दरम्यानची अवनमन मूल्ये कळून आली.




आकृती ४-६

आपल्या गणनांकरता लघुतम वर्गांच्या (२) तत्वावर तीन सामान्य समीकरणे आपण खालील प्रमाणे वापरणार आहोत.

$$b_1 \ \Sigma x_2^1 + b_2 \ \Sigma x_1 \ x_2 + b_3 \ \Sigma x_1 \ x_3 = \Sigma x_1 \ y \qquad (१)$$

$$b_1 \ \Sigma x_1 \ x_2 + b_2 \ \Sigma x_2^2 + b_3 \ \Sigma x_2 \ x_3 = \Sigma x_2 \ y \qquad (२)$$

$$b_1 \ \Sigma x_1 \ x_3 + b_2 \ \Sigma x_2 \ x_3 + b_3 \ \Sigma x_3^2 = \Sigma x_3 \ y \qquad (३)$$

आता कोष्टक ४–१० मधील आंकडे ( अक्षरा ) बदली घालून पायरीपायरीने पुढे जाऊया. सूत्र १ वरून आपणास १.९८.९३ $b_1$ + १८.५८ $b_2$ +८१—९० $b_3$ =२४.२८ (४) मिळतात.

१९८-९३ ने समीकरण (४) ला भागून

$b_1$ + ०.०९३४ $b_2$ + ०.४११७ $b_3$ = ०.१२२० येतात (५)

०.०९३४ ने समीकरण (४) ला गुणून

१८.५८ $b_1$ १.७३५ $b_2$ + ७.६५ $b_3$ = २.२७ येतात (६)
नंतर सूत्र (२) चा वापर करून

१८५८ $b_1$ + ५२.३९ $b_2$ + ४४.४८ $b_3$ = १.४२ मिळतात (७)
समीकरण (६) मधून समिकरण (७) वजाकरून

− ५०.६६ $b_2$ − ३६.८३ $b_3$ = ०.८५ येतात. (८)
समीकरण (८) ला − ५०.६६ ने भागून

$b_2$ — ०.७२७ $b_3$ = — ०.०१६७८ येतात (९)

आता आपण समीकरण (४) ला — ०.४१२ ने गुणूया आणि − ८१.९६ $b_1$ ७.६३ $b_2$ − ३३.७४ $b_3$ =—१०.०० प्राप्त करूया (१०)
नंतर समीकरण (४) ला ०.७२७ ने गुणून

− ३६.८३ $b_2$ − २६.७७ $b_3$ = + ०.६१७९ येतात. (११)
शेवटी, सूत्र ३ लागू करून आपणास

८१.९० $b_1$ + ४४.४८ $b_2$ + ७९.५० $b_3$ = २२.६४ मिळतात. (१२).
समीकरणे (१०), (११), आणि (१२) ची बेरीज करून आपणास

१६..९३ $b_3$ = १२.०१ मिळतात. (१३)

∴ $b_3$ = ०.७०९३ (१४)

समीकरण (९) वरून

$b_2$ = − ०.५३२४ (१५)

समीकरण ५ वरून

$b_1$ = − ०.१२२३ (१६)

समीकरण (१२) ची सर्व मूल्ये घालून तपासणी करा :

५६.३९ = ५६.३३

$a = y - (b_1 X_1 + b_2 X_2 + b_3 X_3)$,

a = ४.१३६.

पूर्वीच्या संगणनांवरून विलीन ऑक्सिजनच्या पतनाचे पुढील समीकरण मिळते :

$y = a + bX_1 + b_2 X_2 + b_2 X_3$

y = ४.१३६ — ०.१२२१ $X_1$ — ०.५३२४$X_2$ + ०.७०९३$X_3$

येथे y = विलीन ऑक्सिजनचे पतन, ppm

$X_1$ = नमनाच्या वेळचा BOD, ppm,

$X_2$ = नमनाच्या वेळचे तपमान, °C,

$X_3$ = नमनाच्या वेळचा प्रवाह, द. से. स. १००० घ. फुट.

**कोष्टक ४–११.**

**गणन केलेल्या ऑक्सिजनच्या पतनाची नमनाच्या वेळच्या ऑक्सिजनच्या निरीक्षण केलेल्या पतनमूल्याशी तुलना.**

| दिनांक | सूत्रावरून गणन केलेले ऑक्सिजनचे पतन, ppm | निरीक्षण केलेले ऑक्सिजनचे पतन, ppm |
|---|---|---|
| ६/१८/५८ | २.०५ | २.१० |
| ७/१/५८ | १.२१ | १.०० |
| ७/२२/५८ | ४.६२ | ४.६० |
| ८/४/५८ | ५.३० | ५.५० |

विलीन ऑक्सिजनच्या समीकरणावरून प्रदूषणाच्या निर्मितिस्थानाच्या खाली घडून येणाऱ्या नमनाचे अचूकतेच्या स्वीकार्य मात्रेत भाकित करता येते हे दाखविण्याकरता त्या समीकरणातून प्राप्त केलेल्या निष्कर्षाचा कोष्टक ४–११ त सारांश केला आहे. प्रदूषणाच्या निर्मितिस्थानापाशी अनुज्ञात BOD भारण संगणित करण्याकरता दुसरी सहसंबंधाची कार्यपद्धती वापरली पाहिजे. नाल्यातील नमनबिंदूपाशी अपरप्रवाही BOD भार, तपमान प्रस्त्राव, आणि परिणामी BOD यांच्याशी, सहसंबंधित करून तशाच प्रकारच्या लघुतम – वर्ग पद्धतीवरून BOD चे समीकरण व्युत्पन्न करता येते. BOD चे समीकरण विकसित करण्याकरता लागणारी आधारसामग्री कोष्टक ४–१२ त दिली आहे.

खालील तीन सामान्य समीकरणे वापरून,

$$b_1\ \Sigma X_1^2 + b_2\ \Sigma x_1 x_2 + b_3\ \Sigma x_1 x_3 = \Sigma x_1 y \qquad (१)$$

$$b_1\ \Sigma x_1 x_2 + b_2\ \Sigma x_2^2 + b_3\ \Sigma x_2 x_3 = \Sigma x_2 y \qquad (२)$$

$$b_1\ \Sigma x^1\ x_3 + b_2\ \Sigma x_2 x_3 + b_3\ \Sigma x_2^2 = \Sigma x_3 y \qquad (३)$$

सूत्र (१) वरून आपणास

४.६५ $b_1$ – १५.०६ $b_2$ + १३.४७ $b_3$ = ४.९९ मिळतात. (४)

४.६५ ने समीकरण (४) ला भागून

$b_1$ − ३.२४ $b_2$ + २.९० $b_3$ = १.०७ मिळतो. (५)

आता सूत्र (२) वापरून

− १५.०६ $b_1$ + ५१.०० $b_2$ — ३९.२३ $b_3$ = − १५.९२ मिळवू (६)

३.२४ ने समीकरण (४) ला गुणून

+ १५.०६ $b_1$ − ४८.७९ $b_2$ + ४३.६४ $b_3$ = १६.१७ येतात. (७)

समीकरण (६) व (७) ची बेरीज करून

२.२१ $b_2$ + ४.४१ $b_3$ = ०.२५ येतो. (८)

२.२१ ने समीकरण (८) ला भागून आपणास

$b_2$ + २.०० $b_3$ = ०.११३ मिळतो. (९)

− २.८९७ ने समीकरण (४) ला गुणून आपणास

१३.४७ $b_1$ + ४३.६३ $b_2$ − ३९.०२ $b_3$ − १४.४६ मिळतो. (१०)

समीकरण (९) ला − ४.४० ने गुणून−

− ४.४० $b_2$ − ८.८० $b_3$ = ०.४९७ येतो. (११)

सूत्र (३) वापरून आपणास

१३.४७ $b_1$ − ३९.२३ $b_2$ + ४४.८७ $b_3$ = १०.१३ मिळतो (१२)

समीकरणे (१०), (११) व (१२) ची बेरीज करा.

− २.९५ $b_3$ = ४.८२७, $b_3$ = + १.६४.

समीकरण (९) मध्ये हे फलन घालून आपणास b = − ३.१६७ मिळतो;

आणि तो समीकरण (१२) त घालून $b_1$ = − १३.९३ येतो. आता समीकरण (७) तपासा − २०९.७९ = − २०९.९२.

$a = y - b_1 X_1 - b_2 X_2 - b_3 X_3$

a = ११४.९६

म्हणून **BOD** चा भार देणारे समीकरण

y = ११४.९६ − १३.९३ $X_1$ − ३.१६७ $X_2$ + १.६४ $X_3$ असे होते. येथे y

= (केंद्र५) जवळ नमन असताना BOD भार दर दिवशी १००० पौंड,

$X_1$ = अपरप्रवाही केंद्र (२ व ३) चा संयुक्त BOD भार दर दिवशी १००० पौंड,

$X_2$ = नमन केंद्र ५ जवळचे तपमान, $^{o}C$,

$X_3$ = नमन केंद्र ५ जवळचा प्रवाह, द. से. स १० घ. फूट.

फक्त केंद्र २ जवळ मिसळलेल्या प्रदूषण भारास ३० प्रतिशत् घट लागू करून (प्राथमिक उपचार), आपणास

कोष्टक ४–१२

**प्रदूषणाच्या उत्पत्तिस्थानापासून ( केंद्र ५ ) पर्यंतच्या नमनाचा,**

| दिनांक | BOD केंद्र ५ ppm y | (१०००० पौंड दिवस) कें. २+३ $X_1$ | केंद्र ५ जवळ तपमान oC $X_2$ | प्रस्त्राव द. से स. १०घ. फू. $X_3$ | $y^2$ | $y_1 X_1$ |
|---|---|---|---|---|---|---|
| ६–१८–५८ | ६.३७ | ६.९१ | ११.५ | १४० | ४०.५८ | ४४.०२ |
| ७–१–५८ | १.२० | ४.४१ | २०.५ | ८.५४ | १.४४ | ५.२९ |
| ७-२२–५८ | ५.९४ | ४.१९ | २०.० | ५.१७ | ३५.२३ | २४.८९ |
| ८–४–५८ | २.१० | ४.८५ | १६.५ | ६.६६ | ४.४१ | १०.१९ |
| बेरजा | १५ ६१ | २०.३६ | ६८.५ | ३४.३७ | ८१.७१ | ४८.३९ |
| | $\bar{y}$ | $\bar{X}_1$ | $\bar{X}_2$ | $\bar{X}_3$ | | |
| माध्य | ३.९० | ५.०९ | १७.१३ | ८ ८९ | | |
| सुधारित घटक | | | | | $n\bar{y}_2$ ६०.८४ | $ny\bar{X}_1$ ७९.४० |
| सुधारित बेरजा | | | | | २०.८७ | ४.९९ |

कोष्टक ४–१२ चालू

**BOD भार, तपमान आणि प्रस्त्रावाशी, बहुविध रेखीय संबंध**

| $yX_2$ | $yX_3$ | $X_1^2$ | $X_1X_2$ | $X_1 X_3$ | $X_2^2$ | $X_2X_3$ | $X_3^2$ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ७३,२६ | ८९,१८ | ४७,७५ | ७९,४७ | ९६,७४ | १३२,२५ | १६१.०० | ११६,०० |
| २४.६० | १०,२५ | १९.४५ | ९०,४१ | ३७,६६ | ४२०.२५ | १७५,०७ | ७२,९३ |
| ११८,८० | ३०,७१ | १७,५६ | ८३,८० | २१.६६ | ४००,०० | १०३,४० | २६.७३ |
| ३४,६५ | १३,९९ | २३,५२ | ८०,०३ | ३२,३० | २७२,२५ | १०९,८९ | ४४,३६ |
| २५१,३१ | १४४,१३ | १०८,२८ | ३३३,७१ | १८८,३६ | १२२४ ७५ | ५४९.३६ | ३४०,०२ |
| $ny\bar{X}_2$ | $ny\bar{X}_3$ | $n\bar{X}_1^2$ | $nX_1\bar{X}_2$ | $nX_1\bar{X}_3$ | $n\bar{X}_2^2$ | $nX_2\bar{X}_3$ | $n\bar{X}_3^2$ |
| २६७.२३ | १३४,० | १०३.६३ | ३४८,७७ | १७४,८९ | ११७३,७५ | ५८८,५९ | २९५,१५ |
| −१५,९२ | १०,१३ | ४,६५ | −१५,०६ | १३,४७ | ५१,०० | −३९,२३ | ४४.८७ |

०.७० X ३६९२* = केंद्र २ जवळ द. दि. २५८४ पौंड,

केंद्र १ जवळ द. दि. १५९ पौंड } नैसर्गिक
केंद्र ३ जवळ द. दि. ११५९ पौंड } प्रदूषण

एकूण द. दि. ३९०२ पौंड, मिळतात.

भार २०-५ $^{\circ}C$ तपमान आणि द से. स ५१.७ घ. फूट प्रवाह (अत्यंत क्रांतिक तपमान आणि प्रवाह) असताना केंद्र ५ जवळ, वरील फलन (काहीसा घटित भार), BOD च्या समीकरणात निविष्ट केले तर नमनाजवळ शेष BOD भाराप्रत आपण पोहोचू.

BOD = ११४.९६ – १३.९३ (३९०२) – ३-१६७ (२०-५)
= ४-१७ (द. दि. १००० पौंड)
= द. दि. ४१७० पौंड अथवा द. से. स ५१-७

घ. फूट प्रवाह असताना, १४.९४ ppm.

विलीन ऑक्सिजन नमन सूत्रात हा BOD वापरून, तळातील निक्षेपांच्या घटित परिणामाकडे दुर्लक्ष केले असताना, घडून येणारे विलीन ऑक्सिजनचे पतन आपणास मिळते. (तळात कमी निक्षेप असण्याचा परिणाम वाहितमलापासून प्रदूषण कमी होण्यात होतो, आणि वाहत्या नदीतील विऑक्सिजनीकरणाच्या वेगात ह्या घटकामुळे फरक पडतो.) यावरून आपणास विलीन ऑक्सिजनचे पतन

$$= ४.५५५ - ०.१३७१ \,(१४९४) - ०.५९३१ \,(२०.५) + ०.७६३९ \left(\frac{१०००}{५१.७}\right)$$

= ५.०९५ ppm मिळते.

संपृक्तीच्यावेळी (२० $^{\circ}C$) वि. ऑ. = ९.२ ppm

ऑक्सिजनची त्रुटी = ९.२–५.०९५ = ४.१०५ ppm

म्हणून (क्रांतिक परिस्थितीत फक्त ४ नमुन्यांसह) चर्चिल पद्धतींवरून असे दिसून येते कीं, जर अपरप्रवाही केंद्र विलीन ऑक्सिजनने पूर्णपणे संपृक्त झाले तर (†), क्रांतिक परिस्थितीच्या कालात नाल्यात ४ ppm वि. ऑ. टिकून राहण्याकरता प्राथमिक उपचार पुरेसा होतो. चर्चिल पद्धतीने प्राप्त केलेली वि. ऑ. ची काहीशी उच्च पातळी, (स्ट्रीटर–फेल्प्स सूत्राप्रमाणे २.७१), जेव्हा BOD भार कमी केला जातो तेव्हा होणारा अवपंकाचा (slime) परिणाम विचारात न घेतल्यामुळे, निर्माण होण्याची शक्यता असते. अवपंकाच्या वाढीची प्रवृत्ति जैवी

* केंद्र २ जवळ मिसळलेला सरासरी BOD.

† वरील स्ट्रीटर-फेल्प्स सूत्रीकरणाने प्राप्त केलेला निष्कर्ष पहा.

क्रियेत ( biological action ) वाढ करून प्रवाहीं पाण्यातील विलीन ऑक्सिजनच्या निष्कासनाचे त्वरण करण्याकडे असते. उलटपक्षी, जेव्हा अवमलाचे निक्षेप अस्तित्वात असतात अथवा अवपंकाची वाढ दाट आणि भरपेट होते तेव्हा तयार झालेल्या अवात–विघटन पदार्थांना पाण्याच्या वरच्या थरातून ऑक्सिजनची गरज लागेल असा निष्कर्ष खुशाल काढता येईल. अवपंकातील कार्बनिक द्रव्याचे वाढते निष्कासन पाण्याच्या ऑक्सिजन मागणीचा काही अंशी प्रतिकार करते. अवपंकाच्या आणि तळातील निक्षेपांच्या वाढीचा निव्वळ परिणाम, स्थानीय ऑक्सिजन मागणीतील त्वरण आणि (अनुप्रवाही) ऑक्सिजन मागणीच्या नंतर होणाऱ्या घटीत होतो.

## संदर्भ–


१- चर्चिल, एम ए. आणि आर. ए. बकिंगहॅम, "स्टॅटिस्टिकल मेथड फॉर अॅनॅलिसीस ऑफ स्ट्रीम प्यूरिफिकेशन कपॅसिटी", स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २८, ४, ५१७–५५७ (एप्रिल १९५६).

२- क्रॉक्सटन, एफ. ई. आणि डी. जे. काउडेन, अप्लाईड जनरल स्टॅटिस्टिक्स; एंजलवुड क्लिप्स, एन. जे. प्रेंटिस हॉल, इन्कॉ-१९५५, पा. २६१–२८०

३ सिमन्स, जे. डी, एन. एल. नेमेरो, आणि टी. एफ आर्मस्ट्रॉंग, "मॉडिफाईड रिव्हर सॅम्प्लिग फॉर कॉम्प्यूटिंग डिझॉल्व्ड ऑक्सिजन सॅग," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, " २९, ८, ९३६ ( ऑगस्ट १९५७ ).

४. स्ट्रीटर, एछ. डब्ल्यू-, आणि ई. बी. फेल्प्स, "ए स्टडी ऑफ दि पोल्यूशन अँड नॅचरल प्यूरिफिकेशन ऑफ दि ओहायओ रिव्हर,', यूनायटेड स्टेट्स सार्वजनिक स्वास्थ्य सेवा, परिपत्रक क्र. १४६, १९२५

५. थॉमस, एछ. ए., "पोल्यूशन लोड कपॅसिटी ऑफ स्ट्रीम्स," वॉटर अँड स्युवेज वर्क्स, ९५, ११, ४०९. ( नोव्हेंबर १९४८ )


सुचविलेले अतिरिक्त वाचन


१. फेअर, जी. एम , " दि डिझॉल्व्ड ऑक्सिजन सॅग – अॅन अॅनॅलिसीस," स्युवेज वर्क्स जर्नल, ११, ३, ४४५ (मे १९३९).

२. कीट्रेल, एफ. डब्ल्यू , आणि ओ. डब्ल्यू. कॉक्टिस्की ( Kochtisky ), " शॅलो टर्ब्यूलंट स्ट्रीम, सेल्फ प्यूरिफिकेशन कॅरेक्टरिस्टिक्स," स्युवेज वर्क्स जर्नल, १९, ६, १०३२–१०४८ ( नोव्हेंबर १९४७ ).

३. ल बॉस्केट, एम. ज्यू., आणि ई. सी. ( Tsivoglow ), "सिम्प्लिफाईड डिझॉल्व्ड ऑक्सिजन कॉम्प्यूटेशन्स," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २२, ८, १०५४ ( ऑगस्ट १९५० ).

४. स्ट्रीटर, एछ. डब्ल्यू., " ए नोमोग्राफ सोल्यूशन ऑफ दि ऑक्सिजन सॅग इक्वेशन, स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २१, ५, ८८४ ( सप्टेंबर १९४९ ).



: ९ :

# नाल्यातून नमुने घेणे

औद्योगिक अपशिष्टांवर करावयाचे उपचार नाल्यातील नमुने घेण्याच्या कार्यक्रमावर आधारलेले असतात. पण त्या उपचारासंबंधी सर्वंकष निर्णय, नाल्यातील नमुन्यांच्या कार्यक्षमतेपेक्षा अधिक खात्रीलायक नसतो. नाल्यातून नमुना घेण्याच्या व्यापक कार्यक्रमाचे आयोजन करण्यासाठी खर्च केलेल्या वेळेचा योग्य मोबदला जेव्हा अभियंते कार्यक्षमतेने चालतील अशा संयंत्राचे अभिकल्पन करतील तेव्हाच मिळेल. असा नमुना घेण्याचा कार्यक्रम आयोजित करताना (३) अनेक बाबींचा विचार करावा लागेल. अशा अभ्यासात समाविष्ट करण्याच्या महत्वाच्या बाबी खाली दिल्या आहेत

१) नमुने गोळा करण्याची वारंवारता

२) नमुन्यांची एकूण संख्या

३) (नमुने) गोळा करण्याची स्थाने

४) (नमुने) गोळा करण्याची पद्धत

५) मिळवावयाची माहिती

६) विश्लेषणापूर्वी घ्यावयाची नमुन्यांची काळजी

७) वर्षातील नमुने घेण्याचा काल

८) माहितीची सांख्यिकी हाताळणी

९) कार्यक्रमाची एकंदर उद्दिष्टे

(१) **वारंवारता–** योग्य प्रकारे संग्रथित (composited) एकूण नमुनासंच मिळण्याकरता आवश्यकतेनुसार वरचेवर नमुने गोळा करावेत. मुख्य नमुन्यात अपेक्षित अशा प्रत्येक बदलाचे व्यक्तिगत घटक असावेत. उदाहरणार्थ, जेव्हा ४ ते १० पर्यंत pH मध्ये बदल होत आहे असे माहीत असते तेव्हा प्रत्येक नमुना घेण्याच्या कालावधीत, संग्रथित नमुन्यात ४, ५, ६, ७, ८, ९ व १० ही pH मूल्ये असतील असे व्यक्तिगत नमुने एकदा तरी दिसून आले पाहिजेत. परिस्थितीमुळे जर तात्काल विश्लेषण करण्याची जरुरी भासली तर अल्प अगर संमिश्र न केलेले अधिक व्यक्तिगत नमुने गोळा करण्यात येतात. जेव्हा नाल्यातील सर्वसाधारण विद्यमान परिस्थिती आपणास निश्चित करावयाची असते तेव्हा पहिली पद्धत आचरण्यात येते.

(२) **नमुन्यांची एकूण संख्या –** एकंदर कार्यक्रम आणि सर्वेक्षणाकरता मिळणारा वेळ आणि प्रयत्न, यांच्यावर ही संख्या अवलंबून असते. जर विशिष्ट उद्देशाने योग्य प्रकारे

सर्वेक्षणाचे आयोजन केले तर कमीतकमी नमुने लागतील उदाहरणार्थ, जर एकाद्याला नदीतील वैशिष्ठये-विशेषत: विलीन ऑक्सिजनची रुपरेखा – प्रवाह मंद असताना निश्चित करावयाची असेल तर योग्य वेळी गोळा केलेले २ अगर ३ नमुने पुरेसे होतील. असे असले तरी, जर नमुन्याच्या गुणधर्मांवर परिणाम करणारे घटक स्पष्टपणे प्रस्थापित करावयाचे असतील तर हे नमुने फक्त अत्यंत अवर्षण घडणाऱ्या काळातच घेतले पाहिजेत. सर्व महत्वाचे घटक समाविष्ट झाले असलेले नमुने गोळा करण्याच्या अभियंत्याच्या क्षमतेवर लागणाऱ्या नमुन्यांची संख्या बऱ्याच वेळा अवलंबून असते. हे विशद होण्यासाठी असे समजा कीं, फक्त पतझडीच्या ( fall ) मोसमातच, अन्य कार्बनिक द्रव्यांच्या अतिरिक्त, नाल्यात फेनॉल असल्याचे माहीत आहे. म्हणून जूलैमध्ये किमान प्रवाह आणि कमाल तपमान असते अशी वस्तुस्थिती असली तरी, पतझडीच्या कालात अभियंत्याने नदीतून एक अगर अधिक नमुने गोळा केले पाहिजेत. खात्रिलायक विश्लेषण आणि भाकिताकरता किमान ४ ते ६ नमुने नदीतून घेणे सामान्यत: पसत असते. विषाक्त ( toxic ) धातूच्या तुरळक लोंढ्यासारखे नदीतील घटक, विशिष्ट मोसमात नदीतीरावर पुराचे पाणी पसरणे, अवर्षण कालातील प्रवाहाचे विचित्र स्वरूप, इत्यादींच्यामुळे किमान संख्येपेक्षा अधिक नमुने घेण्याची जरुरी भासेल.

## (३) (नमुने) गोळा करण्याची स्थाने –

ही स्थाने काळजीपूर्वक निवडली पाहिजेत. प्रदूषणाची निर्मितिस्थाने, उपनाल्यामुळे झालेले तनुकरण ( dilution ), भोवतालच्या प्रदेशवर्णनातील ( topography ) बदल, आणि नदीचा उतार, ह्यांचा विशेष विचार केला पाहिजे. नमुना घेण्याची स्थाने निवडताना जमिनीवरील महत्वाच्या लक्षणांचा प्रभावही लक्षात घेतला पाहिजे. उदाहरणार्थ, नागरी पाणी पुरवठ्याचे प्रवेशद्वार ( intake ), राज्य उपवन, औद्योगिक क्षेत्र, मासे पकडण्याची चांगली जागा, खासगी उपहारगृहे अगर शिबिरांच्या जागा, या प्रत्यकाच्या बाबतीत नाल्याच्या उपयोगासंबंधी निश्चित धारणा असते. प्रदूषणाची स्वीकार्य मर्यादा पाण्याच्या होणाऱ्या उपयोगाप्रमाणे बदलत असल्याने, अशा सर्व क्षेत्रांच्याजवळ नमुने गोळा केले पाहिजेत आणि नाल्याच्या उपयोगाच्या अशा सर्व स्थानांच्या किंचित वर आणि किंचित खाली नाल्याची अवस्था आणि बदल, यांची नोंद ठेवली पाहिजे.

चवथ्या प्रकरणात सादर केलेल्या व्यक्तिवृत्ता ( case history ) प्रमाणे, नाल्यावरील किमान केंद्रांची (बिंदूंची) शिफारस केली आहे. ह्या केंद्रात (अ) जेथे पाणी स्वच्छ असेल अशी अपरप्रवाही जागा; (आ) प्रदूषण अगर तनुकरणाच्या स्थानाच्या किंचित खालचा नाला; (इ) प्रदूषणाच्या विशिष्ट उद्भवामुळे–ऑक्सिजन नमनाचा तळ– निकृष्ट झालेली परिस्थिती असलेला नाला; (ई) ऑक्सिजन नमनाचा तळ आणि ऑक्सिजनच्या पातळीची पुन: प्राप्ति, यांच्यातील मध्यबिंदूजवळचा नाला; यांचा समावेश करावा.

स्वीकार्य नाला-भारण निश्चित करण्याकरता चवथ्या प्रकरणात वर्णन केलेल्या पद्धतींच्यापैकी कोणची वापरली हे दृष्टिआड करून सुद्धा, ह्या चार केंद्रानी उद्देश साध्य होईल. वर उल्लेखिलेल्या विभिन्न स्थानीय परिस्थितीवर अनिरिक्त नमुने घेण्याची आवश्यकता अवलंबून राहील. तसेच, नमुने घेण्याची केंद्रे एकसारखे अनुप्रस्थ छेद असलेल्या शक्यतितक्या निकटच्या बिंदूच्यापाशी ठेवावी. त्या ठिकाणचा तळ बदलणारा नसावा, ( नमुना घेणे सोयीचे व्हावे व प्रवाहमापनाच्या अचूकतेत वाढ व्हावी म्हणून) नाल्याची रुंदी कमीतकमी असावी, आणि वेग सामान्य असावा. केंद्राकडे सहज जाता येणे आणि प्रातिनिधिक नमुने सहज घेता येणे, ह्या बाबींचाही केंद्राची निवड करताना विचार केला पाहिजे. समान नमुने गोळा करण्यासाठी आणि नाल्याच्या अनुप्रस्थ छेदाचे व वेगाचे मापन करण्यास नाल्यावरील पुलाची पुष्कळ मदत होते.

वेलीय नदीमुखातून ( tidal estuary ) नमुने घेणे अवघड असते आणि ती समस्या वादग्रस्त आहे; ती सोडविण्यासाठीं संपूर्ण गणितीय सूत्रीकरणाचा उपयोग करण्यापासून साधे पकड -- नमुने ( grab – samples ) घेण्यापर्यंत अभियंत्यांनी कार्यक्रम आखले आहेत वेलीय नाल्यातीत प्रदूषण भरती–ओहोटीप्रमाणे कमीं जास्त होते आणि काही तासांत नव्हे तर अनेक दिवसांपर्यंत, प्रदूषणाच्या निर्मितिस्थानाच्या खालच्या भागात अनेक वेळा त्यातील काही भाग जाऊन पोहोचतो; अशी वस्तुस्थिती असल्यामुळे ही समस्या निर्माण होते. विशिष्ट नाल्यातील वेलाचक्र ( tide cycle ) निश्चित करणे व नंतर भरती ओहोटी तसेच मध्यवेला असताना नमुने गोळा करणे ही नमुना घेण्याची एक पद्धत परिणामकारक असल्याचे लेखकाला आढळून आले. ह्या पद्धतीमुळे विश्लेषकाला वेलीय प्रदूषण परिस्थितीचे सुसगत आणि सर्वकष चित्र प्राप्त होते.

## (४) नमुना गोळा करण्याची पद्धत –

२ फुटांपेक्षा कमी खोल असणाऱ्या नाल्यातून ०.६ फूट खोलीवर आणि २ फूट खोल असणाऱ्या नाल्यातून १ २ फूट खोलीवर नमुने घ्यावेत या पेक्षा खोल असणाऱ्या नाल्यातून नमुने घेताना ०.२ व ०.८ फूट खोलीवरील मिश्र भागांतून नमुने घ्यावे लागतात. जेव्हा नाल्यातील प्रवाह अगदी संथ असतो तेव्हा विश्लेषण करून प्रत्येक नमुन्यातील समभाग एकत्र करावेत. नमुन्याची राशि, वैयक्तिक आणि/अगर मिश्र नमुन्यांच्यावर विश्लेषण करावयाची संख्या आणि विश्लेषणाच्या प्रकारावर, अवलंबून असते. .बहुतेक नमुने गोळा करण्याकरता मानक प्रकाराच्या विलीन–ऑक्सिजन प्रतिदर्शित्राची ( sampler ) शिफारस करण्यात येते. कांचेची बुचे असलेल्या कांचेच्या बाटल्या आणि पॉलिथेलीनची भांडी अतिविस्तृत प्रमाणात वापरण्यात येतात. जीवाणु–विषयक नमुन्यांच्याकरता विशेष प्रकारच्या निर्जंतुक बाटल्यांची आवश्यकता असते.

## (५) मिळवावयाची आधारसामग्री (data)

मिळवावयाची आधारसामग्री, सर्वेक्षणाचे उद्देश आणि अन्वेषणाकरता उपलब्ध असलेला कालावधी व पैसा, यांच्यावर अवलंबून असते. उदाहरणार्थ, जर नियामक कार्यकारणीची मुख्य आस्था नाल्याच्या एकाद्या विभागातील ऑक्सिजनची साधने ही असेल तर, विलीन ऑक्सिजन, पाण्याचे तपमान व नाल्यातील प्रवाह, यांचे मापन शक्य तितक्या दीर्घ आणि क्रांतिक कालावधीत करावे लागेल. जर सर्वेक्षण सामान्य स्वरुपाचे असेल तर साधन सामग्रीचे निर्वचन ( interpretation) आणि मूल्यांकन नंतर करण्यास मदत व्हावी म्हणून नाला विश्लेषकाने शक्य तितक्या जास्त रासायनिक, भौतिक, व जीवाणू विषयक चांचण्या कराव्या. फक्त चार मोजण्यांचा अंतर्भाव असलेल्या अनेक सर्वेक्षणांतून अपशिष्ट – उपचार – संचांचे अभिकल्पन करण्यास पुरेशी होईल इतकी माहिती प्राप्त होऊ शकते असे लेखकाला आढळून आले आहे. (१) प्रवाहवेग, (२) तपमान, ( ३ ) BOD, आणि (४) विलीन ऑक्सिजन, ह्या त्या मोजण्या आहेत. त्याशिवाय, pH, रंग आणि गढूळपणा, ह्यांच्या माहितीवरून नाल्याच्या सामान्य भौतिक अवस्थांचे निदर्शन होते. जेव्हा पिण्याकरता, स्नानाकरता, अथवा मासे पकडण्याकरता नाल्यातील पाणी वापरण्यात येते तेव्हां जीवाणुविषयक विश्लेषणाचीं गरज असते.

## (६) विश्लेषणापूर्वी घ्यावयाची नमुन्यांची काळजी–

नमुने गोळा केल्यानंतर शक्य तितक्या लवकर सर्व नमुन्यांचे विश्लेषण करावे. शक्य असेल तेथे किनाऱ्यावरच विश्लेषण करावे अशी लेखकाची शिफारस आहे. आधुनिक हातवाहू उपकरणे उपलब्ध असल्याने, प्रत्येक विश्लेषणाकरता नमुने प्रयोगशाळेत आणण्याचे सोयीं-शिवाय वेगळे कारण दिसत नाही. तथापि, नाल्यातील स्थानावरील कॉलीफॉर्मचे गणन ( count ) आणि फेनॉलचे संकेंद्रण, तसेच तरंगत्या घनपदार्थांच्या राशीच्या निर्धारणासारख्या तपशीलवार चांचण्या करणे अव्यवहार्य असते. रासायनिक, भौतिक, अगर जीवाणुविषयक किंचितही बदल होणारे नमुने, ० $^{o}C$ ते १० $^{o}C$ ( इष्टतम ४ $^{o}C$ )तपमान टिकून राहण्यासाठी, विश्लेषण करीपर्यंत बर्फात ठेवावेत. विलीन ऑक्सिजनचे नमुने नाल्यातील स्थानावर अम्लीकरणाच्या अवस्थेतून घ्यावेत. फेनॉलच्या नमुन्यांचे कॉपरसल्फेटने जतन करावे. अन्य विश्लेषणांकरता नमुने जतन करण्यासाठी संदर्भग्रंथ २ पहावा.

## (७) जर निष्कर्ष प्राप्त करण्याकरता वेळेचे बंधन असेल तर वर्षातून कोणच्यावेळी नमुने घ्यावेत–

ह्याला अत्यंत महत्व असते. औद्योगिक अपशिष्टांच्या उपचारासंबंधीच्या नाल्याच्या अभ्यासात आपणाला मुख्यतः प्रदूषणांच्या क्रांतिक अवस्थांची दखल घ्यावी लागते. जेव्हा

परिसरातील हवा अतिगरम असते, नाल्यातील वेग कमालीचा मंद असतो, आणि मानव निर्मित प्रदूषण कमाल असते तेव्हा, ह्या अवस्था सामान्यपणे अस्तित्वात असतात. यूनायटेड स्टेट्सच्या बहुतेक भागांत, उन्हाळ्यात सामान्य परिस्थितीत क्रांतिक अवस्था निर्माण होतात: म्हणून नालासर्वेक्षणासाठी उन्हाळ्याचा काल आदर्श असतो. परंतु नाल्यातील आणि मनुष्यबळाच्या परिस्थितीमुळे अनेक अभ्यास वसंत ऋतूत व हिमऋतूतही करणे भाग पडते. समस्यांच्या तातडीमुळे अथवा अपवाह अगर प्रदूषणाच्या असाधारण परिस्थितीमुळे कधीकधी कोणच्याही मोसमात अन्वेषणे करावी लागतात. तथापि, तपमान, प्रवाह, व प्रदूषणभार, यांची क्रांतिक अवस्था असताना जेंव्हा माहिती गोळा करण्यात येते तेव्हा चुका कमी होण्याचा संभव असतो त्यामुळे, प्रत्येक नाला-अन्वेषकाचे आणि औद्योगिक अपशिष्ट अभियंत्याचे उद्दिष्ट नाल्याच्या क्रांतिक परिस्थितीत माहीती गोळा करावी हे असावे.

भाविष्यकालीन क्रांतिक कालावधीत प्राप्त होणाऱ्या परिस्थितीला लागू होतील अशी नाल्याची अन्वेषणे प्रक्षेपित करण्याची जरूरी संभवनीय असते. समस्येची तीव्रता वर्षावर्षाला आणि वर्षातील एका कालापासून दुसऱ्या कालापर्यंत काही प्रमाणात बदलत असल्याने उन्हाळ्याच्या क्रांतिक परिस्थितीत जेंव्हा सर्वेक्षण करण्यात येते तेव्हा सुद्धा ह्याची कधीकधी जरूरी असते.

## (८) आधार सामग्रीची सांख्यिकी हाताळणी –

अन्वेषकाला सर्वेक्षणाचा जो पैलू महत्वाचा वाटतो त्यावर भर देण्याकरता आधार सामग्रीची हाताळणी करावी लागते ही वस्तुस्थिति सर्वश्रुत आहे. ही प्रथा स्वयमेव नैतिक ( ethical ) असू शकते आणि अस्तित्वात असणे शक्य असलेल्या अन्य अवस्था अगर घटनांच्या संबंधी पूर्वनिर्णय घेतला जात नाही. तथापि, सामान्य माणसापर्यंत ही माहिती योग्य स्वरुपात पोचविण्यासाठी अभियंत्याला सांख्यिकी व गणितीय शास्त्रांचे कामचलाऊ ज्ञान असले पाहिजे. उदाहरणार्थ, अस्तित्वात असलेल्या कॉलीफॉर्म जीवाणूंच्या अधिकतम संभाव्य संख्येचा (MPN ) आभ्यास करताना गणितीय सरासरीवरून ह्या संख्येचे विवरण अगर तिच्यावर ठामपणे जोर देणे शक्य होत नाही. उलट पक्षी, ज्यामितीय माध्य अगर रीति ( mode ) या पद्धतीने ही संख्या अधिक अचूकतेने चांगल्या प्रकारे निर्दशित होऊ शकते. शिवाय, जीवाणु-विषयक व्यवस्थेत गणितीय माध्य आणि रीति, ह्यांत बऱ्याच प्रमाणात फरक असू शकतो आणि पुष्कळवेळा असतोही. खालील निदर्शी उदारणावरून कॉलीफॉर्म जीवाणु – संख्यांच्या मालिकेचे गणितीय माध्य व रीति, यामधील फरक दिसून येईल.

| नमुना क्रमांक | कॉलीफॉर्म संख्या, MPN/१०० मि. लि. |
|---|---|
| १ | ० |
| २ | ० |
| ३ | ० |
| ४ | ९.० |
| ५ | ३.६ |
| गणितीय माध्य | १२·६/५ = २.३ |
| रीति | = ० |

औद्योगिक अपशिष्ट–अभियंत्याला क्रांतिक परिस्थितीतील प्रवाहाच्या वेगाचे महत्व असते. प्रवाहातील कधीकाळी नोंद केलेला किमान प्रवाह जर त्याने आपल्या आंकड्यात समाविष्ट केला तर त्याचा शेवट अवास्तव मूल्यांकनात होईल. उलट, उन्हाळ्यातील माध्य अगर मंद प्रवाहाचे मूल्य धोकादायक असू शकेल कारण पुष्कळ वेळा ह्यापेक्षाही प्रवाह अधिक मंद असू शकेल. अपशिष्टा वरील उपचार करण्याच्या सुविधांचे अभिकल्पन करण्यासाठी कसोटी म्हणून काही राज्यनियामक कार्यकारिण्या दहा वर्षांत घडणे शक्य असलेल्या किमान सात दिवसांच्या प्रवाहाचा उपयोग करतात.

नदीच्या माहितीच्या सांख्यिकी हाताळणी इतकेच औद्योगिक अपशिष्टाविषयीची सांख्यिकी माहिती हाताळणे महत्वाचे असते. उदाहरणार्थ, अपशिष्ट अभियंत्याला अशी जाणीव असावी लागते कीं, काही परिस्थितीत उच्च अपशिष्टांचे आंकडे महत्वपूर्ण असतात पण BOD ची गणितीय माध्यमूल्ये, जेव्हा ह्या अपशिष्टांवर उपचार करण्याकरता आपणास अभिकल्पन करावयाचे असते तेव्हा, आवश्यक असतात. उपचार–संयंत्राची कार्यक्षमता संगणित करताना, केवळ माध्यमूल्य वापरण्यापेक्षा गणितीय माध्यापासून होणाऱ्या मानक विचरणाचा वापर करण्याने अभियंत्याला संयंत्राच्या परिचालनाचे अधिक स्पष्ट चित्र प्राप्त करता येते. तसेच एका उपचार–संयंत्राच्या कार्यक्षमतेची दुसऱ्याच्या कार्यक्षमतेशी तुलना करताना विचरण गुणांकांचा ( coefficients of variation ) उपयोग करणे इष्ट असल्याचे त्याला आढळून येईल.

## (९) कार्यक्रमाच्या एकूण उद्दिष्टात–

कार्यक्रमाच्या एकूण उद्दिष्टात बराच फरक असणे शक्य असते. उदाहरणार्थ, एका

प्रसंगी अपरप्रवाही बाजूवरील उद्योगाचा अनुप्रवाही पाण्याच्या दर्जावर काय परिणाम झाला आहे या संबंधी अभियंत्याला आस्था असू शकेल. ह्या विशिष्ट प्रसंगी ग्राहक ( receiving ) नाल्यातील रंगाबद्दल त्याला खास औसुक्य असू शकते. अन्य प्रसंगी, फक्त उन्हाळ्याच्या मोसमातील नाल्याच्या विलीन ऑक्सिजनच्या अवनमनाचे ( sag ) गुणधर्म पारखून घेण्याचा अभियंत्याचा प्रयत्न असेल. आणखी दुसऱ्या एका उदाहरणात, राज्य प्रदूषण नियंत्रण प्राधिकारिणीने प्रस्थापित केलेल्या वर्गवारीच्या मानकांचे नाल्यातील गुणधर्मासंबंधी पालन करण्यासंबंधी अभियंत्याला आस्था वाटत असेल. नाल्याच्या सर्वेक्षणाच्या अनेक विभिन्न उद्दिष्टांपैकी ही फक्त काही उदाहरणे आहेत. वर उल्लेख केलेले हे सर्व आठ घटक सर्वेक्षणाच्या एकूण उद्दिष्टांवर अंशतः अवलंबून असतात.

## संदर्भ–

१– हॅनी, पी. डी. आणि जे. श्मिड ( Schmidt ), " रिप्रेझेंटेटिव्ह सँप्लिग अँड ॲनॅलिटिकल मेथड् इन स्ट्रीम स्टडीज," यूनाटेड स्टेट्स सार्वजनिक स्वास्थ्य सेवा, तांत्रिक अहवाल, W ५८-२, १३३-१४२, (१९५८).

२– " स्टँडर्ड मेथड्स फॉर एक्झॅमिनेशन ऑफ वॉटर, स्युवेज, अँड वेस्ट्स," १० वी आवृत्ति, युनायटेड स्टेट्स सार्वजनिक स्वास्थ्य सेवा, १९५५.

३– व्हेल्झ, सी. जे., " सँप्लिग फॉर इफेक्टिव्ह इव्हॅल्यूएशन ऑफ स्ट्रीम पोल्यूशन," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २२, ५, ६६६ ( मे १९५० ).



# : ६ : नाल्याच्या संरक्षणाचे उपाय–

लोकांना नाल्याचा अनेक प्रकारे उपयोग होतो आणि नाल्यातील मिळालेल्या सेवेतील प्रदूषण दूर करणे ही सर्वांत मुख्य सेवा आहे. तथापि, जलपान, नौकानयन, स्नान करणे, मासे पकडणे, सिंचाई आणि ऊर्जासारखे नाल्यातील इतरही अधिक महत्वाचे उपयोग आहेत. म्हणून त्याचा वापर करणाऱ्या लोकांचे जास्तीत जास्त हित व्हावे याकरता नाल्याचे संरक्षण केले पाहिजे.

नाल्याची परिस्थिती स्वीकार्य असावी यासाठी अनेक पद्धती वापरात आहेत. अपशिष्टांवरील उपचारणासंबंधी घेतलेल्या अतिलवचिक नियंत्रणाच्या वैयक्तिक निर्णयांपासून नाल्यातील अगर मलनि:स्त्रावासंबंधी कायद्यानी प्रमाणित केलेल्या ताठर नियंत्रणापर्यंत ह्या पद्धतींची व्याप्ति असू शकते. लवचिक नियंत्रण व्यवस्थेच्या कार्यपद्धतीतील विचरणामुळे त्या पद्धतीचे तपशीलवार विवेचन करता येणार नाही. सामान्यत: नाल्याच्या बाजूने वस्ती केलेल्या लोकांचे जास्तीत जास्त हित होईल अशा प्रकारे अपशिष्टाच्या उपचारणाचा विशिष्ट प्रकार व दर्जा असला पाहिजे अशी राज्य नियामक कार्यकारिणीची मागणी असते. अशा सैल कार्य पद्धतीचा फायदा तात्काल निर्णय घेण्याचे स्वातंत्र्य हा असतो; पण नाल्याच्या वापराचा संबंध असलेल्या घटकांच्या प्रतिनिधित्वाचा अभाव हा त्यातील धोका असतो. शिवाय, एका स्थानापासून दुसऱ्या स्थानापर्यंत करावयाच्या उपचारात एकसारखेपणाचा अभाव असण्याची शक्यता असते आणि त्याचा परिणाम अनुचितपणात होतो. तथापि, एकसारखेपणा नसणेही कधीकधी फायदेशीर ठरते. उदाहरणार्थ, नाल्यातील नगरपालिकेच्या पाणीपुरवठयाच्या प्रवेशस्थानाच्या वरच्याबाजूस बसविलेल्या संयंत्रातून त्याच नाल्यातील समप्रकाराच्या पण प्रवेशस्थानाच्या खालच्या बाजूस प्रस्त्रावित होणाऱ्या अपशिष्टावर करण्यात येणाऱ्या उपचारांपेक्षा अधिक परिपूर्ण उपचारांच्या तरतुदींची अपेक्षा करावी लागेल.

ताठर संरक्षणासाठी यूनायटेड स्टेट्समध्ये विचारसरणीच्या दोन प्रणाल्या प्रसृत आहेत. एका प्रणालीत "मलनि:स्त्राव मानक" अधिमान्य आहेत तर दुसरीत "नाला मानक" अधिमान्य आहेत. एका विशिष्ट प्रकारच्या उद्योगातील सर्व मलनि:स्त्रावातून प्रस्त्रावित झालेली अपशिष्टे एका ठराविक टक्क्याच्या खाली अगर प्रदूषक द्रव्यांच्या विशिष्ट कमाल संकेंद्रणाच्या खाली ठेविली पाहिजेत. अशी मलनि:स्त्रावाच्या ( effluent ) प्रमाणीकरण पद्धतीत आवश्यकता असते. दर रोज नाल्यात मिसळल्या जाणाऱ्या प्रदूषक पदार्थांच्या एकूण राशीवर सामान्यपणे नियंत्रण राहत नाही. जरी लहान आणि मोठ्या उद्योगांतील अपशिष्टां

वरील उपचाराच्या तरतुदीचे प्रमाण तेच असले तरी नाल्यातील प्रदूषणाच्या बऱ्याच भागास मोठा उद्योग जबाबदार असतो. तथापि, असा युक्तिवाद करता येणे शक्य आहे कीं, त्या क्षेत्रातील त्याच्या मोलामुळे मोठया उद्योगांना नाल्याच्या आत्मसात करण्याच्या कार्यक्षमतेतील मोठा भाग वाटून द्यावा लागेल.

नियामक दृष्टिकोनातून, नाला मानकांच्या व्यवस्थेपेक्षा मलनिःस्त्राव मानकांची व्यवस्था, नियंत्रणास अधिक सुलभ असते. अपशिष्टावर करावयाच्या उपचाराची नक्की राशि निर्धारित करण्यासाठी नाल्याचे तपशीलवार विश्लेषण करण्याची आवश्यकता नसते. शिवाय, नाल्यांच्या वर्गीकरणाच्या कालात अथवा प्रदूषण कमी करण्याच्या कार्यक्रमाच्या आयोजनात 'मलनिःस्त्राव मानकांचा राज्याला मार्गदर्शक म्हणून उपयोग होऊ शकतो. उलटपक्षी, मलनिःस्त्राव दर्जा जर वाढवला नाही तर अतिभारित नाल्याकरता कोणच्याही प्रकारे प्रभावी संरक्षण करण्याची तरतूद ह्या व्यवस्थेत नसते. मलनिःस्त्रावाचे मानक नाल्याच्या संपूर्ण संरक्षण करण्यावर आधारित करण्याच्या ऐवजी ते अधिकतर उपचारातील काटकसर आणि व्यवहार्यतेवर आधारलेले असते; म्हणून नाल्याचा सर्वोत्तम वापर ही प्राथमिक विचाराची बाब होत नाही. औद्योगिक मलनिःस्त्रावाच्या मानकांची पूर्ती केल्यावर नाल्याचा वापर जवळजवळ त्यातील परिस्थितीवरच अवलंबून असतो. औद्योगिक काटकसरीकरता नैसर्गिक साधनांची दर्जोन्नति आणि संधारणाकडे काही प्रमाणात दुर्लक्ष होते.

नाल्याच्या वर्गवारीचा अथवा दर्जाचा मानक प्रस्थापित करण्यावर आणि नाल्याची प्रस्थापित वर्गवारी अथवा दर्जा टिकून राहण्यास आवश्यक प्रस्त्राव त्यात जाईल असे नियमन करण्यावर नाल्याच्या मानकांची व्यवस्था आधारलेली असते; नाल्यातील मानकांचा प्राथमिक उद्देश त्याचा सर्वोत्तम उपयोग होण्यासाठी प्रत्येक नाल्याचे संरक्षण आणि जतन करणे, हा असतो. अपशिष्टावर उपचार करण्यासंबंधी कोणचाही निर्णय घेण्यापूर्वी, सामान्यतः,नाल्याच्या वर्गीकरणाची एक दीर्घ आणि गुंतागुंतीची प्रक्रियाकरावी लागते. राज्याच्या नियमांनुसार नाल्याचे वर्गीकरण केले जाते, नंतर विद्यमान प्रदूषणासाठी त्यातील नमुने घेतले जातात व विश्लेषण करण्यात येते, आणि विद्यमान व संभाव्य वापरांकरता त्याचे सर्वेक्षण करण्यात येते. नियामक कार्यकारिणीकडून सर्वोतम वापराबद्दल हितसंबंधी पक्षांचे म्हणणे सार्वजनिकरीत्या ऐकून घेण्यात येते आणि नतर नाल्याच्या अगर त्याच्या विभागाच्या सर्वात जास्त वापरासंबंधी निर्णय घेण्यात येतो. साहजीकच जितकी उच्च वर्गवारी तितका अधिक स्वच्छ नाला असावा लागतो, आणि परिणामी अपशिष्टावरील उपचाराची मात्रा अधिक असावी लागते. नंतर प्रत्येक प्रदूषणकारकावर रीतसर नोटीस बजाविली जाते व नाल्याची वर्गवारी कायम राहण्याकरता अवश्य असणारे निश्चित उपाय करण्यासाठी त्याच्यावर कालमर्यादा घालण्यात येते. त्यानंतर कायद्याचे पालन

करणे ही, शिक्षण, मन वळविणे, सार्वजनिक दाब आणि कधीकधी महान्याय–प्रतिनीधीचे कार्यालय यांची बाब बनते. नाल्याच्या मानकांची पूर्ती करण्याकरता अपशिष्टावर किती उपचार करावयाचा हे ठरविणे प्रत्येक उद्योगावर सोपविले जाते, आणि उद्योगास काय मान्य होईल हे ठरविण्याकरता उद्योगाकडून, सामान्यतः, प्रदूषण नियंत्रण अधिकारिणीशी प्रत्यक्ष संपर्क साधण्यात येतो, कारण प्रदूषण नियंत्रण अधिकारिणीला पुर्नविलोकन करावे लागते आणि अपशिष्ट–उपचार संयंत्रांचे अंतिम संरचन नकाशे मान्य करावे लागतात.

उद्योगाचा प्रकार अगर उद्योग आणि नगरपालिकांची स्थाने, यासारखे अन्य घटक कोणतेही असोत, अतिप्रदूषणास प्रतिबंध करता येतो हा नाला मानक व्यवस्थेचा प्रमुख फायदा असतो. नाल्यात सामावून घेता येईल इतकी मर्यादा भारावर या व्यवस्थेत घालता येते आणि म्हणून नाल्याच्या बाजूने क्रांतिक विदूजवळ स्थापित केलेल्या उद्योगात अडचणी निर्माण केल्या जातात. उलटपक्षी, जितक्या काळजीपूर्वक मजूर, वाहने, बाजार आणि अन्य बाबीचा विचार केला जातो तितक्याच काळजीने संयंत्राचे स्थान निश्चित करण्याचा निर्णय घेताना प्रदूषण कमी करण्याविषयी विचार करावा.

नाला – मानकावर आधारलेल्या व्यवस्थेची वर्गवारी पुरी करण्यात अनेक अडचणी येतात. त्यांचा खाली उल्लेख केला आहे

(१) निरनिराळ्या वर्गवारीचे विभाग अपशिष्टाने भरलेले असल्याने निर्माण होणारा गोंधळ




(२) भाविष्यकालीन औद्योगिक, नागरी, कृपिविषयक आणि अन्य उपयोगाकरता नाल्यातील विभाग राखून ठेवण्यातील मतभेद

(३) प्रस्थापित वर्गवारीत (विभागाची दर्जोन्नति अथवा अवनति यात) बदल करताना उद्योगापासून अगर नागरिकांपासून होणारा अडथळा आणि दप्तर दिरंगाई

(४) वर्गवारी करण्यापुर्वी संमिश्र आणि सपूर्णतया सर्वेक्षण करण्याची आवश्यकता. ही बाब खर्चाची आणि अडचणीची असू शकते, आणि त्यामुळे (कार्यवाहीत) विलंब होतो.

(ह्या विषयीची) आशादायक बाजू उद्योग, नागरी संस्था, आणि नाल्याच्या ज्या परिस्थित्यनुरूप संयंत्राचे अभिमूल्पन करावयाचे ती परिस्थिति नक्की जाणणाऱ्या अभियंत्याना सुरक्षितता वाटते, ही आहे. जर प्रसंगाची व्याप्ति आणि उपचाराची नक्की मात्रा माहीत असेल तर उद्योग आपली समस्या सोडविण्याची पद्धत शोधू शकतो.

खालील वर्गीकरणानुसार न्यूयॉर्क राज्याने नाला – मानक पद्धति अमलात (२) आणली आहे.

ताजे पाणी –

वर्ग AA – मान्य असलेले रोगाणुनाशन करून अस्तित्वात असलेली नैसर्गिक अशुद्धता नाहीशी करण्याकरता जरूर तर अतिरिक्त उपचार केलेले **पिण्याचे पाणी**

वर्ग – A किमान किलाटन, अवसादन, निस्यंदन, व रोगाणु–नाशन; या शिवाय जरूर तर नैसर्गिक अशुद्धता नाहीशी करण्यासाठी अतिरिक्त उपचारांसारखे मान्य उपचार जर पाण्यावर करावे लागले तर असे **पिण्याचे पाणी**

वर्ग B – **स्नान** अगर अन्य गौण वापर

वर्ग C – **मासे पकडणे** अगर अन्य गौण वापर

वर्ग D – **कृषि विषयक, औद्योगिक प्रशीतन** अगर **औद्योगिक प्रक्रिया जल**, अथवा अन्य गौण वापर

वर्ग E – **वाहितमल, आणि औद्योगिक अपशिष्ट निस्तरण**, आणि **परिवहन**, अथवा अन्य गौण वापर

वर्ग F – **वाहितमल** आणि **औद्योगिक अपशिष्टे** अथवा अन्य अपशिष्टांची विल्हेवाट

लवणयुक्त वेलाजले (tidal salt waters)

वर्ग SA– विकण्याकरता शेल मासे पकडणे आणि अन्य वापर

वर्ग SB– स्नान आणि विकण्याकरता शेलमासे पकडण्याव्यतिरिक्त अन्य वापर

वर्ग SC– स्नानाव्यतिरिक्त आणि विकण्याकरता शेल मासे पकडण्याव्यतिरिक्त मासे पकडणे आणि इतर वापर.

वर्ग SD– मासे पकडणे, स्नान करणे, आणि शेल मासे पकडणे याव्यतिरिक्त कोणत्याही प्रकाराचा वापर

भूजले (under ground water)

वर्ग GA– (जल) पान, पाकशाला, अथवा अन्नप्रक्रिया, आणि इतर वापर.

वर्ग GB-GA तील वापराव्यतिरिक्त, औद्योगिक अगर अन्य जलपुरवठा.

एकदा का नाल्याचे वर्गीकरण झाले कीं, नियामक अधिकारिणीकडून ते वर्गीकरण टिकवण्याचा अगर त्यात सुधारणा करण्याचा प्रयत्न करण्यात येतो. या व्यवस्थेखाली अपशिष्ट–उपचार यंत्रणेचे अभिकल्पन करणाऱ्या अभियंत्यावर अपशिष्ट–उपचार सिद्ध करण्याची जबाबदारी पडते. अभियंत्याला असे दाखविता आले पाहिजे कीं, ज्या नाल्यावरील संयंत्रातून अपशिष्ट सोडण्यात येते त्याची वर्गवारी अशा अपशिष्टामुळे बदलणार नाही. नाल्याचा विद्यमान दर्जा आणि महत्वाची प्रदूषणाची स्थाने नजरेस आणण्यासंबंधी नियामक अधिकारिणी न,गरिकांना जबाबदार असते.

## संदर्भ–


१. ब्लडगुड, डी, ई, " १९५३ चे औद्योगिक अपशिष्ट-चर्चा मंडळ( forum )", स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २६, ५, ६४० (मे१९५४).

२. न्यू यॉर्क राज्य जलप्रदूषण नियंत्रण मंडळ, "क्लासिफिकेशन अँड स्टँडर्डस् ऑफ वॉटर क्वालिटी अँड प्यूरिटी," जर्नल ऑफ दि अमेरिकन वॉटर वर्क्स असोसिएशन, ४२, १२, ११३७ (डिसेंबर १९५०).

३. डॅपर्ट, ए पी.. "पोल्यूशन कंट्रोल थ्रू दि मेकॅनिझम ऑफ क्लासेस अँड स्टँड्र्डस," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २४, ३, ३१३ ( मार्च १९५२).

४. स्ट्रीटर, एछ. डब्ल्यू "स्टँड्र्डस ऑफ स्ट्रीम सॅनिटेशन," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स २१, १, ११५ ( जानेवारी १९४९ )




## : ७ : उदासीनीकरण ( Neutralization )

अति क्षारीय अगर अम्लीय अपशिष्टे उपचार केल्याशिवाय ग्राहक नाल्यात सोडता कामा नयेत हे अत्यावश्यक असते. सर्वांत कनिष्ट वर्गीकरणातील, म्हणजे ज्या नाल्याची- अपशिष्ट - निस्तारणाकरता आणि / अगर नौकानयनाकरता – वर्गवारी केली आहे, अशा नाल्यावर सुद्धा pH च्या उच्च अगर कमी मूल्याचा उलट परिणाम होतो. जेव्हा अम्ल अगर क्षारांचे धातु खंड ( नाल्यातील ) प्रवाहावर अकस्मात लागू केले जातात तेव्हा ही परिस्थिती अधिकच क्रांतिक होते.

अपशिष्ट – जलातील अति अम्ल अगर क्षारतेच्या उदासीनीकरणाकरता अनेक मान्यवर पद्धती उपलब्ध आहेत. त्यापैकी काहीत खालील पद्धतींचा समावेश आहे : ( १ ) अपशिष्टांचे असे मिश्रण करणे की त्याचा निव्वळ परिणाम, pH जवळजवळ उदासीन होण्यात होतो; ( २ ) चुनखडीच्या थरांमधून अम्लीय अपशिष्ट - जल जाऊ देणे; ( ३ ) चुन्याच्या अथवा डॉलोमाइट चुन्याच्या गाऱ्यात अम्लीय अपशिष्टे मिसळणे; ( ४ ) दाहक ( caustic ) सोडा ( NaOH ) अथवा सोडा ॲश ( $Na_2 CO_3$ ) यांची संकेंद्रित द्रावणे अम्लीय अपशिष्टांत योग्य प्रमाणात घालणे; ( ५ ) क्षारीय अपशिष्टांमधून बॉयलर मधील दग्धवायु ( fluegas ) फुंकणे; ( ६ ) क्षारीय अपशिष्टांत संपीडित $CO_2$ घालणे ( ७ ) क्षारीय अपशिष्टांत $CO_2$ निर्माण करणे; ( ८ ) क्षारीय अपशिष्टांत सल्फ्युरिक अम्ल घालणे.

उदासीनीकरणाकरता वापरावयाचे द्रव्य व त्याची पद्धत एकंदर खर्चाकडे ध्यान देऊन निवडावी, कारण द्रव्याच्या किंमतीत फार फरक असतो आणि निरनिराळ्या पदार्थांच्याकरता वापरावयाची उपकरणे निवडलेल्या पद्धतीप्रमाणे बदलावी लागतात. उदासीनीकरण करावयाच्या क्षार अगर अम्लाची राशी, प्रकार, आणि आयतन (volume) हे, उदासीनी करणाकरता कोणचे द्रव्य वापरावयाचे ते निश्चित करण्याचे, निर्धारक घटक असतात.

कोणच्याही चुन्याच्या उदासीनीकरण पद्धतीत अपशिष्ट–अभियंत्याने एक किमान स्वीकार्य निःस्त्रावी pH ठरवावा, आणि किमान pH पर्यंत पोचण्यासाठी अम्ल–निःस्त्रावाकरता पुरेसा प्रक्रिया – कालावधी ठेवावा. त्यामुळे अभियंत्याला सामान्यपणे अकारण होण्यासारख्या खर्चात बरीच बचत करता येईल (९).

पुरेसा अवरोधन ( detention ) काल ठेवून आणि जरूरी असल्यास नंतरच्या जीव- विषयक उपचारणातील क्षमतेचा काही प्रमाणात त्याग करून गिरणीतील उदासीनीकरणावर

होणारा खर्च कमी करता येतो. अशी अनेक उदाहरणे (उपलब्ध) आहेत. शक्य असणाऱ्या मर्यादेत, उच्च प्रमाणातील क्षारीय अपशिष्टांच्या केवळ अवरोधन-कालाचा परिणाम, अंतिम pH हवा असेल तितका कमी करण्यात जितका उदासीनीकारक रसायनांच्या वापराने प्राप्त होतो तितका, होणार नाही. जेव्हा pH ची मूल्ये उदासीनतेच्या निकट असतात तेव्हा जीवविषयक उपचार अधिक कार्यक्षमतेने होतात. म्हणून रसायनांनी केलेल्यां प्राक् उदासीनी करणामुळे असा उपचार अधिक परिणामकारक होतो.

## ७–१ अपशिष्टे मिसळणे –

संयंत्राच्या एकूण परिचालनात अथवा शेजारच्या औद्योगिक संयंत्रांच्या दरम्यान, निरनिराळ्या अपशिष्टांचे मिश्रण साध्य करता येते. एकाच संयंत्रात क्षारीय आणि अम्लीय अपशिष्टे वैयक्तिकरीत्या निर्माण होऊ शकतात, आणि उचित वेळी ह्या अपशिष्टांचे योग्य प्रकारे मिश्रण करून उदासीनीकरण साध्य करता येते. (आ ७–१). त्या करता, क्षारीय अगर अम्लीय अशा दोघांपैकी एकाचे धातुखंड ( slugs ) बनू नयेत म्हणून प्रत्येक अपशिष्ट काही मात्रेत साठविण्याची सामान्यपणे जरुरी असते.

अम्लीय अपशिष्ट प्रस्त्रावित करणाऱ्या संयंत्राच्या निकटवर्ती क्षेत्रात क्षारीय अपशिष्ट सोयीस्करपणे पंप करता येईल. असे क्षारीय अपशिष्ट एका संयंत्रातून निर्माण होत असेल तर, अशा प्रत्येक संयंत्राकरता उदासीनीकरणाची काटकसरीची शक्यता असलेली व्यवस्था अंमलात आणता येते. उदाहरणार्थ, क्षारीय (चुना व मॅग्नेशिया) अपशिष्ट निर्माण करणाऱ्या एका




आ. ७–१ उदासीनीकरणावरील साठवणाचा परिणाम

वास्तुसामुग्रीच्या संयंत्रातील गारा, काहीसे समानीकरण केल्यानंतर, अम्लीय अपशिष्ट निर्माण करणाऱ्या एका रासायनिक संयंत्रातील निःस्त्रावात मिसळण्याकरता सुमारे अर्ध्या मैलावर पंप करण्यात येतो. ह्या संमिश्रणातून फलित होणाऱ्या उदासीन अपशिष्टावर अंतिम निस्तारणाकरता अधिक सहज उपचार करता येतात व अशा रीतीने दोन्ही संयंत्रातील व्यापारविषयक, राजनीति संबंधी व अभियांत्रिकी समस्या सोडविता येतात.

## ७–२ अम्लीय अपशिष्टांवरील चुनखडीचा उपचार –

चुनखडीच्या थरांमधून अम्लीय अपशिष्ट नेणे ही अम्लीय जलाच्या उदासीनीकरण्याच्या मूळ पद्धतींच्यापैकी एक पद्धत होती ( ३-११ ). अपशिष्ट थरातून वर अगर खाली पंप करता येते. उपलब्ध शीर्ष आणि लागणारा खर्च यावर हे अवलंबून असते. पंपिंगचा वेग द. मि. स द. चौ फू. स सुमारे एक गॅलन अगर त्यापेक्षा कमी असतो. खालील विशिष्ट प्रक्रियेप्रमाणे रासायनिक उदासीनीकरण घडून येते.



$$CaCO_3 + H_2SO_4 \rightarrow CaSO_4 + H_2CO_3$$

जोपर्यंत अतिरिक्त चुनखडी उपलब्ध असते आणि ती जोपर्यंत सक्रिय अवस्थेत असते तोपर्यंत ही प्रक्रिया चालू राहते. केवळ चुनखडीच्या पुरेशा राशीची तरतूद करून पहिली अट पुर्ण करता येते; दुसरी अट पुरी करणे मात्र कधीकधी अवघड जाते. थराची खराबी होण्याचे टाळण्याकरता वरची मर्यादा सुमारे ५ टक्के राहील इतके अम्लीय द्रावण तनुकृत केले पाहिजे. जेकबच्या ( ७ ) मताप्रमाणे, ०.३ टक्के संकेंद्रणापेक्षा जास्त सल्फ्युरिक अम्लाचे उदासीनीकरण करण्याचा प्रयत्न करू नये कारण कॅल्शियम सल्फेटची विद्राव्यता कमी असते आणि संकेंद्रण जर जास्त झाले तर चुनखडीवर आवरण चढते. अति अम्लामुळे कॅल्शियम सल्फेट अवक्षेपित होते आणि नंतर चुनखडीवर लेप जमून ती निष्क्रिय बनते.

वापरलेल्या चुनखडीच्या थरांची विल्हेवाट लावणे ही या उदासीनीकरणाच्या पद्धतीत एक गंभीर उणीव होऊ शकते. काही ठराविक कालांतराने वापरलेल्या चुनखडीच्या जागी नवीन चुनखडी घातली पाहिजे; ह्या बदलाची वारंवारता, थरामधून सोडण्यात येणाऱ्या अपशिष्टांची राशि आणि दर्जा यावर अवलंबून असते. भार जेव्हा अत्युच्च प्रमाणात अम्लीय असतात तेव्हा, विशेषतः अपशिष्टात जेव्हा सेंद्रिय पदार्थ असतात तेव्हा, फेस निर्माण होण्याची शक्यता असते.

## ७–३ अम्लीय अपशिष्टांवरील चुन्याच्या गाऱ्याचे उपचार –

अम्लीय अपशिष्टांत चुन्याचा गारा मिसळणे ही अधिक अलीकडची आणि प्रभावी उदासीनीकरणाची कार्यपद्धति आहे. ( ५, १४, १५, १६ ) – चुनखडीच्या संस्तरांचा वापर केल्याने जी प्रक्रिया होते तशीच या कार्यपद्धतीतही होते. तथापि हीत चुन्याचा सतत वापर

होत असतो कारण त्याचे कॅलिशयम सल्फेटमध्ये रूपांतर होते आणि क्रमशः ते अपशिष्टातून निघून जाते. जरी ह्या पद्धतीत परिणाम सावकाश होत असला तरीही चूना–कार्यपद्धतीत उच्चप्रमाणात उदासीनीकरणाची शक्ति असते. तुलनेने ही कमी खर्चाची असते पण जर तिचा वापर मोठ्या प्रमाणात करावा लागला तरमात्र ती खर्चाच्या दृष्टीने महत्वाची बाब बनू शकते.

कधीकधी जलयोजित ( hydrated ) चुना हाताळणे अवघड जाते कारण साठवणाच्या डोण्यांच्या निर्गमद्वारांवर कमान करण्याची अथवा झेपावण्याची त्याची प्रवृत्ति असते आणि त्याच्यात प्रवाही गुणधर्म कमी असतात. जेथे अम्ल–अपशिष्टांचा कमी संबंध येतो अशा उदासीनीकरण समस्यांत ह्याचा विशेषतः उपयोग होतो, कारण खास प्रकारच्या साठवणाच्या सुविधांची उभारणी न करता तो पोत्यात साठवून ठेवता येतो.

प्रत्यक्ष उदाहरणात (२), नायट्रिक अम्ल आणि ( सल्फ्युरिक ) अम्लाच्या सुमारे १.५ टक्के संकेंद्रणाच्या व्याप्तीतील अपशिष्टांचे उदासीकरण, ४७.५ % Ca O, ३४.३ % MgO, आणि १.८ % $CaCO_3$ असलेला भाजलेला डालोमाइट दगड वापरून, समाधानकारकपणे करण्यात आले. अवशिष्ट – सल्फेशन किमान राखण्याचा अतिरिक्त फायदा या दगडापासून मिळाला; जर अशा संकेंद्रणाच्या सल्फ्युरिक व नायट्रिक अम्लांचे उदासीनीकरण करण्यासाठी उच्च कॅलिशयम असलेल्या चुन्यांपैकी आपण कोणचाही चुना वापरला असता तर ही गोष्ट अशक्यप्राय झाली असती (८).

## ७–४. अम्लीय अपशिष्टांच्यावरील दाहक ( caustic ) सोड्याचे उपचार–

जर अम्लीय अपशिष्टांत संकेंद्रण केलेली कॉस्टिक सोडा अगर सोडियम कार्बोनेटची द्रावणे योग्य प्रमाणात मिसळली तर त्याचे परिणाम जलद होतात, पण हे उदासीनीकरण महाग पडते कारण हे उदासीनीकारक, चुना अगर चुना दगडापेक्षा, अधिक शक्तिमान असतात. प्रतिक्रिया पदार्थ विलेय असतात आणि पाण्यात घातल्यामुळे त्या पाण्याचे काठिण्य वाढण्यास ते कारणीभूत होत नाहीत हा आणखी एक फायदा असतो. अम्लीय अपशिष्टे प्रस्त्रावित करणाऱ्या पंपाच्या चूषणाच्या बाजूत सामान्यतः कॉस्टिक सोडा सोडण्यात येतो. कमी राशि असलेल्या अम्ल अपशिष्टांचे उदासीनीकरण करण्याकरता ही पद्धत उपयुक्त आहे. पण अम्ल अपशिष्टांच्या राशी जर मोठ्या असल्या तर त्यांच्या उदासीनीकरणाकरता विशिष्ट प्रकारच्या प्रमाणीकारक साधनांचा ( ८ वे प्रकरण पहा ) वापर करावा आणि कॉस्टिक सोड्याच्या साठवणाकरता अम्ल अपशिष्ट प्रवाहात क्षार थेट मिसळले जावेत म्हणून बहुवेगी पंप बसविलेल्या सोयीस्कर आकाराच्या टाकीची आवश्यकता असते.

**कोष्टक ७–१**

**विविध क्षारीय कारकांच्या ( agents ) खर्चाची तुलना (६)* ( होक प्रमाणे )**

| रसायन | अंदाजी किमत डॉलर/ टन | समाक्षारीयता घटक † | समाक्षारीयता घटकाची किमत डॉलर/ टन |
|---|---|---|---|
| NaOH ( ७८ % $Na_2$ O ) | १०६ | ०.६८७ | १५४ |
| $Na_2$ $CO_3$ (५८%$Na_2$ O ) | ५७ | ०.५०७ | ११२ |
| MgO | ८३ | ०.३०६ | ६४ |
| उच्च कॅल्शियम असलेला जलयोजित चुना | १४ | ०.७१० | २० |
| डॉलोमयटिक जलयोजित चुना | १४ | ०.९१२ | १५ |
| उच्च कॅल्शियम असलेली चुनकळी | ११ | ०.९४१ | १२ |
| डॉलोमायटिक चुनकळी | ११ | १.११० | १० |
| उच्च -कॅल्शियम असलेला चुनादगड | ४ | ०.४८९ | ८ |
| डॉलोमायटिक चुनादगड | ४ | ०.५६४ | ७ |

आतापर्यंत आपण अम्ल अपशिष्टांच्या उदासीनीकरणाच्या चार पद्धतींची चर्चा केली क्षारीय अपशिष्टांचा विचार करण्यापूर्वी आपण ( आतापर्यंत ) विचारात घेतलेल्या अम्ल उदासीनीकरण पद्धतींच्या समाक्षारीयतांचे आणि खर्चाचे कोष्टकीकरण करूया. होकच्या (६) कोष्टक ७–१ मध्ये विभिन्न उदासीनीकरण करणाऱ्या कारकांच्या समाक्षारीयता आणि खर्चांची तुलना केली आहे.

कोष्टक ७–१ मध्ये दिलेला समाक्षारीयता घटक उदासीनीकरण करणाऱ्या कारकाच्या निवडीतील महत्वाच्या घटकांपैकी एक असल्याने, होकने (४) (आ. ७–२) ह्या घटकाच्या केवळ संगणनाचीच तरतूद केलेली आहे असे नसून अपशिष्टातील दर गॅलनला उदासीनीकारक किती

* १९७४ सालात असलेल्या दरावर आधारित

† केलेल्या उदासीनीकरणाकरता उपलब्ध असलेल्या क्षाराचे माप ( दर ग्रॅमला CaO चे सममूल्य ग्रॅम्स.)

आकृति ७–२










सरळ पट्टीने A व B स्केल जोडा व C या स्केलवरून निष्कर्ष काढा.

आ. ७-2.

अम्लीय अपशिष्टांवरील उपचाराकरता सूत्रालेख (nomogram); क्षारीय कारकाची (agent) लागणारी राशि निर्धारित करण्याचा आलेख (होक प्रमाणे) (४).

लागेल याचे गणन करण्याकरता सूत्रालेखाची ही ( comograph ) तरतूद केली आहे. त्याच्या पद्धतीत ०.५N NaOH ची अतिरिक्त राशि असलेल्या सल्फ्युरिक अम्ल–अपशिष्टाच्या एका ५ मि. लि. नमुन्याचे अनुमापन ( titration ) करून आणि ०.५ N HCL च्या सहाय्याने फेनॉलथॅलीनच्या अंतिम बिंदूपर्यंत पश्चानुमापन (back titration) करून अम्ल–मूल्य निर्धारण करण्याचा अंतर्भाव केलेला असतो. चुन्याच्या समाक्षारीयता घटकाचे ( अगर उदासीनीकरण करणाऱ्या कारकाचे ) निर्धारण, ०.५ NHCL अतिरिक्त असलेल्या क्षारीय कारकाच्या १ ग्रॅम नमुन्याचे अनुमापन करून, तो नमुना १५ मिनिटे उकळत ठेवून, आणि ०.५ N NaOH च्यासह फेनॉलथॅलीनच्या अंतिम बिंदूपर्यंत पश्चानुमापन करून, करण्यात येते. अम्ल–अपशिष्टाच्या ( B ही रेखा ) दर गॅलनला क्षारीय कारक किती पौंड लागेल हे समजण्याकरता अम्ल-मूल्य ( C ही रेखा ) आणि समक्षारीयता घटक ( A ही रेखा ) होकच्या सूत्रालेखाशी जोडता येतात.

कॅर्बॉनिक आणि सल्फ्युरिक अम्ल–अपशिष्टाकरता जेव्हा उदासीनीकरणाचा कारक म्हणून सोडियम हायड्रॉक्साइड वापरण्यात येते तेव्हा खालीलप्रमाणे प्रक्रिया घडून येतात.



$$Na_2CO_3 + \underbrace{CO_2 + H_2O}_{\text{कॅर्बॉनिक अम्ल–अपशिष्ट}} \rightarrow २\ NaHCO_3,$$



$$२\ NaOH + CO_2 \rightarrow Na_2CO_3 + H_2O;$$



$$NaOH + \underbrace{H_2SO_4}_{\text{सल्फ्युरिक अम्ल अपशिष्ट}} \rightarrow NaHSO_4 + HOH,$$



$$NaHSO_4 + NaOH \rightarrow Na_2SO_4 + HOH$$

ही दोन्हीही उदासीनीकरणे दोन टप्प्यात घडुन येतात आणि निष्पन्न वस्तू ( end products ) इष्ट असलेल्या अंतिम pH वर अवलंबून असतात. उदाहरणार्थ, एका उपचार पद्धतीत अंतिम pH फक्त ६ हवा असेल आणि म्हणून निष्पादनातील बराचसा भाग $NaHSO_4$ चा राहील तर दुसऱ्या उपचार पद्धतीत ८ PH लागेल आणि निष्पादनात बहुतांशी $Na_2SO_4$ असेल.

आता क्षारीय अपशिष्टांच्या उदासीनीकरणाचा विषय आपण घेऊया.

## ७–५ बॉयलर मधील फुकट जाणाऱ्या दग्ध वायूचा (flue gas) वापर–

क्षारीय अपशिष्टांतून बॉयलरमधील टाकाऊ पिंगट दग्ध वायू फूंकून टाकणे ही त्याच्या

उदासीनीकरणाची तुलनेने नवीन आणि काटकसरीची पद्धत आहे. ह्या पद्धतीने केलेल्या प्रायोगिक कार्यापैकी बहुतेक कार्य वस्त्र–निर्मितीतील अपशिष्टांवर करण्यात आले आहे (१,१०, १३, १४ १७ ). चांगल्या प्रकारे ज्वलन झालेल्या ढिगाऱ्यातील वायूत अंदाजे १४ टक्के कार्बन डाय ऑक्साइड असते. जेव्हा कार्बनडायऑक्साइड अपशिष्ट–जलात विरघळते तेव्हा त्यातून कॅर्बोनिक अम्ल ( क्षीण अम्ल ) तयार होते व नंतर त्याची, अतिरिक्त क्षारतेचे उदासीनीकरण करण्यासाठी, दाहक अपशिष्टाशीं खालील प्रमाणे प्रक्रिया होते.










ढिगाऱ्यावर बसविलेला भाता, अपशिष्टावरील उपचार करण्याच्या जागेपर्यंत गॅस वाहून नेण्याकरता गॅसनळी, गॅसमधून सल्फर आणि ज्वलन न झालेले कोळशाचे कण काढून टाकण्याकरता निस्यंदक, अपशिष्ट – जलांतील ढिगाऱ्यातल्या गॅसचे विसर्जन करण्यासाठी गॅस विसारक ही उपकरणे लागतात. ढिगाऱ्यातल्या गॅसमुळे अपशिष्ट जलातून हायड्रोजन सल्फाइड निर्माण होते व त्यात बऱ्याच प्रमाणात सल्फर असते. उपद्रवी परिस्थिती निर्माण होण्यास प्रतिबंध व्हावा म्हणून ह्या हायड्रोजन सल्फाइडचे ज्वलन व अवशोषण केले पाहिजे अथवा वरच्या वातावरणात त्याचा ठामपणे निकास केला पाहिजे.

## ७–६ क्षारीय अपशिष्टावरील कार्बन डाय ऑक्साइडचा उपचार –

ज्या प्रमाणे उत्प्रेरित अवमल – ( activated sludge ) डोण्यात संपीडित वायूची प्रयुक्ति केली जाते, बरेचसे तशाच प्रकारे बाटलीत भरलेल्या $CO_2$ ची अपशिष्टजलांवर प्रयुक्ति करण्यात येते आणि ज्या तत्वावर बायलर–संभरण ( feed ) वायूमुळे उदासीनीकरण होते त्याच तत्वावर क्षारीय अपशिष्टांचे उदासीनीकरण होते; म्हणजेच जेव्हा $CO_2$ पाण्यात विरघळून जातो तेव्हा त्यातून क्षीण अम्ल ( कॅर्बोनिक अम्ल ) तयार होते. जेव्हा क्षारीय अपशिष्टात संपीडित कार्बन डाय ऑक्साइड मिसळण्यात येते तेव्हा बॉयलर–संभरण वायूच्या बाबतीत येणाऱ्या परिचालनांतील अडचणींच्यापेक्षा बऱ्याच कमी

अडचणी येतात व उदासीनीकरण साध्य होते. तथापि, जेव्हा क्षारीय अपशिष्ट जास्त प्रमाणात असते तेव्हा ( उदासीनीकरणास ) जबर खर्च येतो. सुमारे दररोज ६ द. ल. गॅलन क्षारीय अपशिष्ट निर्माण होणाऱ्या वस्त्र निर्मिति गिरणीत (१०), बाटलीत भरलेल्या कार्बन डायऑक्साइडने उदासीनीकरण करण्याच्या व्यावहारिक बाबींचा अभ्यास करण्यात आला आणि त्यावरून असे दिसून आले कीं, ह्या $CO_2$ चा पुरवठा करण्याकरता आवश्यक असणारी उपकरणे बसविण्यास सुमारे १,५०,००० डॉलर्स खर्च येईल आणि $CO_2$ निर्माण करण्यासाठी लागणारी शक्ति व इंधन, यांच्याकरता दररोज सुमारे २७५ डॉलर खर्च येईल; एवढ्या मोठ्या वस्त्रनिर्मिति गिरणीत सुद्धा हा खर्च डोईजड वाटतो.

## ७.७ क्षारीय अपशिष्टांतून $CO_2$ निर्माण करणे –

पाण्याच्या खाली वायुज्वलन करणे ही कार्बन डाय ऑक्साइड निर्माण करण्याची आणखी एक पद्धत आहे. ह्या कार्यपद्धतीचे निमज्जित दहन असे नांव आहे. जैवी ( biological ), उपचार करण्यापूर्वी अपशिष्टाचे उदासीनीकरण करण्यासाठी नॉयलॉनची अपशिष्टे निस्तारित करण्यात तिचा वापर करण्यात आला आहे. प्रायोगिक संयंत्रावरील अभ्यासात, बाष्पन पात्र, पात्रातील अपशिष्टाच्या पृष्ठभागाखाली निमज्जित केलेला ज्वाला-स्रोत असलेला ज्वालक (burner,) ज्वालाग्राही मिश्रण तयार होण्याकरता हवा व गॅस मिसळण्याची नळी ( bustle pipe ), आणि हवा, गॅस व अपशिष्ट, यांच्या प्रवाहाचे मापन करण्याकरता लागणारी उपांगे, आणि प्रत्येक पाळीत बाष्पशील झालेल्या अपशिष्टाचे वजन, यांचा वापर करून संशोधकांनी निमज्जित दहन अविरतपणे चालू असताना त्याचे अन्वेषण केले. वातना ऐवजी निमज्जित दहनाचा कमी खर्चाच्या दृष्टीने, संयंत्रातील अपशिष्टांच्या काही भागावर उपचार करण्याकरता उपयोग करण्यात यावा असा निर्णय त्यांनी घेतला. ( ह्या उदाहरणात, अपशिष्टाच्या उदासीनीकरणाचा उद्देश नसून त्यातील विषाक्त द्रव्यांचे विच्छेदन ( stripping ) करणे हा प्रधान उद्देश होता. )

## ७.८ क्षारीय अपशिष्टांवरील सल्फ्युरिक अम्लाचा उपचार –

क्षारीय अपशिष्टात सल्फ्युरिक अम्ल मिसळणे ही नित्याची बाब असते पण ते उदासीनीकरण करण्याचे काहीसे महाग साधन आहे. जर सल्फ्युरिक अम्ल मोठ्या प्रमाणात विकत घेतले तर दर पौंडास एक सेंट इतकी अल्प किंमत पडत असली तरी त्याची पौंडी किंमत २ ते ३ सेंट इतकी जास्त असू शकते. साठवणाला जागा कमी लागणे आणि संभरणाची साधनें कमी लागणे हा सल्फ्युरिक अम्लतेतील अति अम्लतेचा परिणाम असतो; परंतु त्यातील संक्षारकतेमुळे त्याची हाताळणी करणे कठीण असते. अपशिष्ट–जलात जेव्हा $H_2SO_4$ मिसळण्यात येतो तेव्हा पुढीलप्रमाणे उदासीनीकरण घडून येते.



$$२\ NaOH + H_2SO_4 \rightarrow Na_2SO_4 + २\ H_2O.$$



## संदर्भ–

१ – बीच, सी. जे., आणि एम. जी. बीच, "ट्रीटमेंट ऑफ अल्कलाइन डाय वेस्ट्स वुइथ फ्ल्यू गॅस." दक्षिण नगरपालिका आणि औद्योगिक अपशिष्ट संमेलनाची कार्यवाही ( एप्रिल १९५६ ), पान १६२.

२ – डिकर्सन, बी. डब्ल्यू, आणि आर. एम. ब्रुक्स, "न्यूट्रलायझेशन ऑफ ॲसिड वेस्ट्स," इंडस्ट्रियल अँड इंजनिअरिंग केमिस्ट्री ४२, ४, ५९९ (एप्रिल १९५०),

३ – जेम. एछ. डब्ल्यु., "न्यूट्रलायझेशन वुइथ अप–फ्लो एक्स्पँडेड लाईम स्टोन बेड," स्युवेज वर्क्स जर्नल, १६, १, १०४ (जानेवारी १९४४)

४ – होक, आर. डी., "ए न्यूट्रलायझेशन नोमोग्राफ," इंडस्ट्रियल वेस्ट्स, ३, ५ D–४८ ( सप्टेंबर – ऑक्टोबर १९५८ ).

५ – होक, आर. डी., "न्यूट्रलायझेशन स्टडीज ऑन बेसिसिटी ऑफ लाईम स्टोन अँड लाईम," स्युवेज वर्क्स जर्नल, १६, ४, ८५५ ( जुलै १९४४).

६ – होक आर. डी., "अँसिड आयर्न वेस्ट्स न्यूट्रलायझेशन," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २२, २, २१२–२२१ ( फेब्रुवारी १९५०).

७ – जेकब्स, एछ. एल., "न्यूट्रलायझेशन ऑफ ॲसिड वेस्ट्स," २३, ७९०० ( जूलै १९५१ ).

८ – जेकब्स, एछ. एल 'ॲसिड न्यूट्रलायझेशन," केमिकल इंजिनिअरिंग प्रोग्रेस, ४३, ५ २४७ ( मे १९४७ )

९ – लेविस, सी. जे., आणि एल. जे. योस्ट, "लाईम इन वेस्ट ॲसिड ट्रीटमेंट," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स' २२, ७, ८९३ (जूलै १९५०).

१० – नेमेरो, एन एल., "होल्डिंग अँड एरिएशन ऑफ कॉटन मिल फिनिशिंग वेस्ट्स," ५ व्या दक्षिण नगरपालिका आणि औद्योगिक अपशिष्ट संमेलनाची कार्यवाही ( एप्रिल १९५६) पान १४९.

११ – रीडल, ए. एल., "न्यूट्रलायझेशन वुइथ अप–फ्लो लाईम स्टोन बेड," स्युवेज वर्क्स जर्नल १९, ६, १०९३ (नोव्हेंबर १९४७ )

१२ – रेमी, ई. डी., आणि डी. टी. लॉरिया, "डिस्पोजल ऑफ नायलॉन वेस्ट्स," १३ व्या पर्ड्यू औद्योगिक अपशिष्ट संमेलनाची कार्यवाही, (मे १९५८) पान ५९६

१३ – "ट्रीटमेंट ऑफ अल्कलाईन सल्फर डाय वेस्ट वुइथ फ्ल्यू गॅस," स्वास्थ्यविषयक अभियांत्रिकी विभागाची पत्रिका, संशोधन अहवाल क्र. ८, रासायनिक अभियंत्याच्या अमेरिकन संस्थेची कार्यवाही, ८२, १०७८, SA – ५ ( आक्टोबर १९५६ ).

१४ – रुडॉल्फ्स, डब्ल्यू. "न्यूट्रलायझेशन वुइथ लाईम," स्युवेज वर्क्स जर्नल, १५,३,५९० ( मे १९४३ )

१५ – रुडॉल्फ्स, डब्ल्यू., "प्रीट्रीटमेंट ऑफ वेस्ट्स," स्युवेज वर्क्स जर्नल, १५, १, ४८ ( जानेवारी १९४३ ).

१६ – स्मिथ, एफ., "न्यूट्रलायझेशन ऑफ पिकल लिकर," स्युवेज वर्क्स जर्नल १५, १ १५७ (जानेवारी १९४३)

१७ – स्टोली, डब्ल्यू आर., "अॅप्लिकेशन ऑफ फ्ल्यू गॅस टू दि डिस्पोजल ऑफ कॉस्टिक टेक्स्टाईल वेस्ट्स," तिसऱ्या दक्षिण नगरपालिका आणि औद्योगिक अपशिष्ट संमेलनाची कार्यवाही पान १९०.



# ८ समानीकरण आणि प्रमाणीकरण

## ८–१ समानीकरण –

प्रस्त्रावित होत असलेला निःस्त्राव आपल्या ( pH, वर्ण, गढूळपणा, क्षारता, BOD इत्यादि ) स्वास्थ्यविषयक गुणधर्मात सर्वसाधारपणे एक सारखा होईपर्यंत डोणीत अपशिष्ट राहू देण्याच्या पद्धतीला समानीकरण म्हणतात. ह्या डोण्यांत (१) चांगले मिश्रण व्हावे, (२) लघुकृत संयुगांचे रासायनिक ऑक्सीकरण व्हावे (३) काही प्रमाणात जैवी ऑक्सीकरण, व्हावे आणि (४) तरंगते पदार्थ खाली बसू नयेत, यासाठी ढवळण्याची तरतूद व्हावी म्हणून कधीकधी हवा अंतःक्षेपित करण्यात ( inject ) येते.

अपशिष्टाची राशि आणि कारखान्यातून प्रस्त्रावित झालेल्या अपशिष्टाच्या प्रकाराप्रमाणे डोणीचा आकार आणि रूप बदलते असते. संयंत्रातील सर्व अपशिष्टे सामाऊ शकतील आणि समरूप होतील अशी समानीकरण डोणीची क्षमता असते. बहुतेक सर्व औद्योगिक संयंत्रांचे परिचालन चक्रीय तत्वावर ( cycle basis ) होते; जसे परिचालन चक्र दर दोन तासांनी पुनः होत असल्यास दोन तासांचा प्रवाह माऊ शकेल अशी समानीकरण टाकी सामान्यतः पुरेशी होईल. जर प्रत्येक २४ तासानी हे चक्र पुनः होत असेल तर अपशिष्टाचा २४ तासांचा प्रवाह मावण्याइतकी मोठी समानीकरण डोणी असावी लागेल.

असे असले तरी, अपशिष्ट केवळ साठवून ठेवणे ( hold ) समानीकरणास पुरे पडत नाही. मिश्रण इतके पर्याप्त झाले पाहिजे की प्रस्त्रावित झालेल्या अपशिष्टाची प्रत्येक एकेक राशि, अनेक तासापूर्वी प्रस्त्रावित झालेल्या अपशिष्टाच्या इतर एकेक राशींत मिसळली जाईल. ही मिश्रणक्रिया पुढील प्रमाणे करण्यात यावी; (१) योग्य वितरण आणि अडथळे ठेवणे; (२) यांत्रिकी प्रक्षोभन करणे; (३) वातन करणे; आणि (४) या तीन्हीही बाबी संयुक्तपणे करणे.

## योग्य वितरण आणि अडथळे ठेवणे

ही मिश्रणाची सर्वांत काटकसरीची पद्धत आहे. मात्र तिची कार्यक्षमता सर्वात कमी असते. तथापि, अनेक संयंत्रावर ही पद्धत पर्याप्त ठरली आहे. अनेक प्रवेशी नलिका वापरून आणि टाकीच्या रुंद बाजूवर त्या सारख्या अंतरावर बसवून अगर संपूर्ण रुंदीवर भोके

असलेली नळी बसवून ( आ. ८-१ ) अपशिष्टाचे आडव्या दिशेने वितरण साधता येते. टाकी जेव्हा रूंद असते तेव्हा वर आणि खाली अडथळे बसविणे श्रेयस्कर असते. कारण त्यामुळे अधिक कार्यक्षमतेने आडवे व उभे वितरण घडून येते. जेव्हा रूंदीच्या बाजूने विभिन्न स्थानांतून अनेक वेगवेगळी अपशिष्टे डोणीत जात असतात तेव्हा अडथळे असणे विशेष महत्वाचे असते. डोणीच्या तळाकडे अंत:प्रवाह जबरीने वळविला पाहिजे, त्यामुळे तरंगते कण प्रवेशी वेगामुळे खाली बसण्यास आणि तेथे साचून राहण्यास प्रतिबंध होतो.




**आ ८-१ भोकें असलेली अंत:प्रवेशी नलिका व वर आणि खाली अडथळे बसविलेल्या समानीकरण डोणीचे वरून दिसणारे दृश्य –**

**यांत्रिकी प्रक्षोभनामुळे** अडथळ्यांची गरज नाहीशी होते आणि सामान्यत: फक्त अडथळे बसवून जे मिश्रण होते त्यापेक्षा अधिक चांगले मिश्रण तयार होते. आ. ८-२ (१) मध्ये एक नमुनेदार योजना दाखविली आहे. टाकीच्या लांब बाजूच्या मध्य रेषेत सारख्या अंतरावर बसविलेल्या तीन लाकडी द्वारसदृश प्रक्षोभकांचा उपयोग करण्यात आला आहे. तीन अश्वशक्तीच्या चलित्रावर द. मि. स. १५ फेऱ्यांच्या वेगाने चालविण्यात येणारे प्रक्षोभक सामान्यपणे पुरेसे होतात.



**आकृति ८-२ अडथळ्यांच्या ऐवजी यांत्रिकी प्रक्षोभक बसविलेल्या समानीकरण डोणीचे पार्श्व दृश्य –**

आ. ८–२ मधील योजना सैद्धांतिकतया आदर्श टाकीशी जुळणारी आहे. कारण तिची कार्यक्षमता उच्च असते आणि ती बसविण्यास लहान जागा पुरते; शिवाय प्रत्यक्ष निस्सारणासाठी अगर अंतिम उपचारणाकरता निरनिराळी रासायनिक अपशिष्टे तिच्यातून तयार होतात. जर अपशिष्टांवर अनुगामी ( subsequent ) उपचारणांची गरज भासली तर ती कार्यपद्धत आपोआप सुसाध्य होते कारण एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत गुणधर्म जलद बदलणाऱ्या अपशिष्टांची समस्या निरसित झालेली असते. जेव्हा (१) समानीकरणासाठी मर्यादित जागा उपलब्ध असते, (२) तरंगते घनपदार्थ काढून टाकणे इष्ट नसते, (३) अपशिष्टांच्या गुणधर्मात जलद बदल होत असतात, आणि (४) अनुगामी उपचारणाची सुविधा असणे हे लक्ष्य असते तेव्हा, समानीकरणाच्या ह्या पद्धतीची रूडॉल्फस आणि मिलर (१) यांनी शिफारस केली आहे.

अशा प्रकारची उपकरणे केवळ समानीकरणासच चांगली असतात असे नसून ती, तनुकरण, ऑक्सीकरण, लघुकरण, अगर इच्छित परिणाम होण्यास ज्यात एका क्षणी प्रस्त्रावित केलेल्या रासायनिक संयुगांशी त्या आधी प्रस्त्रावित केलेल्या अगर नंतर प्रस्त्रावित होणाऱ्या संयुगांच्याबरोबर प्रक्रिया व्हावी अशी इच्छा असते अशा कोणत्याही अन्य कार्यासाठीसुद्धा चांगली असतात.

**समानीकरण डोण्यांचे वातन करणे** हा अपशिष्टे मिसळण्याचा अत्यंत कार्यक्षम मार्ग आहे, परंतु तो अत्यंत खर्चाचाही आहे. वातनाने खालील गोष्टी घडून येतात. अपशिष्टांचे मिश्रण आणि समानीकरण करण्यास मदत होते. अवस्थापित द्रव्य टाकीत साचून राहण्यास प्रतिबंध होतो अगर त्यात घट होते. आणि सल्फरच्या संयुगांसारख्या लघुकृत संयुगांच्या प्राथमिक रासायनिक ऑक्सीकरणाची त्यातून तरतूद होते. समानीकरण डोणीचे वातन करण्यासाठी दर गॅलन अपशिष्टास सुमारे अर्ध्या घनफूट हवेची गरज लागते. जेथे अपशिष्टांचे गुणधर्म आणि राशी बदलत्या असतात, लघुकृत संयुगे जास्तीत जास्त असतात, आणि त्यात अवस्थापनशील तरंगते घनपदार्थ असतात, तेथे तशा परिस्थितीत वातनाने विशेष फायदे होतात.

## ८–२ प्रमाणीकरण –

नागरी वाहितमलात प्रमाणात औद्योगिक अपशिष्ट प्रस्त्रावित करण्याच्या क्रियेस प्रमाणीकरण म्हणतात. तसेच औद्योगिक अपशिष्टांच्या निःस्त्रावाचे, ज्या नदीत ते सोडले जाते तिच्या प्रवाहाशी प्रमाणीकरण करता येते. प्रमाणीकरणाचा उद्देश हा असतो की, नागरी वाहितमल संयंत्रात शिरणाऱ्या औद्योगिक अपशिष्टांची टक्केवारी स्थिर ठेवणे. मग घरगुती वाहितमलाचा प्रवाह कितीही असो. ह्या कार्यपद्धतीचे अनेक उद्देश असतात: (१) औद्योगिक अपशिष्टांत असलेल्या रसायनांची मात्रा अकस्मात वाढल्याने नागरी संयंत्रातील रासायनिक

वाहितमलावरील उपचारणास बाधा होण्यापासून रक्षण करणे, (२) जीवाणूना क्रियाहीन करण्याची शक्यता असलेल्या औद्योगिक अपशिष्टांचे धडक (shock) भारण होण्यापासून जैवी उपचार-साधनांचे संरक्षण करणे, (३) उपचारित निस्त्रावाच्या स्वास्थ्यविषयक प्रमाणांतील चढउतार कमीत कमी करणे, हे त्यातील काही उद्देश आहेत.

घरगुती वाहितमलाचा प्रवाह जसाजसा क्षणाक्षणाला बदलत असतो त्याचप्रमाणे औद्योगिक अपशिष्टांचा प्रवाहही बदलत असतो, आणि दोन्हीही एकाच मल-व्यवस्थेत रिते होतात म्हणून औद्योगिक अपशिष्टांचे समानीकरण केले पाहिजे आणि तो स्थिर राहू दिली पाहिजेत. नंतर घरगुती वाहितमलाच्या राशीच्या प्रमाणे मलवाहिनीतील अथवा नाल्यातील (प्रवाहा प्रमाणे) त्यांचे प्रमाणीकर केले पाहिजे. प्रमाणीकरण करणे सोयीचे व्हावे म्हणून, वाहितमल संयंत्रात मलनिःस्त्रावाचे प्रस्त्रावण होण्यासाठी कारखान्यात बहुवेगी पंप बसविलेली धारकटाकी बांधली पाहिजे. उद्योगाच्या जागेपासून काही अंतरावर घरगुती वाहितमल-उपचार-संयंत्राचे स्थान सामान्यपणे ठेवलेले असल्याने प्रवाहाच्या वेळेची आणि राशीची सूचना देणे अवघड जाते आणि काही वेळा ते खर्चाचेही असते. म्हणून अनेक उद्योगांत, त्यांतील अपशिष्टे नागरी उपचार संयंत्रात पंप करण्यासाठी स्वतंत्र नळ योजना केलेली असते. त्या स्थानापाशी अपशिष्टांचे समानीकरण करण्यात येते आणि प्रवेशी नागरी अपशिष्ट-जल प्रवाहाशी त्यांचे प्रमाणीकरण करण्यात येते.

अर्थात, स्वतंत्र नळयोजना नेहमीच शक्य वा जरुरीची नसते. एका वस्त्रनिर्मिति गिरणीत असे आढळून आले की, सकाळी ८, दुपारी १२, आणि सायंकाळी ७ वाजता अशा तीन वेळा धारक टाकीतील निःस्त्रावी पंपाच्या झडपेचे समायोजन करून बदलत्या घरगुती वाहितमलाच्या प्रवाहाशी तेथील अपशिष्टाचे प्रभावी प्रमाणीकरण करता आले.

नागरी संयंत्राजवळ घरगुती वाहितमलाच्या प्रवाहानुरूप औद्योगिक अपशिष्ट प्रस्त्रावित करण्याच्या दोन सामान्य पद्धती आहेत. सुनिर्धारित घरगुती वाहितमलाच्या प्रवाहाच्या प्रकारा प्रमाणे मानवी नियंत्रण; व इलेक्ट्रॉनिकी सहाय्याने स्वयंनियंत्रण.

मानवी नियंत्रणाला प्रारंभिक खर्च कमी येतो पण त्याची अचूकता कमी असते. त्यात अनेक महिन्यांच्या कालावधीमध्ये आठवड्यातील दर दिवसाकरता घरगुती वाहितमलाच्या प्रवाहाच्या प्रकारांचे निर्धारण करण्याचा अंतर्भाव असतो.वाहितमल-संयंत्रावरील प्रवाह-नोंदींची तपासणी करून अगर शहारातील दरताशी वापरल्या जाणाऱ्या पाण्याचा अभ्यास करून सामान्यपणे हे (नियंत्रण) केले जाते. विविध असंबद्ध नोंदींच्यावर आधारून भाकिते करण्यापेक्षा वाहितमलाच्या प्रत्यक्ष प्रवाहाचे काळजीपूर्वक अन्वेषण करण्यासाठी काही काळ

खर्च करणे श्रेयस्कर असते. या बाबतीत लागू असलेल्या विशिष्ट नोंदींना पुष्टी देण्यासाठी प्रत्यक्ष (मिळालेली) अन्वेषणजन्य आधारसामग्री वापरावी.

## स्वयंनियंत्रण.

वाहितमलाच्या प्रवाहानुसार अपशिष्टाच्या प्रस्त्रावाच्या स्वयंनियंत्रणात मुख्य मल वाहिनीच्या अत्यंत सोयीस्कर अशा सांध्याजवळ प्रवाहाच्या राशीची नोंद करणारे मापनसाधन बसविण्याचा अंतर्भाव सामान्यतः असतो. ह्या साधनाने मलवाहिनीतील प्रवाहाच्या प्रमाणाची अभिलेखकावर (recorder) नोंद होते. ह्या अभिलेखक औद्योगिक संयंत्राच्या धारक टाकीजवळ बसविलेला असतो. अभिलेखकावरील टाकामुळे यांत्रिकी (गियर) अथवा वायवीय (हवा) नियंत्रण करण्याची यंत्रणा, पंपाच्या पडद्याची उघडझाक करण्याकरता प्रवृत्त होते. अर्थात, प्रवाहाची स्वयंनियंत्रित यंत्रणा विविध प्रकारची असते आणि जरी त्यावरील प्रारंभिक खर्च मानवी यंत्रणेपेक्षा जास्त असला तरी मजूरखर्चात बचत करून गुंतविलेल्या भांडवलाची अनेक पटींनी भरपाई करता येते.

काही औद्योगिक आणि नागरीक अधीक्षकांचे असे मत आहे की, उच्च प्रमाणात औद्योगिक अपशिष्ट मलवाहिनीत सोडण्याची सर्वोत्कृष्ट वेळ, रात्री जेव्हा घरगुती वाहितमलाप्रवाह अल्प असतो तेव्हा असते. उपचारणाचा वापरण्यात आलेला प्रकार आणि औद्योगिक अपशिष्टाचे गुणधर्म, ह्यांवर तो (मलवाहिनीत) रात्री सोडण्याची कल्पना चांगली आहे अगर कसे हे अवलंबून असते. जर उपचारण प्रामुख्यानें जैवी असेल आणि औद्योगिक अपशिष्टात सहज विघटन होणारे सेंद्रिय द्रव्य असेल आणि त्यात कोणचेही विषाक्त घटक नसतील तर,




आकृति ८-३ अपशिष्ट–मापनाची यंत्रणा (फिशर आणि पोर्टर यांच्या सौजन्याने खाजगी पत्र)

ाच्याचा जास्तीत जास्त भाग रात्री प्रस्त्रावित करणे सरोखरच श्रेयस्कर असते.
अपशिष्ट निर्माण करणाऱ्या कंपनीत अपशिष्टांचे मलवाहिन्यांत स्वयंनियंत्रित
ण्याकरता तीन घटकांच्या यंत्रणेची शिफारस केली आहे. (आ. ८-३ पहा.)
खालील प्रमाणे असतात : १) समाकल वायवीय प्रेषितासह (integral
ansmeter) गतिमितीय दाबमापी (kinematic manometer), २)
कार्यक्रम नियंत्रक (remotely located indicator-programe controller);
(air signals) येतो आणि इष्ट सांचातल्या (pattern) प्रमाणे अपशिष्ट-
राहण्यासाठी वायवीय नियंत्रकाच्या स्थायी बिंदूचे (set point) समायोजन
र्व छेदित (pre cut) समयाकृति (time pattern) कॅम त्यावर बसविलेला
कार्यक्रम नियंत्रकाकडून वायुसंकेताने क्रियाशील केलेली पडद्याने चालविलेली
actuated) चलित्र नियंत्रित झडप (motor controlled valve). व्यावहारिक
ाचे झाल्यास, वायवीय केशाकर्षी नळीच्या लांबीमुळे संवेदी (sensing) घटकांच्या
नियोजनावर मर्यादा पडते पण विद्युत् यंत्रणा वापरून ती दूर करता येते—

८-३ मध्ये दाखविलेली नमुनेदार अपशिष्ट-प्रवाह-प्रमाणीकरण यंत्रणा फिशर
पनीने मला पुरविली होती व तीत तीन आवश्यक असे स्वतंत्र घटक होते :
भलेख आणि वायवीय प्रेषित्र, २) दुरस्थित सूचक-कार्यक्रम अभिलेख आणि
ालविलेली चलित्र-नियंत्रित झडप, हे ते तीन घटक आहेत. द. चौ. इंचास ३ ते
र वायुदाबाचे उत्पादन करणाऱ्या १ ल्या घटकातील प्रवाहाची व्याप्ति द. मि. स
ॅलन (गृहीत वि. गु. १.१) अपशिष्टाइतकी असते. २ रा घटक हा त्या घट-
संकेत प्राप्त करण्याकरता, बसविलेला दूरस्थित सूचक असतो व त्या विषयी मूळ
केला आहे. ३ रा घटक एक स्वयंनियंत्रित झडप असते. प्रवाहाचा कमाल
व कमाल दाबपतन १० पौंड असताना ही झडप काम करू शकते. २ ऱ्या घटकातील
ंत्रकाकडून मिळणाऱ्या वायु - संकेताप्रमाणे ही झडप कार्यान्वित होते.

नळ पूर्णपणे भरून वाहात नाहीत अगर अपशिष्ट उघड्या नाल्यातून वाहते तेव्हा
पतीत औद्योगिक अपशिष्टांचे प्रमाणीकरण करण्याकरता आणखी एक नमुनेदार
ह-मापन करण्याकरता बांधाचा, फ्ल्यूमचा अथवा केनिसन तोटीचा मुख्य प्रवाह—
र करणे, ही आहे. विद्युत् अगर वायवीय तरंगकाने चालणारे प्रेषित्र मापनाच्या
डण्यात येते. नंतर, विद्युत् संदेश अगर वायुदाबाचा, एका प्रमाणीकरण करणाऱ्या
प्रवाह-विभेदक (splitter) चालू करण्याकरता, वापर करण्यात येतो. (अशी
नीअर्स इन्को. नी केली आहे).

संदर्भ–

१– रुडॉल्फस, डब्ल्यू., आणि जे. एन. मिलर, " ए मेथड फॉर ॲक्सिलरेटेड ईक्वलायझेशन ऑफ इंडस्ट्रियल वेस्ट्स ", स्युवेज वर्क्स जर्नल, १९, ४, ६८६ (जुलै १९४६).

२– मॅन्युअल ऑफ स्युवेज प्लँट ऑपरेटर्स, टेक्सास वॉटर अँड स्युवेज वर्क्स असोसिएशन (१९५५), पा. ३४२–३४५.



# : ९ : तरंगणारे घनपदार्थ काढून टाकणे

## ९-१. अवसादन-

जरी बहुतेक वाहितमल-उपचार संयंत्रांत उपचाराची पद्धत अवसादन ही असते तरी जेव्हा घरगुती वाहितमल व औद्योगिक अपशिष्ट एकत्रित असतात अथवा सीलबंद डब्यांच्या कारखान्याचे, कागद, वाळू व कंकर, कोळशाचे धावनातील अथवा कांही अन्य अपशिष्टे त्यात असतात तेव्हाच तिचा (अवसादन पद्धतीचा) औद्योगिक अपशिष्टावरील उपचारणाकरता विचार करावा.

अवसादन टाक्यांची कार्यक्षमता खालील घटकांवर अवलंबून असते :

| | |
|---|---|
| अवरोधन काल | कणांचा वेग |
| अपशिष्ट जलाची वैशिष्टचे | कणांची घनता |
| टाकीची खोली | आधान पात्राच्या भिंतीचा प्रभाव |
| तक्तपोशीचा पृष्ठभाग | द्रोण्यांची संख्या (अडथळे) |
| परिचालन (स्वच्छता) | अवमल निष्कासन |
| तपमान | प्राक् उपचार (ग्रिटचे निष्कासन) |
| कणांचा आकार | प्रवाहातील चढ उतार. |

जरी वंगण तरंगण, समानीकरण, आणि BOD चे लघुकरण, यांसारखी कारणे अवसादन टाक्यांचा उपयोग करण्यास कारणीभूत असली तरी तरंगणारी अवसादनशील द्रव्ये काढून टाकण्याकरता त्यांचा प्रामुख्याने उपयोग केला जातो. सैद्धांतिकतया अपशिष्ट जलाच्या द्रावणातील तरंगणारा कण पृथक ( discrete ) असेपर्यंत द्रावणाशी सापेक्ष अशा ठराविक वेगाने अवसादित होत राहतो; परंतु जेव्हा अन्य कणांशी त्याचे संमीलन होते ( coalesce ) तेव्हा त्याचा आकार, बाह्यरूप, बांधा, आणि परिणामस्वरूप त्याची घनता, यांच्यात बदल होतो, तसेच त्याच्या अवसादन वेगात फरक पडतो. कणांचे किलाटन अगर स्वसंकणना ( self-floculation ) मुळे वेग वाढतो. तरंगत्या घनपदार्थांच्या लघुकरणाचे प्रमाण अति पातळ अपशिष्टात जास्त असते; त्याचे मुख्य कारण संकणनातील वाढ हे असते. ज्या पातळ विलायकातून ( solvent ) कणांची हालचाल होत असते त्यांच्या तपमान व घनतेतील बदलामुळे स्थिर अवस्थापन-वेगातही बदल होईल. द्रवाचे गरम थर वर जात असल्यामुळे भोंवरे निर्माण

होतात आणि कणांच्या अवस्थापनात विक्षोभ निर्माण होतो; द्रवाच्या खालच्या थरांतील वाढलेल्या घनतेमुळे कण तळाशी बसण्याच्या क्रियेत व्यत्यय येणे शक्य असते. कण निःस्त्रावा-बरोबर टाकीच्या बाहेर वाहून जातील इतका अडथळा ह्या घटकांमुळे अवस्थापनास होऊ शकतो,

टाकी किती खोल असावी यालाही फार महत्व असते. उदाहरणार्थ, तुलनेने उथळ असलेल्या उघड्या टाक्यांत वाऱ्याच्या झोतामुळे सर्वसाधारण अवस्थापनास अनेकवेळा अडथळे येतात.

टाकीच्या कार्यक्षमतेवर परिणाम करणाऱ्या प्रमुख घटकांत पृष्ठीय क्षेत्र हा एक असतो. अवशिष्ट-जलातील काढून टाकण्यात येणारे सर्व कण सामावून घेण्यास पुरेसे असे पृष्ठीय क्षेत्र असले पाहिजे असे सर्व अभियंते मानतात. तथापि, अनेक राज्य-स्वास्थ्य विभागांनी, अवस्थापन द्रोण्यांची मान्य होतील अशी मापे ठरविताना, मानक अवरोधन कालांचा आधार घेणे चालू ठेविले आहे. ह्या पद्धतीत अनेक वेळा पुरेशा पृष्ठीय क्षेत्राची तरतूद होत नाही आणि अवस्थापन पूर्णपणे साध्य होत नाही.







**आकृति ९–१ पृष्ठीय क्षेत्र दुप्पट करण्याचा आणि खोली निम्मी करण्याचा परिणाम–**

पृष्ठीय क्षेत्र दुप्पट करणे आणि खोली निम्मी करण्याचे परिणाम आ. ९–१ मध्ये दाखविले आहेत. सैद्धांतिकरीत्या आ. ९–१ (a) मधील द्रोणीतल्या पेक्षा (b) मधील द्रोणीतून विविक्त कणांचे दुप्पट निष्कासन होईल. म्हणून शक्य तितक्या उथळ आणि भरपूर पृष्ठीय क्षेत्र असलेल्या अस्थापन द्रोण्यांचे अभिकल्पन करण्याचा अभियंत्यानी प्रयत्न करावा. तथापि अपक्षरणामुळे अगर प्रवाहाच्या वेगामुळे उथळ टाक्यात बिघाड होण्याची शक्यता असते. म्हणून परिचालनाच्या दृष्टिकोनातून सहा फुटांपेक्षा खोली कमी ठेवणे अव्यवहार्य असल्याचे आढळून आले आहे. द्रोणीच्या लांबीत वाढ करून पृष्ठीय क्षेत्र अत्यंत संतोषजनकपणे वाढविता येते.

अपशिष्टाच्या प्रवाहाच्या प्रमाणावरही अवस्थापन द्रोणीच्या तळाशी बसणाऱ्या कणांची टक्केवारी अवलंबून असल्याने क्षैतिज प्रवाह आणि तक्तपोशीचे अथवा पृष्ठभागाचे क्षेत्र यांतल्या सहसबंधाकरता एक पदावली ( expression ) तयार करण्यात आली आहे. " परिवाह प्रमाण " असे सामान्यपणे तिला संबोधण्यांत येते, आणि दररोज दर चौ. फुटास गॅलनमध्ये ती अभिव्यक्त केली जाते. प्राथमिक अवसादन (sedimentation) द्रोण्या-करता लागणारी परिवाह-प्रमाणे द. दि. द चौ. फु स २०० पासून १००० गॅलन पर्यंत बदलती असतात; अंतिम टाक्यातील कण प्राथमिक द्रोण्यांतील कणांपेक्षा सामान्यत: अधिक जलद अवस्थापित होत असल्याने अंतिम टाक्यांतील प्रवाह-प्रमाण द. दि. द. चौ. फु. स १००० पासून ३००० गॅलन पर्यंत बदलू शकते. प्राथमिक द्रोण्यांतील कणांपेक्षा ग्रिटचे कण शीघ्रगतीने खाली बसत असल्याने आणि दुय्यम द्रोण्यांतील उत्प्रेरित अवमलाच्या पुंजक्यांचा अवस्थापन-वेग कमी करण्याकडे प्रवृत्ति असल्याने त्यांचा अपवादात्मक द्रव्यात अंतर्भाव होतो. ह्या विसंगती-मुळे प्राथमिक व दुय्यम अशा दोन्हीही द्रोण्यांचे अनेकवेळा प्रवाह वेग एकच ठेवून अभिकल्पन करण्यात येते. परिवाह-वेग कमी असण्याचा परिणाम अधिक तरंगते कण व BOD काढून टाकण्यात होतो; ते आ. ९–२ (३) मध्ये दाखविले आहे.

दुर्दैवाने, सैद्धांतिक सूत्रीकरणातील अवस्थापन वेगापेक्षा प्रत्यक्ष अवस्थापन वेग वेगळा असणे शक्य असते. ह्या फरकाची मुख्य कारणे, विक्षोभ व संकणन ही असतात आणि टाकीच्या अनुप्रस्थ छेदाच्या ( cross-section ) संपूर्ण क्षेत्रातील वेग स्थिर राहात नाहीत ही आणखी एक बाब कारणीभूत असते.




आकृति ९–२.



आकृति ९–३.
कणाच्या मार्गांवरील विक्षोभाचा परिणाम




आकृति ९–४. संकणनामुळे अवसादन वेग वाढतो.




आकृति ९–५- अ) तरंगत्या जड घनपदार्थांचे नमुनेदार जलद आणि चांगले अवस्थापन होण्याचे गुणधर्म ब) घनपदार्थांच्या सममिश्रणांचे अवस्थापन होण्याचे मध्यम व सामान्य गुणधर्म. क) उच्च प्रमाणात कलील असलेल्या व सूक्ष्म विभाजन झालेल्या घनपदार्थांच्या अवस्थापनाचे संथ व असमाधानकारक गुणधर्म.

अवसादन द्रोण्यातील विक्षोभाचे कणाच्या अवस्थापनवेगावर चढता आणि उतरता असे दोन्हीही परिणाम होतात; त्यामुळे भोंवरे निर्माण होतात आणि ते काही कणांना खाली व काहींना वर नेतात (आ. ९–३ पहा); म्हणून पुंजीकरणाच्या निमित्तांपैकी विक्षोभ हे एक निमित्त असते. अवस्थापनशील अगर ऊर्ध्वगामी वेग असमान असू शकतात व प्रवेशद्वाराजवळील पाण्याच्या वाढलेल्या क्षैतिज वेगासारख्या विक्षोभ निर्माण करणाऱ्या स्थानीय परिस्थितीवर हे अवलंबून असते.

भोंवरे निर्माण होण्यास कारणीभूत होणाऱ्या इतर घटकांत वारा, प्रवाहाचे असमान वितरण, तपमानातील बदल आणि विभिन्न खोलीवरील द्रवाच्या घनत्वातील फरक, यांचा अंतर्भाव असतो. भोवऱ्यामुळे सामान्यपणे अवस्थापन वेग व परिचालनाची कार्यक्षमता कमी होते व पुंजीकरणामुळे निष्कासित झालेल्या सर्वसाधारण एकूण घनपदार्थांत वाढ होते. आ. ९-४ मध्ये पुंजीकरणाच्या प्रवाहाचे दिग्दर्शन केले आहे. त्यातील θ हा सामान्य कणाच्या ऊर्ध्व अवस्थापनाचा कोन असतो. उथळ टाक्यांत अधिक पुंजीकरण होण्याच्या प्रवृत्तीमुळे आणि इतर कारणांमुळे खोल टाक्यांपेक्षा ह्या (उथळ) टाक्या अधिक पसंत असतात, मात्र अवस्थापित कणांच्या अपक्षरणास प्रतिबंध झाला पाहिजे.

औद्योगिक अपशिष्टांतील अवस्थापनाच्या वेगात बराच फरक पडतो. आ. ९-५ मध्ये अवस्थापन-वेगांचे विचरण दाखविले आहे.

टाकीच्या अभिकल्पनावर तरंगणाऱ्या घनपदार्थांच्या निष्कासनाची टक्केवारी अवलंबून असते आणि हे अभिकल्पन विशिष्ट परिस्थितीतील गरजांवर अवलंबून असते. अलिकडील काळात, अभिकल्पन करणारे अभियंते जागेची परिस्थिति आणि/अथवा खर्चाच्या दृष्टीने रूढ असलेल्या चौकोनी द्रोण्यांच्या ऐवजी गोल अगर चौरस टाक्यांचा वापर करू लागले आहेत. गोल टाक्यांच्या करता फर्म्याचे काम, द्रव्य आणि जमीन चौकोनी द्रोण्यांच्यापेक्षा कमी लागते. तथापि, (१) प्रभावी अवस्थापन-विभागाची लांबी कमी झाल्याने आणि (२) (सैद्धांतिक अवरोधन कालापूर्वी अपशिष्ट जल टाकीच्या बाहेर पडत असल्याने) लघु परिपथ(short circuit) निर्माण होत असल्याने गोल टाक्यांची कार्यक्षमता कमी होते.




आकृति ९-६. गोल टाकीचा प्रवेशी विभाग (अ) टाकीच्या क्षेत्राच्या २० ते ४० प्रतिशत् जागा व्यापतो. चौकोनी टाकीचा प्रवेशी विभाग (ब) तिच्या क्षेत्राच्या १० ते १५ प्रतिशत् जागा व्यापतो.




(अ) गोल टाकी. (ब) चौरस टाकी

आकृति ९-७.

आ. ९·६ मध्ये गोल व चौकोनी टाक्यांच्या प्रवेशी विभागांनी व्यापलेल्या एकूण आडव्या अंतरांची तौलनिक टक्केवारी दाखविली आहे. गोल टाकीच्या प्रवेशी विभागाने कणांच्या क्षैतिज मार्गांचा इतका मोठा भाग व्यापला जातो की प्रवेश व निर्गम द्वारांचे अभिकल्पन करताना विशेष काळजी घ्यावी लागते. प्रवाही परिस्थितीत किंचितही विक्षोभ निर्माण झाल्यास गोल टाकीच्या परिचालनास बाधा होण्याची प्रवृत्ति निर्माण होते, परंतु लांब, अरुंद चौकोनी टाक्यांचे बाबतीत प्रवेशी आणि निर्गम विभागांच्या अभिकल्पनास कमी महत्व प्राप्त होते.

## लघुपरिपथ निर्माण होणे

म्हणजेच अवस्थापन ( setting ) टाकीच्या सर्व भागांतून प्रभावीपणे अवसादन ( sedimentation ) न होणे होय. टाकीचा कसाही आकार असला तरी ही गोष्ट काही अंशी मूलतः सत्य असते. परंतु आ. ९–७ मध्ये दाखविल्याप्रमाणे गोल आणि चौरस टाक्यांत हे अतिसहज घडून येते असे दिसते. लघुपरिपथामुळे काही शासकीय नियामक संस्थांच्याकडून टाकीच्या प्रवेशी आणि निर्गम द्वारांच्या दरम्यान किमान अनुज्ञेय अंतराचे निर्देशन करण्यात येते. कँपने (१) (आ. ९-८ पहा) लेखाचित्रीय पद्धतीने असेही दाखवून दिले आहे की अवसादन टाक्यांच्या विभिन्न आकारांमुळे लघु-परिपथ-मात्रेत फरक पडतो.

आ. ९–८ मध्ये t/T च्या लघुतर व्याप्तींत घडत असलेले उच्चतर बिंदू लघुपरिपथांच्या अभावाचे सूचक असतात. संपूर्ण टाकीच्या अंतर्वस्तूसह धातुखंडाच्या ( slug ) तात्काल होणाऱ्या आदर्श विक्षेपणाचे वक्र A हे सैद्धांतिक वक्र आहे. B हे वक्र गोलटाकीचे प्रतिनिधित्व करते व त्यावरून सुमारे १५ प्रतिशत् अवरोधन कालानंतर काही तरंगणारे संदूषक (contaminant) निर्गमद्वारापर्यंत पोहोचल्याचे दिसून येते. सुमारे ५० प्रतिशत् अवरोधन कालानंतर द्रव्यांचे जास्तीत जास्त संकेंद्रण निर्गमद्वारापर्यंत पोहोचते. C हे वक्र रुंद चौकोनी टाकीतील परिस्थिति दाखविते व ती चौरस टाकीशी मिळती जुळती असते. वक्र D हे लांब अरुंद चौकोनी टाकीकरता आहे आणि ५० प्रतिशत् अवरोधन काल पूर्ण होईपर्यंत संदूषक टाकीच्या टोकापर्यंत पोहोचत नाही आणि सुमारे ८० प्रतिशत् अवरोधन कालानंतर संदूषकापैकी बहुतेक निर्गमद्वाराप्रत पोहोचतो असे त्या (वक्रावरून) दिसून येते. E हे वक्र टोकाशी गोल, अडथळे बसविलेल्या लांब चौकोनी कक्षाचे विक्षेपण वक्र आहे व कक्षाची लांबी रुंदी व खोलीच्या तुलनेने बरीच जास्त असते. ह्या टाकीत १०० प्रतिशत् अवरोधन कालानंतर निःस्त्रावातील सैद्धांतिक कमाल संदूषक अंतर्वस्तू प्राप्त होतात, परंतु ह्या अवरोधन कालापूर्वी त्या फार थोड्या असतात अगर मुळीच नसतात.




आकृति ९–८. टाक्यांच्या करता नमुनेदार विसरण (dispersion) वक्रे जर (Co) ह्या टाकीच्या संपूर्ण आयतनात (C) हा सदूषक मिसळला तर होणारे संकेंद्रण आणि त्याचे प्रत्यक्ष संकेंद्रण, यांचे गुणोत्तर उदग्र अक्ष दाखवितो. टाकीच्या टोकापर्यंत सकेंद्रण पोहोचण्यास लागणारा प्रत्यक्ष काल (t) आणि एकूण अवरोधन काल (आयतन/वेग) (T), यांचे गुणोत्तर क्षैतिज अक्षाने दाखविले आहे. (कॅंप प्रमाणे (१).)

आकृति ९–८ च्या अभ्यासावरून अभ्यासकास, अवसादन टाक्यांच्या योग्य अभिकल्पनास किती महत्व असते हे सहज समजून येईल. शक्य तो योग्य अडथळे बसविलेल्या लांब चौकोनी टाक्यांचा वापर करणे पसंत करावे.

जरी घरगुती वाहितमल व औद्योगिक अपशिष्टे यांच्या गुणधर्मातील फरक बऱ्याचवेळा अगदी अर्थपूर्ण असले तरी घरगुती वाहितमलाच्या बाबतीतील काही सामान्य निवेदने (statements) सर्व अपशिष्टांनाही लागू पडतात. साधारणपणे दोन तासांचा अवरोधन काल ठेवला असताना, प्राथमिक अवसादन–द्रोण्यांतून अंतःस्त्रावातील तरंगत्या घनपदार्थांपैकी ५० ते ७० प्रतिशत् घनपदार्थांचे निष्कासन होते. ९–१ व ९–२ ह्या कोष्टकांमध्ये अपशिष्ट–जलोपचार–संयंत्रावरील अधीक्षकांकडून (२) गोळा केलेली माहिती, चौकोनी व गोल टाक्यांतील निष्कासनाची कार्यक्षमता दाखविण्याकरता, सादर केली आहे.

९–२. तरण (floatation) — काही तरंगणारे आणि काही कलील, पायसीकृत

(emulsified), आणि विलीन पदार्थांच्या परिवर्तन क्रियेस तरण म्हणतात (४)- "तरण" या संज्ञेत, **जोराने प्रक्षुब्ध केलेल्या फेसाचे** तरण, जे खाण उद्योगात कच्च्या धातूचे विलगन करण्यासाठी वापरले जाते ते, आणि अपशिष्ट जलांतील बहुतेक तरंगणांचे (suspensions) निष्कासन करण्याची एक कार्यक्षम पद्धत म्हणून अलिकडे लोकप्रिय झालेले निश्चल (quiescent) **तरण**, यांचा समावेश असतो.

लहान आणि अवस्थापनास अवघड जाणारे कण असणाऱ्या तरंगणांचे पुंजीकरण करता येते व तरंगणाऱ्या कणांना चिकटून राहणाऱ्या हवेच्या सूक्ष्म बुडबुडयांच्या उत्थापक (lifting) शक्तीमुळे द्रवपृष्टाकडे त्यांचे प्लावन करता येते (buoy). तरंगत असलेला सपीडित झालेला (agglomerated) अवमल, साय काढून (skimming), द्रवपृष्ठावरून सहज काढून टाकता येतो. ही साय बहुधा संकेंद्रित अवमलाच्या स्वरूपात गोळा करण्यात येते आणि तिचे सहज निकसन करता येते. तल-द्रवाचा (Subnatant liqeur) निकास करण्यापूर्वी संग्राही टाकीत अवमल तरणिका (float) काही तास रोखून ठेवणे ही एक सोयीस्कर प्रथा आहे. ह्या संकेंद्रण पद्धतीने तरणिकेतील घन अंतर्वस्तूचे मान दुपटीपेक्षा जास्त करता येते; कण संदाबित होत असताना प्रत्यक्षात तरणिकेतून पाणी पिळुन बाहेर निघून जाते. अशी अवमल तरणिका बहुधा अगदी स्थिर व दुर्गंधिरहित असते.

(तरण प्रक्रियेमुळे अंशतः लघुकृत झालेल्या रासायनिक संयुगांचा ऑक्सिजनशी हवेच्या सूक्ष्म बुडबुड्यांच्या स्वरुपात संपर्क होतो. त्यामुळे अपशिष्ट जलाच्या ऑक्सिजनच्या तात्कालिक मागणीस मदत होते.)

वायु विसारक (diffusers) अगर यांत्रिकी ताडकांच्या (beaters) सहाय्याने अपशिष्टाचे वातन करून नमुनेदार निर्वात तरणिका–संचांचे परिचालन होते. वातन काल अल्प असतो, काहीतर ३० सेकंदाइतका अल्प असतो आणि दर गॅलन अपशिष्ट जलास फक्त सुमारे ०.०२५ पासून ०.०५ घ. फु. पर्यंत हवा लागते. नंतर मोठे बुडबुडे नाहीसे करण्याकरता अल्पशा अवातक (de-aeration) कालाची, वायुमंडलीय दाब ठेवून, तरतूद करण्यात येते. त्या क्षणी विलीन वायुने अपशिष्ट जवळ जवळ संपृक्त झालेले असते आणि सुमारे ९ इंच पाऱ्याच्या निर्वातनाखाली राखलेल्या व परिवेष्टित केलेल्या निकासी (evacuation) टाकीत ते प्रवेश करते. निर्वातनामुळे नंतर जे बुडबुडे निर्माण होतात ते तरणास कारणीभूत होतात.

**दाब तरण व निर्वात तरण यांच्यातील फरक असा असतो की, दाबतरणात** अपशिष्टात

हवा दाबाखाली अंतःक्षेपित ( inject ) करण्यात येते तर निर्वातनाखाली अपशिष्ट अनावृत्त करण्याऐवजी वायुमंडलीय दाबाखाली ते अनावृत्त होत असताना हवेचे बुडबुडे तयार होतात. अपशिष्टावर, सामान्यपणे, द. चौ. इंचास सुमारे ३० पासून ४० पौंडापर्यंत दाब दिला जातो आणि सुमारे एक मिनिट त्या दाबाखाली ते ठेवण्यात येते. ( तुरटी आणि/अथवा सिलिका सारखे ) एकादे किलाटक सहाय्यभूत होते व पंपाच्या चूषण टोकापाशी, जेथे टाकीत अपशिष्ट–जल प्रवेश करते तेथे, हवेची अल्पशी राशी या व्यवस्थेत निःस्त्रावित होते. केवळ पंपातून मिळणाऱ्या मार्गानेही अपशिष्टाशी हवा व रसायनांचे चांगले मिश्रण होण्यास ही तरतूद सामान्यतः पुरेशी होते. जेव्हा प्लवन टाकीत बुडबुडे वातावरणात सोडले जातात तेव्हा वर येणाऱ्या छोटया बुडबुडयांशी तरंगणारे कलील आणि काही पायसीकृत कण पाशबद्ध होतात. तरंगणाऱ्या अवमलातून सामान्यतः साय सतत काढण्यात येते आणि मल–पंपानी ती टाकीतून बाहेर काढून टाकण्यात येते.

**विलीन हवा व विसरित हवा** ह्या तरणाच्या दोन भिन्न पद्धती आहेत असे व्रॉब्लिक (६) मानतो. विसरित–हवा–तरंगणात पंख्यांच्या ( propellers ) यांत्रिकी कर्तनामुळे वायूचे बुडबुडे निर्माण होतात. संरंध्र माध्यमातून अथवा वायू आणि द्रवप्रवाहाच्या समांगीकरणाने ( homogenizing ) वायूचे विसरण होते. वायूने अति संपृक्त झालेल्या द्रावणातून वायूचे अवक्षेपण ( precipitation ) करून विलीन–हवा तरणाने वायूचे बुडबुडे निर्माण केले जातात. हे बुडबुडे विसरित–हवेच्या बुडबुडयांच्यापेक्षा बरेच लहान असतात आणि त्यांचा व्यास ८० मायक्रॉनपेक्षा * सामान्यतः मोठा असत नाही पण विसरित–हवेमुळे निर्माण होणाऱ्या बुडबुडयांचा व्यास पुष्कळ वेळा १००० मायक्रॉन इतका असू शकतो.

विलीन–हवा–तरणाची उपपत्ती समजण्याकरता अभ्यासकाने वायुरूप, द्रवरूप व घन अवस्थांचे, आपापसात घनिष्ट संबंध होत असताना, अन्वेषण केले पाहिजे. हेन्रीच्या नियमात वायूची विलेयता ( ह्या उदाहरणात, विलीन हवा ) आणि एकूण दाब, यांच्यातील संबंधाचे $C = kp$ या समीकरणाने दिग्दर्शन केले आहे. येथे $C$ हे द्रावणातील वायूचे सांद्रण असते, $k$ हा हेन्रीच्या नियमातील स्थिरांक असतो, आणि $p$ हा समतुल्य अवस्थेतील द्रावणावरील निरपेक्ष दाब असतो.

---

* १ मायक्रॉन = ०.००१ सें. मीटर = ०.०००३९४ इंच.
१ इंच = २.५४ सें. मीटर.

कोष्टक

औकोनी प्राथमिक अवस्थापन –

| संयंत्राचे स्थान | टाक्यांची संख्या | लांबी फूट | रुंदी फूट | खोली फूट | लांबी / रुंदी | लांबी / खोली |
|---|---|---|---|---|---|---|
| हार्टफोर्ड, कॉन. | ८ | १०० | ६८ | ८.८ | १.५ | ११.४ |
| डेट्रॉइट, मिशि. | ८ | २७० | ११७ | १३ | २.३ | २०.८ |
| रेसीन, विस. | ४ | १४० | ४० | १०.५ | ३.५ | १३.३ |
| न्यूयॉर्क, एन. वाय, बॉनरी बे | ३ | १२४ | ५० | १२ | २.५ | १६.३ |
| न्यूयॉर्क, एन.वाय.,टॅलमॅन्स आयलंड | ३ | १२४ | ५० | ११.६ | २ ५ | १०.७ |
| फोर्ट वेन, इंडि | ३ | १०० | ३३ | १३ | ३.३ | ७.७ |
| रॉचेस्टर, एन. वाय. | २ | ३७ | १२ | ८ | ३.१ | ४.६ |
| मार्शल टाऊन, आयोवा. | ३ | ८० | १६ | ८ | ५.० | १०.० |
| केनोशॉ, विस. | ४ | १३२ | ३२ | १०.४ | ४.१ | १२.७ |
| जॅक्सन मिशि. | ३ | ६७.३ | ३१ | १० | २.२ | ६.७ |
| हॅमॉंड, इंडि. | ६ | १२० | १६ | १३.२५ | ७.५ | ९.० |
| न्यूयॉर्क, एन. वाय. २६ वा विभाग | ४ | १६२ | ६७ | १२ | २.४ | १३ ५ |
| न्यूयॉर्क, एन. वाय., हंट्स पॉइंट | ४ | १६८ | १०८.९ | १२ | १.५ | १४.० |
| ॲबिंग्टन, पा. | २ | ५० | १४ | १० | ३.६ | ५.० |
| पोर्टस्माउथ, वा. | ४ | १०० | १५.२५ | १० | ६.५ | १०.० |
| कॅंटन, ओहायओ | ३ | १२४ | ३२ | १०.६ | ३.९ | १२.६ |
| नाईलस, मिशि. | ६ | ७५ | १४ | ९ | ५.४ | ८.३ |
| डलास, टेक्स. | २ | १८० | ५० | १२ | ३.६ | १५.० |
| रिचमंड, इंडि. | ४ | ९५ | १६ | १४.५ | ५.९ | ६.५ |
| लॅन्सिंग, मिशि. | १६ | ८७.५ | १६ | १० | ५.५ | ८.७ |
| विन्स्टेड, कॉन. | २ | ६५ | १२ | ९ | ५ | ६.८ |
| वॉटरबरी, कॉन. | ३ | २१२.५ | ३३ | १० | ६.४ | २१.२ |
| ओक्लाहोमा सिटी, ओक्ला. | ३ | ८५ | ३३ | १० | २.५ | ८.५ |
| टॅंपा, फ्ला. | ४ | १३० | ४० | १३ | ४.२ | १३.१ |
| रोनोके, वा. | २ | १२० | ३२ | १०.५ | ३.८ | ११.४ |
| ब्लॅकस्टोन व्हॅली, आर. आय. | २ | २३० | ६८ | १०.८ | ३.४ | २१.१ |
| ईस्ट हार्टफर्ड, कॉन. | २ | १२५ | ३२ | ७.५ | ३.९ | १६.७ |
| मिल्फर्ड, कॉन. | २ | ५५ | १६ | ९.७५ | ३.५ | ५.१ |
| स्प्रिंग्फील्ड, मॅस. | ४ | ११५ | ५० | १४.५ | २.३ | ७.९ |
| ऑरव्हिल, ओहायओ | २ | ४३.८ | १६ | १०.४ | २.७ | ४.२ |
| न्यू हॅवन, कॉन. | ३ | १४५ | ३१ | ११.५ | ४.७ | १२.६ |
| लेकोव्हलंड, ओहायओ (पूर्वदिशेने) | ८ | ११५ | ५० | १५ | २.३ | ७.७ |

* संयंत्राच्या अधीक्षकांकडून मिळालेली आधार सामग्री.–

९–१.
**टाकीसंबंधी आधार सामग्री ***

| प्रवाह द.दि.द.ल. गॅलन | अवरोधन तास | परिवाह द. दि. गॅ./फू. | बांधावरील वेग– द. दि. गॅ/फू. | अनुपचारित तरंगते घनपदार्थ मि.ग्रॅ/लि. | निष्कासन-तरंगते घन पदार्थ, % | अनुपचारित BOD मि.ग्रॅ/लिटर | निष्कासन BOD, % |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २४.३० | ३.५३ | ४५० | ५६८०० | १७३ | ६१ | २४० | ४२ |
| ४१८.०० | १.४१ | १६५० | ४०८००० | १८४ | ४४ | १५३ | ३९ |
| १७.०३ | २.४८ | ७६० | १०६५०० | १४९ | ६७ | १३३ | ४८ |
| ४१.०० | ०.९८ | २२१० | २८४००० | १५२ | ३९ | १६९ | २२ |
| ३१.०० | १.२५ | १६७० | २१५००० | १३७ | ५५ | १२८ | ३९ |
| १८.७० | १.२५ | १८९० | ९४५०० | ४०९ | ६१ | २३१ | ३४ |
| ०८१ | १.५६ | ९१४ | ४१००० | २३३ | २१ | २६० | २१ |
| १.२२ | १.५१ | ९५० | १३५५० | ४३६ | ५८ | ४१४ | ४२ |
| १२.७७ | २.४९ | ७५५ | १००००० | १३८ | ४८ | १०२ | ४८ |
| ०.१७ | १.२२ | १४७० | ११८००० | १९३ | १६-१ | १३४ | २२ |
| २० ७० | १.३२ | १८०० | २४००० | २७३ | ३० | २०६ | २५ |
| ४१.०० | २.१६ | ९३० | ३५५०० | १७९ | ३१ | १२७ | २८ |
| ९५.०० | १.७० | १३०० | ९७००० | १४० | ४८ | ११३ | ३० |
| १ २४ | २.०२ | ८८५ | ४४४०० | २३७ | ३९ | ११८ | २९ |
| ७.३६ | १.४९ | १२०० | ४६००० | १५३ | ६३ | १८५ | ४५ |
| १७.०० | १.३३ | १४३० | २१४००० | ५७७ | ४० | २५३ | ३३ |
| २.३० | १.८६ | ३६२ | २७२०० | २५० | ६९-२ | १०६ | ५७ |
| १९.४० | २.०० | १०८० | २४००० | २५८ | ६६ | २५६ | ४१ |
| ६.१० | २.६४ | ९९० | २५००० | १५९ | ४० | १३३ | २३ |
| १६.४५ | २.४५ | ७३५ | २३७०० | ४४५ | ७६ | २०१ | ६८ |
| ०.५० | ५.०० | ३२० | २०८०० | १३० | ७५ | १७० | ५१ |
| १३.९४ | २.७१ | ६६० | १४५०० | १४४ | ५४ | १६६ | ३३ |
| ५.१९ | २.९१ | ६१९ | २०४०० | २४२ | ५. | २२८ | ३१ |
| १२.३० | ५.१२ | ४५५ | १७३०० | २१५ | ६९ | १८३ | ३७ |
| ७.७६ | १.८७ | १०१० | १२०००० | २३० | ६७ | १९० | ५१ |
| १२.२१ | ४.९७ | ३९० | ६२००० | २१२ | ६२ | १३३ | १२ |
| १ ५० | ७.१८ | १८७ | १२५०० | २१२ | ५४ | २४२ | ५० |
| ९.७० | ४.४० | ४०० | २१८०० | १५० | ७९ | १३० | ७२ |
| १७.५ | ३ ३६ | ७६१ | — | १६० | ४९ | १४५ | २६ |
| ०.७३ | ३.६५ | ५१५ | — | ३४२ | ६४ | ४१५ | १८ |
| १४.७ | १.९० | १०९० | — | १७६ | ४९ | — | — |
| ९७.७ | १ २७ | २१२० | — | २४० | ३७ | १४९ | ३५ |

संदर्भाकरता " स्युवेज ट्रीटमेंट डिझाईन पहा " (२)

कोष्टक

गोलाकार प्राथमिक टाक्या :

| स्थाने | | आधार सामग्रीचा काल | | सरासरी प्रवाह, द.लि द.ल गॅ. | संख्या | व्यास फूट | पार्श्वजलाची खोली, फूट |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | वर्ष | संख्या | | | | |
| वॉशिंग्टन डी. सी | – | १९४४-४५ | २ | १३६-३ | १२ | १०६ | १४ |
| विनिपेग, मॅन., कॅनडा | – | १९४३-४४ | २ | २२-८ | २ | ११५ | १२ |
| बॅटल क्रीक, मिशि | – | १९३८-४२ | ५ | ४-९२ | २ | ८० | १० |
| बफेलो, एन. वाय. | – | १९३९-४१ | ३ | १३५ | ४ | १६० | १५ |
| अल्बुकर्क, न्यू- मेक्सिको | – | १९३९-४६ | ७ | ५ | १ | ८० | १२-२ |
| याकीमा, वॉशिंग्टन | – | १९४२ | १ | ९-५ | ४ | ९० | ९ |
| ॲपल्टन, विस्कॉन्सिन | – | १९३८-४५ | ७ | ४-८ | २ | ७० | १० |
| बाल्टिमोर, Md. | – | १९३९-४४ | ४ | ८९-५ | ३ | १७० | १२ |
| स्प्रिंगफील्ड, ओहायओ | – | १९३७-४० | ४ | १४-८ | २ | ९० | १० |
| मॅन्सफील्ड, ओहायओ | – | १९४४-४५ | २ | ३ | १ | ६५ | १२ |
| सेडर रॅपिड्स, आयोवा | – | १९३६-४४ | ९ | ४-२१ | १ | ७० | ११-५ |
| ऑस्टिन, टेक्सास | – | १९४४-४५ | २ | ५-६४ | १ | ७५ | १२ |
| डेन्हर, कोलो. | – | १९३९-४३ | ५ | ४६ | ४ | १४० | ९-७ |
| Ypsilanti, मिशी | – | १९४३-४५ | ३ | १-६६ | २ | ४० | ९ |
| मॉन्रो, मिशि | – | १९३८-४६ | ८ | ४-३ | २ | ४५ | ७-५ |

संयंत्रावरील आधीक्षकांचेकडील आधार सामग्री आणि/अथवा वार्षिक अहवाल.

*

९-२

**कार्यमानाची दीर्घमुदतीची आधार सामग्री** *

| अवरोधन, तास | परिवाह द. दि. गॅ./फू.² | तरंगते घनपदार्थ | | | BOD | | | अवमल | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | अनुपचारित द.ल.गॅ./लि. | निःस्राव द.ल.गॅ./लि. | % निष्कासन | अनुपचारित द.ल.गॅ./लि. | निःस्राव द.ल.गॅ./लि. | % निष्कासन | % घनपदार्थ | % बाष्पशील द्रव्य |
| १-८८ | १३०० | १६३ | ८३ | ४० | १७३ | १२० | ३०.५ | ८.०५ | ६७.५ |
| १-९८ | ११०० | ३४८ | १५९ | ५५ | ३१० | २३१ | २५.५ | ९.० | ७०.५ |
| ३-६६ | ४९० | २८२ | ८५ | ७० | २६४ | १७४ | ३४.१ | ५.५ | ८२.५ |
| १-६ | १६९० | २०९ | ११४ | ४६ | १३८ | १०७ | २२.५ | ५.८ | ५९ |
| २-२१ | ९९५ | २५४ | ९१ | ६१ | २८२ | १५० | ४४.५ | ३.९ | ८१ |
| ४-३२ | ३७३ | ११० | २३ | ७४ | १७५ | ९२ | ५० | ७.० | ७४.४ |
| २-९० | ६२३ | २७६ | ६३ | ७७ | २८४ | १४१ | ५० | ५.६ | ५८ |
| १-६४ | १३६० | २१४ | ८३ | ६१ | २८१ | २०४ | २७.५ | ३.९ | ८२.७ |
| १-५५ | ११६० | १६६ | ६३ | ६२ | ९० | ४३ | ५२ | — | — |
| २-३८ | ९०५ | २०८ | ८० | ५८ | २२७ | १३९ | ३८.८ | ४.२ | ७६ |
| १-९५ | १०६० | ३५४ | १३२ | ६३ | २८३ | २११ | २४ | ५.५ | ८१.२ |
| १-६९ | १२७५ | २६३ | ९५ | ६४ | २८५ | १५२ | ४६.३ | ४.० | ८३ |
| २-३४ | ७५० | १८७ | ४४ | ७७ | २१२ | १०८ | ४९ | ५.४ | ७६ |
| २-५ | ६६० | २२६ | ८७ | ६२ | १४१ | ९५ | ३३ | ८.२ | ७१.४ |
| ३-५५ | ३७८ | ३२९ | ७५ | ७७ | १३५ | ७३ | ४६ | ५.२ | ६७.७ |

संदर्भासाठी "स्युवेज ट्रीटमेंट डिझाईन" पहा (२).




**आकृति ९-९. ( स्टोक्सच्या नियमाच्या सहाय्याने गणन केलेले ) बुडबुड्याच्या आकाराचे फलन म्हणून नळाच्या पाण्यातील हवेचे बुडबुडे वर येण्याचा वेग ( ब्रॅंजिक प्रमाणे (६) ).**

तरंगणाच्या घन संरचनेला जोडून अथवा द्रव अवस्थेत अंतर्भाव करून प्राप्त केलेल्या जोड व्यवस्थेचे स्थूल घनत्व ( bulk density ) मूळ व्यवस्थेतील घनत्वापेक्षा कमी असू शकते आणि संपीडित द्रव्य ( Agglomerate ) उर्ध्व दिशेने तरंगण्यास कारणीभूत होते. म्हणून आर्किमिडीजच्या सिद्धांताप्रमाणे तरंगणाऱ्या मुळच्या कणाला गॅसच्या बुडबुड्यांप्रमाणे प्लावकता प्राप्त होते. निमज्जित वस्तूवरील द्रवाचा परिणामी दाब विस्थापित द्रवाच्या गुरुत्वमध्यातून उर्ध्व दिशेने प्रयुक्त होतो, आणि तो विस्थापित द्रवाच्या वजना इतका असतो हा तो सिद्धांत आहे. वस्तूवर लागू केलेल्या परिणामी बलास **उत्प्लावकता** ( buoyancy ) असे म्हणतात. नंतर आजूबाजूच्या द्रवापेक्षा प्रथम काहीसे जड असणारे घनपदार्थ तरंगू लागण्यास हे बल जबाबदार असते.

**कोष्टक ९–३ अपशिष्टाच्या विलीन-वाय-तरण उपचारणांची नमुनेदार कार्यक्षमता (४).**

| अपशिष्टाचा प्रकार | अंत:स्त्रावातील तरंगणारे घन-पदार्थ, ppm | प्राप्त केलेले लघुकरण | अंत:स्त्रावातील BOD, ppm | प्राप्त केलेल्या लघुकरणाची टक्केवारी- |
|---|---|---|---|---|
| पेट्रोलियमची निर्मिती | ४४१ | ९५ ० | | |
| आगगाडीच्या रस्त्याची देखभाल | ५०० | ९५.० | | |
| मासांची पॅकबंदी | १४०० | ८५.६ | १२२५ | ६७ ३ |
| कागद तयार करणे | ११८० | ९७.५ | २१० | ६२ ५ |
| वनस्पति तेल-प्रक्रियाकरण | ८९० | ९४.८ | ३०४८ | ९१.६ |
| फळे-आणि भाजीपाला डब्यांत भरणे | १३५० | ८०.० | ७९० | ६०.० |
| साबण तयार करणे | ३९२ | ९१.५ | ३०९ | ९१.६ |
| पूतिकुंडातील पंपिंग | ६४४८ | ९६.२ | ३३९९ | ८७.० |
| वाहितमलावरील प्राथमिक उपचार | २५२ | ६९.० | ३२५ | ४९ २ |
| ग्ल्यू तयार करणे | ५४२ | ९४ ३ | १८२२ | ९१.८ |

अपशिष्ट–उपचारणातील अपशिष्ट-जलाच्या मोठ्या राशींच्याशी बहुधा आपला संबंध येत असल्याने तरण-कक्षातील अवरोधन काल ही क्रांतिक बाब बनते. (त्या नंतर) क्रमाक्रमाने पाण्यातील हवेचे बुडबुडे वर जाण्याच्या वेगावर अवरोधन काल मुख्यतः अवलंबून असतो $V = kD$ ह्या स्टोक्सच्या नियमाने वर जाण्याचा हा वेग उत्तम प्रकारे अभिव्यक्त करता येतो व तो १३० मायक्रॉन्सपेक्षा कमी व्यासाच्या कणांना यथार्थ लागू होतो. येथे $V$ हा बुडबुडे वर जाण्याचा द. मि. स फुटात वेग असतो, $k$ हा स्टोक्सचा परिवर्तन गुणांक ( conversion factor ) असतो, आणि $D$ हा हवेच्या बुडबुड्याचा व्यास असतो, आ. ९–९ मध्ये स्टोक्स संबंध संख्यात्मक रीत्या दाखविला आहे.

अनेक औद्योगिक अपशिष्टांतील विलीन–हवा–तरणाने उपचारित केलेल्या नमुन्यांवरून प्राप्त केलेला नमुनेदार फलने, तरंगत असलेले घनपदार्थ आणि अनुक्रमे ६९ ते ९७.५ व ६० ते ९१.८ अशी टक्केवारी दाखवितात (को. ९–३).




**आकृति ९–१०. विभिन्न तपमानात विशुद्ध जलातील हवेची विलेयता. (केमिस्ट्री आणि फिजिक्सचा निदेश ग्रंथ (hand book), ३६ वी आवृत्ति पान १६०९ ).**

इतर सर्व घटक समान असताना, पाण्यात ३०°C तपमानाच्या वेळी ०°C च्या वेळेपेक्षा दुप्पट हवा विरघळत असल्यामुळे अपशिष्ट जलाचे तपमान तरंगण क्रिया प्रभावी होण्यात फार महत्वाचे असते. हा संबंध आ. ९–१० दाखविला आहे.

सामान्य हवेचे बुडबुडे ऋणप्रभारित ( negetively charged ) असतात, अंत:पृष्ठाच्या वायूच्या बाजूवर ते प्रामुख्याने गोळा होतात आणि अंत:पृष्ठ-जलाच्या बाजूवर विरळपणे धनायन पसरलेले असतात. तरंगत असलेलेल्या कणांवर अथवा कलिलांवर महत्वपूर्ण विद्युत् प्रभार असणे शक्य असल्याने ह्या आणि हवेच्या बुडबुड्यांच्या दरम्यान सामान्यत: आकर्षण तरी असते अथवा विकर्षण ( repulsion ) तरी असते.

ज्या प्रक्रियामुळे तरंगण घडून येण्याची शक्यता असते अशा खालील तीन विभिन्न प्रक्रियांचा व्रँब्किकने (६) व्यापक अभ्यास केला : (१) तरंगत्या द्रव अथवा घन अवस्था असलेल्या




(a)




(b)




(c)

आकृति ९–११ विलीन-हवा-तरणाच्या तीन पद्धती. (a) तरगत असलेल्या द्रव अगर सघन अवस्थेतील पदार्थाला वायुचा बुडबुडा चिकटून राहणे. (b) वायुचे बुडबुडे वर जात असताना पुंजीकृत सरचनेत वायूचे बुडबुडे अडकून राहणे. (c) जसजसे पुंजीकरण होत-जाते तसतसे पुंजीकृत संरचनेत वायूच्या बुडबुडयांचे अवशोषण (absorption) आणि अधिशोषण (adsorption) होणे. (ॲक्लिक प्रमाणे (६).)

पदार्थास बुडबुडा चिकटणे, (२) वायूचा बुडबुडा वर जात असताना पुंजीकृत संरचनेत वायूचे बुडबुडे अडकून राहणे, आणि (३) जसजसे पुंजीकरण होत जाते तसतसे पुंजीकृत संरचनेत वायूचे अवशोषण होणे. ह्या तीन्ही घटना आ. ९–११ त दाखविल्या आहेत.

शेवटी, अपशिष्टावरील उपचारण प्रक्रिया म्हणून तरणाच्या वापरातील फायदे आणि तोटे अशा दोन्हींचीही अभ्यासकास जाण हवी. फायद्यांची यादी पुढीलप्रमाणे आहे. (५)

१) वंगण, हलके घनपदार्थ, भरड जड पदार्थ एकाच खेपेत काढले जातात.

२) परिवाहाचा उच्च वेग आणि अल्प अवरोधन काल म्हणजेच लहान आकाराची टाकी आणि परिणामी कमी जागा लागते आणि संरचन खर्चात संभवनीय बचत होते.

३) अवरोधन काल कमी लागत असल्याने दुर्गंधीचा उपद्रव कमी होतो आणि निःस्त्रावित ऑक्सिजनच्या उपस्थितीमुळे दाब व वायवीय संच कमी लागतो.

४) अनेक उदाहरणांत, गुरुत्वीय अवस्थापन व पसाईकरणापेक्षा ( skimming ) अधिक जाडीचा मल व अवमल प्राप्त होतो.

तोटे खालीलप्रमाणे असतात :

१) अतिरिक्त साधने लागत असल्याने परिचालनास खर्च जास्त येतो.

२) गुरुत्वीय अवस्थापन संचांप्रमाणे तरण-संचामुळेही सामान्यपणे उपचारण परिणामकारक होत नाही.

३) दाब प्रकाराच्या संचास उच्च शक्ति लागते व त्यामुळे परिचालनावरील खर्चात वाढ होते.

४) नऊ इंच पाण्याइतका दाब सहन करू शकेल अशा तुलनेने महागड्या हवाबंद संरचनेची निर्वात प्रकाराच्या संचास गरज लागते. हवेत थोडीशी गळती झाली तरी निष्पादनावर परिणाम होतो.

५) गुरुत्वीय अवस्थापन–संचाकरता लागणाऱ्या देखभालीपेक्षा तरण-संचास अधिक कुशल देखभाल करावी लागते.

## संदर्भ–

**अवसादन–**

१– कँप, टी. आर, "स्टडीज ऑफ सेडिमेंटेशन बेसीन डिझाईन", स्युवेज अँड इंडस्ट्रीयल वेस्ट्स २५, १, १ (जानेवारी १९५३).

२– "स्युवेज ट्रीटमेंट डिझाईन", फेडरेशन स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स असोसिएशन मॅन्युअल ऑफ प्रॅक्टिस क्र. ८ (अमेरिकन सोसायटी ऑफ केमिकल इंजिनिअर्स मॅन्युअल ऑफ इंजिनिअरींग प्रॅक्टिस क्र. ३६) १९५९, पा. ९०–९१.

३– ग्रेट लेक अपर मिसिसिपी बोर्ड ऑफ स्टेट सॅनिटरी इंजिनिअर्स, "रेकमेंडेड स्टँडर्ड्स फॉर स्युवेज वर्क्स," मे १०, १९६०.

**तरण–**

४– हेस, आर. डब्ल्यू. आणि इतर, "१९५२ इंडस्ट्रियल वेस्ट्स फोरम," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २५, ६, ७०९ (जून १९५३)

५– "स्युवेज ट्रीटमेंट डिझाईन", फेडरेशन स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स असोसिएशन, मॅन्युअल ऑफ प्रॅक्टिस क्र. ८, (अमेरिकन सोसायटी ऑफ केमिकल इंजिनिअर्स मॅन्युअल ऑफ इंजिनिअरिंग प्रॅक्टिस क्र. ३६) १९५९, पा. ७८.

६– व्रॅब्लिक, ई. आर, "फंडामेंटल प्रिन्सिपल्स ऑफ डिझॉल्व्हड् एअर फ्लोटेशन ऑफ इंडस्ट्रियल वेस्ट्स" १४ व्या पडर्चू औद्योगिक अपशिष्ट परिषदेची कार्यवाही (मे १९६५) पान ७४३.

## सुचविलेले अतिरिक्त वाचन

**अवसादन–**

१– कँप, टी. आर, "सेडिमेंटेशन अँड दि डिझाईन ऑफ सेटलिंग टँक्स", ट्रँझॅक्शन्स ऑफ अमेरिकन सोसायटी ऑफ केमिकल इंजिनिअर्स, १११. ८९५, (१९४६).

२– डॉबिन्स, डब्ल्यू-ई., "इफेक्ट ऑफ टर्ब्यूलन्स ऑन सेडिमेंटेशन", ट्रँझॅक्शन्स ऑफ अमेरिकन सोसायटी ऑफ केमिकल इंजिनिअर्स, १०९, ६२९ (१९४४).

३– हॅझेन ए, "ऑन सेडिमेंटेशन," ट्रँझॅक्शन्स ऑफ अमेरिकन सोसायटी ऑफ केमिकल इंजिनिअर्स, ५३, ४५ (१९०४).

तरण—

४— बीब, ए - एछ. "सोल्यूबल ऑईल वेस्ट ट्रीटमेंट बाय प्रेशर फ्लोटेशन", स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २५, ११, १३१४ ( नोव्हेंबर १९५३ ).

५— ड' आर्सी. एन. ए. ज्यू. "डिझॉल्व्हड एअर फ्लोटेशन सेपरेट्स ऑईल फ्रॉम वेस्ट वॉटर," ऑईल अँड गॅस जर्नल, ५०, २७, ३१९ ( नोव्हेंबर १९५१ ).



# : १० : कलिल घनपदार्थ काढून टाकणे

## १०–१. कलिलांची वैशिठ्ये–

आपल्या अत्यंत सूक्ष्म आकारामुळे ( १ ते २० मिलीमायक्रॉन), जलयोजनेच्या अवस्थेमुळे आणि पृष्ठभागावरील विद्युत् प्रभारामुळे तरंगणाऱ्या कणाची कलील अशी व्याख्या करता येते.

कलिलाचे दोन प्रकार असतात : द्रव द्वेषी ( hydrophybic ) आणि द्रवप्रेमी ( hydrophylic ) अशा नावाने ते संबोधिले जातात. कलिलांच्या परिस्थितीत बदल झाल्यास, त्यांच्या वैशिष्यांतील फरकामुळे प्रतिक्रिया भिन्न होतात. हे गुणधर्म समजून घेण्यास को. १०–१ ची अभ्यासकास मदत होईल.

नाल्यातून सोडण्यापूर्वी अपशिष्टजलातून कलिले काढून टाकणे महत्वाचे असल्याने त्यांच्या भौतिक आणि रासायनिक गुणधर्मांची जाण असली पाहिजे.

विस्थापित अवस्थेतील कणांवर विस्थापक माध्यमातील परमाणूंची गोळाबारी झालेली **ब्राउनियन हालचाल** कलिलात दिसून येते. कलिलांचा आकार लहान आणि त्यांच्या कणांचे वजन कमी असल्यांने ते अनिवार्यत: अनावस्थापनी ( nonsettleable ) असतात. ते आपोहनक्षम ( dyalyzable ) असतात; म्हणजेच अर्धप्रवेश्यता असलेल्या पटलातून त्याना गाळून आपल्या मणीभाव ( crystalloid ) प्रतिवस्तूंच्या ( counter parts ) पासून वेगळे करता येते. विलेय आयनांच्या तुलनेने कलिलांचे **विसरण** ( diffusion ) फार सावकास होते. सामान्यपणे, कलिलांचे कण ( काही थोडे असलेच तर ) फार कमी **परिसारक** ( osmotic ) **दाब** प्रदर्शित करतात, कारण विलेय आयनांच्या आकाराच्या मानाने त्यांचा आकार मोठा असतो. त्यांच्यात **अंतर्ग्रहणाचे** ( imbibition ) (जेलने पाणी आत घेण्याचे) वैशिष्टय असते. वस्तुत: (बहुतेक वेळा कलिल मानण्यात आलेले) जीवाणूंचे बीजाणू ( spores ) पाणी ग्रहण करतात आणि अंकुर पावतात. अनेक वेळा कलिल जेल अति निस्यंदक ( ultra filters ) म्हणून वापरण्यात येतात. कलिल व्यवस्थेतील विसरित अवस्था टिकून राहू देण्याइतकी लहान रंध्रे असलेली पण विसरण माध्यम आणि त्यांचे मणिभाव विलेय बाहेर पडू शकतील इतके मोठे हे जेल असतात. कलिल व्यवस्थेत व्यापक प्रमाणात **श्यानता** ( viscocity ) आणि **नम्यता** ( plasticity ) दिसून येते. सामान्यपणे विशुद्ध विसरण–माध्यमातल्यापेक्षा द्रवद्वेषी विलयात ( sol ) फक्त थोडी जास्त श्यानता दिसून येते आ. (१०–१), आणि जेव्हा विसरित द्रव्याच्या संकेंद्रणात

वाढ होते तेव्हा हे संकेंद्रण फक्त थोडेसेच वाढते. उलटपक्षी, द्रवप्रेमी व्यवस्थेत श्यानतेची मूल्ये उच्च प्रमाणात वाढतात. या प्रकारच्या कलिलांमुळे, आ १०–१ मध्ये दर्शविल्याप्रमाणे, श्यानता आणि विसरित अवस्थेतील संकेंद्रण यांच्यामधील संबंध रेखीय असण्याऐवजी परवलयिक (parabolic) असतात.

**कोष्टक १०–१. कलिल विलयांचे (sols) प्रकार आणि गुणधर्म –**

| गुणधर्म | द्रव द्वेषी (hydrophobic) | द्रव प्रेमी (hydrophylic) |
|---|---|---|
| भौतिक अवस्था | निलंबाभ (suspensoid) | पायसाभ (emulsoid) |
| पृष्ठतणाव | अगदी माध्यमासारखेच कलिल असते. | माध्यमापेक्षा कलिलाचा पृष्ठतणाव बराच कमी असतो. |
| श्यानता | केवळ विसरक अवस्थेच्या अगदी समान कलिल असते. | फक्त कलिलांची श्यानता बरीच वाढते. |
| टिंडॉल परिणाम | अतिशय स्पष्ट. (याला अपवाद फेरिक हायड्रॉक्साइड असते.) | अल्प अगर संपूर्ण अभाव |
| पुनर्गठनाची सुलभता | गीटणानंतर अगर सुकविल्यानंतर सुलभपणे पुनर्गठन करता येत नाही. | सहज पुनर्गठन करता यते. |
| विद्युत् विश्लेषणाशी अभिक्रिय (reaction) | विद्युत् विश्लेष्याने सहज किलाटन होते. | विद्युत् विश्लेष्य क्रियेशी फार संवेदनशील असते म्हणून किलाटनाकरता बरेच जास्त लागते |
| उदाहरणे | धातूंची ऑक्साइडे, सल्फाइडे, चांदीची हलाइडे, धातू, सिलिकॉन डायऑक्साइड. | प्रथिने, स्टार्च, गोंद, श्लेष्य (mucilages) आणि साबण. |




**आकृति १०–१.**

**कलिल प्रकाराचा श्यानतेवरील परिणाम–**

अनेक कलिल व्यवस्थांत, विशेषत: द्रवप्रिय ( जेल ) व्यवस्थांत, प्रत्यास्थतेचा (elastic) " ( उसळण्याचा " अगर प्रतिरोध करण्याचा ) गुणधर्म असतो. त्या गुणधर्मामुळे विरूपणास जेल प्रतिरोध करू शकते आणि त्यामुळे पूर्वी केव्हातरीं विरूपित झालेले आपले मूळचे आकार व रूप पुन: प्राप्त करू शकते. जर विसरण माध्यमाच्या **प्रणमनांकाहून** (refra ctive index) **भिन्न प्रणमनांक असलेल्या** विसरित अवस्थेतील कलिल द्रावणामधून संकेंद्रित किरणावली ( beam ) पार केली तर लंबत: ( perpendicularly ) पाहिले असता तिचा मार्ग दुधाळ असल्याचे स्पष्ट दिसून येते. ह्याला टिंडॉल परिणाम असे म्हणतात. ( को. १०–१ पहा ).

कलिल कणांचा एक महत्वाचा गुणधर्म असा असतो कीं, आपल्या भोवतालच्या परिसराच्या संबंधात ते सामान्यत: **विद्युत् प्रभारित** असतात. जर कलिल व्यवस्थेमधून विद्युत् प्रवाह सोडला तर धन कण ॠणाग्राकडे ( cathode ) आणि ॠण कण धनाग्राकडे ( anode ) भ्रमण करतात.

## १०–२. रासायनिक किलाटन–

अपशिष्ट जलातील ऑक्सिजनची मागणी आणि गढूळपणा निर्माण करणाऱ्या कलिल घन पदार्थांच्या निष्कासनास पुष्कळवेळा माध्यमिक उपचार असे संशोधण्यात येते. कारण कलिलांचे आकार तरंगणाऱ्या आणि विरघळलेल्या घनपदार्थांच्या आकारांच्या दरम्यान असतात. हे घनपदार्थ काढून टाकण्याची अतिसामान्य आणि व्यवहार्य पद्धत रासायनिक किलाटन ही आहे.

रासायनिक किलाटनात, कलिलांना अस्थिर करणे, त्याना एकत्रित करणे आणि अवसादन सोपे जावे म्हणून त्याना एकत्र बांधणे, ह्या प्रक्रिया कराव्या लागतात. तरंगणाऱ्या द्रव्यांचे, विशेषत: कलिल होण्याइतके सूक्ष्म विभाजन झालेल्या द्रव्यांचे, अवशोषण, पाशबंधन वा अन्य प्रकारे त्यांचे एकत्रीकरण करणारे रासायनिक पुंजके तयार करण्याचा ह्या प्रक्रियेत अंतर्भाव असतो. तुरटी $Al_2(SO_4)_3 . 18 H_2O$; कॉपेरास, $FeSO_4 . 7H_2O$; फेरिक सल्फेट, $Fe(SO_4)_3$; फेरिक क्लोराइड, $FeCl_3$; आणि फेरिक सल्फेट व क्लोराइडचे मिश्रण केलेले क्लोरीनेटेड कॉपेरास, ही रसायने बहुतांशी वापरण्यात येतात कार्बनयुक्त अपशिष्टांचे किलाटन करण्यात अल्युमिनम सल्फेट (तुरटी) अधिक परिणामकारक असल्याचे दिसून येते आणि जेव्हा प्रथिनात अपशिष्टांची राशि बऱ्याच प्रमाणात असते तेव्हा आयर्न सल्फेटे अधिक प्रभावी ठरतात.

रासायनिक किलाटन प्रक्रियेत, विसरित द्रव्यांची कलिले, पाणी अगर अन्य विसरण करणारे माध्यम आणि किलाटनकारी रसायनांचा समावेश असलेल्या अनेक विचरकांच्या ( variables ) मधील गुंतागुंतीच्या साम्यावस्थांचा ( equilibria ) अंतर्भाव असतो. विद्युत् क्रियेसारखी चालन बले ( driving forces ) ह्या तीन्ही विचरकांच्या अन्योन्य क्रिया घडून येण्याकरता, उपलब्ध असणे आवश्यक असते.

## १०–३. विद्युत् भाराच्या उदासीनीकरणाने किलाटन : हे सिद्ध करण्याचे मार्ग

(१) कलिलांचे झीटा विभव खाली आणणे (आ. १०–२), स्थिर केलेले कलिल आणि विसारक माध्यमाच्या मधील अस्तित्वात असलेले विद्युत् प्रभार, यांच्या मधील फरक हे झीटा विभव असते.

(२) पाण्यातील आयनांच्या किलाटकावर होणाऱ्या प्रक्रियेने सामान्यपणे तयार झालेले हायड्रस ऑक्साइड, कलिलासारख्या विरुद्ध दिशेने प्रभारित झालेल्या अतिरिक्त इलेक्ट्रॉनने माध्यमाचे अभिसिंचन ( flooding ) करून कलिली प्रभाराचे, उदासीनीकरण करते. तसेच, परस्पर विरुद्ध दिशेने प्रभारित झालेल्या कलिलांच्या प्रक्रियेने किलाटकी कलिले अस्थिर बनतात आणि हायड्रस ऑक्साइड निर्माण करतात; हायड्रस ऑक्साइड हे पुंजके बनविणारे द्रव्य आहे

विद्युत् प्रभाराच्या दृष्टिकोनातून अपशिष्ट-जलात कलिलांचे दोन मुख्य प्रकार असतात :

(१) अनेक प्रथिने, स्टार्च, हेमीसेल्यूलोज, पॉलीपेप्टाइड, आणि इतर पदार्थ समाविष्ट




आकृति १०–२. स्थिर कलिल

कोष्टक–१०–२. संयोजकता (valence) आणि किलाटकाची मात्रा

| विद्युत् विश्लेष्य | ऋणायन (anion) संयोजकता | लागणारे किमान संकेंद्रण, मिलिमॉल्स/लिटर | विद्युत् विश्लेष्य | धनायन (cation) संयोजकता | लागणारे किमान संकेंद्रण, मिलिमॉल्स/लिटर |
|---|---|---|---|---|---|
| KCl | १ | १०३ | NaCl | १ | ५१ |
| KBr | १ | १३८ | $KNO_3$ | १ | ५० |
| $KNO_3$ | १ | १३१ | $K_2SO_4$ | १ | ६३ |
| $K_2CrO_3$ | २ | ०.३२५ | $MgSO_4$ | २ | ०.८१ |
| $K_2SO_4$ | २ | ०.२१९ | $ZnCl_2$ | २ | ०.६८ |
| $K_3Fe(Cn)_6$ | ३ | ०.०९६ | $BaCl_2$ | २ | ०.६९ |
| | | | $AlCl_3$ | ३ | ०.०९ |

असलेली स्वाभाविकपणे आस्तित्वात असलेली कलिले. त्या सर्वांवर ऋण प्रभार असतो ( बहुतेकांचा द्रवद्वेषी स्वभावधर्म असतो ).

(२) सामान्यपणे लोखंड आणि अल्युमिनमच्या हायड्राक्साइडसारखी किलाटकांनी निर्माण केलेली कृत्रिम कलिले बहुतांशी धन प्रभारित आयने असतात. ( त्यांचा स्वभावधर्म बहुतांशी द्रवप्रेमी असतो.)

बहुतेक वैज्ञानिकांच्या मंडळातून असे मानले जाते की, कलिल कण प्रामुख्याने विसरण माध्यमातील आयनांच्या, सामान्यत: $\overset{+}{H}$ अगर $O\overset{-}{H}$ यांच्या, अधिमान्य अधिशोषणामुळे ( adsorption ) प्रभारित होतात. तसेच हा प्रभार अंशत: $N\overset{+}{H}_2$ आणि $CO\overset{-}{O}$ सारख्या, त्यांच्या संरचनात्मक गटा पैकी काहींच्या प्रत्यक्ष आयनीकरणामुळेसुद्धा असू शकतो.

हायड्रस अल्युमिनम आणि आयर्न ऑक्साइडे, तसेच धातूचे अन्य विलायक, धन आणि ऋण असे दोन्हीही प्रभार प्राप्त करू शकतात :



$$\begin{pmatrix} FeO \\ FeO.\,xHOH \\ O \end{pmatrix} Fe^{+++} \leftarrow \begin{cases} O\bar{H} \\ O\bar{H} \\ O\bar{H} \end{cases}$$

अतिरिक्त $Fe^{+++}$ मुळे कलिलांचे धनप्रभारण होते.



$$\begin{pmatrix} FeO \\ FeO.\,xH_2O \\ O \end{pmatrix} O\bar{H} \leftarrow \overset{+}{H}$$

अतिरिक्त $O\bar{H}$ मुळे कलिलांचे ऋणप्रभारण होते.

असे असले तरी, अधिशोषणाशिवाय अन्य उपायानी कलिलाला प्रभार प्राप्त करता येतो. जेव्हा द्रावणात प्रथिन विरघळण्यात येते तेव्हा ते खालील आयोजनाने निर्दशित करता येते :



$$\overset{-}{COO} \text{ — ( प्रथिन आधारी परमाणु ) — } N\overset{+}{H}_2$$

द्रावणातील अंतिम आयनिक प्रभार निश्चितपणे जाणून घेण्याकरता सर्व धन $N\overset{+}{H}_2$ गट

आणि सर्व ऋण $\overline{COO}$ गट एकत्र करण्याची जरुरी पडणे शक्य असते कारण कणाच्या प्रत्यक्ष आयनीकरणामुळे अन्तर्निहित प्रभार बाहेर पडतो. त्यामुळे परमाणूंच्या स्वतःच्या आत असलेल्या गटांच्या अन्तर्निहित आयनीकरणामुळे विलयास ( sol ) स्थिरता प्राप्त होते.

दुहेरी थराच्या आयनांच्या प्रकारात आणि संख्येत काहीही बदल झाल्यास त्यामुळे झीटा विभव इतक्या मात्रेपर्यंत कमी होते की कलिल आपली स्थिरता गमावून बसते. तुलनेने मोठ्या कणात अवक्षेपण आणि/अगर किलाटन होण्यास प्रतिरोध करण्याच्या क्षमतेस "स्थिरता" असे परिभाषित ( defined ) केले आहे. जेव्हा कलिलावर अत्युच्च विद्युत्भार असतो आणि त्याचा आकार किमान असतो तेव्हा कलिल जास्तीत जास्त स्थिर असते. जसजशी संयोजकता वाढत जाते तसतशी आयनांची किलाटन शक्ति जलदगतीने वाढते; हे हार्डी-शूल्झ नियमात निवेदित केले आहे. को. १०-२ मध्ये प्रक्रिया पूर्ण करण्याकरता धनायन आणि ऋणायनाना लागणाऱ्या विविध रासायनिक किलाटकांचे किमान संकेंद्रण दिले आहे. १, २ आणि ३ संयोजकतांकरता लागणाऱ्या विद्युत् विश्लेष्यांच्या सकेंद्रणांची गुणोत्तरे ७२९ = ११-४ = १ अशी असतात.

अपशिष्ट जलातील pH च्या बदलाशी विद्युत् विश्लेष्ये आणि कलिलाची सहज प्रतिक्रिया होते. अपशिष्ट जलात अस्तित्वात असलेल्या संदूषक कलिलांपैकी बहुतेकांचा समावेश असलेल्या बहुतेक ऋणभारित कणांचे, ७.० पेक्षा कमी अनुकुलतम ( optimum ) pH चे मूल्य असताना, किलाटन होते. या उलट पुंजीकारक हायड्रॉक्साइड कलिल pH ची मूल्ये ७.० पेक्षा जास्त असताना आणि सामान्यपणे ९.० च्यावर असताना अविलेय असतात. pH वाढविण्याकरता, तसेच कलिलांचे अवक्षेपण होण्यास मदत व्हावी म्हणून सामान्यतः चुना मिसळण्यात येतो.

तुरटीतील कमाल अविलेयतेची pH व्याप्ती ५ ते ७ च्या दरम्यान असते; फेरिक आयनाचे ph मूल्य ४ पेक्षा अधिक असतानाच किलाटन होते आणि फेरस आयनाचे फक्त ९.५ च्या वरच होते. कॉपेरस, $FeSO_4 . 7H_2O$ हा फक्त उच्च क्षारीय अपशिष्टांच्या बाबतीत, एक उपयुक्त किलाटक असतो. स्वतःच किलाटक असलेला चुना, किलाटकाच्या समविद्युत् बिंदूपर्यंत ( iso electric point ) pH वाढविण्याकरता, लोह लवणात अनेकदा मिसळण्यात येतो. या बिंदूजवळ, कलिलावर कमीतकमी अथवा किमान स्वविद्युत् भार असतो, आणि ते कमीतकमी स्थिर असते. pH ची मूल्ये ९ व त्यापेक्षा जास्त असताना, चुना पूर्णपणे अविलेय असल्याने. चुना व कॉपेरासचे एकत्रित किलाटन केले तर, pH च्या व्याप्तीत वाढ होते. चुना मिसळण्यापूर्वी अपशिष्ट जलाचे वातन केल्याने ( लोहाचे ऑक्साइड आणि हायड्रॉक्साइडच्या

अवस्थांत परिवर्तन करण्याकरता कार्बन डाय ऑक्साइडचा उपयोग करून आणि ऑक्सिजनचा पुरवठा करून ) चुन्याची निर्मिती होऊन किलाटनात वाढ होते.

pH मुल्ये कमीं असताना फेरस आयनाचे फेरिक आयनात ऑक्सीकरण करून ते सुद्धा किलाटक म्हणून वापरता येत असल्याने, क्लोरिनीकरण करून खालीलप्रमाणे ऑक्सीकरण केले पाहिजे.



$$6\,FeSO_4^{++} \cdot 7H_2O + 3\,Cl_2 \rightleftharpoons 6\,Fe^{+++}\ SO_4 + 6\,\bar{Cl} + 42H_2O.$$

आधीच अपशिष्ट जलात अस्तित्वात असलेल्या ऋण आयनांच्यामुळे अम्ल वर्गातील pH ची उपयुक्त व्याप्ति विस्तरित होते आणि घन आयनांमुळे समाक्षारित ( basic ) वर्गातील pH ची उपयुक्त व्याप्ति विस्तरित होते. म्हणून मृदुजलात अम्ल pH च्या व्याप्तीत ऋण प्रभारित रंगित कलिलांचे उत्तम प्रकारे किलाटन होते आणि क्षारीय जलात धन प्रभारित लोह आणि अल्युमिनम आयतसुद्धा अवक्षेपक रसायने म्हणून चांगली असतात. तुरटीचा उपचार केलेल्या अपशिष्टाचे प्राक् क्लोरिनीकरण केल्यामुळे रंगनिष्कासनात कधीकधी वाढ होते. सूक्ष्म बिभाजनित चिकणमाती, उत्प्रेरित सिलिका, बेंटोनाइट अगर अन्य किलाटक सहाय्यक द्रव्ये तुलनेने स्वच्छ पाण्याकरता पुष्कळवेळा वापरण्यात येतात. ह्यातील कोणचेही मिसळल्याने, सिल्व्हर आयोडाइड स्फटिकांनी ढगांचे बीजारोपण करण्याच्या घटनेसारखी घटना घडून येते. या मदतकर्त्यांमुळे, ज्यांच्या भोंवती अवक्षेप जमू शकतील, ज्वालाश्मचयित होतील आणि पुंजके तयार होतील अशा, केंद्रकांची ( nucli ) तरतूद होते आणि परिणामी घनतेत आणि अवस्थापन वेगात वाढ होते.

कधीकधी अपशिष्ट-जलातील लोह व मँगनीजच्या उपस्थितीमुळे धनायनिक किलाटकांच्या परिणामात वाढ होते. किलाटकातील संकेंद्रणाच्या वाढीमुळे किलाटन प्रक्रियेला बऱ्याच प्रमाणात कमी कालावधी लागतो. तसेच अपशिष्ट जल ढवळण्याने किलाटनात वाढ होते कारण संघट्टकांच्या ( collsions ) संख्येत वाढ होते आणि पुंजके अधिक जलद तयार होतात.

**संदर्भ–**

१– फेअर, जी. एम., आणि जे. गेयर, "एलेमेंट्स ऑफ वॉटर अँड वेस्ट वॉटर", न्यू यॉर्क, जॉन वायली अँड सन्स, इन्कॉ. १९५८ पा. ६१६.

२– " केमिकल कोअँग्यूलेशन ऑफ स्युवेज ", रुडॉल्फ्स, डब्ल्यू., आणि एछ. डब्ल्यू. गेम, स्युवेज वर्क्स जर्नल ८, क्र. २, ३, ४
( मार्च, मे, जूलै १९३६, पा. १९५, ४२२, ५३७, ५४७.

३– रुडॉल्फ्स, डब्ल्यू., आणि जे. एल. बेलमॅट, " ए सेपरेशन ऑफ स्युवेज कोलाइड्स बुइथ दि एड ऑफ दि इलेक्ट्रॉन मायक्रास्कोप ", स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २४, २, २४७ ( मार्च १९५२ ).

४– रुडाल्फ्स, डब्ल्यू., आणि एछ. गेम ( Gehm ), कोलाइड्स इन स्युवेज अँड स्युवेज ट्रीटमेंट : I. ऑकरन्स अँड रोल. ए क्रिटिकल रिव्ह्यू," स्युवेज वर्क्स जर्नल, ११, ५, ७२७ ( सप्टेंबर १९३९ ).



# : ११ : विरघळलेले अकार्बनिक घनपदार्थ काढून टाकणे

अपशिष्टावर उपचारण करणाऱ्या अभियंत्यानी अपशिष्ट-जलांतील विलीन खनिजांच्या निष्कासनाकडे तुलनेने कमी लक्ष दिले आहे, कारण सेंद्रिय द्रव्य आणि तरंगारे घनपदार्थ, यांसारख्या काही अन्य घटकांइतकी खनिजें प्रदूषक आहेत असे मानले जात नाही. तथापि, आपणास जसजशी प्रदूषणाची कारणे आणि परिणाम अवगत होत जातात तसतसे वाहितमल संयंत्रातून नाल्यात वाहू दिल्या जाणाऱ्या अकार्बनिक द्रव्यांच्या प्रकारांची राशी कमी करण्याचे महत्व दिसून येते. क्लोराइडे, फॉस्फेटे, नायट्रेटे व काही विशिष्ट धातू ही, अधिक सामान्य आणि महत्वाच्या विलीन अकार्बनिक घनपदार्थांची उदाहरणे आहेत अपशिष्टांतील अकार्बनिक द्रव्यांचे निष्कासन करण्यासाठी वापरलेल्या पद्धतीतील (१) बाष्पीभवन, (२) अपोहन ( dialysis ), (३) आयन विनिमय, (४) शेवाळे ह्या आणि (५) इतर विविध पद्धती आहेत.

## ११-१. बाष्पीभवन-

बाष्पीभवन ही अपशिष्ट जल आपल्या उकळ बिंदू ( boiling point ) पर्यंत नेण्याची आणि विशुद्ध जलाचे बाष्पन ( vaporizing ) करण्याची एक पद्धत आहे. शक्ति निर्माण करण्याकरता वाफेचा उपयोग करण्यात येतो अगर ती नंतर संघनित ( condensed ) करून तापना करता वापरण्यात येते अथवा भोवतालच्या वातावरणात सरळ सोडून देण्यात येते. अवशेषांत खनिज पदार्थ संकेंद्रिणित होतात व निर्मिति-चक्रात पुन: वापरता येण्याइतके घन बनतील आणि त्यांची सहज विल्हेवाट करता येण्याइतके पुरेसे सकेंद्रणित होतील असे करण्यात येतात. किरणोत्सर्गी अपशिष्टांच्या विल्हेवाटीकरता ही पद्धत वापरण्यात येते आणि कागद गिरण्यांतून अनेक वर्षे सल्फेट-पाक-द्रवाचे इतक्या मात्रेपर्यंत बाष्पीभवन करण्यात आलेले असते की त्याचा पुनरुपयोग करण्याकरता चुल्यात ते परत पाठविता यावे.

बाष्पीभवनाच्या पद्धतीची निवड करताना खालील महत्वाचे घटक विचारात घेण्यात येतात : (१) **अर्थ व्यवस्था (economics)**– बाष्पीभवनास लागणाऱ्या इंधनावरील खर्च भरून निघण्यास पुरे पडेल असे पुन: वापरता येणाऱ्या अवशिष्टाचे मूल्य आहे काय ? (२) **अपशिष्टातील प्रारंभिक विलीन घनपदार्थ,** बदलत्या गुणधर्मांचे घनपदार्थ बाष्पीभवन

खात्रीने होईल इतके पुरेसे आहेत काय ? (३) **पर द्रव्याची राशि व स्वरूप** (character): पोपडे बनतील अगर क्षरण होईल अथवा बाष्पीभवन होताना उष्णतांतरणास ( heat transfer ) अडथळा आणील असे द्रव्य आहे काय ? (४) **प्रदूषणकारी परिस्थिति**: संग्राही ( receiving) नाल्यावर खनिजांचा काय परिणाम होईल ? उदाहरणार्थ, दाहक सोड्याने मासे मरण पावतात, अल्यूमिनमच्या लवणामुळे उपद्रवी शेवाळे वाढण्यास आरंभ होतो, आणि काही ठिकाणी आधीच अस्तित्वात असलेल्या सेंद्रिय द्रव्यातील जीवाणूंच्या वाढीस चालना मिळते (१), औद्योगिक आणि नागरी कार्यांत वापरल्या जाणाऱ्या लवणामुळे अडथळे येतात; अशी आणखीही अन्य उदाहरणे देता येतील.

ज्या नळचांमधून संकेंद्रण अथवा बाष्पन करावयाचे अपशिष्ट वाहते त्या नळचांवर वाफेचे संघनन करून आजकाल अनेक बाष्पकांचे तापन करण्यात येत आहे. सामान्यपणे वाफेचा निरपेक्ष दाब द. चौ. इं. स ५० पौंडापेक्षा कमी असतो. वाफेच्या दिशेने किंचितशा निर्वात अवस्थेत बहुतेक बाष्पकांचे परिचालन करण्यात येते, कारण त्यामुळे बाष्पकातून वाफ काढून घेण्याच्या प्रमाणात वाढ होते. जेव्हा निर्वात पद्धतीचा सेंद्रिय द्रव्याच्या विघटनाशी संबंध असतो तेव्हा ती पद्धति वायुमंडलीय बाष्पकांपेक्षा विशेष पसंत असते. अर्थात, अपशिष्ट जलाची वाफेत पाणवणी ( priming ) होईल इतके जास्त निर्वातन होणार नाही अशी काळजी घेणे आवश्यक असते.

अपशिष्टांच्या बाष्पनांत अनेक समस्या निर्माण होतात बाष्पन होत असताना संकेंद्रणात बदल होणे, फेस येणे, तपमान संवेदनशीलता ( temparature sensitivity ), पोपडे निर्माण होणे, आणि बाष्पकाच्या रचनेत वापरलेल्या द्रव्यांचे प्रकार यांचा त्यात समावेश असतो.

औद्योगिक अपशिष्टाच्या सकेंद्रणात पोपडे तयार होणे हा सामान्यतः महत्वाचा अडथळा असतो. तापन–पृष्ठ–भागावर जसजशी खरपुडी जमू लागते तसतशी एकूण उष्णतांतरणाच्या गुणांकात घट होत जाते; त्यामुळे काम बंद ठेवून नळचा स्वच्छ करण्याची गरज निर्माण होईल इतकी कार्यक्षमता कमी होते. खरपुडी जेव्हा कठीण आणि चिवट असते तेव्हा हे कार्य फार जटील बनते.

कांचेचे अस्तर लावलेल्या उपकरणात बाष्पन करून अगर अन्य सोयीस्कर बाष्पक वापरून खळबळून येण्याच्या ( ruise ) टाकीतून क्रोम, निकेल, आणि तांब्याच्या अम्लप्रकाराच्या मुलामा देण्याच्या अपशिष्टांचे पुनःप्रापण करावे आणि संकेंद्रणित द्रावण मुलामा देण्याच्या व्यवस्थेत परत पाठवावे (१३). उपकरणांची प्रारंभिक किंमत जास्त असते, आणि पुनःप्राप्त

कोष्टक ११-१.

**बाष्पकांचे एकूण नमुनेदार गुणांक (५).**

| प्रकार | | एकूण गुणांक Btu/फूट²/तास/°F |
|---|---|---|
| लांब नळ्यांचे उभे बाष्पक | | |
| स्वाभाविक पुनराभिसरण | | २००–६०० |
| बलपूर्वक पुनराभिसरण | | ४००–२००० |
| अखुड नळ्यांतून बाष्पन करणे | | |
| आडवी नळी | | २००–४०० |
| कॅलँड्रिया प्रकार | | १५०–५०० |
| कुंडलित बाष्पक .. .. | | |
| विक्षुब्ध–पटल बाष्पक, | | |
| न्युटोनियन द्रव श्यानता | | |
| | १ सेंटी पॉइज | ४०० |
| | १०० सेंटी पॉइज | ३०० |
| | १०००० सेंटी पॉइज | १२० |

करावयाच्या रसायनांची राशि आणि मूल्य अधिक बाष्पाचे पुन:प्रापण न केलेल्या उपचारण व्यवस्थेतील परिचालनास येणारा अंदाजी खर्च, ह्या कसोटया उपकरण विकत घेण्याचे समर्थन करण्याच्यावेळी लागू केल्या पाहिजेत.

उष्णन पृष्ठभागामधून (नळीची जाडी) होणाऱ्या बाष्पनाच्या कार्यक्षमतेचा उष्णतांतरण वेगाशी प्रत्यक्ष संबंध असतो. हा वेग दर ताशी ब्रिटिश औष्णिक एककात ( **Btu**/तास ) अभिव्यक्त करण्यात येतो. खालील तीन घटकांच्या गुणाकाराइतका हा वेग असतो : एकूण उष्णतांतरण गुणांक, उष्मन पृष्ठ क्षेत्र, आणि अपशिष्ट व वाफ यांच्यामधील तपमानातील एकूण फरक. गणितीय पद्धतीने पुढीलप्रमाणे ते अभिव्यक्त करता येते :

$$q = UA\ (ts - tw) = UA\ \triangle t, \qquad (१)$$

येथे, q हा उष्णतांतरण वेग Btu/तास असतो; U हा एकूण गुणांक Btu/फूट$^2$/तास/$F^6$ असतो; A हे उष्मन पृष्ठक्षेत्र फूट$^2$ असते; ts हे वाफेच्या संघनकाचे तपमान °F असते. tw हे अपशिष्ट उकळत असतानाचे तपमान °F असते; आणि t = ts—tw हा वाफ आणि अपशिष्ट यांच्या एकूण तपमानातील फरक असतो. को. ११-१ मध्ये निरनिराळ्या प्रकारच्या बाष्पकांकरता U ची नमुनेदार मूल्ये दिली आहेत. अपशिष्टांची श्यानता, पोपडे बनणे आणि परिचालन तापन, यांचा विचार करून स्थूलपणे हे आंकडे अंदाजित केले आहेत. ( तपमान अवकल अधिक असले तर अधिकतर गुणांक मिळतात ).




आकृति ११–१. नमुनेदार अपोहन प्रवाह आरेख-

## ११-२. अपोहन ( Dialysis )

पटलांमधून आपल्या असमान विसरणाच्या ( diffusion ) सहाय्याने होणाऱ्या विद्रुतांच्या ( solute ) विलगनास अपोहन म्हणतात (२, ३, ७, ८, १०, ११, १८, १९, २०, २१, २२, २३). विनिर्मिति–प्रक्रियांत पुनरुपयोगाकरता विशुद्ध द्रावणांचे पुनःप्रापण करण्यासाठी हे सर्वांत जास्त उपयोगी पडते; उदाहरणार्थ, वस्त्र निर्मिती उद्योगातील दाहक सोडा (१४). सुमारे ९६ टक्के अशुद्ध द्रव्ये हेमी सेल्यूलोजच्या स्वरुपात असणाऱ्या विलयापासून ( sol ) स्फटिकाभाच्या ( crystalloid ) ( Na OH ) होणाऱ्या विलगनाचा पुनःप्रापणाशी संबंध असतो. इतर अशुद्ध द्रव्यांत पेक्टीन्स, मेण, आणि रंगांचा अंतर्भाव असतो.

सध्या सुमारे ८ ते १० बाजारी अपोहक उपलब्ध आहेत. अशुद्ध संकेंद्रणित दाहक द्रावण प्रवाहाच्या विरूद्ध ऊर्ध्व दिशेने अनुप्रवाही जलपुरवठ्यात सोडणे आणि त्यातून एका अर्धपारगम्य पटलाच्या सहाय्याने त्याचे विलगन करणे, ह्या सोप्या तत्वावर ह्या सर्वांचे परिचालन होते (आ. ११–१). पटलातून दाहक सोडा पार होतो आणि अपशिष्टातील इतर अशुद्ध द्रव्यांच्या

मानाने तो अधिक जलद पाण्यात जातो. पाण्यातल्यापेक्षा अशुद्ध द्रावणातील संकेंद्रण नेहमीच जास्त असते; आणि अशुद्ध दाहक द्रावणात पटलामधून प्रवाहित होणाऱ्या पाण्याची प्रवृत्ति ते पातळ करण्याकडे असते. पटलामधून विसरित होणाऱ्या सोडियम हायड्रॉक्साइडची राशि, काल, अपोहीं पृष्ठभागाचे क्षेत्रफळ, संकेंद्रणातील माध्य फरक आणि तपमान, यांच्यावर अवलंबून असते. हे घटक खालील समीकरणाने अभिव्यक्त केले आहेत.

$$Q = KAt(\triangle C) \qquad (२)$$

येथे K हा एकूण विसरण गुणांक आहे, t हा मिनिटात काल आहे, **A** हे अपोहक पृष्ठाचे क्षेत्रफळ आहे, आणि

$$\triangle C = \triangle Cav = \frac{(\triangle C_1 - \triangle C_2)}{२\text{-}३ \log to \triangle c_1 / \triangle c_2},$$

जेथे $\triangle c_1$ व $\triangle c_2$ हे पटलांच्या माथ्याशी व तळाशी असलेल्या द्रावणाच्या संकेंद्रणातील फरक असतात.

पुनःप्रापण केलेल्या Na OH च्या वजनाचे जेव्हा प्रत्यक्ष गणन केले जाते तेव्हा पटलाचा दर्जा व प्रकार हे सर्वोपरी महत्वाचे असतात असे दिसून येते. खालील समीकरणावरून हे उघड दिसून येईल :

$$W = UA \triangle c \log mean \qquad (३)$$

येथे W हे एकक कालात (ग्रॅम/मिनिट) पटलातून जाणाऱ्यां द्रव्याचे वजन असते, **U** ह अपोहकाचा एकूण गुणांक असतो, आणि $\triangle c$ log mean ही पटलाच्या ($\triangle cav$) बाजूवरील लघुगणकीय (logarthamic) माध्य संकेंद्रण–प्रवणता (gradient) असते. तसेच

$$\frac{१}{u} = \frac{१}{u_1} + \frac{१}{u_2} \text{ असतो.}$$

येथे $u_1$ हा सें. मी./मि. एकत्रित फिल्म-रोध (film resistance) असतो व $u_2$ हा सें. मी./ मि. त पटल रोध (membrance resistance) असतो. प्रत्येक पडद्यातील (diaphragm) पटलरोध $u_2$ वेगळा असल्याचे दिसून येते. सच्छिद्र पटलांची वैशिष्ठचे निर्वंधात्मक असण्याची कारणे, विलय, विलयक, आणि पटल, यांच्या दरम्यानची यांत्रिकी चाळणक्रिया व भौतिकीरासायनी (physiochemical) अन्योन्यक्रिया (interaction) अशी

दोन्हीही असतात. आजकाल वापरण्यात येत असलेली प्रमुख पटले, सेल्यूलोज नायट्रेड, चर्मपत्र ( parchment ), आणि सेलोफेन ही आहेत.

## ११-३. आयन विनिमय- ( Ion exchange )

रेझीनयुक्त द्रव्यातील सोडियम अगर हायड्रोजन आयनांच्याकरता अपशिष्ट जलातील काही अनिष्ट धनायनांच्या व ऋणायनांच्या विनिमयाची आयन विनिमय ही मूलभूत प्रक्रिया असते. नैसर्गिक व कृत्रिम अशा दोन्हीही रेझीनांना सामान्यत: **झिओलाइट्स** म्हणतात. घरगुती पाणीपुरवठ्यातील काठिण्य कमी करण्याकरता आयनविनिमय कार्यपद्धतीचा प्रथम विकास करण्यात आला, परंतु धातूवर मुलामा देण्यातील अपशिष्टासारख्या औद्योगिक अपशिष्ट जलावर उपचार करण्याकरताही तो अलिकडे वापरण्यात येत आहे. मृदुकरण प्रक्रिया खालील प्रमाणे दिग्दर्शित करता येते :



$$\left.\begin{matrix} Ca \\ Mg \end{matrix}\right\} \left\{\begin{matrix} (HCO_3)_2 \\ SO_4 \\ Cl_2 \end{matrix}\right. + Na_2Z \rightarrow \left.\begin{matrix} Ca \\ Mg \end{matrix}\right\} Z + Na_2 \left\{\begin{matrix} (HCO_3)_2 \\ SO_4 \\ Cl_2 \end{matrix}\right. ,$$

येथे Z हे झिओलिटिक मूलकाचे ( radical ) चिन्ह आहे. जेव्हा झिओलाइटच्या संस्तराची मृदुजल निर्माण करण्याची क्षमता संपुष्टात येते तेव्हा मृदुकारक कामातून तात्पुरता काढून घेण्यात येतो, नंतर साफ करण्याकरता आणि संस्तराचे पुन: जलीय संस्तरण करण्याकरता त्याचे प्रतिधावन ( back washing ) केले जाते व नेहमीच्या मिठाच्या द्रावणाने त्याचे पुनर्जनन करण्यात येते; मिठामुळे कॅल्शियम आणि मॅग्नेशियम विद्राव्य क्लोराइडच्या स्वरूपात निष्कासित होतात व त्याचवेळी मूळ अवस्थेप्रत झिओलाइट आणण्यात येते; ह्या आणि अतिरिक्त लवणांपासून ते खळबळून मुक्त करण्यात येते; आणि नंतर मृदुकारक कार्यान्वित करण्यात येतो. प्रक्रिया खालीलप्रमाणे निदर्शित केली जाते.



$$\left.\begin{matrix} Ca \\ Mg \end{matrix}\right\} Z \text{ २ } NaCl \rightarrow \left.\begin{matrix} Ca \\ Mg \end{matrix}\right\} Cl_2 + Na_2Z.$$

आयन विनिमय हे अपशिष्टावरील उपचारणाचे साधन म्हणून पाण्याच्या मृदुकरणाच्या रूढ पद्धतीची केवळ एक नूतन प्रयुक्ति आहे. जर योग्य मार्गाचा अवलंब केला तर द्रव्याच्या व पाण्याच्या संधारणाकरता ( conservation ) त्यात फार मोठी क्षमता आहे.

उदाहरणार्थ, धातूवर मुलामा देण्यातील अपशिष्टाच्या उपचारात (१३) विशिष्ट प्रयुक्तीकरता निवडलेल्या धनायनिक व ऋणायनिक रेझीनांच्या संस्तरातून खळबळण्याचे पाणी सोडण्यात येते आणि नंतर खळबळण टाकी मधून आयनीकरण नाहीसे केलेल्या पाण्याचे पुनर्भ्रमण (recycling) करण्यात येते क्रोमिक अम्ल द्रावणांतून संदूषक धातूंचे (१३) निष्कासन करण्याकरता अखंड परिचालन तत्वावर (continuous basis) ही पद्धत लागू करावी. त्यामुळे प्रक्रिया टाकीत शुद्ध क्रोमिक अम्लाचे द्रावण परत जाते. निकेल आणि तांब्याचा मुलामा देण्याच्या द्रावणांच्या बाबतीत, संदूषक धातु आणि ज्यावर मुलामा द्यावयाचा ती धातु, ह्या दोन्हीही धनायनिक असतात, आणि म्हणून त्या सर्व काढून घेण्यात येतात. जर कार्यवाहीचा उद्देश धातूंचे पुनःप्रापण हा नसेल तर आयन विनिमय ही केवळ संकेंद्रण पद्धति होईल व पुनर्जनित द्रावणावरील उपचारणाकरता काही साधने हुडकावी लागतील.

रेझिनांच्या संस्तरांच्या पुनर्जननाकरता वापरल्या जाणाऱ्या रसायनांवरही त्यांची विल्हेवाट करण्यापूर्वी विशेष उपचार करावे लागतात. रेझिनांच्या संस्तरांच्या परिचालनावर आणि कार्यक्षमतेवर सेंद्रिय द्रव्य आणि pH यांचा ठळक परिणाम होतो; काही रेझिनांतून सेंद्रिय द्रव्याचे अपक्षालन (leaching) झाल्यामुळे मुलामा दिलेल्या धातूंच्यावर हानिकारक परिणाम होऊ शकतो.

जेव्हा सर्वोत्तम दर्जाच्या पाण्याची आवश्यकता असते तेव्हा विखनिजीकरण (आयन विनिमय) अत्यंत उपयुक्त होते पण त्यात गुंतागुंतीच्या रासायनिक प्रक्रियांचा संबंध येतो; आणि म्हणून सर्व वेळी त्यांचे परिचालन व अधीक्षण काळजीपूर्वक केले पाहिजे. शिवाय कर्मचारी व उपकरणे यांना धोका असणाऱ्या रसायनांचा आयनविनिमय कार्यपद्धतीत कधीकधी उपयोग करण्यात येतो. बाष्पकाऐवजी आयनविनिमय व्यवस्थेची निवड करण्यापूर्वी ह्या गोष्टींचा विचार केला पाहिजे; कारण, जेव्हा प्रवाह मंद असतो तेव्हा असणाऱ्या परिस्थिती-सारख्या काही उदाहरणांत, बाष्पकसुद्धा काटकसरीचे होत नाहीत. सामान्यतः अपोहनाला खर्च कमी येतो आणि जेव्हा विशुद्ध संयुगाचे पुनःप्रापण अनिवार्य ठरते तेव्हा ते बाष्पन आणि आयनविनिमयाशी स्पर्धा करू शकते.

संयंत्राचे ताप संतुलन (heat balance) आणि अपेक्षित परिचालनाच्या परिस्थितीचे काटेकोरपणे मूल्यांकन केल्यानंतरच बाष्पनाचा वापर करावयाचे का विखनिजीकरण करावयाचे याचा निर्णय बुद्धिपूर्वक घेता येईल (१७). हे घटक, तसेच परिचालनास लागणारा खर्च यांचा विचार या दोन्हीपैकी कोणच्या एका व्यवस्थेला लागणाऱ्या भांडवली खर्चाच्या अनुषंगाने केला पाहिजे.

## ११–४. शेवाळे–

नायट्रोजन, फॉस्फरस, पोटॅशियम, क्लोराइड, कॅलशियम आणि मॅग्नेशियम यांच्यासारख्या खनिजांचा, आपल्या चयापचयात्मक (metobolic) प्रक्रियात, शेवाळे उपयोगी ठरते. अपशिष्ट-जलांतून खनिजांचे निष्कासन करण्याकरता शेवाळ्याचा वापर करणे अद्यापि प्रयोगावस्थेत आहे आणि बहूतेक अन्वेषणे वाहितमलाच्या नि.स्त्रावावर करण्यात आली आहेत.

कोष्टक ११–२.

हिरव्या शेवाळ्याची मूलघटनात्मक (elemental) रचना (क्रॉसच्या मते) (९).

| मूल घटक | | शुष्क वजन, % | |
|---|---|---|---|
| क्लोरेला | | | |
| | कार्बन | ५१.४ | – ७२.६ |
| | हायड्रोजन | ७.० | – १०.९ |
| | ऑक्सिजन | २८.५ | – ११.६ |
| सेनेडेस्मस | | | |
| | नायट्रोजन | ७.७ | – २.२ |
| | फॉस्फरस | २.० | – १.० |
| | सल्फर | ०.३९ | – ०.२८ |
| | मॅग्नेशियम | ०.८० | – ०.३६ |
| | पोटॅशियम | १.६२ | – ०.८५ |
| | कॅल्शियम | ०.०८ | – ०.००५ |
| | लोह | ०.५५ | – ०.०४ |
| | जस्त | ०.००५ | – ०.०००६ |
| | तांबे | ०.००४ | – ०.००१ |
| | कोबाल्ट | ०.००३ | – ०.००००००३ |
| | मँगेनीज | ०.०१ | – ०.००२ |

**कोष्टक ११–३.**

**मॅसॅच्युसेट्स मधील सरोवरे आणि तलांवातील सायनोफीसी आणि क्लोरोफीसीचीं उपस्थिति (occurrence) (२४).**

| रासायनिक विश्लेषण, ppm | | अनेकवेळा १०००/सें.मी.$^3$ च्या पेक्षा जास्त | | १००/सें.मी.$^3$ पेक्षा कमी | |
|---|---|---|---|---|---|
| | | सायनो फीसी | क्लोरो फीसी | सायनो फीसी | क्लोरो फीसी |
| रंग | ०–३० | २ | २ | ११ | ० |
| | ३०–६० | २ | २ | ३ | १ |
| | ६०–१०० | ३ | १ | ७ | २ |
| | १०० पेक्षा जास्त | ० | ० | १ | १ |
| क्लोराइडे (नेहमीपेक्षा जास्त) | ० | २ | १ | ३ | १ |
| | ०.१–०.३ | १ | १ | १० | ५ |
| | ०.४–२.५ | १ | ० | ९ | ६ |
| | २.५ पेक्षा जास्त | ३ | ३ | ० | ० |
| काठिण्य | ०.५ | ० | ० | ६ | ४ |
| | ५.१० | २ | १ | १० | ५ |
| | १०.२० | २ | १ | ५ | २ |
| | २० पेक्षा जास्त | ३ | ३ | १ | १ |
| अल्युमिनॉइड अमोनिया (विलीन) | ०–०.१०० | ० | ० | ४ | ३ |
| | ०.१ – ०.१५ | ० | ० | ६ | ४ |
| | ०.१५–०.२० | २ | २ | ७ | ३ |
| | ०.२० पेक्षा जास्त | ५ | ३ | ५ | २ |
| मुक्त अमोनिया | ० – ० ०१ | ० | ० | १० | ४ |
| | ०.०१–०.०३ | ० | ० | ८ | ५ |
| | ०.०३–०.१० | ३ | २ | ४ | ३ |
| | ०.१ पेक्षा जास्त | ४ | ३ | ० | ० |
| नायट्रेट्स | ० – ०-५ | १ | ० | १२ | ६ |
| | ०-०५–०-१० | ३ | २ | १० | ६ |
| | ०-१०–०.२० | १ | ० | ० | ० |
| | ०.२० पेक्षा जास्त | २ | ३ | ० | ० |

लेखकाच्या प्रयोग शाळेत (६) केलेल्या अशा एका अभ्यासात उपनगरी गृह-विकास उपचार-संयंत्राशी संबंध आला होता आणि त्यात प्राथमिक अवसादन, ठिबकणारे निस्यंदन, आणि स्थिरीकरण-कुंडांचा उपयोग केला होता. अवसादन आणि निस्यंदन करून जरी फॉस्फरसचे काहीही निष्कासन झाले नसले तरी कुंडातील शेवाळचाच्या सक्रीय वाढीमुळे फॉस्फेटचा अंश सुमारे ४२ टक्क्याइतका कमी झाला. अन्य खनिजांच्या संकेंद्रणाचे मापन केले नव्हते. स्थिरीकरण कुंडातील अतिसक्रिय शेवाळचाचे ऑस्वॉल्डने **क्लोरेला** आणि सेंडेस्मस असे वर्णन केले आहे, कारण ते अत्यंत कणखर असतात. ह्या दोन शेवाळचांच्या प्रकारांकडून न होणाऱ्या खनिजांच्या स्थिरीकरणाच्या सप्रमाणतेकरता (validity) ऋॉसने (९) त्यांच्या मूळ घटनात्मक रचना को. ११–२ मध्ये सादर केल्या आहेत.

को. ११ २ मधील शेवाळयुक्त रचनेवरून ज्या कोणच्याही द्रावणात शेवाळे वाढते त्यातून खनिजे किती प्रमाणात ग्रहण केली जातात ते दिसून येते वस्तुतः शेवाळचाचे अखंड होणारे प्रकाश-संश्लेषण (photo synthesis) त्याच्या संभाव्य वाढीस पुष्टी देण्यास पुरेसे होईल अशा वेगाने बऱ्याच कालपर्यंत ही अकार्बनिक संयुगे पुरविण्याकरता (अपशिष्टजल) संवर्धन माध्यमात (culture medium) असलेल्या क्षमतेवर प्रत्यक्षपणे अवलंबून असते. अकार्बनिक पोषकांच्या उपलब्धतेवर, तसेच अस्तित्वावर, उद्ग्रहण (uptake) (आणि म्हणून शेवाळचाची वाढ) अवलंबून असते असा पुरावा मिळतो. म्हणून पोषकाच्या अविलेयता व कलिल वैशिष्ठ्यांच्यामुळे शेवाळचाच्या वाढीत अडथळा येतो; अपशिष्ट-जलातील काठिण्य त्याला सहाय्यभूत होते. मॅसच्युसेट्समधील सरोवरे व तलाव यांच्यावर १९०० साली केलेल्या सांख्यिकी अभ्यासावरून असे दिसून आले कीं, कठीण जलाच्या पुरवठ्यातून मृदुजलातल्या-पेक्षा शेवाळचाची जास्त संख्या उपलब्ध झाली (को. ११–३). वोगनने (४) वॉशिंग्टन, सिएॅटल येथील वाहितमलावर तृतीयक (tertiary) उपचारणाची तरतूद करून फॉस्फरसचा उपयोग करून घेण्याच्या शेवाळचाच्या क्षमतेचा उपयोग केला होता. ह्या उपचारात शेवाळचाची सक्रियता व चुना, या दोन्हीचा वापर करण्यात आला आणि दुय्यम वाहितमल संयंत्रातील निःस्त्रावामधून ९० टक्क्यापेक्षा जास्त फॉस्फरस काढून टाकण्यात आला

## ११–५. विविध पद्धती –

अपशिष्ट जलातील काही अकार्बनिक द्रव्ये काढून टाकण्याकरता रासायनिक अवक्षेपण अगर रासायनिक किलाटनाचा उपयोग करण्यात आला आहे. उदाहरणार्थ, काही परिस्थितीत, अपशिष्ट-जलावर कॅल्शियम हायड्रॉक्साइडचा उपयोग करणे, नायट्रोजन आणि फॉस्फरस काढून टाकण्यात, उचित प्रमाणात परिणामकारक होते. विभिन्न किलाटकांचे सतत प्रयोग करणे आवश्यक आहे आणि ते कार्य लेखकाकडून सध्या चालू आहे.

## संदर्भ-


१- अॅम्बर्ग, एछ. आर, " दि इफेक्ट ऑफ न्यूट्रिअंट्स अपॉन दि रेट ऑफ स्टॅबिलायझेशन ऑफ स्पेंट सल्फाइट लिकर इन रिसीव्हिंग वॉटर्स," रासायनिक अभियंत्यांच्या अमेरिकन संस्थेची कार्यवाही, ८०, क्र. ८२१ (आक्टोबर १९५५).

२- मेरिल जी. आर., ए. आर. मॅकॉमर, आणि एछ. आर. मॅन्स्वर्जर, " अमेरिकन कॉटन हँडबुक," २ री आवृत्ति, १९४९.

३- बॅसेट, एछ. पी., " सुपर फिल्ट्रेशन बाय डायलायसिस," केमिकल अँड मेटॅलर्जिकल इंजिनिअरिंग, ४२, ५, २५४ (मे १९३८).

४- बोगन, आर. एछ, " पायलट प्लँट इव्हॅल्युएशन ऑफ ए टर्शरी स्टेज ट्रीटमेंट प्रोसेस फॉर रिमूव्हिंग फॉस्फरस फ्रॉम स्युवेज," सिअॅटल शहराकरता तयार केलेला अहवाल, डिसेंबर १९५९.

५- ब्राऊन, जी. जी. आणि इतर, **यूनिट ऑपरेशन्स**, न्यूयॉर्क, जॉन वायली अँड सन्स, इन्कॉ, १९५०, पा. ४८४.

६- ब्रायसन, जे. सी, " कंट्रोल ऑफ अल्गी थ्रू फॉस्फेट कंट्रोल," अप्रसिद्ध अहवाल, सायरॅक्यूज विश्वविद्यालय, सप्टेंबर १९६१.

७- ईनॉन, डी. जे, जर्नल, सोसायटी ऑफ दि केमिकल इंडस्ट्री. ५२, २४, १७७ T, (जून १९३३).

८- कर्क, आर. ई, आणि डी. एफ, ऑथमर," एन्सायक्लोपीडिया ऑफ केमिकल टेक्नॉलजी," न्यूयॉर्क, इंटरसायन्स पब्लिकेशन्स इन्कॉ. १९५०, पा. ५.

९- क्रॉस, आर. डब्ल्यू.," फोटोसिंथेसिस इन दी अल्गी," इंडस्ट्रियल अँड इंजिनिअरिंग केमिस्ट्री, ४८, ९, १४४९ (सप्टेंबर १९५६).

१०- ली, जे. ए., " **केमिकल अँड मेटॅलर्जिकल इंजिनिअरिंग,**" ४२, ९, ४८३ सप्टेंबर १९३५.

११– लोवेट, एल. ई., ट्रॅन्झॅक्शन्स इलेक्ट्रो केमिकल सोसायटी, ७३, १६३ (एप्रिल २७ १९३८ ).

१२– मॅक कॅब, डब्ल्यू , एल., आणि जे. सी. स्मिथ, "युनिट ऑपरेशन्स ऑफ केमिकल इंजिनिअरिंग," न्यूयॉर्क, मॅक् ग्रॉ हिल बुक कं. इन्कॉ., १९५६ पा. ५३०.

१३– "मेथड्स फॉर ट्रीटिंग मेटल फिनिशिंग वेस्ट्स," ओहायओ नदीघाटी जलस्वास्थ्य आयोग ( जानेवारी १९५३, पा ५८.

१४– नेमेरी, एन. एल., आणि डब्ल्यू. आर स्टील, "डायलायसिस ऑफ कॉस्टिक टेक्स्टाइल वेस्ट्स," दहाव्या औद्योगिक अपशिष्ट संमेलनाची कार्यवाही, पडर्यू विश्वविद्यालय" ( मे १९५५, पा. ७४–८१.

१५– नॉर्डेल, एस्केल, "वॉटर ट्रीटमेंट" न्यूयॉर्क : रिन्होल्ड पब्लिशिंग कार्पोरेशन, १९५१, पा. ३४१.

१६– ऑस्वॉल्ड, डब्ल्यू. जे., "फंडामेंटल फॅक्टर्स इन ऑक्सिडशन पाँड डिझाइन," जीवरसायनी अपशिष्ट उपचारण संमेलन, लेख क्र. ४४, मॅनहटन महाविद्यालय, एप्रिल, २०-२२, १९६०.

१७– पॉवेल, शेपर्ड, टी.," वॉटर कंडिशनिंग फॉर इंडस्ट्रीज," न्यूयॉर्क : मॅक् ग्रॉ हिल बुक कं. इन्कॉ., १९५४, पा. २१४.

१८– रोटमन, ई. टी., "व्हिस्कोज रेयॉन मॅन्युफॅक्चरिंग वेस्ट्स अँड देअर ट्रीटमेंट," वॉटरवर्क्स अँड स्युवेज, ९१, ८, २९५ ( ऑगस्ट १९४४).

१९– रॉटमन, ई. टी., "सदर्न पॉवर अँड इंडस्ट्री," ६२, ८. ८६ (ऑगस्ट १९४४).

२०– रुडॉल्फ्स, डब्ल्यू. स्युवेज वर्क्स जर्नल ९, ६, ९९८, ( नोव्हेंबर १९३७).

२१– "टेक्स्टाईल वेस्ट्स – ए रिव्ह्यू," न्यू इंग्लंड, आंतर राज्य जल प्रदूषण नियंत्रण आयोग, ३ डिसेंबर, १९५०

२२– कॅसी, एछ. डब्ल्यू , यू. एस. पेटंट २२२६, ३३७, १९४०.

२३– व्हॉलब्रॅथ, एछ. बी.,"अॅप्लाइंग डायलायसिस टू कोलॉइड–क्रिस्टलॉइड सेपरेशन्स," केमिकल अँड मेटॅलर्जिकल इंजिनिअरिंग, ४३, ६, ३०३ – ३०६ ( जून १९३६ ).

२४– व्हिपल, जी. सी," मायस्क्रॉपी ऑफ ड्रिंकिंग वॉटर," न्यूयॉर्क : जॉन वायली अँड सन्स, इन्कॉ., १९४८, पा. २१४–२१५.



# : १२ : विरघळलेले सेंद्रिय घनपदार्थ काढून टाकणे

अपशिष्ट जलांतून विलीन सेंद्रिय द्रव्य काढून टाकणे ही अपशिष्ट अभियंत्याने करावयाच्या महत्वाच्या कामगिऱ्यांपैकी एक असते, परंतु दुर्दैवाने ती अत्यंत अवघडांपैकी एक आहे. सामान्यत: अपशिष्टावरील उपचाराच्या ह्या अवस्थेकरता जैवी पद्धती अतिशय परिणामकारक ठरल्या आहेत, कारण अपशिष्टांतील सेंद्रिय द्रव्य गट्ट करून टाकण्यात जीवाणू निष्णात असतात आणि जीवाणुविषयक कार्यक्षमता जितकी जास्त असेल तितके जास्त सेंद्रिय द्रवाचे अपचयन ( reduction ) होते. तथापि, सूक्ष्म जीव, पर्यावरण परिस्थितीतील फरकांच्या संबंधात, फार लहरी ( temperamental ) व संवेदनशील असतात. बहुतेक जीवाणूंच्यावर प्रभाव पाडणारे मुख्य घटक, तपमान, pH, ऑक्सिजन तणाव ( ऑक्सिजनच्या संकेंद्रणाची पातळी ), विषाक्त तत्त्वे अथवा संयुगे आणि भोवतालच्या माध्यमातील अन्नाचा गुणधर्म व राशि (सेंद्रिय द्रव्य), हे असतात. म्हणून इष्ट अशा विशिष्ट जैवी जातींच्या बहुप्रसवनाकरता ( proliferation ) अनुकूलतम पर्यावरणी परिस्थिती आणणे ही अभियंत्याची जबाबदारी असते.

जैवी उपचाराचे अनेक प्रकार आहेत आणि विशिष्ट प्रकारच्या अपशिष्ट जलाकरता एकाची प्रयुक्ति केली जाते. सेंद्रिय द्रव्यावरील उपचारणाच्या काही विशेष कार्यपद्धती खाली दिल्या आहेत :

(१) ऑक्सिकरण कुंडांतील खांजणीकरण ( Lagooning )
(२) उत्प्रेरित अवमल उपचारण
(३) सुधारित वातन
(४) विसर्जित - वृद्धि ( dispersed growth ) वातन
(५) जीवाणु अवशोषण
(६) उच्चगति वातजीवी उपचारण ( संपूर्ण ऑक्सीकरण)
(७) ठिबकणारे निस्यंदक
(८) फवारणी सिंचाई
(९) आर्द्र ज्वलन

(१०) वात निरपेक्ष उपचारण ( digestion )

(११) निर्वातन ( cavitation ) योजना

(१२) खोल विहीरीतील अंतःक्षेपण ( injection ).

## १२–१. खांजणीकरण ( Lagooning ) –

सेंद्रिय द्रव्यांचा, तसेच अपशिष्ट जलांचा निरास करण्याचे ऑक्सिजन कुंडात खांजणीकरण करणे हे सामान्य साधन आहे. उपचाराच्या ह्या पद्धतीवर फारच थोडे संशोधन झाले आहे. उद्योगातील आपल्या अपशिष्टविषयक समस्येतून सुटका करून घेण्याची एक कार्यपद्धति म्हणून ह्या पद्धतीचा प्रथम विकास झाला संयंत्राच्या शजारी एका क्षेत्रात खोदकाम करून त्यात एका टोकाजवळ अपशिष्ट जले वाहून अगर पंप करून दुसऱ्या टोकातून ती संग्राही नाल्यात सोडून देण्यात आली. जागा किती उपलब्ध आहे, साठवण काल किती असणे इष्ट आहे व किती लागणार आहे, ह्यांवर खांजणांची खोली अवलंबून असते. खोलीच्या जैवी कार्यक्षमतेवर पडणाऱ्या प्रभावाकडे सुरवातीस फार कमी लक्ष दिले जात होते. वास्तविक, विलेय सेंद्रिय द्रव्याचे अपचयन सामान्यतः अपेक्षित नसे, किंबहुना ते वांछितही नसे, कारण ते गृहीत धरले जात असे आणि सेंद्रिय द्रव्याच्या अवक्रमणामुळे ( degradation ) ऑक्सिजनचे रिक्तिकरण ( depletion ) होते व त्याबरोबरच दुर्गंधीचा उपद्रव होतो असे मानणे संयुक्तिक ठरत असे. म्हणून अवमल खाली बसण्यासाठी आणि प्रवाहाचे समानीकरण करण्यासाठीच फक्त खाजणांचा उपयोग केला जात होता. परंतु आता खांजणांतील सेंद्रिय द्रव्याच्या स्थिरीकरणासंबंधी आधुनिक तंत्रामुळे नवीन उपपत्त्या लावण्यात येत आहेत.

आपल्याला माहीत आहे कीं, कुंडातील अपशिष्टांचे स्थिरीकरण अगर ऑक्सीकरण अनेक स्वाभाविक स्वयंशुद्धीच्या घटनांचा परिणाम असतो. त्यातील अवसादन हा पहिला टप्पा असतो. कुंडातील अंतःस्त्रवणांच्या ( influents ) सभोवतालच्या क्षेत्रावर अवसादनशील घनपदार्थ निक्षेपित होतात ( deposited ); अंतःस्त्रवणाच्या अभिकल्पनेवर क्षेत्राचा आकार अवलंबून असतो. विरघळणाऱ्या लवणांच्या क्रियेमुळे काही तरंगणारे आणि कलिल द्रव्य अवक्षेपित होते ( precipitated ) आणि नंतर सूक्ष्म जीवांच्यामुळे होणाऱ्या परिणामी अवसादाच्या विघटनामुळे ( decomposition ) त्यांचे निष्क्रिय अवशेषांत व विलेय सेंद्रिय पदार्थांत परिवर्तन होते नंतर आपल्या चयापचयात्मक प्रक्रियांकरता अन्य सूक्ष्म जीवाणूंना आणि शेवाळयांना ह्यांची गरज लागते.

**कोष्टक १२–१.**

**वाहितमलातील सेंद्रिय घटकांचे जैवी अवक्रमण–**

| विघटन होत असलेला पदार्थ | अणुजीवी एन्झाइम्सचा प्रकार | अंतिम उत्पादन: वातनिरपेक्ष विघटन ( anaerobic ) | अंतिम उत्पादन: वातजीवी विघटन ( aerobic ) |
|---|---|---|---|
| प्रथिने | प्रोटिनेज * | अमिनो अम्ले<br>अमोनिया<br>हायड्रोजन सल्फाइड<br>मीथेन<br>कार्बन डायऑक्साइड<br>हायड्रोजन<br>अल्कोहोल<br>सेंद्रिय अम्ले<br>फेनॉल<br>इंडॉल | अमोनिया, नायट्राइट्स नायट्रेट्स<br>हायड्रोजन सल्फाइड, सल्फ्युरिक अम्ल<br>अल्कोहोल<br>सेंद्रिय अम्ले<br>कार्बन डाय ऑक्साइड<br>पाणी |
| कार्बोहायड्रेट्स | कार्बोहायड्रेट्स * | कार्बन डाय ऑक्साइड<br>हायड्रोजन<br>अल्कोहोल्स<br>चरबीयुक्त अम्ले | अल्को-होल्स<br>चरबीयुक्त अम्ले<br>कार्बन डाय ऑक्साइड<br>पाणी |
| लिपिड्स (चरबी) | लिपेज * | चरबीयुक्त अम्ले,<br>कार्बन डाय ऑक्साइड<br>हायड्रोजन, अल्कोहोल | चरबीयुक्त अम्ले व ग्लिसरॉल<br>अल्कोहोल, कार्बनडाय ऑक्साइड<br>पाणी |

* एन्झाइम्सचे प्रकारच फक्त. ह्या अवक्रमणात डझनावारी एन्झाइम्सचा उपयोग करावा लागणे शक्य आहे.

सेंद्रिय द्रव्याचे विघटन हे वातजीवी (मुक्त ऑक्सिजनच्या उपस्थितीत जगणारे) अथवा वातनिरपेक्ष (मुक्त ऑक्सिजनच्या अनुपस्थितीत जगणारे) अशा दोन्हीही अणुजीवांचे ( micro-organisms ) कार्य असते. प्रदूषण भार अति उच्च असणाऱ्या अथवा तळाशी ऑक्सिजनचे अस्तित्व राहणार नाही इतक्या खोल कुंडात एकाचवेळी दोन्हीही प्रकारच्या अणुजीवांकडून सेंद्रिय द्रव्याच्या विघटनाचे सक्रिय कार्य होत असते. अनाग्रही ( facultative ) वातनिरपेक्ष या नांवाने ज्ञात असलेल्या तिसऱ्या प्रकारच्या अणुजीवांत वातजीवी अथवा वातनिरपेक्ष अशा दोन्हीही परिस्थितीत वाढ होण्याची क्षमता असते, आणि वातजीवी व वातनिरपेक्ष अवस्थांच्या दरम्यान असणाऱ्या संक्रमण ( transition ) विभागातील अपशिष्टांच्या विघटनास त्यांची मदत होते. सेंद्रिय द्रव्याचे संपूर्ण ऑक्सीकरण वातजीवी अणुजीवांमुळे होत असल्याने वातजीवी परिस्थिती टिकून राहणे इष्ट असते लिंबवर्गाच्या, खाटिक खाना व काही विशिष्ट कागद गिरण्यातील अपशिष्टांवर उपचार करण्याकरता वातनिरपेक्ष किण्वन ( fermentation ) प्रभावी झाले आहे. या उलट दुग्धव्यवसाय, सूतधंदा, यांतील व अन्य सेंद्रिय अपशिष्टांकरता वातजीवी जीवाणू अत्यंत परिणामकारक ठरले आहेत.




**आकृति १२–१. स्थिरीकरण कुंडातील शेवाळ्याची भूमिका (१).**

वाहितमलातील सेंद्रिय घटकांच्या अणुजीवी ( microbrial ) अवक्रमणाची स्थूल योजना को. १२–१ मध्ये दाखविली आहे. तसेच या कोष्टकात वातजीवी व वातनिरपेक्ष विघटनांतील फरकही दाखवून दिला आहे.

नैसर्गिक संतुलित वनस्पति-प्राणिचक्र ( plant-animal cycle ) शेवाळ्याकडून पूर्ण होत असल्याने स्थिरीकरण कुंडातील शेवाळ्यास फार महत्व असते. मोसमी असो अगर नित्याकरता असो, शेवाळ्याकडून $CO_2$, सल्फेटे, नायट्रेटे, फॉस्फेटे, पाणी, आणि सूर्यप्रकाश, यांचा वापर आपल्या स्वतःच्या कोशीय ( cellular ) द्रव्याच्या संश्लेषणाकरता करण्यात येतो

व त्यातून अपशिष्ट द्रव्य म्हणून मुक्त ऑक्सिजन निर्माण होतो. कुंडातील पाण्यात विरघळलेला ह्या ऑक्सिजन जीवाणू आणि अन्य अणुजीवांना आपल्या चयापचयी प्रक्रियांकरता उपलब्ध होतो. ह्या प्रक्रियांत, कुंडातील सेंद्रिय द्रव्याचे श्वसन (respiration) आणि अवक्रमण, यांचा अंतर्भाव असतो. म्हणून ज्यात (अ) अणुजीव पाण्यात विरघळलेल्या ऑक्सिजनचा उपयोग करतात व (आ) सेंद्रिय अपशिष्ट द्रव्याचे $CO_2$, $H_2O$, नायट्रेटे, सल्फेटे, फॉस्फेटे, यांच्यासारखी अपशिष्ट द्रव्ये निर्माण करण्याकरता, विघटन होते, व (इ) त्याचा प्रकाश संश्लेषणात अनुपचारित द्रव्ये म्हणून शेवाळचाकडून उपयोग केला जातो, आणि (ई) त्यामुळे उच्च कार्यक्षमतेत अणुजीव कार्यान्वित व्हावा म्हणून घटित ऑक्सिजनचा पुरवठा पुनः होतो व वातजीवी परिस्थिती टिकून राहते, असे हे चक्र पूर्ण केले जाते (आ. १२-१ पहा).



आकृति १२-२. त्वरित ऑक्सीकरण करण्यात येणाऱ्या प्रायोगिक-संयंत्र द्रोण्या (२१).

तथापि, जेव्हा शेवाळचाचा नाश होतो तेव्हा कुंडावर दुय्यम सेंद्रिय भारण लागू होते. त्याच्या या उणीवेचा उल्लेख करणे आवश्यक आहे. दुसरा तोटा मोसमी असतो. तो म्हणजे हिवाळचात शेवाळचाचा प्रभाव कमी पडतो.

हिवाळचातील महिन्यांत बर्फ व हिम आवरणामुळे स्थिरीकरण प्रक्रियेत खालील अडथळे येतात :

१) कुंडात सूर्यप्रकाशाच्या प्रवेशास प्रतिबंध होतो व त्यामुळे विद्यमान शेवाळचाचा आकार आणि संख्येत घट होते. सूर्यप्रकाशाच्या अभावामुळे शेवाळयाचा आवश्यकतया नाश होतोच असे नाही, ( अनाग्राही रासायनी-कार्ब पोषी ( chemo-organo-trophs ) म्हणून ज्ञात असलेल्या शेवाळयाची अंधेरातसुद्धा चयापचयी प्रक्रिया चालू राहते ), पण सूर्यप्रकाश नसताना वाढणाऱ्या शेवाळचामुळे फारच थोडा ऑक्सिजन मुक्त होतो अथवा अजिवात मुक्त होत नाही.

२) वाऱ्यामुळे होणाऱ्या मिश्रण आणि पुनर्वातन क्रियेस प्रतिबंध होतो.

३) वातावरण—जलगतिज साम्यक्रियेमुळे ( atmosphere water-dynamic equilibrium phenominon ) होणाऱ्या पुनर्वातनास प्रतिबंध होतो.

४) जर ही परिस्थिती बराच काळ तशीच टिकून राहिली तर त्याचा परिणाम वातनिरपेक्ष अवस्था निर्माण होण्यात होतो.

ह्या घटकांमुळे हिवाळचात कुंड अगर खांजणाची कार्यक्षमता कमी होण्याची प्रवृत्ति निर्माण होते. वाहितमलाचे ऑक्सीकरण होत असताना उच्चगति कुंडातील प्रक्रियेचे हर्मन आणि ग्लॉयना यांनी खालीप्रमाणे वर्णन केले आहे, आणि खनिजांनी घेतलेल्या भागाकडे दुर्लक्ष केले आहे :



$$C_{11}H_{20}O_7N + 14O_2 + \overset{+}{H} \rightarrow 11CD_2 + 13H_2O + \overset{+}{NH_4}.$$

खांजणांचा प्रथम उपयोग करणाऱ्या उद्योगांपैकी सीलबंद डबे उत्पादनाच्या एका कारखान्यात लवकरच असे आढळून आले कीं वातजीवी परिस्थिति द्रोण्यांत टिकविणे कठीण असते; अशीच परिस्थिती अन्य उद्योगांतही अनुभवास आली. जेव्हा कारखान्यांना असे कळून आले कीं, खांजणात जैवी अवक्रमण घडून येते तेव्हा त्यांनी ऑक्सीकरणास उत्तेजन देण्याचे व ते नियंत्रित करण्याचे प्रयत्न केले, आणि अशा खांजणांना अपशिष्ट—ऑक्सीकरण द्रोण्या असे संबोधण्यात येऊ लागले.

अत्यंत आधुनिक ऑक्सीकरण द्रोण्यांतील पाण्यांची खोली जास्तीत जास्त चार फूट असते व त्या अविरत-प्रवाह तत्वावर चालतात. जैवी ऑक्सीकरण व्हावे म्हणून जवळजवळ उदासीन pH, पर्याप्त ऑक्सिजन संकेंद्रण, आणि पुरेशी पोषक खनीज द्रव्ये द्रोणीत सतत राहतील असा अभियंत्यांचा प्रयत्न असतो. pH मूल्यात बदल करण्यासाठी रासायनिक उदासीनीकारकांचा उपयोग करण्यात येतो आणि अवरोधन काल कमी करून व उथळ द्रोण्या वापरून ऑक्सिजनचे पुरेसे संकेंद्रण राखण्यात येते. जैवी क्रिया जलद होण्यासाठी जरुरीप्रमाणे खनिज-लवण पोषक कधीकधी मिसळण्यात येतात. BOD च्या निष्कासनाची व्याप्ति किमान १० टक्क्यापासून ६० ते ९० टक्क्यांइतकी उच्च असते.

एका संपूर्ण व मनोरंजक अभ्यासात लेखकाने हवेवर आधारित ऑक्सीकरण कुंडावर, दर एकर क्षेत्रातील अपशिष्ट जलात BOD चे १३० पौंड उन्नत भारण असताना त्याच्यावर उपचारण केले. अशी तुलनेने उच्च भारणे असताना BOD त ऑगस्टमधील ८७.७ टक्क्यापासून जानेवारीत ५३ टक्क्यापर्यंतच्या व्याप्तीत घट झाली. घटीची वार्षिक सरासरी ६९.३ प्रतिशत् होती. आणखी एका प्रायोगिक संयंत्राच्या अभ्यासात ४ फूट खोल बंदिस्त अडथळे वापरून अगर ते न वापरता ८ फूट खोलीच्या द्रोण्या वापरून मध्य न्यूयॉर्क राज्यात उन्हाळ्याच्या क्रांतिक कालावधीत, BOD चे ८० टक्क्यांपेक्षा जास्त निष्कासन साध्य करता आले. त्यावेळी दररोज दर एकरी ३१२ ते ४६७ पौंड उन्नत भारण ठेविले होते. पांच समांतर प्रायोगिक संयंत्र-द्रोण्यांचे छायाचित्र आ. १२–२ मध्ये दाखविले आहे.

असे असले तरी ऑस्वाल्डचा (२४) निष्कर्ष असा आहे कीं, उच्च प्रमाणात भारण केलेल्या अशा द्रोण्यांत, विशेषत: जेव्हा मिथेनचे किण्वन झालेले नसते अगर तपमानामुळे ते मर्यादित होते, आणि पृष्ठीय थरांत शेवाळ्याचे प्रकाश–संश्लेषण होत नाही तेव्हा, सेंद्रिय अम्ले बनण्यास सुरवात होते आणि नंतर pH ची पातळी कमी होते व म्हणून कुंडातून हायड्रोजन सल्फाइड उत्सर्जित होऊ (emit) लागतो. तथापि, वर वर्णन केल्याप्रमाणे इतके उच्च भारण असतानासुद्धा लेखकाला दुर्गंधी जाणवली नाही; ऑस्वॉल्डच्यामते (२४) त्याचे कारण असे आहे कीं, जर मीथेनचे किण्वन तलनिक्षेपात होऊ लागले तर फारशी दुर्गंधी न सुटता BOD चे निष्कासन उच्च प्रमाणात प्राप्त करता येईल. त्याला असाही विश्वास वाटतो कीं, ज्या कुंडात प्रकाश–संश्लेषित ऑक्सिजनीकरण व मीथेनचे किण्वन ही दोन्हीही घडून येतात अशा (अनाग्राही) कुंडात दर दिवशी दर एकरी ५० पौंडाइतका BOD मर्यादित केला पाहिजे, कारण या दोन्हीही प्रक्रियांना लाभदायक न होणारी परिस्थिति कधीकधी निर्माण होते. लेखकास ह्या घटकेस तरी याबाबत सहमत होण्याची आवश्यकता वाटत नाही.

## १२-२. उत्प्रेरित-अवमल उपचारण-

घरगुती वाहितमलावरील तसेच मोठ्या संयंत्रातील काही थोड्या औद्योगिक अपशिष्टां-वरील उपचारांत उत्प्रेरित अवमल प्रक्रिया बरीच प्रभावी ठरली आहे. या प्रक्रियेत, जैवतया ( biologically ) सक्रिय वाढ होऊ लागते व त्यामुळे अपशिष्टातील सेंद्रिय द्रव्याचे अधिशोषण होते आणि ऑक्सीकरण-एन्झाइम व्यवस्थेमुळे $CO_2$, $H_2O$, $NO_3$ व $SO_4$ यांच्या सारख्या साध्या अंतिम पदार्थात त्यांचे परिवर्तन होते. कलिल व तरंगणावस्थेत असलेल्या द्रव्याच्या बऱ्याच अंशाचा अंतर्भाव असलेल्या वातनित ( aerated ) सेंद्रिय अपशिष्टांत स्वाभाविकपणे जैवी श्लेष्मांचा ( slimes ) विकास होतो, परंतु सेंद्रिय विलीन घनपदार्थांच्या कार्यक्षम निष्कासनाकरता त्वरित ( accelerated ) जैवी क्रियाशीलता लागते. त्यासाठी भरपूर संपर्क-पृष्ठाची तरतूद करणे आवश्यक असते व त्याकरता पुंजक्यांचे उच्च प्रमाणात संकेंद्रण व्हावे लागते पुंजके ( श्लेष्मस्थ-समूह ) ( zoogleal ) हे, जीव अन्न व श्लेष्म द्रव्यांचे जिवंत समूह असतात आणि ते जैवी जीवनाची उच्चप्रकारे सक्रिय असलेली केंद्रे असतात म्हणून " उत्प्रेरित अवमल " ही संज्ञा ! अगदी हळुवारपणे नियंत्रित केलेल्या वातावरणातील ऑक्सिजन आणि जिवंत जीव यांची त्यांना गरज असते.

क्रियाशील पुंजक्यांचा संपर्क काल आणि/अथवा सांद्रण यावर नियंत्रण ठेवून विविध प्रमाणात कार्यक्षमता प्राप्त करता येते. वातन द्रोण्यांच्या जलीय व्यवस्थेचे काळजीपूर्वक अभिकल्पन करून संपर्क काल नियंत्रित करता येतो. वातनाचा सरासरी काल ६ तास असतो. सामान्यतः सुमारे २० टक्क्या इतक्या दुय्यम अवसादित अवमलाच्या विशिष्ट राशीचे पुनराभिसरण करून सक्रिय पुंजक्याचे इष्ट संकेंद्रण टिकविता येते. अवमलराशी जास्त असल्यास BOD चे निष्कासन अधिक प्रमाणात होते आणि त्यामुळे उचित संतुलनासाठी अधिक हवा आणि अन्न ( सेंद्रिय द्रव्य ) यांची जरुरी निर्माण होते. तसेच " शिळ्या " ( old ) जड अवमलाची, खनिजीकृत होण्याकडे आणि ऑक्सिजनचा अभाव होण्याकडे, प्रवृत्ति होते आणि त्याचा परिणाम पुंजक्यांची सक्रियता कमी होण्यात होतो. " ताज्या " ( young ) हलक्या अवमल-पुंजक्यांची. उलट प्रवृति असते, म्हणून वाढीच्या " आयू " ( age ) सबंधी विचार करणे महत्वाचे असते

अनुकूलतम सक्रियतेकरता उत्प्रेरित अवमलाच्या गतिज विज्ञानात ( kineties ) ज्या गोष्टींची जरुरी आहे अशा परिस्थितीचे बुशने (३) खालीलप्रमाणे संक्षेपण केले आहे. वाढीच्या लघुगणकीय अवस्थेत ताजा पुंजकेदार अवमल; अवमलाच्या अपव्ययाचे नियंत्रण करून लघुगणकीय वृद्धीची परिस्थिती टिकविणे; जीवांचे अखंड भारण; ऑक्सीकर ( oxidative ) उपचारणातील कोणच्याही टप्प्यातील ( point ) वातनिरपेक्ष अवस्थांचे निरसन.

उत्प्रेरित–अवमल उपचारणाच्या सद्य:परिस्थितीचे हॅझेल्टाइन (६) ने खालील संक्षेपण केले आहे. वातन होत असलेल्या अपशिष्टातील तरंगत्या घनपदार्थाच्या दर पौंडास BOD चे ०.३ पौंडापेक्षा कमी भारण असल्यास निष्कासन सामान्यपणे ९० टक्क्यापेक्षा जास्त होते. जेव्हा ही भारणे दर पौंडास ०.५ पौंडा इतकी वाढतात तेव्हा कार्यक्षमतेचे भाकित करणे कठीण असते. सामान्यपणे, BOD च्या भारणाचा वातन टाकीच्या क्षमतेशी संबंध असतो; दर १००० घ. फुटास BOD चे सुमारे ३० ते ३५ पौंड मूल्य असलेल्या (अपशिष्टाच्या) संयंत्रात वातन होत असलेल्या २००० ppm इतक्या तरंगणाऱ्या घनपदार्थाबरोबर उपचारण करता येते.

सॉयरने (२७) उत्प्रेरित–अवमल प्रक्रियेच्या मर्यादांची खालील प्रमाणे यादी दिली आहे. टाकीच्या क्षमतेच्या दर हजार घनफुटांकरता सुमारे ३५ पौंडाइतके BOD चे भारण मर्यादित केले असल्याने तुलनेने दीर्घ अवरोधन काल लागतो आणि परिणामतः भांडवली निधी उच्च प्रमाणात लागतो; संमिश्र द्रवात प्रारंभिक ऑक्सिजनची मागणी उच्च असते, फुगीर अवमल निर्माण करण्याची प्रवृत्ति बनते; प्रक्रियेतून मध्यम दर्जाचा निःस्त्राव निर्माण करता येत नाही; उच्च BOD च्या अपशिष्टाकरता उच्च अवमल–पुनराभिसरण गुणोत्तर असावे लागते; अंतिम निर्मलकारकावरील घनपदार्थांची भारणे उच्च असतात; आणि ह्या प्रक्रियेत हवेची मोठ्या प्रमाणात गरज लागते.

अवमल सूचकांवर नियंत्रण ठेवून उत्प्रेरित अवमलाच्या रूढ संयंत्रातील अवमल फुगून जाण्याच्या काही समस्या दूर करण्याचा क्रॉसच्या (१३) प्रक्रियेत प्रयत्न करण्यात आला आहे. उत्प्रेरित–अवमल उपचारणाच्या रूढ कार्यपद्धतीसारखीच ही कार्यपद्धती असते व त्यात अवमलाकरता स्वतंत्रपणे पुनर्वातन करण्यात येते; मात्र काही पाचित्र अवमल (digester sludge), पाचित्र अधिपृष्ठ द्रव (digester supernatant), आणि उत्प्रेरित अवमल, क्रॉस जिला नायट्रोकारक वातन टाकी अशी संज्ञा देतो तीत, २४ तासांच्या कालापर्यंत एकत्रितपणे वातनित करण्यात येतात. अलिकडे द. दि. दर १००० घ. फुटास १७० पौंडाइतके BOD चे उच्च भारण वापरण्यात आले आहे आणि जवळजवळ ९० टक्के निष्कासन साध्य करता आले (१४).

व्हॉन डेर एम्ड (५) ने अशी नोंद केली आहे कीं, रोमाभियुक्त (ciliated) आणि कशाभियुक्त (flagellated) प्रजीवाणू (protozoa), तसेच जीवाणू (bacteria), उत्प्रेरित अवमलात सर्वत्र असतात. जेव्हा BOD चे भारण उच्च अथवा अति अल्प असते तेव्हा अस्तित्वात असणाऱ्या आक्सिजनची मात्रा कितीही असली तरी रोमाभींची जागा कशाभी

घेतात. जेथे वातनाचे कालावधी कमी असतात अथवा जेव्हा ऑक्सिजन केवळ अंशभूत असतो तेव्हा अवमलात फक्त जीवाणू असल्याचे दिसून येते.

## १२-३. सुधारित वातन-

सुधारित वातन अथवा कमीकमी होत जाणारे ( tapered ) वातन, अथवा टप्प्याटप्प्याचे वातन, ही उत्प्रेरित-अवमल उपचारणातील विचरणे आहेत. अधिशोषित सेंद्रिय द्रव्याचे ऑक्सीकरण होण्यासाठी जेव्हा अवमल अनुकूलतम अवस्थेत असतो तेव्हा, त्यात हवेचा कमाल पुरवठा करणे हे उद्दिष्ट असते. वातकाचे स्थान आणि पुरवलेल्या हवेची राशि वदलत जातात; अवमलातील घनपदार्थ आणि ऑक्सीकरण करावयाचे सेंद्रिय द्रव्य यांच्यावर ती अवलंबून असतात. ह्या प्रक्रियांकरता हवेची राशि कमी लागते आणि कमी अवरोधन काल पुरतो असा दावा करण्यात आला आहे, आणि परिचालनाच्या यंत्रणा व सिद्धांत उत्प्रेरित अवमलांच्या सारखेच असतात.




**आकृति १२-३. टप्प्याटप्प्यांनी करण्याच्या उपचारणाचा आयोजन आरेख** ( Schematic diagram )- **पहिला टप्पा, उच्च अवमल बीज** ४००० ppm; **दुसरा टप्पा, अवमल बीज** २००० ppm; **तिसरा टप्पा,** १००० ppm; **चौथा टप्पा,** ८०० ppm.

फक्त दोन अगर तीन तास वातनाचीं तरतूद करून साध्या वातनात येणाऱ्या समस्यांचे निरसन करण्यासाठी उच्चगति-प्रक्रियेचा वापर करणे हा केलेला एक प्रयत्न आहे. वातन टाकीत योग्य जागी ( सामान्यपणे प्रवेशद्वाराजवळ ) संकेंद्रित स्वरुपात उच्चप्रकारे उत्प्रेरित केलेल्या अवमलाचे पुंजके परतून लावण्याची ह्या प्रयत्नात आवश्यकता असते, त्यामुळे जीवाणु पश्चता ( lag ) कमी होते, जीवाणूंच्या लघुगणकीय वाढीत त्वरण होते, आणि नवीन कोशांच्या अधिशोषणासाठी भरपूर पृष्ठभागाची तरतूद होते. परिचालन कमी जास्ती करता येणे हा

ह्या प्रक्रियेतील मुख्य फायदा असतो. प्राथमिक नि:स्त्राव आणि परतवलेले अवमल बीज, यांचे हवे असलेले जवळजवळ कोणचेही गुणोत्तर आपणास प्राप्त करता येईल हे आ· १२–३ वरून दिसून येतें.

## १२–४. विसर्जित–वृद्धि वातन–

पुंजीकारक वार्ढीच्या अनुपस्थितीत विलीन सेंद्रिय द्रव्याच्या ऑक्सीकरणाकरता उपयोगात आणलेल्या प्रक्रियेस विसर्जित–वृद्धिवातन असे म्हणतात (९ ऑक्सिकरणाकरता लागणारे जीवाणू (बीज) अपशिष्टांचे वातन आणि अवसादन केल्यानंतरच्या अधिद्रवात उपस्थित असतात. ह्या अधिद्रवाचा एक भाग आत येणाऱ्या बिजारोपणाकरता राखून ठेवण्यात येतो. अनेक प्रकारच्या विलीन सेंद्रिय अपशिष्टांवर उपचार करण्यासाठी ही कार्यपद्धति यशस्वीपणे वापरण्यात आली आहे (८, १६, १७, १८, १९)· अवमल–बीजारोपणाशी संबंध असलेल्या काही समस्यांचा तीत निरास होतो हा तिचा फायदा आहे. विविध प्रकारच्या औद्योगिक अपशिष्टांमुळे अवमलाचे भरीव प्रमाणात संकेंद्रण करणे अवघड असते आणि अशांच्या बाबतीत (अवमलावर अवलंबून नसणारे) विसर्जित–वृद्धिवातनाचा सहजपणे स्वीकार करण्यात येतो. उत्प्ररित–अवमल प्रक्रियेतल्याप्रमाणे BOD चे तितकेच लघुकरण होण्यासाठी विसर्जित–वृद्धि-वातनात अधिक हवेची जरूरी असते. तथापि विसर्जित वृद्धि – वातनातील प्रारभिक BOD सामान्यपणे बराच उच्च असतो ही गोष्ट जेव्हा आपण विचारात घेतो तेव्हा निष्कासित झालेल्या BOD च्या दर पौंडाकरता लागणारी हवेची राशि उत्प्रेरित–अवमल प्रक्रियेतील राशीच्या इतकीच असते. मात्र BOD चे तितकेच लघुकरण प्राप्त करण्यासाठी लागणारा वातनाचा कालावधी सामान्यत: बराच दीर्घ (६ तासांच्या तुलनेने २४ तास) असतो. विसर्जित–वृद्धिवातनाच्या उपचारणात ऑक्सीकरणाने संपूर्ण निष्कासन करावे लागते मात्र उत्प्रेरित अवमल उपचारणातील वस्तुस्थितीप्रमाणे ते अधिशोषणाने अगर अंशत: ऑक्सीकरणाने केले जाते तसे नव्हे.

सामान्यत:, विसर्जित ( dispersed ) अवस्थेत असलेल्या अगर लहान गटातील संवर्धन माध्यमात ( culluri medium ) जीवाणूंची वाढ होते आणि उच्चगतीच्या जैवक्रियेकरता बीजारोपणाची आवश्यकता असते. ह्या गोष्टीची Heu kelekian ला (९) जाणीव असल्या-मुळे पुंजीकारकाऐवजी विसर्जित वृद्धिचा उपयोग करून संकेंद्रणित विलेय सेंद्रिय अपशिष्टांचे बीजारोपण करण्याची कल्पना त्याला प्रथमत: सुचली. जर अपशिष्टात फक्त विलेय द्रव्य असले तर पुंजीकारक वाढ करू नये. पेनिसिलीन आणि स्ट्रेप्टोमायसीनच्या अपशिष्टांवर प्रथम त्याने केलेल्या कार्यवाहीत (८, १०) विसर्जित–वृद्धिवातन प्रक्रियेसंबंधी त्याने पुढीलप्रमाणे दावा केला आहे.

१) संकेंद्रणित विलेय सेंद्रिय अपशिष्टांच्या उपचारणासाठी उत्प्रेरित अवमल पद्धतीं-च्यापेक्षा ती अधिक प्रमाणात स्वीकारली जाते कारण : (अ) संकेंद्रणित सेंद्रिय अपशिष्टाबरोबर फुगण्याची उत्प्रेरित अवमलाची प्रवृत्ति असते; (आ) विलेय अपशिष्टांतून उत्प्रेरित अवमल विकसित करणे अवघड असते.

२) जेव्हा विलेय आधार द्रव्यांचे ( substrata ) विघटन होते तेव्हा विसर्जित वाढीने थोडासाच अवमल तयार होतो.

३) जसजशी पेनिसिलीन आणि स्ट्रेप्टोमायसीनच्या अपशिष्टांच्या शक्तीत वाढ होते तसतशी BOD च्या लघुकरणाची टक्केवारी कमी कमी होत जाते, परंतु ज्या अपशिष्टात BOD ३००० ppm पर्यंत असतो त्यात ८० टक्के लघुकरणाची अपेक्षा असते. जेव्हा BOD, १००० ppm पेक्षा कमी असतो आणि अपशिष्टाचे वातन २४ तास करण्यात येते तेव्हा BOD चे लघुकरण अधिक होण्याची शक्यता असते.



आकृति १२–४. श्लेष्माच्या गुटिकेतील (capsule) (X 620) गोलाकार टोके असलेल्या शलाका.

४) अनुपचारित अपशिष्टापेक्षा निःस्त्राव अधिक गढूळ असतो आणि रंग नाहीसा झालेला नसतो.

५) रूढ जैवी–उपचार प्रक्रियांकरता पूर्वोपाय म्हणून ही प्रक्रिया वापरावी.

६) बीज द्रव्य सहज विकसित करता येते आणि माती अगर वाहितमलातून थोड्याच दिवसांत त्याचे अनुकूलन ( adaption ) करता येते.

७) दर ताशी दर गॅलनला २ ते ३ घनफूट हवेचे प्रमाण असताना अनुकूलतम परिणाम प्राप्त होतात. अधिक अपशिष्टांकरता हवेचे प्रमाण वाढवावे लागते.

८) अपशिष्टांतील प्रारंभिक pH क्रांतिक घटक असल्याचे दिसत नाही. ६.४ pH असलेल्या अनुपचारित अपशिष्टातील BOD, ७.२ pH ला समायोजित केलेल्या त्याच अपशिष्टातील BOD इतकाच लघुकृत होतो. वातन होत असताना pH ची वाढ होते.



आकृति १२-५ **कवचयुक्त व कवचरहित स्फिअरोटायलस सारखे जीव (X620).**

चिध्यांच्या आणि तागाच्या कागद गिरण्यांतील अपशिष्टाकरता उपचारणाची ही पद्धत फार उपयुक्त असल्याचे लेखकाला (२२) आढळून आले. विसर्जित–वृद्धिवातनाने केलेल्या ग्लूकोजच्या ऑक्सिकरणाच्या मूळ अभ्यासात पोषक मांसरसाचा ( broth ) उपयोग करताना दर मिलिलिटरमध्ये एकून ५ दशलक्ष जीवाणू असल्याचे लेखकांना (२३) आढळून आले. २४ तासांच्या वातनकालात आढळून आलेल्या जीवाणूंचे खालील दोन प्रमुख प्रकार होते :

१) विसर्जित, अखूड, जाड गोलाकार टोके असलेल्या शलाका; अंदाजी आकार, २ ते २.५ मायक्रॉन्स X १ मायक्रॉन. यांतील काही जीव बोटासारख्या गुटिकांच्या आकाराचे होते. जसजसा वातन काल वाढत गेला तसतसे श्लेष्मावगुंठित जीवाणूंच्या संख्येत आभासी ( apparent ) वाढ झाली (आ. १२–४ पहा).

(२) बऱ्याच वेळा कवचरहित स्वरुपात स्फेरोटायलस सारखे जीव अस्तित्वात होते (आ. १२–५ पहा). ६ तासांच्या वातनानंतर हे जीव विपुल प्रमाणात दिसू लागले आणि २४ तासानंतर त्याच्या प्रमाणात कमालीची आभासी वाढ झाली असे वाटले.




**आकृति १२–६. विसर्जित – वृद्धि – वातन व्यवस्था वापरण्याचा प्रथीन – ग्ल्यूकोज अपशिष्टांतील BOD च्या सरासरी लघुकरणावर, २४ तास वातन केल्यावर आणि अवस्थापन झाले नसताना, होणारा तपमापनाचा परिणाम–**

प्रथिने आणि कार्बोहायड्रेट्स (२९) या दोन्हींचा अंतर्भाव असलेल्या औद्योगिक अपशिष्टांच्या विसर्जित वृद्धिवातनाच्या उपयुक्ततेचा अभ्यास करताना ही अपशिष्टे ह्या प्रक्रियेत ऑक्सिकरणाच्या प्रभावाधीन असल्याचे लेखकांना आढळून आले. आ. १२–६ त दाखविल्या-

प्रमाणे तपमानात वाढ करून जैवी ऑक्सीकरणात वाढ करण्यात आली आणि तसे करताना pH च्या ९.५ पर्यंतच्या प्रारंभिक मूल्यामुळे अडथळा आला नाही. जेव्हा विलेय प्रथिन–कार्बोहायड्रेट–अपशिष्टांवर विसर्जित–वृद्धिवातनाने उपचार करावयाचे असतात तेव्हा भरपूर अवरोधन काल मिळेल असे संचांचे अभिकल्पन केले पाहिजे कारण (दर दिवशी दर पौंड BOD ला १०५० घनफूट हवा या ) क्रांतिक प्रमाणाच्यापेक्षा हवेचे जास्त प्रमाण झाल्यावर BOD च्या लघुकरणात वाढ होत नाही, असेही आढळून आले.

## १२–५. जीवाणु - अवशोषण–

एका उपकरण निर्माण करणाऱ्याने केलेल्या उच्चगति–जैवी ऑक्सीकरण प्रक्रियेचे जीवाणु अवशोषण हे व्यापारी नांव आहे, आणि घरगुती वाहितमलाकरता तिचा प्रामुख्याने उपयोग करण्यात येतो. उलिरच व स्मिथनी (३१) टेक्सासमधील ऑस्टिन येथे ती प्रथम विकसित केली. ती मुख्यतः उत्प्रेरित–अवमल प्रक्रियेत केलेली सुधारणा आहे आणि काही बाबतीत टप्प्याटप्प्याच्या वातन–प्रक्रियेशी जुळणारी आहे व ह्या अन्य दोन पद्धतीत लागणाऱ्या हवा व संयंत्राच्या जागेपेक्षा हिला सामान्यतः हवा व जागा कमी लागते. जीवाणु–अवशोषण प्रक्रियेत स्थिरीकरण–ऑक्सिजन–कुंडात अगर वातजीवी पाचित्रात पूर्वी तयार झालेल्या उत्प्रेरित अवमलात अनुपचारित अपशिष्ट अल्प काल (१५ ते २० मिनिटे) मिसळण्यात येते. हे उत्प्रेरित अवमल व अनुपचारित अपशिष्टाचे मिश्रण नंतर सुमारे २ तास अवस्थापित करून त्याचे निर्मलीकरण करण्यात येते. त्यानंतर अवस्थापित झालेला अवमल, ज्यात उत्प्रेरित–




आकृति १२–७. जैवी–अवशोषण प्रक्रियेच्या योजनेची व्यवस्था–

अवमलाचे पुंजके आणि अनुपचारित अपशिष्टातील अधिशोषित अपद्रव्य असते, त्याचे १ ते २ तास स्थिरीकरण-ऑक्सीकरण द्रोणीमध्ये तीव्र प्रमाणात जैवी ऑक्सीकरण होते. नंतर ते मिश्रण-टाकीत परत पाठविण्यात येते आणि पुन: अनुपचारित अपशिष्टाबरोबर मिसळण्यात येते; आणि अशा प्रकारे ही प्रक्रिया सतत होत राहते. निर्मलीकरण अथवा स्थिरीकरणापैकी कोणत्याही एकाचा वातनिरपेक्षा पचनाकरता अथवा निर्वात निस्यंदकात निर्जलीकरणाकरता वापर करून यंत्रणेतील अतिरिक्त अगर अपशिष्ट अवमल काढून घेता येतो (आ. १२-७ पहा)

**कोष्टक १२-२.**

**जीवाणु-अवशोषणाच्या परिचालनाची आधार सामग्री ( उल्रिच आणि स्मिथ यांच्या प्रमाणे ) (३१, ३२).**

| बाब | १९५१ (प्रायोगिकसंयंत्र) | | १९५५ (पूर्ण आकार) | |
|---|---|---|---|---|
| | माध्य | % निष्कासन | माध्य | % निष्कासन |
| अंत:स्त्रावातील BOD, ppm | २६४ | | ३०७ | |
| बहि:स्त्रावातील BOD, ppm | १९५ | ९२.५ | २० | ९३.४ |
| BOD भारण, पौंड/१००० फूट$^3$ | | | १४४ | |
| अवरोधन काल, तास | २.८३ | | ३ | |
| लागणारी हवा, दर घ. फू.स पौंड निष्कासित BOD | | | ६६५ | |
| तरंगते घनपदार्थ, अंत:स्त्राव, ppm | २२६ | | २२६ | |
| तरंगते घन-पदार्थ, बहि:स्त्राव, ppm | १३.९ | ९३.८ | १८ | ९२.१ |

उल्रिच आणि स्मिथ यांचा असा दावा आहे कीं, जीवाणु अवशोषणाला अन्य प्रक्रियांतल्या पेक्षा वातन-टाकीची क्षमता कमी लागते, कारण वास्तविक वातन अथवा अभिक्रियाशीलन (reactivation) संमिश्र द्रवामध्ये घडून येत नसून ते अवस्थापित आणि संकेंद्रणित अवमलात घडून येते. बाह्नितमल आणि परतलेल्या अवमलाचा संमिश्र द्रव बनलेला असल्याने

त्याचे फक्त थोडा वेळच मिश्रण करण्यात येते व मिश्रणाकरता कप्पाही लहान लागतो. १९५१ व १९५५ सालांकरता समर्पक प्रायोगिक संयंत्र आणि पूर्ण आकाराच्या (संयंत्रावरील) निष्कर्ष कोष्टक १२–२ मध्ये दिले आहेत. (३१, ३२).

## १२–६. उच्चगति वातजीवी उपचारण–

सेंद्रिय अपशिष्टांचे ऑक्सीकरण करण्याकरता गेल्या काही वर्षांत उच्चगति वातजीवी उपचारण (संपूर्ण ऑक्सीकरण) हे एक साधन म्हणून विकसित करण्यात आले आहे (२०). संपूर्ण ऑक्सीकरणाच्या प्रक्रियेत अपशिष्टाचे विचूर्णन (comminution), दीर्घकाल वातन (१ ते ३ दिवस), अवमलाचे अंतिम अवस्थापन आणि अवस्थापित अवमल वातन-टाकीत परत पाठविणे, या बाबींचा समावेश असतो. प्राथमिक अवस्थापन अथवा अवमलाच्या पाचनाची जरुरी लागत नाही पण वातनाला लागणाऱ्या वेळाची तरतूद होण्याकरता वातनाची मोठी व्यवस्था करावी लागते. संपूर्ण ऑक्सीकरण प्रक्रिया लहान प्रतिष्ठापनात विशेषेकरून उपयुक्त होते कारण त्यासाठी मोठ्याप्रमाणात देखभालीची जरुरी नसते. जरी अवस्थापनाचा काल कधीकधी तुलनेने कमी झाला तरी अवमल फुगण्याची अडचण फारशी भासत नाही. वस्तुतः ह्या प्रक्रियेतून निर्माण झालेल्या घनपदार्थांत बव्हंशी कमी बाष्पशीलता असते आणि म्हणून उच्च प्रमाणात राख प्राप्त होते. त्यामुळे अवस्थापनाचा वेग बराच जलद वाढतो. अवमल परत जाण्याचे कार्य सतत चालू असते आणि सामान्य उत्प्रेरित अवमल–प्रथेच्या तुलनेने ते अतिशीघ्र होते. उच्च गतीने (प्रवाहाच्या १०० ते ३०० प्रतिशत्) अवमल परतत असल्याने ही व्यवस्था सर्वकाल संपूर्णपणे वातजीवी राखण्यात येते. संमिश्र द्रवातील घनपदार्थांचे संकेंद्रण दीर्घ कालानंतर उच्च पातळीवर पोहोचते आणि ३००० ते ५००० ppm इतके संकेंद्रण कमी करण्याकरता अवमलाचा काही भाग फुकट जाऊ दिला जातो. फुकट जाणाऱ्या अवमलापैंकी काही नंतर साठवून ठेवण्यात येतो व टाकी बसविलेल्या वाहनातून अगर अन्य साधनांनी संयंत्रापासून दूर असलेल्या जागेवर तो सोडून दिला जातो. तो पर्यंत त्याचे आणखी संकेंद्रण करण्यात येते.

जरी उच्चगति वातजीवी उपचारणात अपशिष्ट अवमल कमी निर्माण होत असला तरी उत्प्रेरित अवमलाच्या रूढ संयंत्रात लागणाऱ्या हवेपेक्षा तिप्पट हवा यात लागते, हा त्यातील तोटा आहे, शिवाय निःस्त्रावातून काही पुंजके वाहून जातात.

ह्या उपचाराच्या आणखी एका प्रकाराला संपूर्ण मिश्रण व्यवस्था असे संबोधण्यात येते (१५). त्याच्या परिचालनात असे गृहीत धरले जाते कीं, जर अणुजीवांची वाढ स्थिर राहील अशा स्थितीत त्यांना ठेवले तर त्यांच्या कार्यक्षमतेत कमालीची वाढ होते, आणि

अपशिष्टाचा विशिष्ट गुणधर्म आणि संकेंद्रण याना ते अनुकूल असतात. जर (१) अणुजीव आणि अनुपचारित अपशिष्टे काटेकोरपणे सतत मिश्रित केली, (२) सेंद्रिय संकेंद्रण स्थिर ठेवले, व (३) अपशिष्ट-पोषण वेगाच्या इतक्या स्थिर वेगाने अणुजीवातून निःस्राव अलग केले तरच ही स्थिर-वृद्धि परिस्थिती टिकवता येते. आकृति १२–८ मध्ये एक नमुनेदार संपूर्ण–मिश्रण उत्प्रेरित–अवमल व्यवस्थेचे चित्रण केले आहे (१५). वातन टाकीच्या दर १००० घ. फु. स ऑक्सीकारक जीवांचे भारण ६० पौंड करणे, या उपचार पद्धतीत, शक्य होते.




**आकृति १२–८. संपूर्ण–मिश्रण उत्प्रेरित अवमल व्यवस्था–**
**( मॅक् किन्नी आणि इतरांच्या प्रमाणे (१५) ).**

## १२–७. ठिबकणारे निस्यंदन–

ज्या प्रक्रियेत जैवी संचावर अपशिष्टातील जीवाणूंच्यापासून निर्माण झालेल्या श्लेष्म वाढींचे ( प्राण्यांच्या स्वरुपात ) आवरण पडलेले असते तिला ठिबकणारे निस्यंदन असे नांव दिले आहे. विलेय आणि कलिल सेंद्रिय द्रव्यांचे, त्यांना लागू केलेल्या अपशिष्टातून ह्या वाढी अधिशोषण आणि ऑक्सीकरण करतात. जेव्हा अभियुक्तीचा वेग अतिशय (द. दि. १० ते ३० द. ल गॅं.) असतो व तो अखंड चालू राहतो तेव्हा निस्यंदकातील संस्तरांच्या पृष्ठभागावर गोळा झालेली बुरशी ( humus ) सतत झडून जाते ( sloughing ). ट्रॅप दगड, ग्रॅनाइट आणि चुना दगड यांच्या सारख्या फोडलेल्या खडीपासून निस्यंदकातील पृष्ठीय द्रव्य तयार

करण्यात येते. तथापि अलिकडे प्लॅस्टिकच्या चक्रासारखे अन्य पदार्थ फार प्रभावी झाले आहेत. आयतनाच्या दर एककाला लहान आकाराच्या द्रव्यामुळे अधिक पृष्ठभाग प्राप्त होत असल्याने, सक्रिय पटलास मोठा आधार मिळण्याकरता संपर्क द्रव्य लहान आकाराचे असले पाहिजे, पण वाढीमुळे यातील रंध्रे बुजून जातील अगर सांचलेल्या तरंगणाऱ्या द्रव्याने अगर झडून गेलेल्या पटलाने ते चोंदून जाईल इतका त्याचा आकार लहान असता कामा नये. १।। ते ३ इंच आकाराची फोडलेली खडी वापरण्यात येते व त्यातील लहानात लहान खडे माथ्यावर पसरण्यात येतात. ठिबकणाऱ्या निस्यंदक यंत्रणेतील अभिन्न अंगे, वितरण तोटया, संपर्क पृष्ठभाग, आणि तळातील निकासनाल्यांचे संच, ही असतात या कार्यपद्धतीचे संक्षिप्त स्वरूप खालीलप्रमाणे असते :

१) खडीवर अथवा संपर्कपृष्ठावर एक सक्रिय पृष्ठपटल तयार होते.

२) कलिल द्रव्य आणि श्लिषीय ( gelatinous ) द्रव्यांचे संकेंद्रण घडून येते.

३) जीवाणू आणि एन्झाइम्स, यांचे ह्या अधिशोषित पदार्थांवर आक्रमण होते आणि साध्या संयोगात त्यांचे परिवर्तन होते. त्यामुळे रासायनिक आणि जैवी साधनानी $NH_3$ मुक्त केला जातो आणि त्याचे ऑक्सीकरण होते व सावकास लघुकरण होते, $NO_2$ व $NO_3$ त वाढ होते आ. १२–९)

४) पृष्ठभागावर बुरशीसारखा पुंजीदार अवशेष अथवा अवमल गोळा होतो आणि जेव्हा तो फार जाड होतो तेव्हा तो झडून जातो अथवा पुनःस्थापित होतो ( ही जैवी निस्यंदकासह चालत असलेली सतत प्रक्रिया आहे). त्यां अवमलात अनेक प्रजीव संघ ( protozoa ) आणि बुरशी असते. निस्यंदकात हवा फुकून अथवा अपशिष्ट ठिबकू देऊन फवारणाऱ्या अपशिष्टातून ऑक्सिजनच्या भागाचा पुरवठा केला जातो. निस्यंदकात अवस्थापित होणाऱ्या अपशिष्टामुळे अंशतः निर्वातस्थिती निर्माण होते आणि निस्यंदकात

| | |
|---|---|
| $NH_3$ चे अधिशोषण आणि विमोचन | 2′ |
| $NO_2$ | 2′ |
| $NO_3$ | 2′ |




आकृति १२–९. निस्यंदकात घडून येणारे नायट्रोजनमधील फरक–

हवा ओढून घेतली जाते. पृष्ठभाग जितका मोठा तितकी शुद्ध करावयाच्या द्रवाशी संपर्क करणाऱ्या जैवी जीवांची संख्या वाढते; जितकी ही संख्या जास्त तितके द्रवाचे शुद्धीकरण जास्त होते. पृष्ठीय माध्यमातील दगडांच्या तुकड्यांचा आकार जितका लहान तितके अधिक शुद्धीकरण होते. मात्र अतिलहान कण असल्यास चोंदण्याची क्रिया वृद्धिगत होते.

ठिबकणारे निस्यंदक गाळण आणि ऑक्सीकरण अशी दोन्हीही कार्ये करतात असे थोडक्यात सांगता येईल.

बहुतेक औद्योगिक अपशिष्टांत मिळणाऱ्या पातळ पोषक द्रावणात वाढणाऱ्या जीवाणूंच्या राशीवर क्रियात्मक ( physiological ) कार्यात वाढ होण्यासाठी घनिष्ट संपर्क पृष्ठाची तरतूद करण्याचे महत्व निदर्शनास आणणारा झोबेल (३५) हा पहिला (शास्त्रज्ञ) होता. झोबेलच्या मते घनिष्ट पृष्ठभागाच्या प्रभावामुळे जैवी ऑक्सीकरणात वाढ होण्यास खालील चार घटना कारणीभूत होतात :

(१) घनिष्ट पृष्ठभागामुळे पृष्ठभागावरील अधिशोषणाच्यायोगे पोषकांचे आणि एन्झाइम्सचे संकेंद्रण घडून येणे शक्य होते.

(२) जीवाणूंचे कोश आणि पृष्ठभाग यांच्यामधील अंतराळ संकेंद्रण बिंदू म्हणून काम करतात; त्यामुळे एक्झोएन्झाइम्स व चयापचयोत्पाद ( metabolites ), यांच्यामधील कोशापासून दूर होणाऱ्या विसरणाची गती मंद होते. त्यामुळे अन्नपदार्थांचे पाचन व अधिशोषणास मदत होते

(३) ऑक्सीकरण–लघुकरण आणि अन्य भौतिकी-रासायनिक-प्रक्रियांकरता अनुकूलतम परिस्थिती निर्माण करण्याचे कार्य पृष्ठभाग व कोशामधील अंतराळ करते.

(४) पेरिफाइट्स अनिवार्य असणाऱ्या अणुजीवांच्या करता पृष्ठभाग, संयोजन बिंदू ( attachment points ) म्हणून कार्य करतात.

मामक वेगी अश्म–संस्तरीय ठिबकणाऱ्या निस्यंदकात, ज्या भूमीवर निस्यंदक बांधले आहे तिच्या द. चौ. फुटास सुमारे १०० चौ. फूट पृष्ठीय द्रव्याची तरतूद होते. ठिबकणाऱ्या निस्यंदकासाठी $\frac{L_D}{L} = 10^{-kD}$ हे निष्पादन ( performance ) समीकरण म्हणून वेल्झने (३३) प्रस्तावित केले आहे. येथे $L_D$ हा D या खोलीवर असणारा BOD चा निष्कासनीय अंश असतो, L हे एकूण निष्कासन असते, k हा निष्कर्षणाचा लघुगणकीय वेग असतो, आणि D

ही संस्तराची खोली असते. हे समीकरण आणि नाल्यातील सेंद्रिय द्रव्याच्या विघटनाचा एकाणुक ( monomolecular ) वेग (समीकरण) $\frac{Lt}{L} = 10^{-kt}$ यांच्या मधील साम्य वाचकांच्या लक्षात येईल.




आकृति १२-१०. प्रायोगिक नियंत्रक – निस्यंदक यंत्रणेचा आरेख (इंग्रॅम प्रमाणे (१२) ).

निस्यंदकातील संपर्ककाल, उत्प्रेरित-अवमल-प्रक्रियेच्या तुलनेने, सापेक्षतया कमी असतो आणि उपचाराच्या ह्या प्रकारासाठी ते निश्चितपणे फायदेशीर असते, याची अभ्यासकाने जाणीव ठेवावी निस्यंदकातील संपर्क कालासंबंधी आपल्या ज्ञानात हॉलंडने ( Howland ) (११) भर घातली आहे. खालीलप्रमाणे त्याने संपर्क काल अभिव्यक्त केला आहे :

$$T = \left(\frac{3v}{gs}\right)^{\frac{1}{3}} \frac{l}{q^{\frac{2}{3}}},$$

येथे l ही उतरत्या प्रतलाची लांबी असते, प्रतल क्षितिजाशी जो कोन करते त्या कोनाची s ही साइन असते. g हे गुरुत्वाकर्षणामुळे होणारे त्वरण असते, v ही पाण्याची गतिमितीय श्यानता ( Kinematic viscocity ) ( $^{M}/_{P}$ ) असते व q हा प्रतलाच्या दर एकक रुंदीकरता प्रवाहवेग असतो.

निस्यंदकातून निष्कासित केलेली ऑक्सीकरणशील सेंद्रिय द्रव्याची राशि प्रवाहाच्या कालाच्या अवधीवर प्रत्यक्षपणे अवलंबून असते असे हॉलंडने निर्दशित केले आहे. अनुकूलतम संपर्ककाल आणि कमाल कार्यक्षमता प्राप्त करण्याकरता व्यवहार्य अशा लहानात लहान माध्यम असलेल्या खोल निस्यंदकाची त्याने शिफारस केली आहे.




आकृति १२-११. एका टप्प्याचे (पुनराभिसरणासहित) ठिबकणारे निस्यंदक-

जरी काही संशोधकांनी प्रास्ताविक आणि परिचालन खर्च कमी व्हावे म्हणून उथळ निस्यंदकांची आणि मोठ्या खडीची शिफारस केली असली तरी हॉलंडच्या शिफारशीचे अनुसरण करण्याची आजकाल प्रवृत्ति आहे. कारण ठिबकणाऱ्या निस्यंदनाने BOD चे निष्कासन अधिक प्रमाणात व्हावे असे अभियंत्याना वाटते. चोंदून जाण्याच्या आणि शीर्षहानीच्या अडचणीमुळे संस्तराच्या खोलीवर आणि किती लहान दगड वापरता येईल, या गोष्टीवर मर्यादा पडते.

इंग्रॅमने (१२) ठिबकणाऱ्या आधुनिक निस्यंदकात खालील उणीवा असल्याचे सूचित केले आहे. निस्यंदकाना जागा फार जास्त लागते; त्यांच्या कार्यक्षमतेत ऋतुमानाप्रमाणे

करक पडतो; चोंदून जाणे आणि साठवण यांत समस्या निर्माण होतात; द्रवीय आणि सेंद्रिय भारणावर मर्यादा पडते; प्रायोजित वाहितमलाच्या शक्तीवर मर्यादा पडते.

ज्या निस्यंदनात खोल निस्यंदकांचा (१८ ते २४ फूट) वापर केला जातो अशा नियंत्रित निस्यंद या नांवाच्या ठिबकणाऱ्या निस्यंदन प्रक्रियेचा इंग्रॅमने प्रस्ताव केला आहे. (द. दि. २० द. ल. गॅलन आणि द. दि. द. एकर फुटास १३०० पौंड या सर्वसाधारण वेगाने भारण केलेल्या उच्चगति निस्यंदकातून अपेक्षा केलेले निष्कासन होत असताना), दोन वेळा किमान द्रवीय भारण आणि १ $\frac{1}{2}$ ते १० $\frac{1}{2}$ पट सेंद्रिय भारण ही नेहमीची प्रमाणे वापरून तो BOD चे ७० टक्क्याहून जास्त निष्कासन साध्य करू शकला. त्याचा प्रायोगिक निस्यंदक आ. १२–१० मध्ये दाखविला आहे.

अपशिष्टाच्या तपमानामुळे आणि निस्यंदकाच्या संपृक्तीच्या मात्रेमुळे नेहमीच्या प्रक्रिया–वेगात कधीकधी तफावती पडत असल्याचे बेन ( Bahn ) ने दाखवून दिले आहे. रँकिनला (२६) निस्यंदकातील निःस्त्रावाच्या पुनराभिसरणासंबंधी चिंता वाटते. अनेक उपचारण–संयंत्रांवर केलेल्या अभ्यासावरून त्याने असा निष्कर्ष काढला कीं, डोसाची मात्रा, निस्यंदकावरील भारण अथवा त्याच्या (अभ्यासाच्या व्याप्तीतील) खोलीच्या ऐवजी अनुपचारित अपशिष्ट जलाचा प्रवाह आणि पुनराभिसरण, यांच्या गुणोत्तरावर संपादणूक मुख्यतः अवलंबून असते. एकच निस्यंदक असणाऱ्या लहान संयंत्रात एका टप्प्याच्या निस्यंदकाची सर्वांत जास्त शक्यता असते पण मोठाल्या संयंत्रात, जेथे अनेक निस्यंदक वापरावे लागतात अथवा अधिक बलशाली अपशिष्टांवर उपचार करावे लागतात तेथे निस्यंदकांची दोन टप्प्यांची श्रेणीबद्ध ( series )




आकृति– १२–१२. दोन टप्प्यांची श्रेणीबद्ध–समांतर जीव–निस्यंदन प्रक्रिया.

समांतर योजना ( series-parallel ) केलेली असते आणि टाकी व निस्यंदकांच्या सारख्याच क्षमतेच्या आणि पुनराभिसरित द्रवाची तीच राशि असलेल्या एका टप्प्याच्या निस्यंदकापेक्षा त्यातून अधिक चांगली फलप्राप्ति होते. ह्या योजनांपैकी प्रत्येकीचा आरेख आ. १२–११ व १२–१२ त चित्रित केला आहे.

## १२–८. फवारणी सिंचाई–

सुवाह्य फवारणी सिंचाई व्यवस्थेच्या सहाय्याने शेतातील पिकांना पाणी पाजण्याच्या सुविख्यात पद्धतीची ही पद्धत रूपान्तरण ( adaption ) आहे. स्वयंप्रवृत्त ( self actuated ) फवारणी शीर्षाकडे सुवाह्य नलिकांतून अपशिष्ट पंप करण्यात येते. जलद जोडता येणाऱ्या नळांच्या जोडांनी सज्ज अशा हलक्या वजनाच्या अल्युमिनमच्या अगर जस्ती नलिका वापरण्यांत येतात. त्यामुळे सिंचाईक्षेत्राकडे नलिका नेणे, आणि त्या जलदी जोडणे शक्य होते. भूपृष्ठावर पावसाप्रमाणे अपशिष्टे प्रयुक्त करण्यात येतात. पृष्ठीय अपवाह होऊ नये म्हणून अगर आच्छादक पिकांना हानि पोहोचू नये पण अपशिष्ट जलाची राशि जास्तीत जास्त अवशोषित व्हावी हा ही पद्धत लागू करण्याचा उद्देश असतो. फवारणी–सिंचाई व्यवस्थेत खालील घटकांचा अंतर्भाव असतो :

१) फवारणी करावयाची जमीन,

२) अवशोषण आणि धूप थांबविण्याला मदत म्हणून वनस्पतियुक्त आच्छादक पीक,

३) यंत्रचलित चाळण संच,

४) उल्लोल कुंड ( surge tank ) अगर गर्ता,

५) सहाय्यक स्थिर चाळण,

६) फवारणी तोटीत लागणारा दाब विकसित करणारा पंप,

७) मुख्य नळ,

८) पार्श्व नलिका,

९) द. चौ. इंचास ३५ ते १०० पौंड दाबाखाली चालणारा स्वयंप्रवृत्त परिभ्रामी फवारक.

कमी उंच वाढणाऱ्या दाट गवतासारखे चांगले आच्छादक पीक आणि चांगल्याप्रकारे समतल क्षेत्र असल्यास ३ ते ४ इंच खोलीपर्यंत दर ताशी ०.४ ते ०.६ इंचाच्या प्रमाणात अपशिष्टाची प्रयुक्ति करता येते. वसंत ऋतु, उन्हाळा व शरद ऋतूपुरतीच ही कार्यपद्धति मर्यादित असते.




आकृति १२–१३. आर्द्र–ज्वलन–प्रक्रिया संचाची आयोजन व्यवस्था

## १२–९. आर्द्र ज्वलन–

(द. चौ. इं. स १२०० पौंड) उत्थापित दाबाखाली अभिक्रियक ( reactor ) भांड्यात जीवांनी भरलेले अपशिष्ट-जल आणि हवा पंप करण्याची ही कार्य पद्धति आहे. (आ. १२–१३). जरी जीवांश अपशिष्टांत विलीन झाले असले अगर तरंगत असले तरी, त्यांचे जलद ऑक्सीकरण होते. ह्या जलद ऑक्सीकरणामुळे प्रत्यक्ष संनयनाने ( convection ) पाण्यात उष्णता निर्माण होते, आणि त्याचे वाफेत अतिजलद ( flash ) परिवर्तन होते. अनेक औद्योगिक अपशिष्टांत अस्तित्वात असलेली अकार्बनिक रसायने ह्या वाफेतून स्वतंत्र कक्षात पुनःप्राप्त होतात ह्या प्रक्रिया सुरू करण्यापुरतोच बाहेरच्या साधनांनी उष्णता लागू करण्यात येते; त्यानंतर ती उष्णता टिकून राहण्याकरता स्वतःची सुमारे १२ ते २० टक्केच उष्णता लागते. उरलेली ८० ते ८८ टक्के उष्णता प्रक्रिया वाफ म्हणून अगर विद्युत् अथवा यांत्रिकी शक्तीकरता, टरबाइन्स फिरविण्यासाठी वापरता येते. जेथे वाफेची आवश्यकता असते व अशा अपशिष्टांवरील उपचारणाकरता उपकरणांवर खर्च करणे समर्थनीय होईल इतपत खर्चाचे असते आणि जेथे अपशिष्टातील अकार्बनिक रसायने पुनःप्राप्त आणि पुनरुपयोग करणे न्याय्य ठरेल इतकी

मूल्यवान असतात तेथे, ह्या कार्यपद्धतीला चांगला वाव आहे. जेव्हा अपशिष्टात सेंद्रिय द्रव्याची टक्केवारी किमान असते तेव्हाच आर्द्र ज्वलन प्रक्रिया स्वावलंबी होऊ शकते.

## १२–१०. वातनिरपेक्ष पाचन -

हवेच्या अनुपस्थितीत बंद भांड्यात सेंद्रिय द्रव्याचे ऑक्सीकरण करण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या प्रक्रियेस वातनिरपेक्ष पाचन म्हणतात. ही प्रक्रिया अत्यंत यशस्वी ठरली आहे आणि अंतिम विल्हेवाट करण्यासाठी वाहितमल अनुकूल करण्याकरता ( condition ) वापरण्यात आली आहे. (द्रव अपशिष्टांपेक्षा अवमलावर उपचार करण्याकरताच मुख्यत्वेकरून पाचन करण्यात येत असल्याने त्याच्या परिचालनाच्या उपपत्तीचे अधिक तपशीलवार वर्णन १३ व्या प्रकरणात दिले आहे.) तसेच यीस्ट, कापूस – सफेतीची – द्रोणी, खाटिकखाना, दुग्ध-व्यवसाय, आणि शुभ्र–जल (कागद गिरण्या), यांतील अपशिष्टांसारख्या विलेय सेंद्रिय द्रव अपशिष्टांतील BOD चे अपचयन ( reduction ) करण्यात ती प्रभावी असते. सामान्यत: वातजीवी प्रक्रियेपेक्षा वातनिरपेक्ष प्रक्रिया कमी परिणामकारक असतात; त्याचे मुख्य कारण हे असते कीं, जेव्हा वातनिरपेक्ष जीवाणू सेंद्रिय द्रव्याचे ऑक्सीकरण करतात तेव्हा त्यातून फारच थोडी ऊर्जा निर्माण होते. म्हणून वातनिरपेक्ष प्रक्रियांची गति मंद असते आणि दैनंदिन भारण कमी असावे लागते, आणि/अथवा दीर्घ अवरोधन काल ठेवावा लागतो. तथापि शक्तीची अगदी कमी जोड द्यावी लागत असल्याने अथवा मुळीच द्यावी लागत नसल्याने, परिचालनास खर्च फार कमी लागतो. जेव्हा द्रव अपशिष्ट अल्प प्रमाणात असते आणि त्यात हानिकारक (विषाक्त) द्रव नसते, आणि ऑक्सीकरण सहज झालेल्या विलीन सेंद्रिय द्रव्याची टक्केवारी उच्च असते तेथे, ह्या कार्यपद्धतीत वातजीवी पद्धतीपेक्षा निश्चित फायदे असतात. पाचित्रातील pH जवळजवळ उदासीन बिंदूच्या निकट नियंत्रित केला पाहिजे. औद्योगिक अपशिष्टांतील सेंद्रिय द्रव्याचे कार्बनडायऑक्साइड आणि मीथेन मध्ये परिवर्तन करण्यासाठी बस्वेलने (४) खालील ढोबळ समीकरण प्रस्तावित केले आहे :



$$C_nH_aO_b + \left(n - \frac{a}{4} - \frac{b}{2}\right)H_2O = \left(\frac{n}{2} - \frac{a}{8} + \frac{b}{4}\right)CO_2 + \left(\frac{n}{2} + \frac{a}{8} - \frac{b}{4}\right)CH_4.$$

युनायटेड स्टेट्समध्ये, यीस्ट, ब्युटॅनॉल ॲसेटीन, आसवनी, चिकी ( chewing gum ) आणि मांसाची पॅकबंदी करण्यासाठी, त्यांच्या अपशिष्टांवरील उपचारणाकरता वातनिरपेक्ष

उपचार संयंत्रे उभारण्यात आली आहेत. खाटिक खान्यातील अपशिष्टे वातनिरपेक्ष पाचनाला उत्तमप्रकारे प्रतिसाद देतात असे पीटेलला व इतरांना (२५) आढळून आले तथापि, १९५९ पर्यंत ग्रेटब्रिटनमध्ये पूर्णाकार वातनिरपेक्ष पाचन संयंत्रे अस्तित्वात नव्हती. युनायटेडस्टेट्समध्ये दररोज पाचित्राच्या द. घ. फु. स BOD ची भारणे ०.००३ ते ०.१९१ पौंडा इतकी असताना ह्या अपशिष्टांतून BOD त ६० ते ९२ प्रतिशत् घट साध्य करता आली. सेंद्रिय द्रव्यांच्या संकेंद्रणांची व्याप्ति १५६५ ते १७००० ppm BOD इतकी होती.




आकृति १२–१४. नमुनेदार निर्वातन योजना–

## १२–११. निर्वातन योजना–

अपशिष्टांच्या यांत्रिकी वातनाची निर्वातन योजना ही एक कार्यपद्धति आहे. संपूर्ण निर्वातक समूहात, अंत:स्त्रावी नळीला जोडण्यासाठी द्वारे ठेवलेली उदग्र–वायुप्रवाह नलिका (draft tube) अधिक चलित्राच्या पातळीवर बसविलेल्या एक समायोजी गुलिका–प्रघात–धारुकाचा (ball thrust bearing) आधार दिलेल्या बहुपखी (multi blade) प्रकाराचा परिभ्रमक समूह (rotor assembly), यांचा समावेश असतो. गंजरहित पोलादी दंडावर परिभ्रमक बसविलेला असतो व वायुप्रवाह नलिकेसह संपूर्ण संचाला संरचनात्मक पोलादी पुलाचा आधार दिलेला असतो. आ. १२–१४ त (२८) एक नमुनेदार अनुप्रस्थ छेद (cross-section) दाखविला आहे. परिभ्रमकाचा वेग विशिष्ट क्रांतिक वेगापेक्षा जास्त होताक्षणी पोकळ उदग्र नळीतून वातावरणातील हवा आंत खेचली जाते आणि अपशिष्टात विसर्जित होते. परिभ्रमक

आपल्या विक्षुब्ध मार्गात निर्वातनाचा एक विभाग निर्माण करतो आणि विरळ कमी दाबाच्या क्षेत्रात हवेचा शिरकाव होतो. धारण होत असलेल्या ( entrained ) हवेची राशि, परिभ्रमकाचा आकार व रूप, दर मिनिटास होणारे फेरे, आणि पाण्याची खोली, यांच्यावर अवलंबून असते. विनिर्मात्यांचा असा दावा आहे कीं, वातनाच्या रूढ उपकरणात हवेतील उपलब्ध ऑक्सिजन पैकी ५ टक्के ऑक्सिजन वापरता येतो, या उलट ह्या पद्धतीत किमान २५ टक्के हवेतील उपलब्ध ऑक्सिजन वापरता येतो. (सीलबंद डब्यांच्या कारखान्यातील अपशिष्टे आणि वाहितमलाच्या) किमान एका अपशिष्ट-उपचारण संयंत्रात द. दि. द. पौंड BOD ला ११० घ. फूट हवेचा पुरवठा होत असताना ९० टक्के BOD चे निष्कासन साध्य करता आले. समतुल्य १२००० लोकसंख्येकरता परिचालनाला द. दि. १२.८० डॉलर खर्च आला (२८). ह्या योजनेत अलिकडे केलेल्या सुधारणेत अपशिष्ट जलात (पण त्याच्या पृष्ठभागाजवळ) निमज्जित केलेल्या परिभ्रमकाने यांत्रिकी मिश्रण करण्यात येते. त्यामुळे शक्तीवरील खर्च कमी होतो, पण त्यावेळी वातन अगर मिश्रणांच्या कार्यक्षमतेत हानि झाल्याचे दिसून येत नाही. उच्च प्रमाणात सेंद्रिय द्रव्य असलेल्या अपशिष्टांवर दुय्यम उपचार करण्याची सर्वांत जास्त काटकसरीची ही योजना होईल असा विश्वास वाटतो.

## १२-१२. विहिरीतील अंतःक्षेपण (injection) –

विलीन सेंद्रिय द्रव्यासहित अपशिष्टांची खोल विहिरीत अंतःक्षेपण करून, जेव्हा नाल्यातील प्रवाह मंद असतो अगर बंद असतो अशा क्षेत्रात, विशेषतः अपशिष्टांना दुर्गंधी येत असताना अथवा ती विषाक्त असताना व त्यात अगदी अल्पप्रमाणात तरंगते द्रव्य असताना अथवा त्याच्या अनुपस्थितीत, यशस्वीपणे विल्हेवाट करता आली आहे. याकरता विचारात घ्यावयाच्या घटकांत, विहिरीची आवश्यक खोली, स्थलमंडलीय भूरचना ( surface geological formation ), अंतःक्षेपण दाब, आणि अपशिष्टांच्या राशी व वैशिष्ठ्ये, यांचा समावेश होतो.

### संदर्भ–


१– निनावी, "स्युवेज स्टॅबिलायझेन पाँड्स इन दि डाकोटाज," उत्तर व दक्षिण डाकोटांतील स्वास्थ्य विभाग आणि युनायटेड स्टेट्स स्वास्थ्य, शिक्षण, आणि कल्याण विभाग, यांचा संयुक्त अहवाल, १९५७.

२– बेन, व्ही. सी., "ट्रिक्लिग फिल्टर फॉर्म्यूलेशन्स," जैवी उपचार परिषद, मॅनहटन महाविद्यालय, संशोधनात्मक निबंध क्र. २६, एप्रिल २०–२२, १९६०.

३– बुश, ए. डब्ल्यू., आणि ए. ए. कॉलिन्स्के, "दि युटिलायझेन ऑफ कायनेटिक्स ऑफ ॲक्टिव्हेटेड स्लज इन प्रोसेस ॲंड इक्विपमेंट ऑफ डिझाइन," **इन बायॉलॉजिकल ट्रीटमेंट ऑफ स्युवेज ॲंड इंडस्ट्रियल वेस्ट्स.** न्यूयॉर्क: रीनहोल्ड पब्लिशिंग कॉर्पो., १९५६, पा. २७७.

४– बुस्वेल, ए. एम., आणि डब्ल्यू. डी. हॅटफील्ड, "ॲनेरोबिक फर्मेंटेशन्स," विज्ञप्ति ( bulletin ) क्र. ३२, इलिनॉइस राज्य शासकीय जल सर्वेक्षण विभाग, अर्बाना, इलिनॉइस, १९३९.

५– व्हॉन डेर एम्ड, डब्ल्यू., "आस्पेक्ट्स ऑफ हाय रेट ॲक्टिव्हेटेड स्लज प्रोसेस," विज्ञप्ति क्र. ३५, जैवी अपशिष्ट उपचार परिषद, मॅनहटन महाविद्यालय, एप्रिल २०, १९६०.

६– हॅझेल्टाइन, टी. आर., "ए रॅशनल ॲप्रोच टू दि डिझाइन ऑफ ॲक्टिव्हेटेड स्लज प्लॅंट्स," **इन बायॉलॉजिकल ट्रीटमेंट ऑफ स्युवेज ॲंड इंडस्ट्रियल वेस्ट्स.** न्यूयॉर्क: रीनहोल्ड पब्लिशिंग कॉर्पोरेशन १९५६ पा. २५७.

७– हर्मन, ई. आर., आणि ई. एफ. ग्लॉयना, "वेस्ट्स स्टॅबिलायझेन पॉंड्स," स्युवेज ॲंड इंडस्ट्रियल वेस्ट्स, ३०, ५, ६४६ (मे १९५८), ३०, ४, ५११ (एप्रिल १९५८).

८– Heukelekian, एछ., "कॅरेक्टरिस्टिक्स ॲंड ट्रीटमेंट ऑफ पेनिसिलीन वेस्ट्स," इंडस्ट्रियल ॲंड इंजिनिअरिंग केमिस्ट्री, ४१, ७, १५३५ (जूलै १९४९).

९– Heukelekian, एछ, "एरिएशन ऑफ सोल्यूबल ऑर्गॅनिक वेस्ट्स वुइथ नॉन फ्लॉक्यूलंट ग्रोथ्स," इंडस्ट्रियल ॲंड इंजिनिअरिंग केमिस्ट्री, ४१, ७, १४१२ (जूलै १९४९).

१०– Heulekian, एछ, "ट्रीटमेंट ऑफ स्ट्रेप्टोमायसीन वेस्ट्स," इंडस्ट्रियल ॲंड इंजिनिअरिंग केमिस्ट्री, ४१, ७, १४१२ (जूलै १९४९).

११– हॉलंड (Howland), डब्ल्यु. ई., "फ्लो ओव्हर पोरस मीडिया एॅज इन ए ट्रिक्लिंग फिल्टर," १२ औद्योगिक अपशिष्ट परिषदेची कार्यवाही, पर्ड्यू विश्वविद्यालय, १९५७, पा. ४३५.

१२– इंग्रॅम, डब्ल्यू टी., "ए न्यू ॲप्रोच टू ट्रिक्लिंग फिल्टर डिझाइन", अमेरिकन सोसायटी ऑफ सिव्हिल इंजिनिअर्सची कार्यवाही, संशोधनात्मक निबंध क्र, ९९९, खंड ८२, १९५६.

१३– क्रॉस, एल. एस., "दि यूज ऑफ डायजेस्टेड स्लज ॲंड डायजेस्टर ओव्हरफ्लो टू

कंट्रोल बल्किंग ऑफ अॅक्टिव्हेटेड स्लज," स्युवेज वर्क्स जर्नल, १७१६, ११७७ (नोव्हेंबर १९४५).

१४– क्रॉस, एल. एस.," ड्युअल एरिएशन अॅज ए रगेड अॅक्टिव्हेटेड स्लज प्रोसेस," स्युवेज अँड इंडस्ट्रीयल वेस्ट्स, २७, १२, १३४० (डिसेंबर १९५५).

१५– मॅक् किन्ने, आर. ई, जे. एम. सिमन्स, डब्ल्यू. जी. शिफ्रिन, व एम. वेझीना, "ए डिझाइन अँड ऑपरेशन ऑफ ए कंप्लीट मिक्सिंग अॅक्टिव्हेटेड स्लज सिस्टिम," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, ३०, ८, २८१ (मार्च १९५८).

१६– नेमेरो एन. एल., "डिस्पर्स्ड एरिएशन ऑफ कॉटन फिनिशिंग वेस्ट्स: II इफेक्ट ऑफ हाय pH अँड लोअर्ड एअर रेट," अमेरिकन डायस्टफ रिपोर्टर्स, ४६, १६, ५७५ (ऑगस्ट १९५७).

१७– नेमेरो, एन. एल," होल्डिंग अँड एरिएशन ऑफ कॉटन मिल फिनिशिंग वेस्ट्स," ५ व्या दक्षिण नागरी आणि औद्योगिक परिषदेची कार्यवाही, (एप्रिल १९५६, पा. १४९.

१८– नेमेरो, एन. एल., "ऑक्सिडेशन ऑफ कॉटन कियर वेस्ट्स," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २५, ९, १०६० (सप्टेंबर १९५५).

१९– नेमेरो, एन. एल., "ऑक्सिडेशन ऑफ एन्झाइम डीसाइझ अँड स्टार्च रिन्स टेक्स्टाइल वेस्ट्स," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २६, १० १२३१ (आक्टोबर १९५४).

२०– नेमेरो, एन. एल., आणि जे. सी. ब्रायसन," हॅंकॉक एअर फोर्स बेस वेस्ट स्टॅबिलायझेशन रिसर्च रिपोर्ट," सायरॅक्यूज विश्वविद्यालयाने युनायटेड स्टेट्स हवाई दलाला सादर केलेला अहवाल, मार्च १९६०.

२१– नेमेरो, एन. एल., "अॅक्सिलरेटेड वेस्ट ऑक्सिडेशन पाँड स्टडीज," तिसरी जैवी अपशिष्ट परिषद, मॅनहॅटन महाविद्यालय, एप्रिल २२, १९६०.

२२– नेमेरो. एन. एल., आणि डब्ल्यू रुडॉल्फ्स, "रॅग, रोप अँड जूट वेस्ट्स फ्रॉम स्पेशल्टी पेपर मिल्स, V ट्रीटमेंट बाय एरिएशन," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २४, ८, १००५ (ऑगस्ट १९५२).

२३– नेमेरो, एन. एल., आणि जे. रे, "बायोकेमिकल ऑक्सिडेशन ऑफ ग्ल्यूकोज बाय डिस्पर्स्ड ग्रोथ एरिएशन," बायॉलॉजिकल ट्रीटमेंट ऑफ स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स. न्यूयॉर्क : रीन पब्लिशिंग कॉर्पो., १९५५, प्रकरण १–७.

२४– ऑस्वॉल्ड, डब्ल्यू. जे., "फंडामेंटल फॅक्टर्स इन ऑक्सिडेशन पाँड डिझाइन," जैवी

अपशिष्ट उपचार परिषद, मॅनहटन महाविद्यालय, संशोधनात्मक निबंध क्र. ४४, एप्रिल २०, १९६०.

२५– पेटेट, ए. ई. जे., टी. जी. टॉम्लिन्सन, आणि जे. हेमेन्स, "दि ट्रीटमेंट ऑफ स्ट्राँग ऑरगॅनिक वेस्ट्स बाय एनेरोबिक डायजेशन," जर्नल ऑफ दि इन्स्टिटट्यूट ऑफ पब्लिक हेल्थ इंजिनिअर्स (जूलै १९५९), पा. १७० (ब्रिट).

२६– रँकिन, आर. एस., "पर्फॉर्मन्स ऑफ बायोफिल्ट्रेशन प्लँट्स बाय थ्री मैथड्स," अमेरिकन सोसायटी ऑफ सिव्हिल इंजिनिअर्सची कार्यवाही, ७९, स्वतंत्र क्र ३३६ नोव्हेंबर १९५३).

२७– सॉयर, सी. एन., "ॲक्टिव्हेटेड स्लज मॉडिफिकेशन्स," जर्नल ऑफ वॉटर पोल्यूशन कंट्रोल असोसिएशन, ३२, ३, २३३ (मार्च १९६०).

२८– शूल्झ, के. एल., आणि एछ. एस. फॉर्थ, "न्यू लो कॉस्ट सेकंडरी ट्रीटमेंट बाय न्यू कॅव्हिटेशन सिस्टिम," वॉटर अँड स्युवेज वर्क्स, १०२, २, ७४ (फेब्रुवारी १९५५).

२९– स्ट्रूझेस्की, ई. जे., आणि एन. एल. नेमेरो, "डिस्पर्स्ड ग्रोथ एरिएशन ऑफ प्रोटीन ग्ल्यूकोज मिक्श्चर्स," ९२ व्या औद्योगिक अपशिष्ट परिषदेची कार्यवाही, पर्ड्यू विश्वविद्यालय (मे १९५४) पा. १४५.

३०– टॅम्प्लेशे, जे. ए., "टोटल ऑक्सिडेशन ट्रीटमेंट ऑफ ऑरगॅनिक वेस्ट्स," स्युवेज अँड इंडस्ट्रीयल वेस्ट्स, ३०, ५, ६५२ (मे १९५८).

३१– उलिरछ, ए. एछ, आणि एम. डब्ल्यू. स्मिथ, "दि बायोसॉर्प्शन प्रोसेस ऑफ स्युवेज अँड वेस्ट ट्रीटमेंट," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २३, १०, १२४८ (ऑक्टोबर १९५१).

३२– ऊलिरच, आर. ए., आणि एम. डब्ल्यू. स्मिथ, "ऑपरेशन एक्स्पीरिअन्स वुइथ ॲक्टिव्हेटेड स्लज बायोसॉर्प्शन ॲट ऑस्टीन, टेक्सास," स्युवेज अँड इंडस्ट्रीयल वेस्ट्स, २९, ४, ४०० (एप्रिल १९५७).

३३– वेल्झ, सी. जे., "बेसिक लॉ फॉर दि परफार्मन्स ऑफ बायॉलॉजिकल फिल्टर्स," स्युवेज वर्क्स जर्नल, २०, ४, ६०७ (जूलै १९४८).

३४– "वेट कंबशन ऑफ वेस्ट्स," पॉवर इंजिनिअरिंग, क्र. १२, (डिसेंबर १९५३), पा. ६३.

३५– झोबेल, सी. ई., "दि इन्फ्लयुएन्स ऑफ सॉलिड सर्फेस अपॉन दि फिजिऑलॉजिकल ॲक्टिव्हिटीज ऑफ बॅक्टीरिआ इन सी वॉटर," जर्नल ऑफ बॅक्टीरिऑलजी, ३३, ८६ (जानेवारी १९३७).



# : १३ : अवमलातील घनपदार्थांची विल्हेवाट लावणे

कोणत्याही एका अथवा सर्व द्रव अपशिष्टांच्या उपचारणात तरंगत्या आणि विलीन घनपदार्थाचे अपशिष्टांतून निष्कासन करण्याच्या क्रियेस प्रधान महत्व असते. तथापि, एकदा का द्रवातून घनपदार्थ काढून टाकले की त्यांची विल्हेवाट करणे ही एक महत्वपूर्ण समस्या बनते. दुर्दैवाने घनपदार्थांच्या अंतिम विल्हेवाटीकरता काळ आणि पैसा खर्च करण्याऐवजी अपशिष्ट अभियंते त्यांच्या निष्कासनात जास्त वेळ आणि पैसा खर्च करतात. अनेक वेळा, अन्य प्रकारे योग्य अभिकल्पन आणि परिचालन केलेल्या अपशिष्ट उपचारण संयंत्रात घनपदार्थांच्या विल्हेवाटीची योजना अकार्यक्षम असल्याने अडचणी निर्माण होतात. जेव्हा घनपदार्थांच्या विल्हेवाटीची योजना अकार्यक्षम असते तेव्हा प्रवाही ( flow through ) उपचारण-संचात घन-पदार्थ साठून राहण्याची प्रवृत्ति निर्माण होते व जेव्हा ते पदार्थ साठून राहतात तेव्हा एकंदर निष्कासन-क्षमता कमी होण्यास सुरवात होते. म्हणून, अवमलाची हाताळणी योग्य प्रकारे करण्यात यावी म्हणजे सर्व अपशिष्टांच्या एकंदर उपचारण (क्षमतेत) वाढ होते. अवमलातील घनपदार्थांच्या संबंधात सामान्यपणे वापरल्या जाणाऱ्या बहुतेक पद्धतींचा खालील यादीत समावेश केलेला आहे :

१) अवमल पाचन
२) निर्वात निस्यंदन
३) निक्षालन ( elutriation )
४) शुष्कन संस्तर
५) अवमलाची खांजणे
६) झीमरमनची ज्वलन पद्धत
७) सिकरित ( atomized ) निलंबन
८) शुष्कन आणि भस्मीकरण
९) अपकेंद्रण
१०) अवमलाची पडावातून बाहतूक
११) जमीन भराव
१२) संकीर्ण पद्धती.

## १३-१. अवमल पाचन—

अवमलातील घन पदार्थाची अंतिम विल्हेवाट करण्याकरता करण्यात येणाऱ्या तयारीची पाचन ही सामान्य पद्धत आहे. प्राथमिक, दुय्यम आणि इतर द्रोण्यांत अवस्थापित झालेले

सर्व घनपदार्थ बंदिस्त हवाबंद पाचित्रात पंप केले जातात. तेथे ते शीघ्रतया वातनिरपेक्ष पर्यावरणात विघटित होतात. योग्य बीजारोपण, pH, घनपदार्थांचा गुणधर्म, तपमान, आणि सक्रिय पाचक बीज द्रव्याशी अनुपचारित घनपदार्थांच्या मिश्रणाच्या मात्रा, यांवर त्यांच्या विघटनाचा वेग मुख्यत्वेकरून अवलंबून असतो. अवमलातील घनपदार्थांचा सहज निकास होईल असे त्याना बनविणे, व सेंद्रिय द्रव्यातील काही भागाचे वायुरूप अंतिम पदार्थात परिवर्तन करणे, असे दुहेरी कार्य पाचनामुळे घडून येते.

हायड्रोलायटिक आणि मीथेन असे अणुबीजांचे दोन गट पाचनाचे कार्य करतात. वाहितमल आणि अपशिष्ट अवमलात हायड्रोलायटिक जीवाणू अधिक संख्येने उपस्थित असतात आणि त्यांचे पुनरुत्पादन जलद घडून येते; ते मृतोपजीवी ( saprophy ic ) अणुजीव असतात आणि गुंतागुंतीच्या सेंद्रिय पदार्थांच्यावर हल्ला करतात आणि साध्या सेंद्रिय संयुगात त्यांचे परिवर्तन करतात. ह्या मृतोपजीवी अणुजीवांत अम्ल निर्माण करणारे अनेक जीवाणू असतात; ते परमाणु वजन कमी असणारी असेटिक आणि ब्युटिरिक अम्लासारखी वसीय अम्ले ( fatty acids ), निर्माण करतात. त्यावेळी अवक्रमण ( degradation ) प्रक्रिया होत असतात. काही उदाहरणांत, अशी अम्ले इतकी निर्माण होतात की, ज्या पातळीवर सर्व जैवी क्रिया अवरुद्ध होते त्या पातळीपर्यंत pH खाली आणण्यास ती पुरेशी होतात.

सुदैवाने, मीथेन जीवाणूंचा दुसरा अणुजीवी गट अम्ल आणि मृतोपजीवी जीवाणूंनी बनविलेल्या अन्य अंतिम पदार्थांचा उपयोग करू शकतो. मीथेन निर्मितीकारक pH मधील फरकांशी संवेदनक्षम असतात, आणि ते pH च्या ६.५ ते ८.० ह्या संकुचित व्याप्तीत, ७.२ ते ७.४ हे अनुकूलतम मूल्य असताना, बहुप्रसवी ( prolifcrate ) बनतात. शिवाय, त्यांची संख्या अल्प असते आणि पुनरुत्पादन सावकास होते. परिणामतः, मीथेन जींवाणूंच्या मर्यादित राशीमुळे पाचन होऊ शकेल इतक्या सेंद्रिय अम्लाच्या राशीपेक्षा जास्त राशी तयार होऊ शकते. त्याचा परिणाम pH कमी होण्यात होतो, आणि मीथेन जीवाणूंची अधिक गैरसोय होईल अशी परिस्थिती निर्माण होते. जेव्हा हे घडून येते तेव्हा सामान्यपणे चुना मिसळण्यात येतो व साधारण परिस्थिती पुनः निर्माण होईपर्यंत पाचन क्रियेस काहीवेळ विश्रांती देण्यात येते.

दोन्ही प्रकारच्या जीवाणूंना योग्य पर्यावरण मिळण्याकरता, जीवांची संख्या, अन्नपुरवठा, तपमान, pH व अन्नाची सुलभता, यांच्या दरम्यान संतुलन असावे लागते. खालील घटक पाचक क्रियेच्या प्रभावीपणाचे मापक असतात. वायुनिर्मिति (राशि व दर्जा, दोन्हीही), घनपदार्थांचे संतुलन (एकूण बाष्पशील, आणि स्थिर), BOD, अम्लता आणि pH, बाष्पशील अम्ले, ग्रीज, अवमल वैशिष्ठे व गंध.

पाचनाने ५० टक्क्याइतकी अवमलाची राशि कमी होते. पाचनानंतर अवमल सुकविला जातो आणि / अगर जाळून टाकण्यात येतो, अथवा खत अगर जमीन भराव म्हणून वापरण्यात येतो.

पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे, सेंद्रिय द्रव्याचे किण्वन (पाचन) दोन टप्प्यांत होते: (१) जलविश्लेषक ( hydrolitic ) क्रिया, जिच्यात सेंद्रिय पदार्थांचे वसीय अम्ल आणि अल्कोहोलमध्ये परिवर्तन होते, आणि (२) कार्बन डाय ऑक्साइडची उत्पत्ति ( evolution ) आणि त्याचवेळी मीथेनमध्ये अपचयन ( reduction ) होते. (प्रत्यक्षात $CO_2$ चा व्यय होतो). कार्बोहायड्रेट्स, वसा, आणि प्रथिनांची खालील सामान्य समीकरणे प्रातिनिधिक आहेत :

कार्बोहायड्रेट्स :



$$(C_6H_{10}O_5)x + xH_2O \rightarrow x(C_6H_{12}O_6),$$



$$C_6H_{12}O_6 \rightarrow २\,C_2H_5OH + CO_2,$$



$$२\,CH_3CH_2OH \xrightarrow{+CO_2} २\,CH_3COOH + CH_4,$$



$$CH_3COOH \rightarrow CH_4 + CO_2.$$

चरबी :



अम्लांचे अल्फा ऑक्सीकरण :



$$4\,RCH_2\,COOH + 2\,HOH \rightarrow 4\,RCOOH + CO_2 + 3\,CH_4\,.$$

अम्लांचे बीटा ऑक्सीकरण :



$$2\,RCH_2\,COOH + CO_2 + 2\,HOH \rightarrow 2\,RCOOH + 2\,CH_3\,COOH + CH_4$$

$$CH_3\,COOH \rightarrow CH_4 + CO_2\,.$$

प्रथिने :









$$2\,RCH_2\,OH + CO_2 \rightarrow 2\,RCOOH + CH_4\,,$$



$$RCOOH \rightarrow CH_4 + CO_2\,.$$

एक परिकल्पना ( hypothesis ) अशी आहे कीं, एका कार्बन डाय ऑक्साइडच्या रेणुच्या ( molecule ) अपच्यनातून मीथेनचा एक रेणू निर्माण होतो, म्हणजेच कार्बनडायऑक्साइडची हायड्रोजन-स्वीकारक ( acceptor ) म्हणून क्रिया होते आणि खालील समीकरणातल्याप्रमाणे अल्कोहोलची हायड्रोजन-प्रदाता ( donor ) म्हणून क्रिया होते :



एथिल अल्कोहोल — कार्बनडायऑक्साइड

$$2\,C_2\,H_5\,OH + H_2\,O + CO_2 \longrightarrow 2\,CH_3\,COOH + CH_4 + 2\,H_2\,O\,.$$

हायड्रोजन प्रदाता — हायड्रोजन स्वीकारक — मीथेन—

आपणाला सहज असे दिसून येईल कीं, कार्बन डायऑक्साइड हा एक महत्वाचा अन्नघटक

आहे. संमिश्र संवर्धनात (culture), अन्य जीवांच्याकडून कार्बन डायऑक्साइड निर्माण होतो आणि म्हणून सल्फेट्स अथवा नायट्रेट्सपेक्षा तो अधिक उपलब्ध होतो. हायड्रोजनच्या स्थानांतरणाचा संबंध असलेल्या प्रक्रियांच्या साखळीचे किण्वन असे बुस्वेलने (७) वर्णन केले आहे.

अवक्रमण क्रियापद्धतीतील सर्वांत मंद प्रक्रिया मीथेनची निर्मिती ही असते. म्हणून ती पद्धति वेगनियंत्रक प्रक्रिया बनते. मिथेनच्या जीवाणूंची आवश्यक शरीरक्रियात्मक वैशिष्ठ्ये खालीलप्रमाणे असतात : १) ती अनिवार्यतः वातनिरपेक्ष असतात; २) त्यांना हायड्रोजन स्वीकारक म्हणून कार्बन डाय ऑक्साइड लागतो; ३) हायड्रोजन प्रदाता म्हणून ती कॅल्शियम अॅसेटेट, ब्युटिरेट, एथिल व ब्युटिल अल्कोहोलसारखी साधी सेंद्रिय आधार द्रव्ये वापरतात; ४) त्यांच्या नायट्रोजनची उत्पत्ति अमोनियातून होते; ५) ऊर्जा उपज मंद असल्याने त्यांचा विकास सावकास होतो; ६) ती बीजाणू (spores) बनवत नाहीत; ७) pH मधील बदलास ती अतिसंवेदनक्षम असतात.

बुस्वेलने (७) असा निष्कर्ष काढला आहे कीं, वसीय अम्ली आधार-द्रव्यात कार्बनच्या अणूंची जितकी जास्त टक्केवारी तितकी वायूतील मिथेनची टक्केवारी अधिक. बेकरने (२) मिथेनच्या किण्वनाची पुढील अनन्य लक्षणे प्रस्थापित केली आहेत :




**आकृति १३-१. पाचनक्रिया करून अनुपचारित वाहितमलातील बाष्पशील द्रव्याचा अपचयम (२१).**

१) संमिश्र अथवा समृद्ध संवर्धनात मीथेनचे किण्वन घडून येते आणि म्हणून मोठ्या प्रमाणात ते सतत टिकवता येते.

२) लिग्निन व खनिज तेलांच्या व्यतिरिक्त आधार द्रव्याच्या कोणच्याही प्रकाराला किण्वन लागू करता येते.

३) प्रक्रिया संख्यात्मक असते आणि तिच्यामुळे कार्बनडायऑक्साइड आणि मीथेनमध्ये संपूर्ण आधार द्रव्याचे परिवर्तन होते.

४) ० ते ५५°c या तपमानाच्या व्याप्तीत त्यावर विशिष्ट तपमानाची मर्यादा घातलेली नसते, परंतु एकदा का विशिष्ट तपमानाशी संवर्धन अनुकूलित ( acclimated ) झाले की दोन अंशाच्या पतनानेसुद्धा मीथेनच्या किण्वनात संपूर्णपणे बाधा येते व साठवलेली अम्ले अडथळे आणणारी बनतात.

५) निष्क्रिय घनपदार्थांच्या उपस्थितीस महत्व असते, व म्हणून औद्योगिक अपशिष्टात गवत अगर भुसा मिसळण्याची जरुरी असते.

६) जर आधार द्रव्याचे संकेंद्रण फार झालेले असेल तर बाष्पशील अम्ले साचून राहतात आणि विशेषत: जेव्हा मीथेनमध्ये नंतर होणाऱ्या परिवर्तनापेक्षा त्यांचे साठवण जास्त वेगाने होते तेव्हा किण्वनाचे अवरोधन ( inhibition ) होते. बाष्पशील अम्लाची पातळी ३००० ppm च्या खाली, २००० ppm च्या निकट राखण्याने (असलेल्या) परिस्थितीत मदत मिळते पण क्षार मिसळण्याने तिचे उपशमन ( alleviate ) होत नाही, कारण तो pH–परिणाम नसतो. ४००० ppm च्या पातळीवर खनिज लवणांचे अवरोधन सुरू होते आणि ५० ppm नायट्रेट नायट्रोजनामुळे त्याचा पूर्णपणे अवरोध होतो.

पाचनाने होणाऱ्या बाष्पशील घनपदार्थांच्या अपचयनाची टक्केवारी, अनुपचारित अवमलातील बाष्पशील द्रव्याच्या राशीवर काही प्रमाणात अवलंबून असते. श्लेंझला (२१) असे आढळून आले कीं, जेव्हा अनुपचारित अवमलातील बाष्पशील घनपदार्थ ५५ पासून ८० टक्क्यापर्यंत वाढले तेव्हा बाष्पशील द्रव्यांतील अपचयन ३५ पासून ८५ टक्क्यापर्यंत वाढले. आ. १३–१ मध्ये हे रेखाचित्राने दाखविले आहे.

नित्याच्या एकक–क्षमतेच्या गरजा कमी करता येतील, मात्र परिचालनावर नियंत्रण ठेवून पुढीलप्रमाणे कार्यवाही केली पाहिजे (२३) : १) अनुपचारित व पाचनशील घन-

पदार्थांचे सारखे मिश्रण राखण्याकरता टाकीतील अंतर्वस्तू ढवळल्या पाहिजेत; २) पाचनसंचाल अनुपचारित अवमल सतत मिसळला पाहिजे; ३) पाचित्रात मिसळण्यापूर्वी अनुपचारित अवमलाचे संकेंद्रण केले पाहिजे अथवा तो अगोदरच दाट झालेला असला पाहिजे.

## १३-२. निर्वात निस्यंदन–

अवमलातील घनपदार्थांचे निर्जलीकरण करण्याचे एक साधन आहे आणि घनपदार्थांची अंतिम विल्हेवाट करावयाची राशि कमी असल्याने हे (साधन) लोकप्रिय झाले आहे. त्याच्या "हाताळण क्षमतेतही" सुधारणा झाली आहे, कारण एरव्हीपेक्षा अवमल अधिक सुका असतो. मोठाल्या संयंत्रात निर्वात निस्यंदनाचा वाढत्या प्रमाणात वापर होत आहे. काही संयंत्रात रासायनिकतया अवक्षेपित आणि / अगर केवळ अवस्थापित अवमल निस्यंदित केला जातो तर इतरांत पाचन झालेल्या अवमलाचे निस्यंदन करण्यात येते. ह्या क्रियापद्धतीचे थोडक्यात वर्णन असे आहे : कोशांच्या मालिकेवर ठेवलेले सच्छिद्र नळकांडे आपल्या आंसाभोवती दर मि. स एक फुटापेक्षा थोड्याकमी परिघीय वेगाने फिरते, त्याचा खालचा भाग अवमल सुकविण्याच्या द्रोणीमधून जातो. नळकांड्याच्या आतील निर्वातस्थितीमुळे निस्यंदकाचा पृष्ठभाग द्रोणीतून जात असताना अवमलाचा एक थर उचलला जातो आणि त्यामुळे निर्वातनात वाढ होते. जेव्हा नळकांडे आपला $\frac{३}{४}$ फेरा पुरा करते तेव्हा, समुचित कोशांवर किंचितसा वायुदाब निर्माण होतो; त्यामुळे खुरप्यांना अगर बंधकांना, अवमल पातळ थरात प्रस्रावित व निष्कासित करण्यास मदत होते. कधीकधी, निस्यंदनापूर्वी अवमल-अनुकूलक म्हणून चुना, फेरिक क्लोराइड, यांच्या सारखी रसायने मिसळावी लागतात. दर ताशी द. चौ. फु स शुष्क घनपदार्थाच्या सुमारे २ ते १० पौंडाइतके निस्यंदन वेग असावेत. सुमारे २० फूट व्यासापर्यंत आणि वेगवेगळ्या लांबीचे निर्वात निस्यंदक उपलब्ध आहेत.

(अ) "सर्पिल निस्यंदक (coil filter)" हे अवमलाच्या निर्वात निस्यंदनाचे एक एकस्वकृत (patented) यंत्र आहे. हे विशिष्ट यंत्र इलिनॉइसमधील सेंट चार्लस येथील अवमल-उपचारण संयंत्रात १९५३ पासून वापरण्यात येत आहे. त्यातील निस्यंदक माध्यम मिश्र पोलादाच्या सर्पिल स्प्रिंगच्या २ थरांचे बनविलेले आहे. प्रत्येक स्प्रिंगची दोन्ही टोके पेच असलेल्या गुट्टयाने (plug) जोडून ती निरंत केलेली असते. नळकांड्याच्या प्रत्येक फेऱ्यानंतर ह्या स्प्रिंगा निस्यंदित वडीचे (cake) विसर्जन (discharge) करतात आणि नंतर आणखी एका फेऱ्याकरता भांड्यात प्रवेश करण्यापूर्वी त्या धुण्यात येतात. लठ्ठाच्या (corduroy) धाग्यासारखे लांब दिसणारे डाव्या बाजूकडील द्रव्य प्रत्यक्षात अवमलाचा थर असते (६).



आकृति १३-२ (अ) सर्पिल निस्यंदक




(ब) (अ) मध्ये सर्पिल निस्यंदकाचे आयोजन चित्र दाखविले आहे. (कॅम्लीन सँडर्सन कंपनीच्या सौजन्याने).

निस्यंदक माध्यमाचा दर्जा, अथवा नळकांड्यावर पसरलेले वाण यांना, निस्यंदकाची संपादणूक आणि आयुष्याच्या बाबतीत, महत्व असते. पूर्वीपासून विणलेल्या धाग्याचे निस्यंदन माध्यम विस्तृत प्रमाणात वापरण्यात आले आहे. विणलेल्या धाग्याच्या निस्यंदकावर घनपदार्थ राहण्याची भौतिक प्रक्रिया, किमान तीन क्रियांच्या संयोजनाने घडून येते : १) गाळण, जीत निस्यंदन माध्यमाच्या द्वारांपेक्षा मोठे कण निस्यंदकाला चिकटून राहतात; २) अधिशोषण, अथवा निस्यंदक माध्यमाच्या द्वारांपेक्षा लहान कणांचे निस्यंदकाकडे आकर्षण; ३) अनेक आकारांच्या कणांचे निस्यंदन, ज्यात पूर्वी निस्यंदित झालेल्या वडीसारख्या द्रव्याला ते कण चिकटून बसतात. निस्यंदनाच्या सुरवातीस पहिल्या दोन क्रिया चालू असतात, पण जसजशी "वडी" बनू लागते तसतसे घनपदार्थांच्या सर्वात जास्त राशीच्या निष्कासनास तिसरी क्रिया जबाबदार असते. परंतु त्यामुळे समस्या निर्माण होते कारण जर वडी पूर्णपणे काढून टाकली नाही आणि तंतूंचे निस्यंदक सतत स्वच्छ ठेवले नाहीत तर निस्यंदक कोंडून जातो अगर "आंधळा" बनतो.

टिलर आणि हुआँग, (२५) यांनी असा रिपोर्ट केला आहे की,' सच्छिद्र माध्यमातून निस्यंदन करण्यासाठी सैद्धान्तिक अथवा संशोधनात्मक माहितीची वानवा आहे. ह्या उणिवेची तीन कारणे आहेत : १) निर्वात निस्यंदन यंत्रणा गुंतागुंतीची असते; २) निस्यंदक संस्तरात आढळून आलेल्या अवक्षेपांची प्रायोगिक पुनर्निर्मिति करण्यात अडचण येते, व ३) संशोधकास पुरेशी उत्सुकता नसते. त्यानी असाही रिपोर्ट केला आहे कीं, जरी निस्यंदक संस्तरांतून वाहणारा प्रवाह नेहमी बहुधा श्यान असला तरी सदावी दाबामुळे बाधित होणाऱ्या निस्यदक माध्यमाची प्रवेश्यता व सच्छिद्रता, यांच्यामधील संबंधाबद्दल खात्रीलायक उपपत्ति विकसित झालेली नाही.

निर्वात निस्यंदन यंत्रणेचे आयुष्य वाढविण्यासाठी आणि परिचालनातील समस्या कमी करण्याच्या दृष्टोने एक महत्वाची पायरी, गंजरहित पोलादी सर्पिल स्प्रिंगच्या माध्यमाचा उपयोग करणे, ही आहे. **कॉइल फिल्टर** या नांवाचा ह्या प्रकाराचा प्रातिनिधिक संच आ. १३–२ (६) मध्ये दाखविला आहे.

## १३–३. निक्षालन ( elutriation )-

निस्यंदक धुवून निस्यंदनात सुधारणा घडवून आणण्याच्या कार्यपद्धतीस निक्षालन म्हणतात. अवमलाची क्षारता कमी करून– आणि त्यामुळे किलाटकाची मागणी कमी होऊन– अवमलाच्या निर्जलीकरणास ह्या कार्यपद्धतीची मदत होते व रसायने प्राप्त करण्यापूर्वी अवमल जलाचा जीवरासायनी दर्जा उन्नत करून हे केले जाते (३१). अवमलातील घनपदार्थ धुण्याच्या

खालील तीन व्यवहार्य पद्धती आहेत आणि त्या सर्वात वापरण्याची उपकरणे तुलनेने साधी असतात :

१) एक टप्प्याचे अवमल निक्षालन– यात एकावेळी एकाच वाटद्याचा संबंध येतो. ही भरणी आणि रिक्तीकरणाची कार्यपद्धति असते : अवसादन आणि निथळणाचे कार्य एकाच टप्प्यात केले जाते.

२) दोन टप्प्यांच्या निक्षालनात, निक्षालन झालेल्या अवमलावर पहिल्या टप्प्यातील उपाय पुनः करण्यात येतात; दुसऱ्या धावनाच्यावेळी ताजे पाणी वापरण्यात येते. लहान संयंत्रात दोन्ही टप्प्यांच्याकरता एकच अवसादन टाकी वापरण्यास हरकत नसते.




**आकृति १३–३. अवमलाच्या अनुकूलनाकरता लागणाऱ्या $FeCl_3$ वरील निक्षालनाचा परिणाम** (१०).

३) (दर दिवशी ६००० ते २४००० पौंड घनपदार्थांच्या) मोठ्या संयंत्रांत, पहिल्या टाकीशी शृंखलाबद्ध केलेल्या ( in series ) दुसऱ्या टाकीचा सामान्यतः उपयोग केला जातो. अशी दोन टाक्यांची व्यवस्था प्रतिधारा ( counter current ) धावनाकरतामुद्धा वापरता येते. ह्या व्यवस्थेत, ताजे पाणी दुसऱ्या टप्प्याच्या धावनाकरताच फक्त मिसळण्यात येते, आणि ह्या टाकीतील निथळलेले निक्षालित द्रव ( अथवा वरचे पाणी ) पहिल्या टाकीत येणाऱ्या अवमलात मिसळण्याकरता गुरुत्वाकर्षणाने वाहून जाते.

पाचनाचा परिणाम म्हणून होणाऱ्या रासायनिक खराबीची मात्रा क्षारतेच्या स्वरुपात सोयीस्करपणे मोजता येत असल्याने, ज्यातील पाण्याची क्षारता अवसादन आणि निथळण केलेल्या पाण्याने तनूकृत केली आहे अशा अवमलाची निक्षालित अवमल अशी व्याख्या करता येईल. निर्वात निस्यंदकात अवमलांच्या निर्जलीकरणाची सुरवात म्हणून निक्षालनाच्या

फायद्यात, अमोनियाचा दर्प नाहीसा होणे आणि अवमल–अनुकूलनात चुना वापरण्याची गरज न उरणे, यांचा अन्तर्भाव होतो. तसेच, निक्षालनाने दुय्यम पाचित्रांच्या क्षमतेची गरज कमी करता येते व त्यामुळे लहान संयंत्रात किफायतशीरपणे निर्वात निस्यंदकाचा उपयोग करता येत असल्याने विशेषप्रकारे मदत होते. जेंटरचा असा दावा आहे कीं, निक्षालनामुळे अवमल जल आणि त्यातील खनिजीकृत घनपदार्थ, यांचे गुणोत्तर कमी होते; त्यामुळे अनुकूलनाकरता लागणाऱ्या रसायनांत लक्षणीय घट होते. फेरिक क्लोराइडची होणारी बचत आ. १३–३ मध्ये निर्दशित केली आहे. जेंटरच्या आधारसामग्रीवर ही आकृति आधारित केली आहे (१०).

जेंटरने निक्षालन झालेल्या अवमलाची अंतिम क्षारता सूत्ररूपाने भाकित करण्याच्या पद्धतीची चर्चाही केली आहे. खराब अवमलाच्या मिश्रणाच्या एका राशीत मिसळलेल्या शुद्ध पाण्याची राशि "अ" आहे असे गृहीत धरून त्याने खालील संबंध प्राप्त केले आहेत :

अ + १ = संमिश्र अवमल आणि शुद्ध पाणी यांची एकूण राशी

१/अ + १ = मूळ राशीइतक्या धूत अवमलापर्यंत घनपदार्थ अवस्थापित होऊ दिले आणि मिसळलेले पाणी सायफन केले तर उरलेल्या खराब करणाऱ्या कारकाचे (agent) संकेंद्रण; आणि

$१/(अ+१)^2$ = जर हेच तनुकरण, अवसादन, व निथळणाचे तंत्र पुनः वापरले तर होणारे खराब करणाऱ्या कारकाचे संकेंद्रण.

म्हणून, जर दुसरे धावन जल नवीन पहिल्या धावनाकरता निथळले आणि दोन निक्षालन टाक्या प्रतिधारा–शृंखलाबद्ध (in series) केल्या तर अंतिम अवमलात राहिलेल्या खराब करणाऱ्या मूळ कारकाचा अंश $१/(अ^2+अ+१)$ इतका असतो. उदाहरणार्थ, जर ३००० ppm क्षारता असलेला उपचारित अवमल धुण्याकरणा शुद्ध पाण्याच्या चार राशी वापरल्या तर दोन्ही टाक्यांत प्रतिधारा–धावन केल्यानंतर निक्षालन केलेल्या अवमलात राहिलेली क्षारता

$$\frac{३०००}{(४)^2 + ४ + १} = १४३ \text{ ppm असेल.}$$

## १३–४. शुष्कन संस्तर–

अवमलातील आर्द्रता अवमल शुष्कन संस्तरातून काढून टाकण्यात येते व त्यामुळे अवमलाची राशि कमी होते. त्याची भौतिकीरासायनिक वैशिष्ठ्ये इतकी कमी होतात की ७५ टक्के आर्द्रता असलेला अवमल खोऱ्याने अथवा बगिच्यातील काट्याने हालविता येतो व जलरुद्ध आधान पात्रातून वाहून नेता येतो.

१२ ते २४ इंची भरड वाळू, चांगला पक्का कोळसा अथवा नजीकच्या कक्षातील भरडासुद्धा वापरून अवमल निस्यंदक संस्तर बनविलेले असतात. वाळूच्याखाली सुमारे १२ इंच भरड कंकर पसरलेला असतो आणि त्याच्या खाली ६ ते ८ इंच खुले असलेल्या कौलांच्या अधोनाल्या असतात. वरच्या ३ इंच कंकरात $\frac{१}{८}$ ते $\frac{१}{४}$ इंच व्यासाचे कण असतात. कौलारू अधोनाल्या मध्य ते मध्य ४ ते २० फुट अंतरावर बसवाव्या. अवभूमीच्या ( subsoil ) सच्छिद्रतेवर हे अंतर अवलंबून असते. कधीकधी अधोनालीतील द्रवाची विल्हेवाट करताना समस्या निर्माण होते; ह्या द्रवातील घटकांचे विश्लेषण केल्याशिवाय व सामान्यत: कोणच्यातरी स्वरुपात उपचार करण्यापूर्वी ते कधीही सोडून देऊ नये. एका मोठ्या निस्यंदक संस्तरापेक्षा अनेक लहान कोकोनी संस्तर अधिक चांगले काम देतात. हवामानाच्या परिस्थतीनुरूप कधीकधी हे संस्तर कांच अथवा प्लेक्सी कांचेने झाकून टाकण्यात येतात; त्यावेळी संस्तरावरील गरम आर्द्र हवेचे विसरण व्हावे ( disipate ) म्हणून संवातनाची ( ventilation ) तरतूद करावी लागते.

सामान्यप्रणे बोलावयाचे झाल्यास, वालुकामय शुष्कन संस्तरातून अवस्थापन झालेल्या अनुपचारित अवमलाचा चांगल्याप्रकारे निकास होत नाही. पाचन, निष्कालन, आणि/अथवा रासायनिक उपचारासारख्या पूर्वोपचाराची कोणच्यातरी स्वरुपात सामान्यत: गरज पडते. अंशत: पाचन झालेल्या अवमलाचे अधिक सहजतेने निर्जलीकरण होते (२२). तथापि जर पाचन झालेला अवमल दीर्घकाल साठवून ठेवला तर त्यातील निकासक्षमता कमी होते, कारण वायुप्लावित ( g s buoyed ) अवमलामुळे निस्यंदनी माध्यमातून जास्त आर्द्रता निघून जाते आणि त्यामुळे बाष्पन चक्रात घट होते. पाचित अवमलात घनपदार्थांचे एकूण अंश जास्त असल्यामुळे अवमल–संस्तरातून दरसाल अधिक प्रमाणात सुके घनपदार्थ काढून टाकता येतात.

शीघ्र शुष्कनाकरता साधारणपणे ८ इंच खोली ठेवणे इष्ट असते असे मानले जाते. अशी खोली आणि हवामान, यांवर शुष्कन काल अवलंबून असतो विपुल सूर्यप्रकाश, कमी पाऊसमान, आणि कमी सापेक्ष आर्द्रता असणाऱ्या प्रदेशात उदा. दक्षिणेकडील दीर्घकाल उन्हाळा असलेली विशिष्ट रुक्ष क्षेत्रे यांत स्वाभाविकच शुष्कन काल कमी लागतो. संस्तरावरील अवमल शुष्कन वेगावर वाऱ्याच्या वेगाचा परिणाम होतो. वस्तुत:, बाष्पनात वाढ करणाऱ्या सर्व घटकांचीही अवमलाचे शुष्कन करण्यास मदत होते. बाष्पनाच्या वेगाचे गणन करण्याकरता कॉक्सने (८) खालील समीकरण व्युत्पन्न केले (derive) आहे; ते अवमल – शुष्कनालाही लागू करता येईल :

$$E = \frac{(e_a - e_d + 0.0016\Delta T)}{(0.564 + 0.051\ \Delta T + w/300)},$$

येथे $E$ = दर दिवशी इंचात बाष्पन,

$e_a$ = हवेच्या तपमानातील संपृक्त बाष्पदाब,

$e_d$ = प्रत्यक्ष बाष्पदाब,

$\Delta T$ = हवेचे माध्य तपमान आणि पाण्याचे तपमान यातील फरक,

$w$ = वाऱ्याचा दर दिवशी मैलात वेग, असतात.

मेयरचे खालील सूत्रीकरणसुद्धा व्यापक प्रमाणात वापरण्यात येते :

$$E = C\,(V - v)\left(1 + \frac{w}{10}\right),$$

येथे, $E$ = वेळेच्या दिलेल्या एककाकरता इंचात बाष्पन,

$V$ = पाण्याच्या तपमानात, इंच पाऱ्यात संपृक्त बाष्पदाब,

$v$ = जमिनीपासून २५ फूट उंचीवरील वाऱ्याचा दर ताशी मैलात वेग,

$C$ = वापरलेल्या कालाच्या एककाप्रमाणे आणि पाण्याच्या खोलीप्रमाणे बदलणारा गुणांक, ( हा गुणांक ०.३६ पासून ०.५० पर्यंत बदलतो ).

बाष्पनावर शुष्कन वेग अवलंबून राहतोच, शिवाय केशाकर्षण क्रियेचाही त्याच्यावर प्रभाव पडतो. त्यामुळे अवमलाच्या खोलीतून बाष्पशील पृष्ठभागापर्यंत पाणी वर चढत जाते.

घरगुती वाहितमलातील अवमलाच्या बाबतीत, योग्य प्रकारे अभिकल्पन केलेल्या वाळूवर आधारलेल्या शुष्कन संस्तराच्या दर चौ. फुटावर दरसाल अंदाजे २० ते २५ पौंड शुष्क घनपदार्थांचे भारण करता येते असा अंदाज अभियंत्यांनी केला आहे. ह्या एकक-भारण अंदाजावर हॅझेल्टाइनने (१२) आक्षेप घेतला आहे आणि त्या ऐवजी त्याने "एकूण आधार भारण" सुचविले आहे. ह्या सूचनेत संस्तराच्या प्रत्यक्ष वापरात येणाऱ्या दर चौ. फुटावर ३० दिवसात लागू केलेल्या घनपदार्थांच्या पौंडातील संख्येचा विचार केलेला असतो. उदाहरणार्थ, जर द. घ. फु. स ६२.५ पौंड घनता असलेला, आणि ज्यात १८ प्रतिशत् घनपदार्थ आहेत असा अवमल १२ इंच खोल लागू केला आणि ४० दिवसानंतर काढून टाकला तर एकूण संस्तर भारण,

$$\frac{६२.५ \times ०.१० \times ३०}{४०} = ४.६९ \text{ पौंड/फूट}^2 / ३० \text{ दिवस} * \text{ होईल.}$$

* ओल्या अवमलाचे विशिष्ट गुरुत्व १.० आहे असे गृहीत धरले आहे.

एकूण संस्तर–भारण (Y) आणि लागू केलेल्या अवमलातील घनपदार्थांची टक्केवारी, यांच्यामधील सरलरेखा संबंध, निरनिराळ्या १४ संयंत्रावरून, १४ वर्षांपर्यंतच्या परिचालन कालाकरता पुरविलेल्या माहितीवरून, हॅझेल्टाइनने खालीलप्रमाणे विकसित केला आहे:

$$Y = ०.९६\, x - १.७५$$

एकूण संस्तर भारण Y, ० पासून १० पर्यंत बदलले आणि $x$ मध्ये ० ते १४ पर्यंत बदल झाला. तपमानानंतर, शुष्कन संस्तरातील अवमलातील घनपदार्थांचा अंश हाच संस्तराच्या संपादणुकीवर परिणाम करणारा अत्यंत महत्वाचा घटक असतो असा त्याने निष्कर्ष काढला. अवमलातून काढून टाकावयाचा आर्द्रतेची राशि हा अत्यंत महत्वाचा तिसरा घटक आहे.

## १३–५. अवमलाची खांजणे ( Lagoons ) –

अवमल साठविण्याकरता वापरण्यात येणाऱ्या नैसर्गिक अगर मातीच्या कृत्रिम द्रोण्यांना खांजणे म्हणतात. आर्थिक परिस्थितीमुळे ( पैसा व जमीन ) जेव्हा खांजणांचा वापर करण्याचे सुचविण्यात येते तेव्हा ती सूचना अमलात आणण्यात येते. कारण अवमलावर उपचार करण्याची ती एक तुलनेने कमी खर्चाची पद्धत आहे. तथापि, खांजणांचा उपयोग करण्याचा बेत करताना अनेक घटकांचा विचार केला पाहिजे : (१) विल्हेवाट करावयाच्या क्षेत्राचे स्वरूप आणि स्थलरूपरेखा; (२) लोकवस्तीच्या क्षेत्रापासून त्या जागेचे सान्निध्य; (३) हवामान विषयक परिस्थिति, विशेषत: प्रचलित वारा लोकवस्तीकडे वाहतो अथवा तिच्या विरुद्ध दिशेने वाहतो ते पाहणे; (४) मातीची परिस्थिति; (५) अवमलाची रासायनिक रचना : विषाक्तता व दुर्गंधीकारक घटकांचा विशेष विचार करावा लागेल; (६) भूपृष्ठीय अथवा भूम्यांतर्गत जलपुरवठ्यांचा निकटपणा; (७) मातीच्या सच्छिद्रतेच्या संबंधात अपशिष्ट द्रव्यांचा तिच्यावरील परिणाम; (८ खांजणात अधिक जागा मिळावी म्हणून अधिपृष्ठ द्रवाच्या निकासाचे उपाय; (९) ५ फुटांपेक्षा जास्त खोलीच्या खांजणांभोवती कुंपण घालणे; व अन्य सुरक्षा उपाय योजणे; (१०) हरळीची वाढ, दुर्गंधी, मच्छरांच्या प्रादुर्भावासारखे उपद्रव.

चुनखडीच्या क्षेत्रात अपशिष्टांची खांजणे तयार करणे विशेषेकरून धोकादायक असते कारण त्यांच्या (स्तर) रचनेत नाल्या व पोकळ्या आढळून येतात (१७). सामान्यत: भूजलाची हालचाल मंद असते; कधीकधी एका दिवसात ती एकफुटापेक्षाही कमी असते. ज्या जलभृत ( aquiferous ) वाळूतून पाणी झिरपत असते त्या वाळूची सूक्ष्मता आणि तिच्यातून जाणाऱ्या पाण्याची राशि, यावर ती हालचाल अवलंबून असते. चुनखडीच्या प्रदेशात पाणी उदग्र आणि आडव्या दिशांनी कितीतरी अधिक वेगाने वाहण्याची शक्यता असते, आणि

उंच जागेवर बांधलेल्या खांजणामुळे मौल्यवान भूजलपुरवठ्याचा बराच मोठा अंश प्रदूषित होण्याची शक्यता असते. अनेक वेळा विनिर्मित संयंत्रात दर एक अगर दोन वर्षांनी बुलडोझरने खांजणीतील अवमल बाहेर काढून टाकण्यात येतो. अवमलाचे साठनण व जमिनीची परिस्थिती, यांवर ही वारंवारता अवलंबून असते.

ब्लुडगुडचे (३) असे म्हणणे आहे कीं, खांजणाच्या दर ०.१७ घ. फूट क्षमतेत दरसाल अनुपचारित अवमलातील किमान एक पौंड घनपदार्थाचे पाचन करता येते. तथापि, जर ही खांजणे पाचन व निर्जलीकरण, अशा दोन्ही करता वापरावयाची असतील तर एक पौंड अनुपचारित अवमलातील घनपदार्थांकरता दर वर्षी सुमारे ०.४ घ. फू. खांजणाची क्षमता लागेल; मात्र जसजसा वातशुष्क अवमल हलविण्याइतका तयार होईल तसतसा तो जलदीने काढून टाकला पाहिजे.

## १३–६. झीमरमनची ज्वलन पद्धत–

अवमलावर उपचार करण्याची तुलनेने ही नवीन पद्धत आहे. जलीय द्रावणात असलेल्या सेंद्रिय द्रव्याचे ऑक्सीकरण करता येते आणि त्यातून जे काही उष्णतामूल्य निघेल त्याचा उपयोग करून घेण्याकरता ते मुक्त करता येते; आणि ह्या अवस्थेतील ऑक्सीकरण, जर पाण्याचे प्रथम बाष्पीभवन केले आणि अवशिष्ट नेहमीच्या बॉयलरमध्ये इंधन म्हणून वापरले तर जे ऑक्सीकरण होईल त्यापेक्षा अधिक परिणामकारक असते; हे या उपचारणातील मूल तत्व आहे.

हवेच्या उपस्थितीत इंधनाचे जेव्हा ज्वलन होते तेव्हाच फक्त उष्णता मुक्त होत असल्याने, अभिक्रियक पात्रात जोराने सोडलेल्या हवेवर झीमरमन कार्यपद्धति अवलंबून असते. अभिक्रियकात सोडलेल्या संपीडित हवेच्या दर पौंडास अपशिष्टाच्या निःस्त्रावातील सेंद्रिय द्रव्यापासून उष्णतेच्या ब्रिटिश एककांची ( Btu ) कमाल राशि निर्माण करणे हा या कार्यपद्धतीचा उद्देश असतो.

झीमरमन प्रक्रियेत, रूढ निस्यंदक, रसायने, अवमल पाचन संच, निर्दाहक (incinerator), आणि सहाय्यक उपकरणे वगळता येतात आणि जागा ( space ) आणि जमीन कमी लागते. वाफ, नायट्रोजन, $CO_2$, आणि राख हे अंतिम पदार्थ असतात. अभिक्रियकातील निस्त्रावी वायु पाण्यात धुतले गेल्याने, त्यांत फ्लायॲश असत नाही आणि ते जवळजवळ दुर्गंधीरहित असतात.

वाहितमलातील अवमलाच्या उपचारणात, (अवमल आणि हवा अशी दोन्हीही उत्थापित तपमान आणि दाबात असताना) हवेच्या आनुपातिक ( proportionate ) राशीसह अवमल

सतत अभिक्रियक पात्रातून पंप करून ऑक्सीकरण घडवून आणता येते. जेव्हा संदाबित हवेतील ऑक्सिजन अवमलातील सेंद्रिय द्रव्यात मिसळतो तेव्हा $Co_2$, $N_2$, आणि वाफ तयार होते आणि त्यावेळी राख अवशिष्ट जलात राहते. अभिक्रियक, तसेच संपूर्ण प्रक्रिया व्यवस्था, आपोआप स्थिरदाब राहील अशी राखण्यात येते; आणि ज्वलनाचे पदार्थ अभिक्रियकातून सतत काढून टाकण्यात येतात.




**आकृति १३–४. वाहितमलातील अवमलाचे ऑक्सिकरण** करण्याच्या **झिम्रो प्रक्रियेचा आयोजन आरेख.** (स्टर्लिंग ड्रग कंपनी.)

जर वाहितमल–अवमलातील बाष्पशील द्रव्याचे संकेंद्रण बरेच जास्त असेल तर, ज्वलनाने उत्पन्न होणारी वाफ अधिक वायू ( $Co_2$ व $N_2$ ) यांच्यामुळे प्रक्रियेत वापरण्यात येत असलेले वायुसंपीडक ( air compressors ) आणि पंप चालू ठेवण्यास भरपूर ऊर्जा मिळते. प्रवेशी अवमल आणि हवेचे तपमान हे घटक अभिक्रियकात येताक्षणीच, ऑक्सीकरणाची सुरवात होण्यास पुरे होईल इतक्या मात्रेपर्यंत वाढविण्यासाठी, अभिक्रियकातून येणाऱ्या गरम अवशिष्टाचा तापविनिमय यंत्रात उपयोग करण्यात येतो. अशा रीतीने एकदा का क्रिया सुरू झाली कीं ज्वलन कायम राखण्याकरता उष्णता अगर शक्ति बाहेरून आणावी लागत नाही.

झीमरमन प्रक्रियेस लागणाऱ्या उपकरणांत खालील उपकरणांचा समावेश असतो : संपीडक वायुमापक, उच्च दाबयुक्त अवमल पंप, विक्षोभक (agitator) बसविलेली अवमल साठविण्याची टाकी, तापविनिमय यंत्रे, अभिक्रियक, विलगक आणि शीतक.

(अलिकडे झिम्प्रो प्रक्रिया या नांवाने संबोधित केलेल्या) प्रक्रियेचा आयोजन आरेख आ. १३–४ मध्ये सादर केला आहे. परिचालन परिस्थितीच्या बाबतीत काही विनिर्मात्यांचा दावा असा आहे : "ज्वालेशिवाय ऑक्सीकरणाने वाहितमल–अवमलातील विलेय सेंद्रिय अंशांचे ८० ते ९० प्रतिशत् अपचयन ह्या संयंत्रातून करता येते. निर्जलीकरण अथवा प्राक्तापन न करता अवमल जाळून टाकण्यात येतो. ५०० ते ६०० psig दाब व ४२०°F तपमानात ह्या संचाचे सतत परिचालन होते. भरीव प्रमाणात अकार्बनिक, निष्क्रिय, जीवशास्त्रदृष्टया स्थिर असलेली राख; अपशिष्ट जल; आणि (कार्बन डाय ऑक्साइड, नायट्रोजन आणि वाफ हे) ज्वलनातून निर्माण झालेले गंधरहित गॅसयुक्त पदार्थ, असे (प्रक्रियेतील) अंतिम पदार्थ असतात. स्वयंचलित आणि किमान देखभाल लागणारे असे संयंत्राचे अभिकल्पन केलेले असते. वायुसंपीडक व अवमल पंप ही फक्त दोनच उपकरणे अशी असतात की त्यात हालचाल करणारे घटक असतात. एक टनी (शुष्क वजन) संचास अंदाजे ५० अश्वशक्ति लागते. इमारत आणि जागेच्या गरजा नाममात्र असतात."

## १३–७. सिकरित निलंबन (Atomised suspension) –

बुरुजाच्या माथ्यात उपचार करावयाचे अपशिष्ट द्रव अगर गारा सिकरित करण्याचे हे तंत्र असते. गॉव्हिनने (९,१८) वर्णिलेल्या पद्धतीत जाकिटामधून गरम वायूचे अभिसरण करून ह्या बुरुजाच्या भिंतीचे सतत उत्थापित तपमान ठेविण्यात येते. उपकरणात हवा अगर कोणचाही परवायु समाविष्ट केला जात नाही आणि त्यामुळे फवारणी शुष्कन आणि हे तंत्र, यांच्यातील फरक तीव्रतेने दिसून येतो. विकासकर्त्यांचा असा दावा आहे कीं, तोटयांच्या निकटच्या पल्ल्यात अतिसूक्ष्मपणे विभाजित झालेल्या थेंबांचे (२० ते २५ मि. मी. व्यास) त्यांच्या मंद चरम वेगाला सीकरवर्षीने (atomizer) दिलेल्या प्रारंभिक उच्च वेगाचे जलद अवतरण होते (decelerate) आणि नंतर आपल्या स्वतःच्या बाष्पनाने निर्माण झालेल्या बाष्पात विसर्जित होते अशा प्रकारे निर्माण झालेले निलंबन अभिक्रियकातून जवळजवळ धारारेखी (stream line) गतीने खाली वाहत जाते. जलद पूर्ण झालेल्या बाष्पनानंतर शुष्कन होते. शुष्कन विभागाच्या शेवटास शुष्क कणांचे निलंबनाला ऑक्सीकरण, अपचयन, नायट्रेशन, सल्फोनेशन, इत्यादि रासायनिक प्रक्रिया, (जरूर तर पूड केलेल्या उत्प्रेरकाच्या (catalyst) उपस्थितीत) योग्य आन्तरिक वायुरूप अभिकारक (reactants) अंतःक्षेपित

करून, क्रमाक्रमाने लागू करता येतात. जेव्हा ते अभिकारकातून तळाशी बाहेर पडते तेव्हा निलंबनात, घन अवशिष्ट (जे चक्रवात ( cyclone ) संग्राहकात पुनः प्राप्त करण्यात येते ते), वाफेची बरीच राशि ( जी संघनित करून वापरण्यात येते ती ), आणि ( पुनः प्राप्तीकरता ज्यांच्यावर आणखी प्रक्रिया करण्यात येते आणि नळात विल्हेवाट लावण्यात येते असे ) गौण उत्पादित वायू यांचा समावेश असतो.




आकृति– १३–५. सिकरित-निलंबन तंत्राचे उपकरण (९,१८).

सिकरित निलंबन प्रक्रियेच्या अधिवक्त्यांचा ( advocates ) असा दावा आहे कीं, द्रव पंप करण्याकरताच फक्त बाहेरील उर्जेचा वापर करावा लागतो आणि या उर्जेची राशि उपेक्षणीय असते. या यंत्रणेतून जरी बऱ्याच प्रमाणात वायू आणि वाफ सतत वाहत असली तरीही भाता अगर संपीडक यांचा संपूर्णपणे अभाव असणे हे पुन:प्राप्त प्रवाह पटलाचे ठळक लक्षण असते. वाष्पन होत असताना अभिकारकात निर्माण झालेल्या दाबाचा कार्यक्षमतापूर्वक उपयोग करून त्यांची गरज दूर करण्यात येते. गॉव्हिनच्या प्रक्रियेचा (९,१८) नमुनेदार प्रवाह आरेख आं १३-५ मध्ये दाखविला आहे.

## १३-८. शुष्कन आणि भस्मीकरण-

ह्या दोन प्रक्रियांत अवमलाच्या मोठ्या राशीचे, सेंद्रिय द्रव्यापासून मुक्त करून म्हणजेच सहज विल्हेवाट करता येईल अशा राखेच्या लहान राशीत, ताप शुष्कन आणि भस्मीकरणाने आदर्श लघुकरण होते (२४). दमन शुष्कनात ( flash drying ) गरम वायुप्रवाहात निलंबित अवमल-कणांचे शुष्कन अन्तर्ग्रस्त असते व त्यामुळे जवळजवळ तात्काल आर्द्रतेचे निष्कासन झाल्याची खात्री मिळते. जेव्हा अवमलाच्या ऑक्सीकरणामुळे निर्माण झालेले गरम वायू स्वयंही शुष्कनात प्रत्यक्ष वापरण्यात येतात तेव्हा परिवर्तन हानि होत नाही. दमन शुष्कनानंतर अवमलाचे कण असलेला वायु सामान्यत: चक्रवात विलगकांकडे जातो आणि तेथे आर्द्र थंड वायूंच्या पासून शुष्क झालेला अवमल वेगळा केला जातो.

दमन-शुष्क अवमलाचा खत, मृदानुकूलक म्हणून अथवा अन्य मोलाच्या कार्याकरता वापर करण्यात येतो. न वापरला गेलेला शुष्क अवमल भट्टीच्या नळीत सोडण्यात येतो. तेथे तो दहन कक्षातील ज्वालकाकडे ( burner ) फुंकला जाऊन त्याचे भस्मीकरण होते. अवमल-भात्याने तो भट्टीत फेकला जातो, शिवाय ज्वलनाला लागणाऱ्या हवेपैकी बऱ्याच मोठ्या भागाचा पुरवठा करतो. दुर्गंधी नाहिशी होण्याकरता, पूर्वतापनित वायू ज्वलन होत असलेल्या अवमलात परतवण्यात येतात. फ्लाय अँश काढून टाकण्याकरता, थंड केलेला वायु प्रेरित ( induced ) हवेच्या पंख्यांनी, रक्षासंग्रहकामधून ओढून घेण्यात येतो आणि अपकेंद्रण क्रियेमुळे फ्लाय अँशचे अवस्थापन होऊन भट्टीच्या तळाशी आपोआप विसर्जन होते. नंतर मधूनमधून ती राख खोऱ्याने, अथवा पाण्यात मिसळून व पंप करून काढून टाकून भरावात तिचा वापर करण्यात येतो.

अवमल शुष्क करण्याचा अंतिम उद्देश मृदा संयोजक ( soil additive ) म्हणून उपयोग करण्यासाठी असो वा निर्जंतूक ( sterile ) राख निर्माण व्हावी म्हणून असो, घनपदार्थांमधून

मुक्त आर्द्रतेचे प्रथम बाष्पीभवन करणे, गॅसच्या स्वरुपात तो काढून टाकणे आणि हवेत सोडून देणे आगत्याचे असते. ह्या गॅसचे "बाष्पक भार" (evaporator load) म्हणून नाम निर्देशन केले जाते. अवमल भस्मकारकातील दुर्गंधीवर प्रभावी नियंत्रण फक्त उच्च तपमानात (१२०० ते १४००°F) गंधनाश करण्यानेच होऊ शकते.

जेव्हा अवमलाचे भस्मीकरण करावयाचे असते तेव्हा भट्टीतील मुक्त उष्णता महत्वाची असते : भट्टीचा आकार, तिच्या द घ फु. स $x$ Btu उष्णता मुक्त होईल इतका, भरपूर असावा लागतो. (भिंती आणि भट्टी दीर्घकाल टिकून राहण्याची खात्री असावी म्हणून भट्टीच्या आयतनाच्या द. घ. फु. स दर तासी १२००० Btu इतकी विपुलता असावी असे सामान्यपणे मानले जाते).




**आकृति १३–६. ऊष्मीय दक्षतेवरील** (thermal efficiency) **ढिगाच्या** (stock) **तपमानाचा परिणाम** (१४).

बाष्पशील घनपदार्थातील अंतर्वस्तू आणि त्यांचे औष्मिक मूल्य, यांच्यामुळे निर्माण झालेल्या वायूने दर तासाला भस्मीकृत करावयाच्या (पौंड) घनपदार्थांना गुणून उष्णता निवेश (input) निर्धारित करण्यात येतो, म्हणून ह्या उष्णता निवेशाला १२००० ने भागून भट्टीच्या आयतनाचे संगणन करता येते. भस्मीकारकात ऊष्मीय दक्षता ३० पासून ६० टक्क्यापर्यंत अपेक्षित असते. जितके ढिगाचे तपमान कमी तितकी ऊष्मीय दक्षता अधिक असते (१४). हा अन्योन्य संबंध आ. १३–६ त दाखविला आहे आणि दमक–शुष्कन व भस्मीकरण यंत्रणेतील उष्णता–संतुलन दाखविण्याकरता आ. १३–७ मध्ये प्रवाह–आरेख सादर केला आहे. (द्रव्याचे तपमान शुष्कन परिस्थितीशी स्वतःच जुळवून घेतल्यानंतर) स्थिर-वेग कालावधीतील शुष्कनाच्या वेगाचे गणन करण्याकरता सामूहिक संक्रामण समीकरण (mass transfer equation)

अथवा उष्णता संक्रामण समीकरणांपैकी कोणतेही एक वापरावे (१५).

सामूहिक संक्रामण : $W = k'y\ (Hi - H)\ A,$

उष्णता संक्रामण : $W = \frac{hy\ (t - ti')\ A}{\lambda i},$

येथे,

W = दर ताशी पौंडात बाष्पन वेग,

A = चौ. फुटात शुष्कनाचे क्षेत्र,

hy = उष्णता-संक्रामण गुणांक, Btu फूट$^2$/तास/$^{o}F$,

k'y = सामूहिक संक्रामण गुणांक,
आर्द्रतेतील एकक विचरणाकरता, पौंड/फूट$^2$/तास,

Hi = अंत:पृष्ठाजवळील ( interface ) हवेची आर्द्रता,
पाणी, पौंड/शुष्क हवा, पौंड,

H = हवेतील आर्द्रता, पाणी, पौंड/शुष्क हवा, पौंड,

t = हवेतील तपमान, $^{o}F$,

ti = अंत:पृष्ठाचे तपमान, $^{o}F$, आणि

λi = तपमान ti असताना अप्रकट ( latent ) उष्णता, Btu/पौंड, असतात.

जेव्हा हवा अवमलाच्या पृष्ठभागाशी समांतर वाहते तेव्हा उष्णता-संक्रामण गुणांक, hy, ०.१२८ $G^{०.८}$ असतो आणि ती अभिलंब वाहते तेव्हा सुमारे ०.३७ $G^{०.३७}$ असतो असे अंदाज करण्यात आले आहेत; G = सामूहिक वेग, पौंड/फूट$^2$/तास.

## १३-९. अपकेंद्रण (centrifuging) –

अंतिम विसर्जनात वाढ व्हावी म्हणून अवमलाचे संकेंद्रण करण्याच्या पद्धतीस अपकेंद्रण म्हणतात. आधीच्या प्रतिस्थापनांत अपकेंद्री संकेंद्रण परिणामकारक न होण्याच्या कारणांपैकी एक कारण त्याची कार्यक्षमता कमी होती आणि कल्पित निर्मलीकृत नि:स्त्रावासह यंत्रणेत पुष्कळसे सूक्ष्म कण परत जात असत हे होते. २० अश्वशक्तीच्या अंतर्निहित परिचालन चलित्रांचा वापर करण्यात येत असलेल्या नूतन प्रतिस्थापनांत (४), शुष्क आधारावर, ०.५ ते ०.७५ प्रतिशत् घनपदार्थ असलेल्या अपशिष्ट-अवमलाची दर ताशी ३००० ते ४००० गॅलन हाताळणी करता येते. एकदाका अपकेंद्रित (द्रव्यास) (द. मि. स ६१०० फेरे) परिचालन

वेग आला की फक्त ११ अश्वशक्तीची गरज लागते. परिणामी अवमलाचे सुमारे ५ प्रतिशत् घनपदार्थाइतके संकेंद्रण होते; शिवाय निःस्त्रावात सुमारे ३०० ppm घनपदार्थ असतात. अपकेंद्रीय बलाने अधिक दाट घनपदार्थ अपकेंद्रीय पेल्याच्या भिंतीवर फेकले जातात व तेथे ते परिसीमेवर बसविलेल्या तोटयांमधून बाहेर टाकले जातात. प्रत्येक पेल्यावर (४) १२ तोटयांची द्वारे ठेविलेली असतात आणि प्रस्त्रावी तोटयाची विभिन्न संख्या वापरता येते. ती संख्या संभरण द्रव्यातील घनपदार्थाची राशि आणि इच्छित फलप्राप्तीवर अवलंबून असते. उच्च संकेंद्रणातील अपकेंद्रणाच्या वापरावर मर्यादा पाडणारा एक घटक, अपकेंद्रितातून संकेंद्रणित अवमल प्रस्त्रावित करणाऱ्या पंपाची क्षमता, हा असतो. ज्या निःस्त्रावातून घनपदार्थ वेगळे करण्यात आले आहेत ते मध्यवर्ती तबकडयांमधून अपकेंद्रिताच्या पेल्याकडे वाहत जातात आणि वरच्या झांकणातून बाहेर पडत असताना त्यांत सरासरी ३०० ppm घनपदार्थ असतात.




**आकृति १३-७. दमन-शुष्कन आणि भस्मीकरण व्यवस्थेतील उष्णता-संतुलनाचा प्रवाह आरेख- (१४).**

अपकेंद्रीकृत अवमल अपकेंद्रित्राच्या खालच्या झांकणातून एका हौदात सोडण्यात येतो आणि तेथून तो पाचित्रात अथवा अन्य अंतिम अवमल उपचारण संचात पंप करता येतो. अपकेंद्रित्राच्या पेल्याचा आयोजन आरेख आ. १३–८ मध्ये दाखविला आहे.

अँबरने (१) अलिकडेच अपकेंद्रीकरणाच्या उपपत्तीचे पुनर्विलोकन केले आहे. जेव्हा एकाद्या कणावर बलप्रयोजन करण्यात येते तेव्हा, ज्या रेषेवर कणाच्या गतीस असणारा प्रतिरोध लागू केलेल्या बलाइतका होतो त्या बलरेषेच्या बाजूवरील वेगाइतका वेग होईपर्यंत कणाचे त्वरण होते. ( $F = ma$ ). अवस्थापन टाकीत हे बल गुरुत्वीय असते. अपकेंद्रित्रात ते अपकेंद्री क्षेत्र, $w^2r$, असते. या दोन्हीमधील फरक फक्त दिशा व मात्रेपुरताच असतो. पृथ्वीच्या त्रिज्येच्या बाजूने गुरुत्वाकर्षण क्षेत्र असते, परिभ्रमण अक्षाशी अभिलंब असलेल्या त्रिज्येच्या बाजूने अपकेंद्रीय क्षेत्र असते, आणि अविरत-प्रवाही अपकेंद्रित्रात ते गुरुत्वाकर्षणाच्या ६०००० पटीपेक्षाही जास्त असू शकते कणाच्या हालचालीचे वेग सामान्यतः त्याच्या व्यासाच्या वर्गमूळाशी समानुपाती ( proportional ) असतात.




**आकृति १३–८. अपकेंद्रित्राच्या पेल्याचे आयोजन रेखाचित्र.**

कणावर लागू होत असलेले प्रभावी बल

$$F = (m - m_1)\, w^2 r$$ असते

आणि गोलकाकरता,

$$F = \frac{\pi}{6}(d^3) \Delta P \ w^2 r$$ असते.

अवसादनाला विरोध करणारे बल, स्टोक्सच्या नियमाप्रमाणे,

$$F = 3 \pi \ \mu \ d v_s$$ असते.

साम्यावस्थेत

$$vs = \frac{\Delta \ Pd^2 \ w^2 r}{18 \ \mu}$$ असतो.

अविरत (चालणाऱ्या) अपकेंद्रित्राच्या सर्वसाधारण स्वरुपात जर कण द्रवापेक्षा जड असेल तर, असा कण ज्या वेगाने पेल्याच्या भितीजवळ जातो तो वेग vs असतो. जर कणाने जावयाचे अंतर X असेल तर,

$$X = v_s t - \frac{\Delta P d^2 \ w^2 r}{18 \mu} \frac{V}{Q}.$$

जर दिलेला कण आणि परिभ्रमकाची भित यांच्यामधील मूळ अंतरापेक्षा X ज्यास्त असेल तर तो कण भितीजवळ निक्षेपित होईल आणि यंत्रणेतून काढून टाकला जाईल. आदर्श व्यवस्थेत $(x = s/2)$, d व्यास असलेल्या कणांपैकी निम्मे निष्कासित होतील. हा विच्छेद–बिंदु ( cut off point ) समजावा. त्या ठिकाणी

$$Q = \frac{\Delta P d^2}{9 \mu} \cdot \frac{V w^2 r}{s}$$ असतो..

येथे Q ही वेळेच्या दर एककाकरता प्रवाह राशि असते.

$(\Delta P d^2 / 9 \mu)$ ह्या संज्ञेचा संबंध स्टोक्सच्या नियमाचे अनुसरण करणाऱ्या व्यवस्थेतील फक्त प्रचलांच्याशी ( parameters ) येत असल्याने आणि $(V w^2 r/s)$ या संज्ञेचा संबंध परिभ्रमकाच्या प्रचलांच्याशी येत असल्याने, वरील समीकरण खालीलप्रमाणे मांडता येईल :

$$Q = 2 \ Vg \ \Sigma,$$

ज्यात

$$Vg = \frac{\Delta P d^2 g}{18 \mu}, \text{ आणि } \Sigma = \frac{V w^2 r \ \theta}{gs \ \theta},$$ असतात.

जेथे $r\theta$ व $S\theta$ हे अपकेंद्रित्राचे अनुक्रमे प्रभावी त्रिज्या व अवस्थापन अंतर असते, आणि $\Sigma$ हा अपकेंद्रित्राचा आकार सुचवितो; त्याचे परिमाप ( diamention ) ( लांबी$^2$ ) हे असते. अपकेंद्रित्राइतकेच फलदायी काम सैद्धान्तिकतया करू शकेल अशा अवस्थापन टाकीच्या सममूल्य क्षेत्राइतका $\Sigma$ असतो.

विभिन्न अपकेंद्रित्रांच्या प्रकारांकरता त्यांच्या आकारांच्या सूचकांचे सूत्रीकरण करण्याकरता अँबरने (१) वरील उपपत्ति पुढील प्रमाणे वापरली आहे.

१) प्रयोग शाळेतील चांचणी नलिका अथवा बाटलीच्या अपकेंद्रित्राकरता,

$$\Sigma = \frac{w_2 V}{4.6 \log [2 r^2/( r_1 r_2 )}.$$

२) नळीदार पेल्याच्या अपकेंद्रित्राकरता,

$$\Sigma = \frac{\pi l w^2}{.g} \quad \frac{( r_2^2 - r_1^2 )}{l n [ 2 r_2^2/( r_2^2 - t_1^2 ) ]}.$$

३) तबकडीच्या प्रकाराच्या अपकेंद्रित्राकरता,

$$\Sigma = \frac{2 \pi n w^2 ( r_2^3 - r_1^3 )}{3gC \tan \theta},$$

जेथे

$\Sigma$ = अपकेंद्रित्राचे समतुल्य क्षेत्रफळ,
w = कोनीय वेग, रेडि./सेकंद,
V = राशि,
r = परिभ्रमणाच्या अक्षापासून त्रिज्या,
$r_1$ = आतील पृष्ठभागाची त्रिज्या,
$r_2$ = बाहेरील पृष्ठभागाची त्रिज्या,
l = प्रकाश–कला ( light-phase ) प्रस्त्राव त्रिज्या,
g = गुरुत्वाकर्षण–स्थिरांक,
n = तबकड्यांच्यामधील अंतरांची संख्या,
C = विलेयशील ( solute ) ( द्रव्याचे) संकेंद्रण,
$\theta$ = तबकडीचा अर्ध अंतर्गत ( included ) कोन,
असतात.

ह्या प्रत्येक घटकांच्या बाबतीत, अवस्थापन-परिस्थिती अबाधित असताना एकट्या कणाच्या बर्तावावर आणि स्टोक्सच्या नियमाप्रमाणे निर्धारित केलेल्या परिस्थितीतील अपकेंद्रित्राच्या बलक्षेत्राशी हा कण नेहमी साम्यावस्थेत असतो या धारणेवर, अँबरने आपली गणने आधारित केली आहेत.

## १३-१०. अवमलाची पडावातून वहातुक-

जेव्हा जागा फारशी उपलब्ध नसते आणि सामान्यपणे समुद्रासारखा वाहत्या पाण्याचा खोल साठा उपचारणाच्या जागेच्या निकट उपलब्ध असतो तेव्हा अवमलाच्या अंतिम विसर्जनाकरता आपणाला वापरता येईल असा उपाय अवमल पडावातून वाहून नेणे हा असतो. ह्या उपचार पद्धतीत सिद्धांतांचा फारच थोडा संबंध येतो. अवमलातील अनुपचारित, अवक्षेपित, पाचित अथवा निस्यंदित घनपदार्थ पडावात पंप करण्यात येतात. भार-जलरेखेपर्यंत पडाव भरल्यानंतर त्यातून अवमल किनाऱ्यापासून दूर असलेल्या सोयीस्कर जागेवर वाहून नेण्यात येतो. नंतर, सामान्यपणे पंप करून अवमलाचे जलपृष्ठाखाली बऱ्याच खोलीवर विसर्जन करण्यात येते. ( पडावातील जागेत बचत करण्यासाठी ) अवमल पडावात भरण्यापूर्वी त्याचे काही प्रमाणात संकेंद्रण करावे, पण पंप करताना अडचणी येतील इतके ते ज्यास्त असू नये.

अनुपचारित अथवा उपचारित अवमल थेट समुद्रात पंप करणे आणि तनुकरणाचे तंत्र वापरून त्याची विल्हेवाट लावणे ही प्रथासुद्धा किनाऱ्यावरील शहरांत अवलंबन करण्यात आली आहे ( १६,१९,२७ ). जेव्हा अवमल सुकविण्यास भारी खर्च येतो आणि त्यांचा अंमल करणारी संयंत्रे मोठाल्या पाण्याच्या साठ्यांच्या अनुषंगाने सोयीस्कर ठिकाणी प्रस्थापित केलेली असतात तेव्हा हे तंत्र सामान्यतः वापरले जाते. वंगण अगर तेल, विवर्णन, दुर्गंधी, कॉलीफॉर्मची उच्च संख्या, विषाक्त द्रव्ये अथवा अवमलाचे ढिगारे अगर निक्षेप यांच्यामुळे हे अवमल संदूषित होऊ देऊ नयेत.

सॅन्फ्रॅन्सिस्कोमधील उपचारित अपशिष्ट-जलातील अवमल, सॅन्फ्रॅन्सिस्को उपसागरातील पाण्यात तो जलदी वाहून जाण्याची खात्री असावी म्हणून भरतीची वेळ साधून, नालीच्या मध्यावर ४० फूट खोलीवर विसर्जन करण्यात येतो व अशी विल्हेवाट करताना त्या शहरात वरील सर्व आवश्यकतांची पूर्तता होते. तनुकरणाचे तंत्र वापरण्यापूर्वी संग्राही ( receiving ) पाण्याच्या लाटेच्या विसरण-गुणधर्मांचा ( dispersion characteristics ) अभ्यास करणे अगत्याचे असते.

## १३-११. स्वास्थ्यकर जमीन भराव-

केरकचरा आणि अवमल पूर्वनियोजित आणि पद्धतशीरपणे पुरून टाकण्याकरता सामान्यपणे

वापरण्यात येणारी ही पद्धत आहे (२०). कचऱ्यासारख्या द्रव्याची विल्हेवाट लावण्याची ती एक सोपी, परिणामकारक, आणि कमी खर्चाची पद्धत आहे, परंतु जर अवमल सुकविला नाही तर तो अति पातळ असल्यास ही पद्धत उपयोगी होत नाही. तथापि, निर्वात निस्यंदनित वा वालुका संस्तरशुष्कनित अवमलाची ह्या पद्धतीने विल्हेवाट करता येते.

स्वास्थ्यकर भरावासाठी (२०) प्रस्तावित केलेले क्षेत्र सहज सुगम व्हावे पण पाणी पुरवठ्याच्या जागेपासून व मनरंजन क्षेत्रापासून पुरेसे दूर असावे आणि तसेच ते अतिमहाग जमिनीवर नसावे. जमिनीची उपयुक्तता आणि मालमत्तेच्या भविष्यकालीन संभाव्य उपयोगाचाही विचार करणे महत्वाचे असते. नागरी केरकचऱ्याकरता दर १०००० माणशी दर वर्षी, जर ६ फूट खोलीपर्यंत संदाबन केलेले असेल तर, सुमारे एक एकर जागा लागते. भूजलपातळीपेक्षा जास्त उंचीवर स्वास्थ्यकर जमीनभरावाची स्थाननिश्चिती करावी आणि पाणीपुरवठ्याच्या कोणच्याही स्थानापासून ती ५०० फुटापेक्षा जास्त निकट असू नये. विशेषत: जेव्हा वाळू, कंकर अगर चुना दगडापासून जमीन तयार झालेली असते तेव्हा ही मर्यादा पाळणे आवश्यक असते. जागेवर चरांकरता खुंट्या माराव्या, तलचिन्हे ( bench mark ) प्रस्थापित करावीत, भराव पूर्ण करावयाच्या उंचीची माहिती द्यावी; तसेच खुदाईच्या खोलीचीही माहिती द्यावी. सामान्यपणे चराची रुंदी सुमारे १५ फूट व खोली सुमारे ४ फूट असते. भराव केल्यानंतर दररोज अवमल झांकून टाकावा आणि बुल्डोझरने अथवा ट्रॅक्टरने संदाबित करावा.

## १३-१२. संकीर्ण पद्धती–

अवमलातील घनपदार्थांची विल्हेवाट करण्याच्या अन्य पद्धतींत, त्याचे संकेंद्रण करण्यासाठी तरंगण आणि स्थूलीकरण ( thickening ) अशा दोन प्रक्रियांचा समावेश होतो. तपमान व समयनियंत्रणाच्या ( time control ) मदतीनेच फक्त अवमल तरंगण व्हावे म्हणून जैवी साधनांचा वापर करण्यात येतो (१३). नंतर २० टक्के संकेंद्रण झालेल्या परिणामी घन-पदार्थाचे जेव्हा निर्वात निस्यंदकात निर्जलीकरण करण्यात येते तेव्हा अतिरिक्त रसायनांची गरज लागत नाही. संकेंद्रणाच्या ह्या पद्धतीत, १२० तासांच्या अवरोधन कालानंतर ३५°C तपमान असताना, अनुकूलतम फलप्राप्ति होत असल्याचे आढळून आले (१३). तथापि, अवमलाच्या काही प्रकारांवर (उदा. उत्प्रेरित अवमल) ह्या उपचारणाचा प्रभाव पडत नसल्याचे आढळून आले आहे. काल आणि तपमानावरील नियंत्रणाशिवाय, अवमल – संकेंद्रणाच्या तरंगण पद्धतीत बाष्पशील अंतर्वस्तू आणि pH हे मुख्य घटक असल्याचे दिसून येते.







आकृति १३-९. स्थूलीकरण (thickening) करण्याच्या यंत्रणेचा आयोजन आलेख, आणि टाकीचा छेद (२६).

रसायने न मिसळता अविरत (परिचालनाच्या) आधारावर अवमल दाट करण्याकरता टॉर्पीने १९५३ मध्ये एक पद्धत विकसित केली. तीत केवळ प्राथमिक निर्मलकारकातून अथवा दुय्यम अवमलात एकत्र करून– प्रवाह रचनेमुळे (flow pattern) पातळ अवमल दाट करणाऱ्या संभरण भिंतीकडे अवमलाचे संभरण करता येते. एका नमुनेदार स्थूलीकरण–उपकरणाचा आयोजन आरेख आ. १३-९ त दाखविला आहे. घनपदार्थांचे अवस्थापन होते. ते निर्धारित "आवरण" (blanket) विभागात घट्ट होतात, आणि टाकीच्या तळातून बाहेर काढण्यात येतात. अतिरिक्त द्रव परिघीय बांधावरून निथळून जातो. स्थूलीकरण उपकरणात खुरप्यांच्या भुजांना बसविलेले उभे परिष्कारक (pickets) असलेल्या यंत्रणेचाही समावेश केला जातो. परिष्कारक V च्या आकाराचे असतात आणि त्यांच्या नालीकरण क्रियेमुळे

( channeling ) (अवमलात अडकून राहिलेले) धारित जल आणि वायु पृष्ठभागाकडे जातात. अवमल किती दाट करावयाचा ती मात्रा अनेक घटकांवर अवलंबून असते. अवमलाचे उत्पत्तिस्थान हा त्यातील मुख्य घटक असतो (५). तसेच अवमलाचे स्वरूप श्लिषीय ( gelatinous ) असते. त्यामुळे अवरोधन काल कितीही ठेवला तरी विशिष्ट मर्यादेच्या बाहेर स्थूलीकरण क्रियेत अडचणी येतात. अन्य अवमल अधिक कणीदार असतात आणि जेव्हा फिरणाऱ्या परिष्कारक आणि खुरप्यांच्या भुजानी केलेल्या यांत्रिकी मंद मिश्रणासारखी भौतिक क्रिया त्यांच्यावर करण्यात येते तेव्हा धारित-जल मुक्त होते.

## संदर्भ–

१– अँब्लर, सी. एछ., "थियरी, सेंट्रिफ्युगेशन इक्विपमेंट," इंडस्ट्रियल अँड इंजिनिअरिंग केमिस्ट्री, ५३,६,४३० (जून १९६१),

२– बार्कर, एछ. ए., **अर्काइव्हज फॉर मायक्रोबायॉलॉजी**, ७, ४०४, ४२० (१९३६); ८, ४१५ (१९३७).

३– ब्लडगुड, डी. ई., "स्लज लगूनिंग," वॉटर अँड स्युवेज वर्क्स, ९३, ९, ३४४ (सप्टेंबर १९४६).

४– ब्रॅडनी, एल., आणि आर. ई. ब्रॅगस्टॅड, "कॉन्सेन्ट्रेशन ऑफ अॅक्टिव्हेटेड स्लज बाय सेंट्रिफ्यूज," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २७, ४, ४०४ (एप्रिल १९५५).

५– ग्रिस्बिन, स्टर्लिंग, जी., "स्युवेज स्लज थिकनिंग टेस्ट्स," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २८, २, १५८ (फेब्रुवारी १९५६).

६– समाचार पत्रक क्र. १०२, ५ – ५४, कॉम्लीन–सँडर्सन इंजिनिअरिंग कॉर्पो., पीपॅक, एन. जे.

७– बस्वेल, ए. एम., आणि डब्ल्यू. डी. हॅटफील्ड," एनेरोबिक फर्मेंटेशन," समाचार पत्रिका क्र. ३२, इलिनॉइस राज्य जल सर्वेक्षण, अर्बाना, इलि., १९३९.

८– कॉक्स, जी. एन.," ए समरी ऑफ हायड्रॉलॉजिक डेटा; बेयॉन ड्यू प्लॅंटिअर वॉटरशेड, १९३३ – १९३९", विश्वविद्यालयीन समाचार पत्रिका, लुइझिआना राज्य विश्वविद्यालय १९४०.

९– गॉव्हिन, डब्ल्यू. एछ., "दि अँटोमाइज्ड सस्पेन्शन टेक्नीक," TAPPI, ४०, ११, ८६६ – ८७७ (नोव्हेंबर १९५७); तसेच **केमिस्ट्री इन कॅनडा**, सप्टेंबर १९५५.

१०– जेंटर, ए. एल., "कॉंप्यूटिंग कोअॅग्यूलंट रिक्वायरमेंट्स इन स्लज कंडिशनिंग," ट्रॅन्झॅक्शन्स अमेरिकन सोसायटी सिव्हिल इंजिनिअरिंग, १११, ६३५ (१९४६).

११– जेंटर, ए. एल., "कंडिशनिंग अँड व्हॅक्यूम फिल्ट्रेशन ऑफ स्लज," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २८, ७, ८२९ (जून १९५६).

१२– हॅझेल्टिन, टी. आर, "मेझरमेंट ऑफ स्लज ड्राइंग परफॉर्मन्स," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २३, ९, १०६५ (सप्टेंबर १९५१).

१३– लॅबून, जे. एफ., "एक्पेरिमेंटल स्टडीज ऑन दी कॉन्सेंट्रेशन ऑफ रॉ स्लज," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २४, ४, ४२३ (एप्रिल १९५२).

१४– लीट, सी. ए., सी. डब्ल्यू गॉर्डन, आणि आर. जी. टकर, "थर्मल प्रिन्सिपल्स ऑफ ड्राइंग अँड/ऑर इन्सिनरेशन ऑफ स्युवेज स्लज," कंबशन इंजिनिअरिंग इन्कॉ. प्रकाशन, १९५९.

१५– मॅक्कॅब, डब्ल्यू. एल., आणि जे. सी. स्मिथ," यूनिट ऑपरेशन्स ऑफ केमिकल इंजिनिअरिंग," न्यू यॉर्क, मॅक् ग्रॉ–हिल बुक कं. इन्कॉ. १९५६, पान ८९१.

१६- मिलर, डी. आर., "वर्ल्ड्स डीपेस्ट सबमरीन पाइप लाईन," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, ३०,११,१४२६ (नोव्हेंबर १९५८).

१७– पॉवेल, एस. टी., **इंडस्ट्रियल अँड इंजिनिअरिंग केमिस्ट्री,** ४६, ९, ९५ A (सप्टेंबर १९५४).

१८– रॅबिनोविच, डब्ल्यू., पी. ल्यूनर, आर. जेम्स, आणि डब्ल्यू. एछ. गॉविन, "दि अॅटो-माइज्ड सस्पेन्शन टेक्नीक, भाग III" **पल्प अॅंड पेपर मॅगेझीन**. ऑफ कॅनडा, ५७, १३,१२३ (डिसेंबर १९५६).

१९– रॉन, ए. एम., आणि एफ. आर. बॉवर्मन, "डिस्पोजल ऑफ डायजेस्टेड स्लज बाय डायल्यूशन," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २६, ११, १३०९ (नोव्हेंबर १९५४).

२०– सॅल्व्हॅटा, जोसेफ, ए.," एन्व्हायरनमेंटल सॅनिटेशन," न्यूयॉर्क, जॉन वायली अँड सन्स, इन्कॉ., १९५८ पा. २८८.

२१– श्लेन्स, एछ. ई., "स्टॅंडर्ड प्रॅक्टिस इन सेपरेट स्लज डायजेशन," अमेरिकन सोसायटी **ऑफ सिव्हिल इंजिनिअर्सची** कार्यवाही. ६३, **१११४ (जून १९३७).**

२२– "स्युवेज ट्रीटमेंट प्लँट डिझाइन," अमेरिकन सोसायटी ऑफ सिव्हिल इंजिनिअर्स; मॅन्युअल ऑफ इंजिनिअरिंग प्रॅक्टिस, क्र. ३६ (१९५९) पा. २६५.

२३– "स्युवेज ट्रीटमेंट प्लँट डिझाइन," फेडरेशन स्युवेज इंडस्ट्रियल वेस्ट असोसिएशन, मॅन्युअल ऑफ प्रॅक्टिस क्र. ८, वॉशिंग्टन डी. सी. (१९५९) पा. २१४.

२४– "स्लज ड्राइंग अँड इन्सिनरेशन," समाचार पत्रिका क्र. ६७९१, डॉर कं., १९४१.

२५– टिलर, एफ. एछ., आणि सी. जे. हुआंग, "थिअरी ऑफ फिल्ट्रेशन इक्विपमेंट," इंडस्ट्रियल अँड इंजिनिअरिंग केमिस्ट्री, ५३, ७, ५२९ (जूलै १९५१).

२६– टॉर्पे, डब्ल्यू एन., "कॉन्सेंट्रेशन ऑफ कंबाइन्ड प्रायमरी अँड अॅक्टिव्हेटेड स्लजेस इन सेपरेट थिकनिंग टँक्स," अमेरिकन सोसायटी ऑफ सिव्हिल इंजिनिअर्स, ८०, स्वतंत्र क्र. ४४३ (मे १९५४).

२७– वेस्ट, एल., "स्लज डिस्पोजल एक्स्पीरिअन्सेस अॅट एलिझबेथ, न्यू जर्सी," स्युवेज अँड इंडस्ट्रिअल वेस्ट्स, (जून १९५२).



# :१४: अनुपचारित औद्योगिक अपशिष्टे आणि घरगुती वाहितमळ, यांच्यावरील संयुक्त उपचार

**प्रस्तावना–**

१९५९ मध्ये अंदाजी ६९ टक्के उद्योगांतील अपशिष्टे नागरी मलवाहिन्यांत सोडण्यात येत होती. तसेच ज्या उद्योगातील अपशिष्टे प्रत्यक्ष नाल्यात सोडली जात होती त्यापैकी ८२ प्रतिशत् कोणतेही अपशिष्ट–उपचारण न करता सोडली जात होती व ही एक गंभीर बाब बनली होती (५). नागरिकांच्या कल्याणाच्या या महत्वाच्या गोष्टीकडे शहरातील सुयोग्य शासनाचे स्वाभाविकच बारीक लक्ष असले पाहिजे. स्कोरीफर व त्याच्या समित्यांच्यामते नगरपालिकांना खालील तीन पर्याय उपलब्ध असतात : पहिला, सर्व अगर काही विशिष्ट औद्योगिक अपशिष्ट अपवर्जित ( excluded ) करणे; दुसरा, सर्व औद्योगिक अपशिष्टांच्या उत्पत्तिस्थानांजवळच पूर्वोपचार करावयास उद्योगांना भाग पाडणे, ज्यामुळे घरगुती वाहित–मलातील BOD च्या व घनपदार्थांच्या पातळीच्या जवळपास अपशिष्टांतील पातळी आणता येईल; अथवा काही विशिष्ट अपशिष्टांचे गुणधर्म हानिकारक असल्याने फक्त त्यांच्यावरच पूर्वोपचार करावयास लावणे; आणि तिसरा, सर्व औद्योगिक अपशिष्टांचा स्वीकार करणे अथवा उपचार संयंत्रांतील उपकरणांना धोकादायक असणारी अपशिष्टे वगळून बाकीच्या सर्वांचा स्वीकार करणे.

औद्योगिक संयंत्रांच्या व्यवस्थापकांनाही आपल्या अपशिष्टांच्या विल्हेवाटीसंबंधी कार्यवाही करण्याचे खालील तीन मार्ग मोकळे असतात. पहिला, नगरपालिकेच्या वाहितमल संयंत्रात अपशिष्ट सोडणे व तेथून ते नाल्यात पाठविणे; दुसरा, ते (अपशिष्ट) औद्योगिक अपशिष्ट उपचारण संयंत्रात पाठविणे व तेथून नागरी संयंत्रात अगर नाल्यात सोडणे; कार्यवाहीचा तिसरा मार्ग, म्हणजे नाल्याच्या प्रवाहाचे आणि दर्जाचे काळजीपूर्वक सर्वेक्षण करून नंतर उद्योग व्यवस्थापनाला आढळते की नाल्यात अपशिष्ट प्रत्यक्षपणे सोडता येईल.

अनेक संयंत्रांच्या बाबतीत, त्यांच्या स्थानीय परिस्थितीमुळे आपले अपशिष्ट कोठे प्रस्त्रावित करावयाचे हे ठरविण्यास वाव नसतो. परंतु, जेथे हा वाव असेल तेथे, द्रव–

अपशिष्टांच्या विल्हेवाटीशी संबंधित विद्यमान प्रथांचा काळजीपूर्वक अभ्यास करूनच कोणता "अपशिष्ट मार्ग" वापरावयाचा, या समस्येचे उत्तर मिळेल. सिद्धान्त आणि प्रथा, ह्या दोन्हींचाही अभ्यास करणे केवळ इष्ट असते असे नसून त्याची आवश्यकताही असते.




## १४–१. नगरपालिकांच्या वाहितमल संयंत्रांचा औद्योगिक वापर–

एकाद्या उद्योगाला आपले अपशिष्ट नागरी उपचार संयंत्रात प्रत्यक्ष सोडणे अनेक वेळा शक्य असते व ते इष्टही असते. तेथे प्रदूषणातील काही भाग काढून टाकता येतो (३). जर नागरी वाहितमल संयंत्राचे योग्य प्रकारे अभिकल्पन व परिचालन केले तर, त्यात औद्योगिक अपशिष्टाचे सर्व प्रकार आणि राशी हाताळणे शक्य होते (४). म्हणून नागरी अपशिष्ट–जल उपचार संयंत्राचे एकत्रित संरचन आणि परिचालन, यांतील उद्योग व नगरपालिकांच्यातील सहकार ही एक गंभीरपणे विचार करण्यायोग्य बाब असते. अशा संयुक्त उद्योगात अनेक फायदे असतात.

१) फक्त एकाच परिचालकाची आवश्यकता असते आणि उपचारण संयंत्राचा बंदोबस्त ठेवण्याचे दायित्व संपूर्णपणे त्याच्यावर असते. म्हणजेच, अपशिष्टाच्या विल्हेवाटीचे काम पाहणाऱ्या औद्योगिक कामगाराला जशी संकीर्ण कामें पहावी लागतात तसे या परिचालकाला करावे लागत नाही.

२) जरी एकसारखी उपकरणे लागत असली तरी दोन अगर अधिक संयंत्रांच्या बांधकामास येणाऱ्या खर्चापेक्षा एकाचा खर्च कमी असतो.

३) राशीच्या दर एककाचा वेग कमी ठेवून अधिक अपशिष्टावर उपचार केले जात असल्याने परिचालनास कमी खर्च येतो.

४) एकाच विशिष्ट मालकावर जबाबदारी टाकता येते.

५) उद्योग आणि नागरी व्यवस्था, यांच्यातील सहकार्याची भावना वाढते; जेव्हा परस्पराना समाधानकारक अशी खर्चाची विभागणी केलेली असते तेव्हा, ही भावना विशेषप्रकारे वृद्धिगत होते.

६) सेंद्रिय औद्योगिक अपशिष्टांत जीवाणू मिसळण्यात येतात. जेव्हा ७० टक्क्यापेक्षा BOD चे अपचयन जास्त व्हावे लागते तेव्हा, जैवी उपचारणात ह्या अणुजीवांना फार महत्व प्राप्त होते.

७) स्वतंत्र घरगुती संयंत्रांच्या परिचालकाना मिळणाऱ्या वेतनापेक्षा अशा उपचारण–संयंत्रावरील परिचालकाला सामान्यपणे जास्त वेतन मिळत असल्यामुळे चांगले प्रशिक्षित लोक उपलब्ध होतात.

८) औद्योगिक विनिर्मितीमधील कर्मचारी अपशिष्ट–उपचारण संयंत्रावर नेमल्याने जी गैरव्यवस्था आणि उपेक्षा होण्याचा संभव असतो तो टळतो.

९) नगरपालिकांना संयंत्राच्या बांधकामासाठी राज्याकडे अगर केंद्राकडे मदतीकरता अर्ज करता येतो; पण खाजगी उद्योग अशा फायद्यास पात्र होत नाहीत.

संयुक्त उपचारणांत निर्माण होणाऱ्या अनेक समस्यांत, विल्हेवाट करावयाच्या संयंत्रात जाणाऱ्या औद्योगिक अपशिष्ट जलाचा गुणधर्म ही सर्वात जास्त महत्वाची समस्या असते. औद्योगिक अपशिष्टांच्या प्रस्रावाचे समानीकरण आणि नियंत्रण करण्यात खालील गोष्टी कधीकधी आवश्यक असतात :–

१) जीवाणू आणि अन्य जीवाच्या, जे शुद्धीकरणाचे कारक असतात त्यांच्या, पर्यावरणी परिस्थितीत जलद बदल होण्यास प्रतिबंध करणे, २) किलाटनी द्रोण्यांत रसायनांची भरपूर मात्रा असल्याची खात्री करून घेणे, आणि ३) नाल्यात निःस्त्राव प्रस्त्रावित करण्याच्याआधी हानिकारक जीवाणूंचा नाश होण्यास पुरेसे क्लोरिनीकरण होईल अशी खात्री करून घेणे.

गेली काही वर्षे वाहितमल आणि औद्योगिक अपशिष्टावरील एकत्रित उपचारणाच्या विषयीच्या खालील दोन घटकांनीं विशेष लक्ष वेधून घेतले आहे : १) नाल्यातील प्रदूषण कमी करण्याबद्दल वाढती आस्था आणि २) युद्धोत्तर कालातील उद्योगांची आश्चर्यजनक वाढ आणि नंतर पाण्याच्या मागणीत होणारी वाढ

बहुतेक वाहितमल संयंत्रात कोणत्यातरी स्वरूपात जैवी उपचारणाचा वापर करण्यात येत असल्यामुळे परिचालन समाधानकारक होण्यासाठी अपशिष्ट मिश्रण—

१) शक्यतो एकजीव व प्रवाह वेग एक सारखा असलेले असावे, व अधिक हानिकारक औद्योगिक अपशिष्टांच्या एकदम टाकलेल्या (प्रघात) भारणापासून मुक्त असावे; २) तरंगत्या द्रव्यांच्या अतिभारणापासून मुक्त असावे, ३) अति अम्लता अगर क्षारतेपासून ते मुक्त असावे आणि उदासीनीकरण व ऑक्सीकरण झाल्यानंतर अवक्षेपित होणाऱ्या रसायनांचा त्यातील अंश उच्च नसावा; ४) रोगाणुरोधक ( anticeptic ) द्रव्य आणि धातूंच्या अवशेषापासून जवळजवळ मुक्त असावे; ५) कार्बोहायड्रेट्स, शर्करा, स्टार्च, व सेल्यूलोज, यांसारख्या BOD च्या संभाव्य साधनांचा अंश कमी असलेले आणि ६) ज्यात तेल आणि ग्रीजचे प्रमाण कमी आहे असे असावे.

औद्योगिक अपशिष्टाच्या वैशिष्टयामुळें जरी त्यावर नागरी वाहितमल संयंत्रात बिनधोक आणि परिणामकारकपणे उपचार करता आले तरी खालील दोन महत्वाच्या बाबींचा विचार करावा लागेल : १) वैयक्तिक अथवा औद्योगिक उल्लंघनापासून उपचारणास संरक्षण देणारा नागरी अध्यादेश आणि २) औद्योगिक अपशिष्ट स्वीकारल्यामुळे संरचन व परिचालनावरच ज्यादा खर्च नगरपालिकेस ज्याच्यामुळे करता येतो तो मलवाहिन्यावर आकारलेला कर.

## १४–२. नागरी अध्यादेश–

नागरी अध्यादेशाचे जरी अनेक प्रकार असले तरी विविध घटकांच्या संकेंद्रणावर उपरी सीमा ठेवली जावी हा सर्वांचा उद्देश असतो. कधीकधी ही उपरी सीमा शून्य असते, कारण संयंत्राला अगर त्यातील घटक भागांना, प्रदूषकाची राशि, काहीही असली तरी, हानिकारक होते. नागरी अध्यादेशांच्या पालनाच्या जबाबदारीखेरीज, अनेक उद्योगांनी शहरा (शासना) शी स्वतंत्र करारही केलेले असतात. उपचार–सुविधांचे संरचन, परिचालन; आणि देखभालीची नगरपालिकेची जबाबदारी, आणि कोणत्याही कर्जरोख्यांच्या सहाय्याने एकूण प्रकल्पाकरता वित्तपुरवठा करण्याची जबाबदारी; प्रवाह, BOD, आणि घनपदार्थांच्या कमाल राशींच्या संबंधी उद्योगांनी करण्याच्या घोषणा, नागरी अपशिष्टाच्या तुलनेने औद्योगिक अपशिष्टराशीची

टक्केवारी; दरवर्षी परिचालन व देखभालीकरता उद्योगांनी द्यावयाची रक्कम, जर निर्देशित मर्यादांचे उल्लंघन झाले तर आकारावयाच्या दंडाची तरतूद; आणि उपचार–संयंत्राच्या संयुक्त उपयोगाशी संबंधित अशा अन्य समर्पक बाबी यांचा अशा करारात सामान्यतः समावेश केलेला असतो.

क्रमांक दोनच्या संदर्भ ग्रंथात, अपुऱ्या वाहितमल–नियंत्रणातील धोक्यांची खालील यादी दिली आहे : १) स्फोट व आगीपासूनचे धोके; २) मलवाहिनी चोंदणे; ३) पृष्ठजलाचे अतिभारण (वादळी आणि/अथवा शीतन जलाने होणारे मलवाहिनीचे प्रदूषण; ४) मळ-वाहिन्यांची भौतिक हानि आणि उपचारण–संयंत्राच्या संरचनेची हानि; ५) वाहितमल उपचारातील अडथळे.

मलवाहिनीसंबंधीच्या सर्वंकश अध्यादेशात (२) खालील मुख्य भाग असतात : प्रस्तावना; संज्ञांच्या व्याख्या; सार्वजनिक मलव्यवस्था उपलब्ध असणाऱ्या जागी त्यांचा उपयोग करण्यास भाग पाडण्याचे नियम; जेथे अशी व्यवस्था उपलब्ध नसेल तेथे खाजगी वाहितमल आणि अपशिष्टाच्या विल्हेवाटीच्या संबंधी नियम; मलवाहिन्या व त्यांच्या जोडांच्या संरचनेचे नियम आणि कार्यपद्धती; सार्वजनिक मलव्यवस्थेत सोडण्यास परवानगी देता येईल अशा पाणी व अपशिष्टांच्या राशी आणि स्वरूपासंबंधी नियम; विशेष नियम; तपासनीसांच्या अधिकारासंबंधी तरतूद; अंमल बजावणी (दंडा) च्या संबंधीचे कलम; वैधतेसंबंधी कलम; आणि सह्या व साक्षी.

औद्योगिक अपशिष्टांचे स्वरूप इतके वेगवेगळे असते की कोणच्याही आदर्श अध्यादेशात फक्त स्थूल मर्यादाच प्रस्थापित करता येतात; नेहमी अध्यादेश सल्लागार अभियंत्याच्या शिफारशींच्यावर आधारलेले असावेत. बहुतेक अध्यादेशांत (२) स्वास्थ्य वाहितमलाशिवाय इतर अपशिष्ट पदार्थांच्या नियंत्रणाची खालीप्रमाणे तरतूद करण्यात येते :

१) ज्वालाग्राही पदार्थ अथवा प्रवाहास अडथळा आणणारे द्रव्य सार्वजनिक मलव्यवस्थेत प्रस्त्रावित करण्यास अध्यादेशाने प्रतिबंध करण्यात येतो.

२) निर्देशित नागरी प्राधिकारिणीच्या विशेष परवानगीनेच फक्त औद्योगिक अपशिष्टे सार्वजनिक मलव्यवस्थेत सोडता येतील असे त्यात नमूद केलेले असते.

३) ज्या अपशिष्टांमुळे मलव्यवस्थेच्या परिचालनास हानि पोहोचेल अगर त्यांत अडथळा येईल अशा सर्व अपशिष्टांना त्यात बंदी घातलेली असते. मात्र अशा अपशिष्टांचे पुरेसे उपचारण केले असेल तर ते याला अपवाद समजण्यात येतात. तरीसुद्धा अशी अपशिष्टे प्रविष्ट करूदेण्यासंबंधीचा निर्णय निर्देशित नागरी प्राधिकारिणीनेच घ्यावयाचा असतो.

४) कलम ३ मध्ये रूपरेखित केलेल्या कार्यपद्धतीचा तपशील स्वतंत्र अध्यादेशात परिगणित केलेला ( enumerated ) असतो.

५) औद्योगिक अपशिष्टांच्या आक्षेपार्ह गुणधर्मासंबंधी विशिष्ट मर्यादा घालून कलम ३ मधील कार्यपद्धतीची पुरवणी म्हणून तपशीलवार नियम तयार करण्यात येतात.

सार्वजनिक मलव्यवस्थेत सोडण्यास परवानगी देता येईल अशा पाणी व अपशिष्टांच्या राशी व गुणासंबंधी खालील नियमांच्या तपशिलांचे आदर्श अध्यादेशांत विवरण केलेले असते :

धारा १– वादळाचे पाणी, छपरांवरील अपवाह, शीतन जल, भूजल, इत्यादीना स्वास्थ्य मलवाहिन्यात जाऊ दिले जाणार नाही.

धारा २– **संयुक्त** अगर **वादळी मलवाहिन्या** म्हणून संबोधित केलेल्या मलवाहिन्यांतच वादळी पाणी अथवा अन्य संदूषित न झालेले निकासी पाणी प्रस्त्रावित करता येईल.

धारा ३– यापुढे केलेल्या तरतुदींच्याखेरीज खालील अपशिष्टांपैकी कोणतेही अपशिष्ट कोणाही इसमास स्वास्थ्य मलवाहिनीत सोडता येणार नाही : (अ) १५०°F पेक्षा जास्त तपमान असलेले कोणचेही द्रव अगर वाफ; (आ) वजनाने दर दशलक्ष भागात १०० भागांपेक्षा जास्त वंगण असलेले कोणचेही अपशिष्ट; (इ) कोणचेही पेट्रोल वगैरे अन्य ज्वालाग्राही अगर स्फोटक द्रव अथवा घनपदार्थ, अथवा वायू (ई) योग्य प्रकारे पूड न केलेला कोणताही केरकचरा; (उ) कोणतीही राख, धातु, खंगर, चिंध्या, चिखल, गवत, कांच, पिसे, डांबर, प्लॅस्टिक, लाकूड, अथवा अडथळा वा बाधा आणणारे अन्य घनपदार्थ; (ऊ) ५.५ पेक्षा कमी व ९.० पेक्षा जास्त pH असलेली अगर अन्य संक्षारक गुण असलेली कोणचीही अपशिष्टे; (ए) वाहितमल संयंत्रात, मानवास अथवा संग्राही नाल्यास धोका पोहोचण्याचा संभव असलेली कोणचीही विषाक्त अपशिष्टे; (ऐ) ज्या तरंगत्या घनपदार्थांच्या उपचारणास असाधारण खर्च येण्याची शक्यता आहे असे कोणतेही तरंगणारे घनपदार्थ : (ओ) कोणचेही अनिष्टकर वायू.

धारा ४– वंगण तेल, आणि वाळू, यांच्या करता जरुरीप्रमाणे रोधक बसविले पाहिजेत.

धारा ५– ह्या संस्थापनांची देखभाल मालकाने केली पाहिजे.

धारा ६– ज्यात, (अ) ३०० ppm पेक्षा ५ दिवसाचा BOD जास्त असतो, (आ) तरंगते घनपदार्थ ३५० ppm पेक्षा जास्त असतात, (इ) धारा ३ मध्ये वर्णन केलेल्या संख्यात्मक वैशिष्ट्यांपैकी कोणचेही वैशिष्ठ असते, (ई) शहरातील सरासरी रोजच्या प्रवाहाच्या २ टक्क्यापेक्षा सरासरी रोजचा प्रवाह जास्त असतो अशा कोणच्याही अपशिष्टाच्या प्रवेशासंबंधीच्या अटी ह्या धारेत प्रस्थापित करण्यात येतात.

धारा ७– कोणच्याही अपशिष्टाकरता ज्या प्राथमिक उपचारांच्या सुविधांची तरतूद केलेली आहे त्या सुविधांची देखभाल मालकाने स्वखर्चाने केली पाहिजे.

धारा ८– जरूर तेथे, औद्योगिक अपशिष्टे वाहून नेणाऱ्या मलवाहिनीचा उपयोग करणाऱ्या कोणच्याही मालमत्तेच्या मालकाने, निरीक्षण करणे, नमुना घेणे, आणि मापे घेणे याकरता एक सोयीस्कर तपासकुंडी बांधून घेतली पाहिजे.

धारा ९– धारा ३ व ६ मध्ये उल्लेख केलेल्या पाणी व अपशिष्टांच्या वैशिष्टचांची सर्व मापने आणि विश्लेषणे मानक पद्धतींना अनुसरून निर्धारित केली पाहिजेत.

धारा १०– ह्या अनुच्छेदात ( article ) समाविष्ट केलेल्या कोणच्याही निवेदनामुळे शहर व कोणताही उद्योग, यांच्यामधील विशेष करार अगर व्यवस्थेस बाधा येणार नाही.

## १४–३. मलवाहिनीच्या भाडयाचे दर–

नागरी अर्थसंकल्प सुरक्षित रहावा आणि उद्योगाकडून त्यांच्या अपशिष्टांच्या विल्हेवाटीच्या खर्चाचा योग्य वाटा मिळण्याची खात्री असावी म्हणून मलवाहिन्यांवर भाडे आकारण्याची आवश्यकता असते. मलव्यवस्थेच्या सेवेचे शुल्क आकारण्याच्या खालील अनेक पद्धती नगरपालिका वापरू शकते :

१) मालमत्तेवरील यथामूल्य ( ad valorem ) कर; अमेरिकेच्या लोकवस्त्यांतील ८० टक्के वस्त्यांत ही पद्धत रूढ आहे. लहान शहरे व खेडेगांवांत ही यशस्वी झाली आहे. २) विशेष सामाजिक करनिर्धारण; अग्रफूट मानाप्रमाणे ( front footage ) कराची आकारणी केली जाते; ३) मलवाहिनीवरील भाडेपट्टी. ज्या नगरपालिकात उपचार संयंत्रणाची तरतूद केलेली असते त्यांपैकी एक षष्टमांश पालिकांत ही पद्धत वापरली जाते; ४) उद्योगांशी केलेले विशेष करार; ५) वरील पद्धतींच्यापैकी दोन अगर अधिक पद्धती एकत्रितपणे वापरणे.

करांचा विचार करताना, परिचालन, देखभाल, आणि कर्जाची परतफेड, या निश्चित खर्चाच्या बाबी विचारात घ्याव्यात. ह्या तीन्ही बाबींच्या खर्चातील प्रत्येकीचा कांही अंश मलव्यवस्थेच्या वापरावर लागू करावा आणि उरलेला ह्या व्यवस्थेच्या मालमत्तेच्या मालकांवर आकारावा. मलव्यवस्थेतील प्रत्येक घटकात्मक संचाचा खर्च विषयवार वेगळा करून आणि प्रत्येक संचाच्या वार्षिक खर्चाची टक्केवारी वापरदारावर व उरलेली घरमालकांवर आकारून ही कार्यवाही केली जाते. नंतर, वापरदारांवरील आणि घरमालकांवरील एकूण वार्षिक करभाराची आकारणी, एकांश लागतींची ( unit costs ) बेरीज करून, निर्धारित करण्यात येते. वैयक्तिक घरमालकाच्या मालमत्तेचे (अगर कधीकधी अग्रफूट मानाप्रमाणे) मूल्यांकन करून घरमालकांनी देण्याच्या करभारापैकी एकूण वाटा यथाप्रमाण करण्यात येतो. तसेच वापरदारांच्या वाटयाला

येणाऱ्या करभाराचे प्रमाणित वाटप खालील अपशिष्ट घटकांवर आधारित केले जाते. राशि, तरंगते घनपदार्थ, जैव रासायनिक ऑक्सीजनची मागणी, आणि (कधीकधी) क्लोरीनची मागणी. प्रत्येक संचाकरता वापरदाराच्या वाट्याचे संगणन करताना हे घटक विचारात घेतले जातात. जर केवळ आयतनिक आधारावरच संचाचे अभिकल्पन केले असेल, उदा. मुख्य वाहितमल पंप, तर आयतन योगदात्यावर ( contributor ) वापरदाराचा संपूर्ण वाटा आकारण्यात येतो. उलटपक्षी, अवमल पाचनाच्या एकूण खर्चापैकी ९० प्रतिशत् खर्च तरंगत्या घनपदार्थांच्या योगदात्यांवर व १० प्रतिशत् BOD च्या योगदात्यांवर आकारण्यात येतो. जर पाण्याच्या वापरावर वाहितमलाची राशि आधारलेली असेल आणि पुरवठा खाजगी (विहिरींचे अथवा नदीचे पाणी) असेल तर, प्रवाह मापनाकरता जलमापक सामान्यत: उद्योग पुरवितात.




आकृति १४–१. रोधक ( intercepting ) मलवाहिन्यांच्या वरील निश्चित प्रभारांचे ( fixed charges ) वाटप ( Schroepfer प्रमाणे [५]).

राशि, घनपदार्थ आणि BOD, यांच्या संबंधी वापरदारांवरील प्रभार क्रमवार एकत्र केल्यानंतर, आपणास प्रत्येक वर्गातील वापरदारांच्या एकूण करभाराची माहिती मिळते. ह्या तीन्हींची बेरीज, वार्षिक मलव्यवस्थेच्या खर्चातील अनुक्रमे वापरदाराचा हिस्सा दाखवते आणि क्रमाने वापरदाराच्या व घरमालकाच्या हिश्यांची बेरीज मलव्यवस्थेवरील संपूर्ण वार्षिक खर्च दाखविते.

खर्चाच्या योग्य वाटपाचे दिग्दर्शन करण्याकरता Schroepfer ने (५) खालील उदाहरणाचा उपयोग केला आहे : एका विशिष्ट शहरातील वाहितमलाच्या विल्हेवाटीच्या व्यवस्थेच्या एकूण वार्षिक खर्चात खालील घटक होते :

(पुढील मजकूर पा. २१७ वर पहा)










आकृति १४-२. उपचारण संयंत्रावरील निश्चित प्रभारांचे वाटप (a) राशीचा परिणाम होणाऱ्या बाबी; (b) BOD ने बाधित झालेल्या बाबी; (c) तरंगणाऱ्या घनद्रव्याने बाधित झालेल्या बाबी. ( Schroepfer प्रमाणे [५] ).

कोष्टक–

निश्चित प्रभाराचे वाटप

| संच | एकूण निश्चित भार $ | मालमत्तेच्या मालकावर बसवावयाचा आकार | |
|---|---|---|---|
| | | % | $ |
| रोधक मलवाहिन्या | ३५००० | ६४ | २२३०० |
| उपचारण संयंत्र | | | |
| मुख्य पंपिंग केंद्र | | | |
| उपकरणें | १५०० | ४०.५ | ६०० |
| इमारती | १२५० | ६४ | ८०० |
| जाळ्या आणि ग्रिट कक्ष– | १५०० | ६४ | ९५० |
| प्राथमिक अवसादन टाक्या | ४५०० | ४०.५ | १८०० |
| ठिबकणारे निस्यंदक | ३०००० | २५ | ७५०० |
| अंतिम अवसादन टाक्या | ९००० | ३० | २७०० |
| संग्राही ( receiving ) पंप | ७५० | २५ | २०० |
| क्लोरिनीकरण टाक्या आणि उपकरणें | २००० | ३५ | ७०० |
| पाचन टाक्या आणि संग्राही निस्यंदक | ८००० | ३० | २४०० |
| उप बेरीज | ५८५०० | ३०.३ | १७६५० |
| मुख्य नियंत्रण इमारत | ७५०० | ३०.३ | २३०० |
| संयंत्र जलपुरवठा | २५०० | ३०.३ | ८०० |
| रस्ते व मैदाने | २५०० | ३०.३ | ८०० |
| नळव्यवस्था व तापन | ४००० | ३०.३ | १२०० |
| एकूण संयंत्र | ७५००० | ३०.३ | २२७५० |
| एकूण-निश्चित प्रभार | ११०००० | ४१ | ४५०५० |

१४–१.
(Schroepfer) प्रमाणे (५).

| वापरदारांवर बसवावयाचा आकार | —वर आकारावयाचा वापरदाराचा वाटा | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | राशि | | तरंगते घनपदार्थ | | BOD | |
| $ | % | $ | % | $ | % | $ |
| १२७०० | १०० | १२७०० | | | | |
| ९०० | १०० | ९०० | | | | |
| ४५० | १०० | ४५० | | | | |
| ५५० | ६० | ३३० | ४० | २२० | | |
| २७०० | ८५ | २३०० | १५ | ४०० | | |
| २२५०० | १० | २२५० | | | ९० | २०२५० |
| ६३०० | ५० | ३१५० | | | ५० | ३१५० |
| ५५० | | | | | १०० | ५५० |
| १३०० | ४० | ५२० | | | ६० | ७८० |
| ५६०० | | | १०० | ५६०० | | |
| ४०८५० | २४.२ | ९९०० | १५.२ | ६२२० | ६०.६ | २४७३० |
| ५२०० | २४.२ | १३१० | १५.२ | ७९० | ६०.६ | ३१०० |
| १७०० | २४.२ | ४१० | १५.२ | २६० | ६०.६ | १०३० |
| १७०० | २४.२ | ४१० | १५.२ | २६० | ६०.६ | १०३० |
| २८०० | २४.२ | ६८० | १५.२ | ४३० | ६०.६ | १६९० |
| ५२२५० | २४.२ | १२७१० | १५.२ | ७९६० | ६०.६ | ३१५८० |
| ६४९५० | ३९.२ | २५४१० | १२.२ | ७९६० | ४८.६ | ३१५८० |

कोष्टक १४–२.

परिचालन आणि देखभालीवरील खर्चाचे वाटप

( Schroepfer प्रमाणे ) (५).

| संघ | परिचालन व देखभाली वरील एकूण खर्च | मालमत्तेच्या मालकांवर आकारता येणारा | | वापरदारांवर आकारता येणारा, | — बर आकारावमाचा वापरदारांचा वाटा | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | राशि | | तरंगते घनपदार्थ | | BOD | |
| | $ | % | $ | $ | % | $ | % | $ | % | $ |
| रोधक मलवाहिन्या | २२०० | ६० | १३०० | ९०० | ६० | ५०० | ४० | ४०० | | |
| मुख्य पंपिंग केंद्र | ९२०० | १७ | १६०० | ७६०० | १०० | ७६०० | | | | |
| प्राथमिक उपचार | ६७०० | ५० | ३४०० | ३३०० | ५० | १७०० | ५० | १६०० | | |
| दुय्यम उपचार | १३५०० | १५ | २००० | ११५०० | १० | १२०० | | | ९० | १३३०० |
| नि:स्त्रावाचे क्लोरिनीकरण | ५२०० | १५ | ८०० | ४४०० | १० | ४०० | | | ९० | ४००० |
| अवमलाची विल्हेवाट | १७५०० | ५ | ९०० | १६६०० | | | १०० | १६६०० | | |
| सामान्य | ५००० | १५ | ८०० | ४२०० | २५ | १००० | ४३ | १८०० | ३२ | १४०० |
| पर्यवेक्षणावरील | ६२०० | १५ | ९०० | ५३०० | २५ | १३०० | ४३ | २३०० | ३२ | १७०० |
| वसुली व बिले करणे | ५००० | १५ | ८०० | ४२०० | २५ | १००० | ४३ | १८०० | ३२ | १४०० |
| एकूण | ७०५०० | १७.८ | १२५०० | ५८००० | २५.४ | १४७०० | ४२.१ | २४५०० | ३२.५ | १८८०० |

| | | |
|---|---|---|
| १) निश्चित प्रभार | | |
| | रोधक मलवाहिन्या * | $ ३५००० |
| | उपचारण संयंत्र * | ७५५०० |
| २) परिचालन आणि देखभालीवरील खर्च | | ७०००० |
| | एकूण | $ १८०५०० |

मलवाहिन्या आणि उपचारण संयंत्रांमधील निश्चित प्रभाराचे वाटप कोष्टक १४–१ मध्ये दाखविले आहे. कोष्टक १४–२ मध्ये परिचालन आणि देखभालीवरील खर्चाचे वाटप दाखविले आहे. कोष्टक १४–३ मध्ये निश्चित प्रभार व देखभालीवरील खर्च सारांश रूपात दिला आहे.

मालमत्तेच्या **मालकावरील प्रभार** निर्धारित मूल्यांकनाप्रमाणे ( assessed evaluation ) वाटण्यात यावा. चर्चिलेल्या उदाहरणात तो $ २०,०००,००० धरला आहे. म्हणून मालमत्तेच्या दर १००० डॉलर मूल्यांकनासाठी मालमत्तेच्या मालकावर आकारावयाच्या प्रभाराची रक्कम २.८८ डॉलर होते. वापरदारावरील आकारणी, प्रवाह, घनपदार्थ, आणि BOD, यांच्यावर पूर्वी उल्लेखिल्याप्रमाणे अवलंबून असते. म्हणून वार्षिक प्रवाह आणि अपशिष्ट भाराच्या प्रत्येक प्रकाराच्या राशी पहिल्या वर्षाच्या परिचालनानंतर, निश्चित कराव्या अथवा वापरदारावरील वार्षिक प्रभार निश्चित करण्यापूर्वी त्या अंदाजित कराव्या. कोष्टक १४–४ मधील तिसऱ्या स्तंभात, स्तंभ १ व २ मध्ये दिलेल्या माहितीवरून प्राप्त केलेल्या एकांश दरांची ( unit rates ) सूचि दिली आहे.

अनुपचारित औद्योगिक अपशिष्ट व घरगुती वाहितमलाची एकत्रित विल्हेवाट करावयाच्या एका प्रकल्पाचे प्रकरणवृत्त ( case history )—

चर्चेकरता ८५०० लोकसंख्येच्या विकसनशील व औद्योगिक–अपशिष्टाच्या समस्येला तोंड द्यावे लागणार असलेल्या एका प्रत्यक्ष शहराच्या उदाहरणाचा आपण विचार करूया. जेव्हा नागरी शासन आणि औद्योगिक व्यवस्थापन अपशिष्टाच्या विल्हेवाटीसंबंधीच्या समस्या सोडविण्यासाठी एकमेकांस सहकार्य देतात तेव्हा काय फलनिष्पत्ती प्राप्त करता येते याचे हे शहर एक उत्कृष्ट उदाहरण म्हणून काम देते.

शहरातील वाहितमल ज्या नाल्यात सोडावयाचा त्यात तो प्रस्त्रावित करण्यापूर्वी त्याबर पुरेशा प्रमाणात उपचार करण्यात येत नसत. परंतु वाहितमलावर केवळ योग्य उपचार करणे आणि त्याचे निष्कासन करणे यापेक्षा काही अधिक या समस्येत अंतर्भूत होते.

त्या शहरातील कापसाच्या सुतावर अंतिम उपचार करण्याच्या एका मोठ्या गिरणीतील अपशिष्टावरही उपचार करण्याची आवश्यकता होती म्हणून नागरी व्यवस्था आणि उद्योग, यांनी खऱ्याखुऱ्या सहकाराच्या भावनेने आपल्या समस्यांची उत्तमप्रकारे सोडवणूक करण्याच्या प्रयत्नात लेखकाशी औपचारिक करार केला—

भांडवली निवेश ( investment ) : रोधक मलवाहिन्या, $ ७००००० आणि उपचारण संयंत्र, $ १५०००००; [दर वर्षी ५ प्रतिशत् (एकूण व्याज आणि मुद्दल) कर्ज फेड.]

कोष्टक १४–३.

(निश्चित आणि परिचालन प्रभारांच्या वाटपाचा सारांश Schroepfer प्रमाणे ) (५) .

| निश्चित भार | — वर आकारावयाचा | | | |
|---|---|---|---|---|
| | वापरदार | | मालमत्तेचे मालक | |
| | % | $ | % | $ |
| मलवाहिन्या | ३० | १२७०० | ६४.० | २२३०० |
| उपचारण संयंत्र | ६९.७ | ५२२५० | ३०.३ | २२७५० |
| परिचालन व देखभालीवरील खर्च | ८२.२ | ५८००० | १७.८ | १२५०० |
| एकूण आणि सरासरी | ६८-१ | १२२९५० | ३१.०९ | ५७५५० |

कोष्टक १४–४.

(तीन घटकांवर आधारलेली वापरदारांवरील प्रभारांची गणने Schroepfer प्रमाणे) (५).

| | वार्षिक राशि | एकूण, $ | एकांश दर |
|---|---|---|---|
| प्रवाहाची राशि | १३७० दशलक्ष गॅलन | ४०००० | $ २.९३/१००० गॅलन |
| तरंगते घनपदार्थ | ३६४७००० पौंड | ३२४६० | ०-८९/१०० पौंड |
| BOD | ३८४७००० पौंड | ५०३८० | १.४०/१०० पौंड |

समस्या सोडविण्याकरता खालील कार्यवाही करण्यात आली : १) घरगुती आणि औद्योगिक अपशिष्टांचे मापन, २) अपशिष्टांच्या स्वास्थ्यविषयक वैशिष्टयांचे निर्धारण, ३) अपशिष्टांवरील प्रायोगिक उपचार, ४) संग्राही प्रवाहावरील परिणाम प्रस्थापित करणे,

५) विद्यमान आणि अनुज्ञेय प्रस्त्रावांचे गणन ६) नाल्यातील विश्लेषणावर आधारित केलेल्या शिफारसी, ७) औद्योगिक प्रक्रिया–जलाकरता विसर्जन— संयंत्रातील निस्त्रावाच्या पुनरुपयोगासंबंधी अन्वेषण, ८) भविष्यकालीन विस्ताराकरता नियोजन, ९) लागणाऱ्या सयंत्रांचे निर्धारण, १०) उपचारण–खर्चाच्या वाट्याचे विभाजन (apportioning) ११) उपचारण–संयंत्राच्या जागेची निवड.

वस्तुस्थितींची माहिती गोळा करून त्याचे मूल्यमापन करताना प्रत्येक अंगाचा स्वतंत्रपणे विचार करण्यात आला. माहिती उपलब्ध झाल्यानंतर आणि तिचे बिनचुक मूल्यमापन केल्यानंतरच **फक्त** सुयोग्य अभियांत्रिकी निर्णय घेता आला.

**कोष्टक १४–५.**

**वाहितमल आणि अपशिष्टांच्या २४ तासातील प्रवाहाच्या * सर्वेक्षणांचे निष्कर्ष–**

| तारीख | गिरणीतील दरमिनिटास गॅलन | | | शहरातील दरमिनिटास गॅलन | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | किमान | सरासरी | कमाल | किमान | सरासरी | कमाल |
| १/२३/५७ | ५६६ | १२४८ | २३६० | २२७ | ३३३ | ५३० |
| २/ ४ /५७ | ८९२ | १४९४ | २७०० | | | |
| २/२५/५७ | | | | २२७ | ३६४ | ५९० |

* शहरी प्रवाह अगदी सुसंगत होता.

**कोष्टक १४–६.**

**नागरी जलोपचार कार्यालयाने * पुरविलेल्या पाण्याचा सरासरी वापर.**

| महिना | द. दि. द. ल. गॅ. | महिना | द. दि. द. ल. गॅ. |
|---|---|---|---|
| जानेवारी | ०.५१३ | ऑगस्ट | ०.९६८ |
| फेब्रुवारी | ०.५२८ | सप्टेंबर | १.०१३ |
| मार्च | ०.५६३ | ऑक्टोबर | १.२९६ |
| एप्रिल | ०.६४८ | नोव्हेंबर | १.१३५ |
| मे | ०.८५२ | डिसेंबर | १.०६१ |
| जून | ०.७३४ | जानेवारी | |
| जूलै | ०.७०४ | २३-२४,१९५७ ‡ | १.२२५ |

* १९५६ सालाकरता महिनावार रोजची सरासरी.

‡ अपशिष्टाचा नमुना घेण्याच्या कालातील पहिल्या २४ तासांची तारीख; द. दि. द. ल. गॅलनाचा आंकडा सुमारे ५० टक्के औद्योगिक खप दाखवितो.




आकृति १४–३ (अ) व (ब) जानेवारी २३ व २४ तारखेस दर १५ मिनिटांच्या कालांतराने नोंद केलेले शहरातील बाहितमल आणि गिरणीतील अपशिष्ट यांचे प्रवाह.

## १४–४. घरगुती आणि औद्योगिक अपशिष्टांचे मापन–

अभियंत्याला कोणत्याही अपशिष्टाच्या प्रवाहाचे मापन करावयाच्या वेळी, मनुष्य बल, वेळ, आणि पैशाची मापनाच्या व्याप्तीवर मर्यादा पडते. प्रवाहाचे प्रत्यक्ष मापन न करता गत कालातील पाण्याच्या वापरावर आधारित केलेल्या प्रवाहाला फार थोडे मोल असते, आणि पुष्कळ वेळा ते दिशाभूल करणारे असते. अपशिष्ट–जलाच्या प्रत्यक्ष प्रवाहाच्या दीर्घ काल नोंदी ठेवणे इष्ट असते, परंतु वर दिलेल्या कारणांपैकी एक अगर अधिक कारणांमुळे सामान्यत: ते व्यवहार्य ठरत नाही. (म्हणून) काहीसा सोयीस्कर असा मधला मार्ग शोधणे जरुरीचे असते आणि असा मार्ग, लोकसंख्या, पाण्याचा वापर, आणि अपशिष्ट जलाचे मापन, यांची तुलना करून प्रवाहाच्या संतुलनाचे ( balance of flow ) अभिकल्पन करणे, हा असतो.

ह्या उदाहरणात, गिरणीत व शहरात अशा दोन्ही ठिकाणी २४ तासांच्या ३ कालावधीत अपशिष्ट-जलाच्या नि:स्त्रावाचे नमुने गोळा करण्यात आले आणि प्रवाहाचे मापन करण्यात आले. गिरणीतील अपशिष्ट–जलाचे मापन, तेथील संपूर्ण अपशिष्ट ज्यावरून वाहील अशा ९०° व्हीच्या आकाराचा खाच असलेल्या बांधाचा आणि फ्ल्यूमपेटीचा उपयोग करून, करण्यात आले. अंशत: भरून वाहणाऱ्या १६ इंची निकासी मलवाहिनीतील प्रवाहाची खोली तिच्या उताराची नोंद घेऊन शहरी वाहितमलाचे मापन करण्यात आले आणि प्रवाह-गणनासाठी मॅनिंगचे सूत्र वापरण्यात आले. ह्या तीन दिवसांतील, किमान, सरासरी, व कमाल प्रवाहाच्या निरीक्षणांची नोंद को. १४–५ मध्ये केली आहे. नमुना घेण्याच्या प्रथम दिवशी १५ मिनिटांच्या कालांतरातील प्रवाह–विचरणांची नोंद आ. १४-३ मध्ये केली आहे.

आ. १४–४ मध्ये दुसऱ्या दिवशी दर अर्ध्या तासाच्या अंतराने मोजलेल्या प्रवाहातील विचरणे दाखविली आहेत. को. १४–६ त १९५६ सालातील प्रत्येक महिन्यातला पाण्याचा सरासरी खप दाखविला आहे. पहिल्या २४ तासांच्या नमुना घेण्याच्या कालातील गिरणीच्या क्षमतेच्या टक्केवारीचे दिग्दर्शन कोष्टक १४–७ वरून होते. तसेच त्या कालावधीतील रंगकामाच्या सामान्य प्रकारापासून होणारे विचरणही त्यावरून दिसून येते. को. १४–८ मध्ये तीच माहिती दुसऱ्या २४ तासांच्या कालावधीकरता दिली आहे. ह्या माहितीवरून अभियंत्याला विनिर्मितीच्या अन्य परिस्थितीतील अपेक्षित असलेल्या अपशिष्टाची शक्ति आणि राशि यांची निश्चिती करता येते.




आकृति·१४–४. अर्ध्यातासाच्या अंतराने ४ व ५·फेब्रुवारीला नोंद केलेले शहरातील वाहितमल आणि गिरणीतील अपशिष्ट यांचे प्रवाह–

२४ तासांच्या कालाच्या सर्वेक्षणात गिरणीतील अपशिष्ट द. मि. स सरासरी १३७१ गॅलन होते (गॅं/मि) (को१४-५). १५ मिनिटांच्या कालात द मि. स ५६६ या किमान मूल्या-पासून द. मि. स २७०० गॅलन इतक्या कमाल मूल्यापर्यंत ते बदलत गेले. (अशा तऱ्हेच्या विचरणामुळे स्वतंत्र उपचारणापेक्षा संयुक्त उपचारण नेहमीच अधिक अवघड जाते.) अंदाजी ८ तासांच्या कालांतरात अत्युच्च प्रवाह घडून आले. (आ. १४–३ व १४–४ पहा.), आणि

दिवसाच्या प्रवाह-राशी पासून रात्रीच्या प्रवाहात फारसा मोठा फरक पडला नव्हता. ८ तासांचा प्रवाह धारण करील असे अभिकल्पन केलेल्या समानीकरण द्रोणीमुळे ह्या अत्युच्च प्रस्त्रावांची सारखी पातळी होऊ शकेल हे आपणास सहज दिसून येईल.

२४ तासांच्या सर्वेक्षण कालात शहरातील वाहितमलाची सरासरी द. मि स ३४८ गॅलन होती (को. १४-५). द. मि. स किमान २२७ गॅलन पासून कमाल ५९० गॅलनपर्यंत त्याचे विचरण होते. सकाळी १० वाजल्यापासून दुपारी २ वाजेपर्यंत अत्युच्च प्रवाह घडून येत होते, तसेच पुन: संध्याकाळी ७ पासून रात्री पर्यंत ते अत्युच्च होते. कमाल प्रवाह सरासरी प्रवाहाच्या सुमारे १.७ पट होता तर किमान प्रवाह सरासरी प्रवाहाच्या सुमारे ०.४ पट होता. ("सर्व साधारण" घरगुती वाहितमल (प्रवाह) सरासरी (प्रवाहा) च्या किमान ५० टक्क्यांपासून कमाल २०० टक्क्यांपर्यंत बदलता असतो.

**कोष्टक १४-७.**

**जानेवारी २३-२४ चे गिरणीतील उत्पादन.**

| | |
|---|---|
| जानेवारी २३-२४ च्या कालात २४ तासात दशलक्ष गॅलन मध्ये मापन केलेला पाण्याचा खप- | १.७५११ प्रक्रिया जल<br>०.०१८६ मृदुकारक पश्चधावन<br>०.१००० वालुका निस्यंदक, पश्चधावन<br>०.१०८० अन्य प्रक्रियाजल<br>एकूण-१.९७७७ |
| मापन केलेले अपशिष्ट (प्रवेशी अपव्ययाची टक्केवारी) ९०.७ | १.७९५ |
| रंग विनिर्मिति | कमाल क्षमतेची टक्केवारी |
| रंग गृह अ | ९० |
| रंग गृह ब | १०० |
| रंग गृह क | ५९ |
| स्लॅशिंगचे उत्पादन | ८० |
| सफाई उत्पादन | ८०-९० |

( कोष्टक १४–७ पुढे चालू )

| मूल स्थान | रंगकामाच्या प्रकाराने प्रभावित झालेला अपशिष्टांचा गुणधर्म | | |
|---|---|---|---|
| | सामान्य रंगकाम | | प्रत्यक्ष रंगविणे, जानेवारी २३–२४ |
| | रंगाचा प्रकार। | % | % |
| रंग गृह अ | प्रत्यक्ष रंग | २९ | ५ |
| | वॅट रंग | ६१ | ६४ (चरम दिवस) |
| | सल्फर नॅप्थॉल वॅट अम्ल | १० | सल्फर ३१ |
| रंग गृह ब | प्रत्यक्ष रंग | ४० | अतिरिक्त प्रत्यक्ष (आठवडयाचा दिवस) |
| | वॅट रंग | ४० | |
| | सल्फर | २० | |
| रंग गृह क | वॅट रंग | ८० | ९७.५ |
| | नॅप्थॉल | १५ | २.५ |
| | सल्फर | ५ | — |

एकूण सामान्यवाहितमल प्रवाहाच्या शहरी वाहितमलाची सरासरी २० टक्के असल्याने शहरी वाहितमल प्रवाहातील विचरणांचा कोणच्याही एका मिनिटातील एकूण राशीवर भरीव परिणाम झाला नाही, परंतु गिरणीतील अपशिष्टाच्या प्रवाहातील विचरणांचा एकूण अपशिष्टाच्या राशीवर तात्काळ परिणाम होतो. कारण गिरणीतील प्रवाहाची राशि शहरात त्यापेक्षा कितीतरी जास्त होती.

## कोष्टक १४–८

### ४–५ फेब्रुवारीचे गिरणीतील उत्पादन.

| | |
|---|---|
| फेब्रुवारी ४-५ तारखांच्या २४ तासांच्या कालावधीत दशलक्ष गॅलनमध्ये मापन केलेला पाण्याचा खप. | १.५०३३ प्रक्रिया जल<br>०.०१८६ मृदुकारकातील पश्च धावन<br>०.१००० वालुका निस्यंदकातील पश्चधावन<br>०.४२०० अन्य प्रक्रियाजल<br>एकूण २.०४१९ |
| मापन केलेले अपशिष्ट | २.१५ |
| फुटलेल्या मलवाहिनीतील वाहितमल, दशलक्ष गॅलन, | ०.३० |
| गिरणीतील प्रत्यक्ष अपशिष्ट, द.ल.गॅलन, | १.८५ |
| रंगाचे उत्पादन | कमाल क्षमतेची टक्केवारी |
| रंग गृह अ | ९५ |
| रंग गृह ब | १०० |
| रंग गृह क | ५९ |
| स्लॅशिंग उत्पादन | ८५ |
| सफाई उत्पादन | ८२–९५ |

( कोष्टक १४–८ पुढे चालू )

| मूल स्थान | रंगाच्या प्रकाराने प्रभावित झालेल्या अपशिष्टांचे गुणधर्म | | |
|---|---|---|---|
| | सामान्य रंगकाम | | प्रत्यक्ष रंगकाम, फेब्रु. ४–५. |
| | रंगाचा प्रकार। | % | % |
| रंग गृह अ | प्रत्यक्ष रंग | २९ | २.० |
| | वॅट रंग | ६१ | २५.६ |
| | सल्फर<br>नॅप्थॉल<br>वॅट अम्ल | १० | सल्फर ७०.४<br>नॅप्थॉल —<br>वॅट अम्ल २.० |
| रंग गृह ब | प्रत्यक्ष रंग | ४० | ६७ |
| | वॅटरंग | ४० | ३३ |
| | सल्फर | २० | — |
| रंग गृह क | वॅट रंग | ८० | ६६.५ |
| | नॅप्थॉल | १५ | ३३.५ |
| | सल्फर | ५ | — |

ऑक्टोबर मधील सरासरी दिवसांच्या व्यतिरिक्त, (को. १४–६ पहा) कोणच्याही दिवसांच्या मानाने (महिन्याच्या सरासरीवर आधारित केलेला) शहरी पाण्याचा खप, नमुना घेण्याच्या पहिल्या २४ तासांच्या कालावधीत, जास्त होता. म्हणून त्या दिवशीची नागरी अपशिष्टाची राशि जवळ जवळ कमाल असल्याचे मानण्यास हरकत नाही. त्याच कालावधीतील गिरणीतील उत्पादन कमाल क्षमतेच्या ८० ते १०० प्रतिशत् होते (को. १४–७), म्हणून गिरणीतील अपशिष्टाच्या संदर्भात हा दिवस उच्च प्रमाणात उत्पादनक्षम होता. तसेच, रंगकामातील अपशिष्टाचा गुणधर्म, गिरणीतील सामान्यपणे उत्पादन होत असलेल्या अपशिष्टाच्या गुणधर्मांचा प्रतिनिधी होता. नमुना घेण्याच्या कार्यक्रमानंतर असा निष्कर्ष काढता आला कीं, शहर आणि उद्योगानी एकत्रितपणे प्रायोजित केलेल्या संयंत्रात द. मि. स सरासरी एकूण १७१९ गॅलन (द. दि. २.४७ द. ल. गॅलन) अपशिष्ट हाताळले गेलेच पाहिजे.

## १४–५ अपशिष्टांच्या स्वास्थ्यविषयक गुणधर्मांचे निर्धारण–

पहिल्या २४ तासांच्या नमुना घेण्याच्या आणि मापन करण्याच्या कालात, ६ तासांची गिरणीतील ४ संमिश्र अपशिष्टे आणि १२ तासांचे २ शहरी वाहितमल गोळा करण्यात आले आणि त्यांचे pH, रंग, क्षारता, अम्लता, BOD, आणि एकूण घनपदार्थांच्या संबंधात, विश्लेषण करण्यात आले. अमेरिकेच्या सार्वजनिक स्वास्थ्यसेवा विभागाच्या **पाणी, वाहितमल, आणि औद्योगिक अपशिष्ट तपासणीच्या मानक पद्धती** १० वी आवृत्ति, (६), प्रमाणे ह्या चांचण्या करण्यात आल्या. को. १४–९ मध्ये त्यांचे निष्कर्ष सादर केले आहेत. दुसऱ्या २४ तासांच्या नमुना घेण्याच्या व मापन करण्याच्या कालावधीत गोळा केलेल्या गिरणीतील ६ तासांच्या ४ संमिश्र अपशिष्टांचे अन्वेषण करून त्यांचे निष्कर्ष को. १४–१० देण्यात आले आहेत. तिसऱ्या मापन कालातील २४ तासांच्या शहरी वाहितमलाचा संमिश्र नमुना गोळा करण्यात आला आणि त्याचे विश्लेपण त्या कालात करून त्याचे निष्कर्ष को. १४–११ त दिले आहेत.

(शहरी आणि औद्योगिक अपशिष्टांच्या) नमुन्यांचा पहिला संच बुधवारी गोळा केला; त्यावेळी गिरणीतील काम (जवळ जवळ वा) पूर्ण क्षमतेत चालू होते, आणि शहरी वाहितमलाची राशि सामान्य होती. (गिरणीतील अपशिष्टांच्याच फक्त) नमुन्यांचा दुसरा संच सोमवारी गोळा केला; तेव्हा आठवड्यानंतर गिरणीतील पूर्ण उत्पादनास नुकतीच सुरवात झाली होती. (शहरी अपशिष्टांचाच फक्त) तिसरा संचसुद्धा सोमवारी गोळा केला आणि त्यावेळी शहरी वाहितमल जास्तीत जास्त प्रबल होता आणि त्याची राशि कमाल होती. जेव्हा पावसाचे अंत:स्त्रवण किमान होते असे गृहीत धरण्यात आले तेव्हा अशा शुष्क हवामानाच्या कालात सर्व नमुने गोळा केले होते.

गिरणीतील अपशिष्टाचे उदासीनीकरण करण्यास लागणाऱ्या सल्फ्युरिक अम्लाच्या राशी दाखविणारी दोन अनुमापन वक्रे ( titration curves ) आ. १४–५ व १४–९ त सादर केली आहेत. ४ फेब्रुवारी १९५७ मध्ये गोळा केलेल्या गिरणीतील अपशिष्टाच्या उदासीनीकरणास लागणारे अम्ल आ. १४–५ मध्ये दिले आहे. आ. १४–६ त २५ फेब्रुवारी १९५७ ला गोळा केलेले गिरणीतील अपशिष्ट व अपशिष्ट-वाहितमल मिश्रण, अशा दोघांच्या उदासीनीकरणास लागणाऱ्या अम्लाची राशि आणि खर्च दाखविला आहे. को. १४–१२ त ९ एप्रिलला घेतलेल्या नमुन्यातील pH आणि ११.३ पर्यंत pH खाली आणण्यास लागणारी अम्लाची राशि दिली आहे.

**pH.** २४ तासांच्या संपूर्ण कालात गिरणीतील अपशिष्टाचा pH ११–५ व ११–७ च्या दरम्यान जवळजवळ स्थिर राहिला. अन्य ग्राह नमुन्यांत ( grab samples ) (को. १४–१२)

त्याची व्याप्ति १०–७ व ११–९ च्या दरम्यान काहीशी अधिक दिसून आली. शहरी वाहितमलाचा सामान्य गुणधर्म दाखविणारा pH ६.६ पासून ७·० पर्यंत बदलता होता आणि त्यावरून त्याची अवस्था "ताजी" असल्याचे निदर्शनास आले. योग्य आयतनमितीय ( volumetric ) समानुपातित ( proportioned ) असलेल्या दोन्ही अपशिष्टांच्या मिश्रणात अजूनही pH अंदाजी ११.५ इतका उच्च मिळू शकत होता, म्हणून प्रभावी जैवी उपचारणास मदत होण्याकरता एकूण pH कमी करण्याची आवश्यकता भासली.

**कोष्टक १४–९.**

**२३ जानेवारीला गोळा केलेल्या गिरणीतील अपशिष्टांची आणि घरगुती वाहितमलाची स्वास्थ्यविषयक वैशिष्ट्ये.**

| विश्लेषण | संमिश्र नमुना | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | गिरणी, पहिले ६ तास | गिरणी, दुसरे ६ तास | गिरणी, तिसरे ६ तास | गिरणी, चौथे ६ तास | शहर, पहिले १२ तास | शहर, दुसरे १२ तास |
| pH | ११.५ | ११.६ | ११.६ | ११.६ | ६.९ | ७.० |
| रंग, ppm | ३२० | ९६० | ३२० | १२८० | १६० | १२० |
| क्षारता, $CaCo_3$, ppm | ९६५ | १५०८ | १३३८ | १५५५ | २१३ | २०० |
| अम्लता, $CaCo_3$, ppm | ० | ० | ० | ० | ४६ | ४० |
| एकूण घनपदार्थ, ppm | २०१४ | २७१४ | २२९८ | २९८६ | ७८० | ७२४ |
| एकूण सेंद्रिय घनपदार्थ, ppm | [illegible]९२ | ९०० | ७७६ | १००० | ४९० | ४६० |
| एकूण राख, घन, ppm | १३२२ | १८१४ | १५२२ | १९८६ | २९० | २६४ |
| तरंगते घनपदार्थ, ppm | १८५ | १०५ | ११२ | १२४ | २६४ | २४८ |
| तरंगते सेंद्रिय घनपदार्थ, ppm | १७० | १०५ | | ९६ | १५२ | १०४ |
| तरंगती घन राख, ppm | १५ | ० | | २८ | ११२ | १८० |
| विलीन घनपदार्थ, ppm | १८२९ | २६०९ | २१८६ | २८६२ | ५१६ | ४४० |
| विलीन सेंद्रिय घनपदार्थ, ppm | ५२२ | ७९५ | | ९०४ | ३३८ | ३५६ |
| विलीन घन राख, ppm | १३०७ | १८१४ | | १९५८ | १७८ | ८४ |
| BOD ५ दिवस, $२०^{०C}$ ppm | ३१[illegible] | १९१ | १६६ | २४९ | ४७४ | ४३७ |

**क्षारता–** शहरातील वाहितमलापेक्षा गिरणीतील अपशिष्टाची क्षारता ५ ते ८ पट असते, आणि गिरणीतील राशि शहरातल्या राशीपेक्षा ४ पट असल्याने शहरातील वाहितमलाच्या क्षारतेचा एकूण क्षारतेवर फारच थोडा परिणाम होतो.व ाहितमलात पुन: एकदा शुद्ध घरगुती वैशिष्ठचे दिसून आली. त्यातील क्षारता २०० ते ४०० ppm होतो. गिरणीतील अपशिष्टात ती ९६५ ते १९५५ ppm असल्याचे दिसले. म्हणून मिश्रणाचे जैवी क्रियेने उपचारण करण्याकरता (त्यातील) हायड्रॉक्साइड क्ष रतेचे बरेच अपचयन करावे लागले.

**एकूण घनपदार्थ–** शहरातील वाहितमलापेक्षा गिरणीतील अपशिष्टात तीन ते चारपट अधिक घनपदार्थ होते. गिरणीतले (अपशिष्टातील) घनपदार्थ २००० त ३००० ppm इतके भिन्न होते, पण वाहितमलातील घनपदार्थातील विचरण ७०० ते १००० ppm होते. शहरी वाहितमलात घनपदार्थातील सेंद्रिय अंश अदमासे ६० ते ७० प्रतिशत् होता तर गिरणीतील अपशिष्टात तो सुमारे ३० टक्केच होता, हे अर्थपूर्ण वाटते; गिरणीतल्या अपशिष्टातील ७० टक्के घनपदार्थ अकार्बनिक होते.

कोष्टक १४–१०.

४ फेब्रुवारीला गोळा केलेल्या गिरणीतल्या अपशिष्टाचे घनपदार्थ आणि BOD संबंधी विश्लेषण–

| विश्लेषण | संमिश्र नमुना | | | |
|---|---|---|---|---|
| | गिरणी, पहिले ६ तास | गिरणी, दुसरे ६ तास | गिरणी, तिसरे ६ तास | गिरणी, चौथे ६ तास |
| एकूण घनपदार्थ, ppm | २१७८ | २५३२ | २५९० | २२७४ |
| एकूण सेंद्रिय घनपदार्थ, ppm | ७९४ | ९९२ | ८०८ | ८२२ |
| एकूण राख, ppm | १३८४ | १५४० | १७८२ | १४५२ |
| तरंगते घनपदार्थ, ppm | १६४ | १२० | १७६ | ११२ |
| तरंगते सेंद्रिय घनपदार्थ, ppm | ४८ | ५६ | ४४ | ३२ |
| तरंगती घन राख, ppm | ११६ | ६४ | १३२ | ८० |
| विलीन घनपदार्थ, ppm | २०१४ | २४१२ | २४१४ | २१६२ |
| विलीन सेंद्रिय घनपदार्थ, ppm | ७४६ | ९३६ | ७६४ | ७९० |
| विलीन घन राख, ppm | १२६८ | १४ ६ | १६५० | १३७२ |
| BOD, ५ दिवस, २०$^{\circ}$C, ppm | २४६ | २९७ | १८५ | १८२ |

कोष्टक १४–११.

२५ फेब्रुवारीला गोळा केलेल्या शहरातील वाहितमलाची स्वास्थ्यविषयक वैशिष्ट्ये–

| विश्लेषण | २४ तासातील संमिश्र नमुना, संकेंद्रण |
|---|---|
| pH | ६.६ |
| क्षारता, ppm $Ca Co_3$ | ४१० |
| अम्लता, ppm $Ca Co_3$ | ७० |
| एकूण घनपदार्थ, ppm | ९८२ |
| एकूण सेंद्रिय घनपदार्थ, ppm | ६९४ |
| एकूण घन राख, ppm | २८८ |
| तरंगते घनपदार्थ, ppm | ३१८ |
| तरंगते सेंद्रिय घनपदार्थ, ppm | २६६ |
| तरंगती राख, ppm | ५२ |
| विलीन घनपदार्थ, ppm | ६६४ |
| विलीन सेंद्रिय घनपदार्थ, ppm | ४२८ |
| विलीन राख, ppm | २३६ |
| BOD, ५ दिवस, २०$^{\circ}$C (६८$^{\circ}$F), ppm | ३०४ |

कोष्टक १४–१२.

९ एप्रिलला गोळा केलेल्या ग्राह नमुन्यांच्या ( grak samples ) उदासीनीकरणाकरता लागणारे अम्ल; गिरणीतील अपशिष्ट व शहरातील वाहितमल एकत्र केला होता.

| नमुना नंबर | प्रारंभिक pH, गिरणीतील अपशिष्ट | जेव्हा २० प्रतिशत् वाहितमल मिसळला तेव्हाचा pH | ११.३ इतका pH खाली आणण्याकरता लागणारे अम्म, * पौंड $H_2SO_4$/गॅलन मिश्र अपशिष्ट |
|---|---|---|---|
| १ | ११.९ | ११.९ | ०.००४१२ |
| २ | ११.८५ | ११.८ | ०.००१५५ |
| ३ | ११.७५ | ११.७ | ०.००६१० |
| ४ | ११.८ | ११.८ | ०.००१०३ |
| ५ | ११.७ | ११.६५ | ०.००३११ |
| ६ | ११.८ | ११.८ | ०.००१६९ |
| ७ | ११.६५ | ११.६५ | ०.००३८३ |
| ८ | ११.८ | ११.८ | ०.००३४६ |
| ९ | ११.७ | ११.७ | ०.००११० |
| १० | ११.८५ | ११.६ | ०.०० |
| ११ | ११.६ | ११.३ | ०.०० |
| १२ | १०.७ | १०.४ | ०.०० |

* लागणारे सरासरी अम्ल = ०.००२३६ पौंड/गॅलन.
लागणारे एकूण अम्ल = ०.००२३६×२.५ द. ल. गॅ. = ५९०० पौंड/दिवस
दर पौंडास ०.००९ डॉलरप्रमाणे अम्लाची किंमत = ५९००×०.००९
= $ ५३.१०/दिवस




आकृति १४–५. गिरणीतील अपशिष्टाच्या उदासीनीकरणाकरता लागणारे अम्ल

कोष्टक १४–१३.

गिरणीतील अपशिष्ट व शहरातील वाहितमल यांचे सरासरी भार.

| | राशि, द.ल.गॅलन | BOD, पौंड/दिवस | तरंगते घनपदार्थ पौंड/दिवस | एकूण घनपदार्थ, पौंड/दिवस |
|---|---|---|---|---|
| गिरणी | १.९७५ | ३७४५ | २२७० | ४०१२५ |
| शहर | .५०२ | १५७५ | १२४३ | ३६५० |
| एकूण | २.४७७ | ५३२० | ३५१३ | ४३७७५ |

प्राधान्यतः दाहक सोडा.




**आकृति १४–६. गिरणीतील अपशिष्ट आणि संमिश्र अपशिष्ट यांच्या अम्लीय गरजांची तुलना दर्शविणारे $H_2SO_4$ ने केलेले अपशिष्टांचे उदासीनीकरण. ( २/२५/५७ ला अपशिष्ट गोळा केले.)**

**तरंगते घनपदार्थ–** गिरणीतील अपशिष्टातील तरंगते द्रव्य शहरातील वाहितमलातल्या पेक्षा सुमारे निम्मेच होते. त्याची व्याप्ती १०० ते २०० ppm होती. पण वाहितमलात ते २५० पासून ३५० ppm पर्यंत होते. म्हणून वाहितमल आणि औद्योगिक अपशिष्टाच्या मिश्रणातील तरंगत्या घनपदार्थांचे एकूण संकेंद्रण निव्वळ घरगुती वाहितमलातल्यापेक्षा कमी राहील.

**जीवरसायनी ऑक्सीजनची मागणी** ( biochemical oxigen demand ) गिरणीतील अपशिष्टातील BOD शहरी वाहितमलातल्यापेक्षा किंचित कमी होता. तो १६६ ते ३१० ppm इतका होता, आणि वाहितमलात तो ३०४ ते ४७४ ppm होता. पण सर्व व्यावहारिक कार्यात या चांचणीची मूल्ये बदलू शकत असल्याने, शहरी व औद्योगिक अशा दोन्ही अपशिष्टांच्या BOD ची मूल्ये एकसारखी आहेत असे मानण्यास हरकत नाही.

## कोष्टक १४–१४.

## गिरणीतील अपशिष्ट व शहरातील वाहितमल, यांच्या मिश्रणांच्या रासायनिक किलाटनाचे निष्कर्ष

( संमिश्र नमुने )

| प्रदूषणकारक गुणधर्म | उपचारणापूर्वी | | उदचारणानंतर | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | * ppm | † ppm | * ppm | % लघुकरण | ‡ ppm | § ppm | ** ppm | % लघुकरण (सरासरी) |
| रंग, ppm | ३२० | ९५० | २० | ९३.७ | ८० | ६० | ७० | ९२.७ |
| तरंगते घन-पदार्थ, ppm | १४३ | १०७ | २८ | ८०.५ | ३२ | ३२ | २८ | ७२ |
| BOD, ppm | २२८ | ९९ | ११७ | ४९ | १६ | १२ | १२ | ८६ |

* ४ फेब्रुवारी १९५७ चे अपशिष्ट ( pH चे खास समायोजन केले नव्हते).

† २५ फेब्रुवारी १९५७ चे अपशिष्ट.

‡ ११.३ पर्यंत प्रारंभिक pH खाली आणला.

§ १०.६ पर्यंत प्रारंभिक pH खाली आणला.

** १०.० पर्यंत प्रारंभिक pH खाली आणला.

**उदासीनीकरण–** अनुमापन वक्रांवरून (आ १४–५ व १४–६) गिरणीतील अपशिष्टाचे स्वरूप उच्च प्रमाणात क्षारीय असल्याचे दिसून येते. उदा. २५ फेब्रुवारीला गोळा केलेली अपशिष्टे नमुनेदार ( norms ) आहेत असे धरल्यास, गिरणीतील अपशिष्टाच्या pH, ११.० पर्यंत खाली आणण्यासाठी सुमारे २०००० पौंड सल्फ्युरिक अम्ल लागेल. गिरणीतील अपशिष्टात शहरीवाहितमल मिसळल्यास अम्लाची रोजची लागणारी राशि १५००० पौंडाइतकी कमी करता येईल. आ. १४–६ मधील अनुमापन वक्राच्या आधारावर ह्या प्रक्रियेस दररोज सुमारे १५० डॉलर खर्च येईल. अन्य नमुन्यांचे आणखी अनुमापन केल्यानंतर असे दिसून आले कीं, pH १० व ११ च्या दरम्यान येईल असे उदासीनीकरण करण्यास दररोज सुमारे ५०

ते १०० डॉलर खर्च येईल. आ. १४–५ मधील अनुमापन वक्रावर हा (खर्च) आधारित केला आहे. तो टाळता यावा म्हणून गिरणीच्या बाहेर अपशिष्ट सोडण्यापूर्वी दाहकांच्या पुन:प्रापणावर सखोल विचार केला पाहिजे हे उघड आहे. को. १४–१३ त गिरणीतील अपशिष्ट आणि शहरातील वाहितमल यांच्या संयुक्त भारणांचा सारांश दिला आहे.

## १४–६. अपशिष्टांवरील प्रायोगिक उपचार–

४ व २५ फेब्रुवारीला गोळा केलेल्या संमिश्र अपशिष्टावर खालील प्रमाणे उपचार करण्यात आले : (१) संमिश्रित अपशिष्ट–नमुन्यातून ८० टक्के गिरणीतील अपशिष्ट व २० टक्के शहरातील वाहितमलाचे मिश्रण करण्यात आले; (२) सल्फ्युरिक अम्ल घालून pH, ११.३, १०.६ व १०.० पर्यंत खाली आणला; (३) किलाटनाला अनुकूलतम परिस्थिती निर्माण होण्यासाठी ८० ppm चुना व १४ ppm फेरिक क्लोराइड मिसळले; आणि (४) परिणामी मिश्रणांचे ३० सेकंद दमक मिश्रण ( flash mix ) केले, त्याचे ३० मिनिटे किलाटन केले, आणि एक तास अवस्थापन केले.

**कोष्टक १४–१५.**

**९ एप्रिलला गोळा केलेल्या ग्राह्य नमुन्यांतील तरंगत्या घनपदार्थांचे अपचयन** (reduction); **गिरणीतील अपशिष्ट व शहरातील वाहितमल एकत्रित.**

| नमुना नंबर | अनुपचारित मिश्रणातील तरंगते घनपदार्थ, ppm | किलाटनित व अवस्थापित निःस्रावातील तरंगते घनपदार्थ | |
|---|---|---|---|
| | | ppm | % अपचयन |
| १ | ८०० | ७६ | ८८ |
| २ | ९२ | ४० | ५७ |
| ३ | ८३६ | २२ | ९७ |
| ४ | ६८ | २० | ७१ |
| ५ | ८८ | ३६ | ५९ |
| ६ | २०० | २४ | ८८ |
| सरासरी | — | — | ७७ |

कोष्टक १४–१६.

९ एप्रिलला गोळा केलेल्या ग्राह्‌ नमुन्यातील रंगाचे अपचयन; गिरणीतील अपशिष्ट व शहरातील वाहितमल एकत्रित. *

| नमुना नंबर | अनुपचारित मिश्रण रंग, ppm | किलाटनित अवस्थापित निःस्त्राव, रंग † | |
|---|---|---|---|
| | | ppm | % अपचयन |
| १ | ३२० | १२० | ६२.५ |
| २ | १६० | ८० | ५० |
| ३ | २४० | ८० | ६७ |
| ४ | ६४० | ३२० | ५० |
| ५ | १२८० | २४० | ८१ |
| ६ | १२८० | १६० | ८८ |
| ७ | ३२० | १६० | ५० |
| ८‡ | १६० | १६० | ० |
| ९ | २४० | १२० | ५० |
| १० | १६० | ८० | ५० |
| ११ | ६४० | २०० | ६९ |
| १२ | ३२० | ८० | ७५ |
| सरासरी | — | — | ६८ |

* मानक हेलिज जलचांचणीकारकात, मानक रंग चक्र वापरून, तनुकरण पद्धतीने रंगनिर्धारण केले.

† ११.४ पर्यंत pH कमी करून आणि नंतर ८० ppm $Ca(OH)_2$ व १४ ppm $FeCl_3$ मिसळून सर्व नमुन्यांचे उपचारण केले.

‡ सरासरीतून वगळा.

रंगाच्या तरंगत्या घनपदार्थाच्या, व BOD च्या ह्या उपचारांनी केलेल्या निष्कासनाचा सारांश को. १४–१४ त दिला आहे.

गिरणीतील अपशिष्ट व शहरातील वाहितमल, यांचे ग्राह्‌ नमुने ९ एप्रिल १९५७ ला दर अर्ध्या तासाने गोळा केले, व प्रत्येक बाजूचा नमुना दुसऱ्या बाजूच्या नमुन्यात ८० टक्के गिरणीतील अपशिष्ट व २० टक्के शहरातील अवमल या प्रमाणात मिसळण्यात आला.

कोष्टक –१४–१७.

**१० एप्रिलला गोळा केलेल्या ग्राह्‌ नमुन्यांतील BOD चे अपचयन; गिरणींतील अपशिष्ट व शहरातील वाहितमल एकत्रित.**

| नमुना नंबर | अनुपचारित अपशिष्ट मिश्रणातील BOD, ppm | किलाटनित व अवस्थापित निःस्त्राव | | खांजणीकरण केल्यानंतरचा निःस्त्राव † | |
|---|---|---|---|---|---|
| | | * BOD, ppm | % अपचयन | BOD, ppm | % अपचयन |
| १ | ३९१ | २१४ | ४५.३ | ३१५ | |
| २ | २७९ | १३९ | ५०.१ | १०५ | ६२.४ |
| ३ | ४९० | ३१८ | ३५.२ | ३०७ | ३७.४ |
| ४ | २१६ | ११९ | ४५.० | ९० | ५८.४ |
| ५ | २३३ | १६३ | ३०.१ | १४२ | ३९.१ |
| ६ | २७२ | १३२ | ५१.५ | ८० | ७०.६ |
| सरासरी | | | ४३ | | ५४ |
| ७‡ | २९० | | | ३५२ | |

* प्रत्येक ग्राह्‌-नमुना मिश्रणांतील pH ११.३ इतका खाली केला आणि नंतर ८० ppm चुना व १४ ppm फेरिक क्लोराइडचा त्यावर उपचार केला.

† प्रत्येक किलाटनित निःस्त्रावाचे तीन दिवस पर्यंत बाहेरील उथळ द्रोण्यांत खांजणीकरण केले; वस्त्रनिर्मिती अपशिष्टांतील काही रंगाचे सूर्यप्रकाशामुळे पुष्कळवेळा विरंजन होते. ( bleached )

‡ औद्योगिक अपशिष्ट आणि वाहितमलाचा संमिश्र नमुना ५ दिवस पर्यंत प्रत्यक्ष खांजणात साठविला; प्रारंभिक pH ११.४ होता व अंतिम pH ९.३ होता.

कोष्टक १४–१८

**१९ एप्रिलला गोळा केलेल्या गिरणीतील अपशिष्ट व शहरातील वाहितमलावर प्रयोगशाळेत उपचारण केलेल्या अवमलाचे विश्लेषण. ***

| घटक | टक्केवारी |
|---|---|
| नायट्रोजन | ०.२ |
| $P_2O_5$ | १.२७ |
| $K_2O$ | ०.०५ |
| $CaO$ | ४९.१८ |
| $MgO$ | २.८२ |

* $CaCo_3$ च्या तुलनेने एकूण उदासीनीकरण – मूल्य ७६% आहे.

ह्या मिश्रणांतील प्रत्येक पूर्वीच्या नमुनापद्धतीने, उपचारणित केले. मात्र ११.३ पर्यंतच pH खाली आणला. को.१४–१५ त तरंगत्या घनपदार्थांच्या अपचयनांचा सारांश दिला आहे. को. १४–१६ त रंग-निष्कासन दाखविले आहे.

१९ एप्रिल १९५७ ला वाहितमलाचे व गिरणीतील अपशिष्टाचे आणखी नमुने गोळा करण्यात आले, आणि पूर्वी प्रमाणेच मिश्रण करून त्यांच्यावर उपचार करण्यात आले. मात्र (त्यांतील) रासायनिक क्रियेने अवस्थापन केलेला मलनि:स्त्राव खांजणांत साठविण्यात आला. या उपचारांमुळे झालेली **BOD** ची अपचयने को. १४–१७ त सादर केली आहेत. ह्या नमुन्यांतून तयार झालेला रासायनिक अवमल सुका करण्यात आला आणि मृदासंयोज्य ( soil additive ) म्हणून मूल्य निर्धारण करण्याच्या उद्देशाने विश्लेषित करण्यात आला. को. १४–१८ त मृदाविश्लेषणे सादर केली आहेत.

**आकृति १४–७. शहराजवळील संग्राही नाला म्हणून काम देणाऱ्या R या नदीचा व तिच्या उपनद्यांचा नकाशा–**

## १४–७. संग्राहक ( receiving ) नाल्यावरील अपशिष्टांच्या परिणामांचे प्रस्थापन–

१९५२ मधील उन्हाळ्यात व हिवाळ्यात राज्य प्रदूषण नियंत्रण समितीने नदीखोऱ्याचे प्रकृष्ट ( intensive ) सर्वेक्षण केले. त्यांनी प्रकाशित केलेल्या निष्कर्षांपैकी शहरानजीकच्या

मुख्य संग्राहक नदीच्या संबंधीचा एक भाग को. १४–१९ मध्ये उद्धृत केला आहे. शहरानजीकच्या नदीच्या उपनद्यांचा आयोजन आरेखही आ. १४.७ मध्ये सादर केला आहे. केंद्रांना क्रमांक दिले आहेत आणि प्रत्येक केंद्राची परिस्थिती कोष्टक १४–१९ मध्ये दाखविली आहे. (R) नदीच्या D या शाखेशी झालेल्या संगमापासून नदी व खाडीच्या संगमापर्यंत D वर्गीकरण अस्तित्वात आहे. संबंधित असे हे उच्चतम वर्गीकरण असल्याने, को. १४–२० मध्ये सादर केलेल्या प्रस्थापित कसोटया महत्वाच्या आहेत. शहराजवळच्या नदीचे विलीन ऑक्सिजन अवनमन (sag) वक्र आकृति १४–८ मध्ये आरेखित केले आहे. तसेच D वर्गीकरण टिकून राहावे म्हणून ८२ व्या केंद्राजवळ कितीं भार प्रस्तावित करता येईल हे दाखविण्याकरता तपशीलवार गणने करण्यात आली; ही गणने अनु. १४–९ मध्ये सादर केली आहेत. शहर व गिरणीमुळे नदीत निर्माण झालेल्या प्रदूषण–भाराचे निर्धारण १९५२ मध्ये राज्य प्रदूषण नियंत्रण समितीने केले होते व त्याचे निष्कर्ष कोष्टक १४-२१ मध्ये दिले आहेत.




आकृति १४–८. शहराजवळच्या नदीची विलीन–ऑक्सिजन रूपरेखा–

कोष्टक १४–१९

शहरानजीकच्या नदीचे १९५२ मध्ये सर्वेक्षण केल्यानंतर राज्य प्रदूषण नियंत्रण समितीने काढलेले निष्कर्ष–

| केंद्र क्रमांक | मैल क्रमांक | सरासरी प्रस्राव द. से. स. घ. फूट | तपमान°C | pH | $CaCo_3$ ppm, च्या स्वरुपात क्षारता | तरंगते घनपदार्थ ppm | एकूण घनपदार्थ ppm | विलीन ऑक्सिजन ppm | BOD, २५°C (६८°F) % संपृक्तता | BOD, २५°C (६८°F) पौंड/दिवस | कॉलीफॉर्म लॉग सरासरी MPN* १०० ml |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ८२ | १.० | ४.३ | २१ | ५.९–७.४ | १४१ | १०२ | ६८२ | ० | ० | ३६४८ | ७७१०००० |
| ८१ | ८२ | ७.१ | १८ | ६.४–७.२ | १४३ | ५२ | ४८७ | ०.२७ | २.७ | २३६४ | ६९१०००० |
| ८० | ८० | १४ | १९ | ६.६–७.३ | ११३ | ४४ | २८७ | २.२९ | २४.८ | २०४७ | २२३०००० |
| ७६ | ७६.२ | १६ | १८ | ७.०–८.४ | १०३ | ३० | २७७ | ४.१३ | ४३.१ | ७६५ | ६७२००० |
| ६८ | ७४.२ | २५ | १६ | ७.३–७.६ | ९३ | २४ | २४५ | ५.४१ | ५५.६ | ८१४ | २३०००० |
| ७८ | ६८.९ | २१.४ | १६ | ७.२–७.५ | ८९ | १८ | २१६ | ६.३६ | ६४.६ | ४९३ | ११६००० |
| ६९ | ५५.६ | ५५ | १९ | ७.२–७.९ | ६२ | १३ | १४१ | ७.८५ | ८२.८ | ९३३ | ६५७५ |

* संभाव्यतम संख्या ( MPN )

कोष्टक १४–२०.

D वर्गीकरणाकरता राज्य प्रदूषण नियंत्रण समितीची मानके

| | |
|---|---|
| सामान्य उत्तम वापर | शेतकी, यात सिंचाई आणि जनावरांना पाणी पाजण्याचा समावेश आहे; औद्योगिक शीतन व प्रक्रियाजल पुरवठा; माशांचे अतिजीवन ( survival ). |
| तरंगणारे घनपदार्थ, अवस्थापनशील घनपदार्थ, अवमल निक्षेप | संग्राहक पाण्यात अपचयन व मिश्रण होण्यास योग्य संधी मिळाल्यानंतर, ज्यांच्यामुळे शेतकी, औद्योगिक शीतन प्रक्रिया, आणि माशांच्या अतिजीवनास लागणारे पाणी निरुपयोगी होणार नाही अशी वाहितमल, औद्योगिक अपशिष्टे, इतर अपशिष्टास कारणीभूत होणाऱ्याच फक्त राशी. |
| pH | त्या क्षेत्रातील पाण्याकरता pH सामान्य असला पाहिजे; सामान्यतः तो ६.० व ८.५ च्या दरम्यान असला पाहिजे, मात्र दलदल असलेल्या पाण्यात तो ४.३ इतका कमी असू शकतो. |
| विलीन ऑक्सिजन | ३.० ppm पेक्षा तो कमी नसावा. |
| विषाक्त अपशिष्टे, तेले, हानिकारक पदार्थ, रंगित अगर अन्य अपशिष्टे, अथवा तापविलेले द्रव | शेतकी, औद्योगिक शीतन कार्य, आणि माशांच्या अतिजीवनास पाणी निरुपयोगी करणार नाहीत अशा वाहितमल, औद्योगिक अपशिष्ट, आणि अन्य अपशिष्टांस कारणीभूत होणाऱ्या राशीच फक्त –आणि फक्त अशीच तपमाने. |

## १४–८. विद्यमान आणि अनुज्ञेय प्रस्त्रावांचे गणन–

राज्य जल प्रदूषण नियंत्रण समितीने १९५२ मध्ये केलेल्या सर्वेक्षणामधील शहराच्या खालच्या बाजूच्या नदीतील प्रवाहाच्या अवस्थांवर पुढील गणने आधारित केली आहेत. त्या समितीने प्रकाशित केलेल्या अहवालावरून मूलभूत माहिती घेतली आहे. अक्षरांच्या मूल्यांच्या खुलाशाकरता ४ थ्या प्रकरणातील अनुच्छेद ४–१ मधील समीकरणे पहावीत.

रोजचा BOD पौंडात मिळण्याकरता खालीलप्रमाणे सुरवात करू या :

$L_{83}$ = १०.३ पौंड, २० $^{o}C$ तपमान

$L_{82}$ = ३६२२ पौंड, (तपमान सुधारणा)

एकूण = ३६३२.३ पौंड, (संगमाच्यावर L एक मैल);

L संगम = ३६३२ — ०.२० × $\frac{१}{२४}$ × ३६३२ = ३६३२ — ३० = ३६०२ पौंड,

$L_{81}$ = २२३० पौंड,

म्हणून नदींच्या या पल्ल्यातील सरासरी अंतिम BOD

$$\bar{L} = \frac{३६३२ + २२३०}{२} = २९३१ \text{ पौंड.}$$

दर दिवसाचे नाल्यातील विऑक्सीकरण प्रमाण ($K_1$) आणि पुनर्वातन प्रमाण ($K_2$) खालीलप्रमाणे असतात :

$$K_1 = \frac{१}{\Delta t} \log \frac{३६०२}{२२३०} = \frac{१}{०.१३} \log १.६१५ = ७.६९ \; (०.२०९)$$

= २० $^{o}C$ तपमानात १.६१, आणि

$$K_2 = K_1 \frac{\bar{L}}{\bar{D}} = -\frac{\Delta D}{२.३ \, t \, \bar{D}}.$$

विलीन ऑक्सिजनचा अंश मिळण्याकरता, खालीलप्रमाणे गणन करूया :

DO संगम = DO $_{83}$ + DO$_{82}$ = ४० + D = ४० पौंड.
वि. आ. वि. ऑ. वि. ऑ.

जर २० $^{o}C$ तपमानात ऑक्सिजनच्या सपृक्तीतील त्रुटी

= ९.२ × ८.३४ × ५.३ × .६४६ = २६३ पौंड असेल तर

D संगम = २६३—४० = २२३ पौंड,

$D_{81}$ = ९.२ × ५.४ × ७.१ = ३५३ पौंड, आणि नाल्याच्या ह्या पल्ल्यातील

सरासरी ऑक्सिजनची त्रुटी $\bar{D} = \frac{२२३ + ३५३}{२} = २८८$ पौंड.

म्हणून $\Delta D = ३५३ — २२३ = १३०$ पौंड.

वरील सूत्र वापरून, आपल्याला आता नाल्याच्या पुनर्वातनाचा वेग खालीलप्रमाणे काढता येईल :

$$K_2 = १.६१ \times \frac{२९३१}{२८८} - \frac{१३०}{२.३ \times ०.१३ \times २८८}$$

$$= २०^{oc} \text{ तपमानात } १४.८४.$$

दीर्घसूत्राने तपासणी करून, आपल्याला

$$D_{81} = \frac{K_1}{K_2 - K_1} L \text{ संगम} \left( १०^{-K_1 t} - १०^{-K_2 t} \right) + D \text{ संगम} \times १०^{-K_2 t}$$

$$D_{81} = \frac{१.६१ \times ३६००}{१४.८४ - १.६१} \left( १०^{-१.६१ \times ०.१३} - १०^{-१४.८४ \times ०.१३} \right) +$$

$$३५३ \times १०^{-१४.८४ \times ०.१३}$$

$D_{81}$ = २७१ पौंड, मिळतो

$D_{81}$ = ३५३ पौंड असल्याने, ३५३ पौंड त्रुटी मिळण्याकरता लागणाऱ्या राशी इतका $K_2$ कमी करण्याचे खालीलप्रमाणे ठरविण्यात आले :

$$D_{81} = \frac{१.६१ \times ३६००}{K_2 - K_1} ( ०.६१८ )$$

$$D_{81} = ३५३ = \frac{१.६१ \times ३६००}{X} (०.६१८), \text{ जेथे } X = K_2 - K_1$$

X करता (समीकरण) सोडवून, आपणास

X = १०.१ मिळतो.

म्हणून, $K_2 = X + K_1 = १०.१ + १.६१ = २०^{oc}$ तपमानात ११.७१.

नदीत विलीन ऑक्सिजनची किमान त्रुटी ३ ppm राहण्याकरता शहरापाशी अनुज्ञेय **BOD (L)** चे गणन खालीलप्रमाणे करावे :

सामान्य समीकरण :

$$\log L_A = \log D_B + \left( १ + \frac{K_1}{K_2 - K_1} \left( १ - \frac{D_A}{D_B} \right)^{०.४१८} \right) \log \frac{K_2}{K_1} .$$

आपल्या प्रमेयाला हे समीकरण लागू करून आणि $j$ संगम दाखवितो असे धरून आपणास,

$$\log L_j = \log D_{81} + \left( १ + \frac{K_1}{K_2 - K_1} \left( १ - \frac{D_j}{D_{81}} \right)^{०.४१८} \right) \log \frac{K_2}{K_1} ,$$

$$\log L_j = \log ५.३८ \times ५.४ \times ३.६$$

$$+ \left( १ + \frac{२.०३}{१२.७ - २.०३} \left( १ - \frac{८.१६ \times ५.४ \times ५.३ \times ३.६ / ७.१}{८.४ \times ५.४ \times ३.६} \right)^{०.४१८} \right) \log \frac{१२.७}{२.०३} ,$$

हे २५ $^{o}C$ तपमान असताना, आणि केंद्र ८१ जवळ द. से. स. ३.६* घ. फूट असताना ही असते.

विऑक्सिकरण आणि पुनर्वातन वेग २५ $^{o}C$ तपमानात प्राप्त करण्याकरता :

$$K_2 = १.०८२^{**} \times ११.७१ = १२.७$$

$$K_1 = १.२६^{**} \times १६१ = २.०३.$$

नंतर संगमाजवळ २५ $^{o}C$ तपमानातील अंतिम BOD प्राप्त करण्याकरता

$$\log L_j = २.०२ + (१ + ०.११०३)\ ०.७९८ = २.०२ + ०.८९८ = २.९१८,$$

म्हणून $L_j$ = ८२५ पौंड; व २५ $^{o}C$ त तो अनुज्ञेय BOD असतो.

१९५२ मधील सर्वेक्षणात २० $^{o}C$ तपमान असताना संगमाजवळ अंतिम BOD, ३६०२ पौंड होता, म्हणून २५ $^{o}C$ तपमानाकरता $L_j$ = ३६०२ × १.१०** = ३९६० पौंड,

= २५ $^{o}C$ तपमानातील $L_j$

---

* बऱ्याच अभ्यासानंतर युनायटेड स्टेट्स भूविज्ञान सर्वेक्षण संस्थेने पुरविलेला द. से. स ३.६ घ. फू. हा आकडा, १० वर्षांतून एकदा घडून येणारा ७ दिवसाचा किमान प्रवाह दाखवितो.

** परिवर्तन गुणांक.

**कोष्टक १४–२१.**

**१९५२* मधील शहर आणि गिरणीतील अंदाजित प्रदूषण.**

| स्थान | लोकसंख्या १९५० | सेवा मिळालेली अंदाजित लोकसंख्या | अपशिष्टाचा प्रकार | अंदाजित अपशिष्ट द. दि. द. ल. गॅ. | उपचारणाचा प्रकार | उपचारणा-पूर्वी समतुल्य लोक-संख्या | संग्राहक नाला |
|---|---|---|---|---|---|---|---|
| शहर | ७१२१ | ५००० | घरगुती वाहितमल | ०.५० | प्राथमिक | ५००० | नदी |
| | | | औद्योगिक अपशिष्ट | ०.५० | औद्योगिक अपशिष्ट व वाहितमला-वर एकाच संयंत्रात उपचार केले | १९००० | नदी |
| | | | | | एकूण अंदाजित समतुल्य लोकसंख्या | २४६०० | |

* राज्य नदी अहवालावरून.

आता २५ $^{co}$ तपमानात ३.० ppm वि. ऑ. चे D हे नाला वर्गीकरण आणि द. से. स ३.६ घ. फूट प्रवाह टिकविण्याकरता कराव्या लागणाऱ्या BOD तील घटीचे गणन खालीलप्रमाणे करावे :

$$\frac{Lj - \text{अनुज्ञेय } Lj}{Lj} = \text{लागणारी } \% \text{ BOD घट}$$

$$= \frac{३९६० - ८२५}{३९६०} \times १०० = ७९.१ \text{ प्रतिशत् लागणारी घट.}$$

## १४-९. नाल्याच्या विश्लेषणावर आधारित केलेल्या शिफारशी-

आता आपण उपायांसंबंधी विचार करूया : तपशीलवार केलेल्या विश्लेषणांवरून आपणास असे दिसून आले कीं, २५°C तपमानात D- वर्गीकरणाकरता नदीची अवस्था उपयुक्त राहण्यासाठी आणि १० वर्षातून संभाव्यत: एकदा घडून येणाऱ्या ७ दिवसांच्या किमान प्रवाहाकरता, BOD चे ७९.१ टक्के निष्कासन करण्याची जरुरी आहे. प्राथमिक अथवा माध्यमिक उपचार करून ७९.१ प्रतिशत् अपचयन होऊ शकले नसते हे उघड आहे. दुय्यम उपचारणाची जरुरी होती, कारण संग्राहक नाल्याच्या विश्लेषणाच्या मूल्यांकनानंतर जर आपणास असे आढळून आले की ५० टक्क्यापेक्षा BOD चे अधिक अपचयन करणे जरूर आहे, तर सामान्य अवस्थापन आणि/अथवा रासायनिक किलाटन या उपचारांच्या अतिरिक्त जैवी उपचार केले पाहिजेत.

म्हणून रासायनिक किलाटन करण्याच्या अगोदर अथवा नंतर कोणच्यातरी स्वरूपात जैवी उपचारण करावे लागेल. लेखकाचे असे मत आहे कीं, जर रासायनिक किलाटनाच्या आधी जैवी उपचारण केले तर नि:स्त्रावाच्या दर्जावर अधिक चांगले नियंत्रण ठेवता येते. ह्या दोन्ही प्रमुख उपचारण संचांची एकत्रित कार्यक्षमता सुमारे ९० प्रतिशत् असणे शक्य आहे, मात्र ह्या दोन्हींच्या अगोदर पर्याप्त समानीकरण, अवस्थापन, आणि उदासीनीकरण केलेले असावे. ह्या कार्यक्षमतेमुळे संग्राहक नाल्याचे केवळ संरक्षण होते असे नसून त्यातून औद्योगिक पाणी पुरवठ्याकरता पुनरुपयोग करता येईल असा नि:स्त्रावही प्राप्त होतो.

म्हणून लेखकाने अशी शिफारस केली आहे कीं, जैवी निस्यंदनाबरोबरच रासायनिक किलाटन करावे म्हणजे (१) नि:स्त्राव औद्योगिक वापरास उपयुक्त होईल, आणि (२) ७९.१ प्रतिशत् BOD च्या अपचयनाबरोबरच रंगाचेही निष्कासन होईल.

संयुक्त अपशिष्टांची रंग आणि उच्च क्षारता, ही दोन प्रमुख वैशिष्ठ्ये असल्याने प्रदूषण नाहीसे करण्याकरता अनुकूलतम परिस्थिति निश्चित करता यावी म्हणून रासायनिक किलाटनाचा अभ्यास करण्यात आला. pH च्या क्षारतेच्या टप्प्यात चुना व फेरिक क्लोराइड अत्यंत परिणामकारक असल्याचे आढळून आले. अनेक प्रयोगानंतर, चुना व फेरिक क्लोराइडची किमान मात्रा (अनुक्रमे ८० ppm व १४ ppm) वापरून ३० ते ५० टक्क्यांपर्यंत BOD चे निष्कासन झाल्याचे आढळुन आले. ह्या उपचारणाबरोबर केलेल्या अम्लीय उदासीनीकरणास दररोज $ ५३.१० खर्च येईल असा अंदाज करण्यात आला.

ह्या अपशिष्टांचे एकदा उदासीनीकरण केल्यानंतर BOD चांचणीत त्यांच्यात विषाक्तता प्रदर्शित झाली नसल्याने, प्रयोगशाळेत जैवी प्रयोग करण्यात आले नाहीत. पर्यावरण उपयुक्त असले की जैवी ऑक्सीकरण होईल असे गृहीत धरण्यात आले. प्रयोग शाळेत अथवा प्रायोगिक संयंत्रावर अभ्यास करून जैवी संचावरील निश्चित भारणांचे निर्धारण करावे.

१९५२ मधील सर्वेक्षणात नदीची वैशिष्ठ्ये जशी होती तशीच ती आजही आहेत अशा गृहीतकावर ह्या विश्लेषणातील आंकडे आधारित केले होते. १९५२ मध्ये भाकित केलेल्या (को. १४–२१) भारणांच्यापेक्षा त्यांच्यात काहीशी वाढ झाली आहे. पण विद्यमान (अनुपचारित) भार रोजच्या BOD च्या ५२३० पौंड अगर २५००० ते ३०००० लोकसंख्ये-बरोबर असल्याचे आढळून आल्याने, १९५२ मध्ये अंदाजित केलेल्या २४६०० लोकसंख्येपेक्षा (ही) वाढ फारशी जास्त नाही.

## १४–१०. निस्तारण संयंत्रातील निःस्त्रावाच्या पुनरुपयोगाचे औद्योगिक प्रक्रिया-जलाकरता अन्वेषण–

देशातील विभिन्न भागांत तपशीलवार केलेल्या अभ्यासावरून असे दिसून आले कीं, उपलब्ध पुरवठ्यापेक्षा काही क्षेत्रात पाण्याची मागणी वाढत आहे. ह्या टंचाईने निर्माण केलेल्या आव्हानाला उत्तर म्हणून अनेक उद्योग संयंत्रात शीतन व अन्य कामातील अपशिष्ट-जलाच्या उद्धरणाचे ( reclamation ) मूल्य यशस्वीपणे दाखवून दिले आहे.

पाणी ही इतकी मौल्यवान वस्तु आहे कीं, आपल्या प्रकरण वृत्तातील (case history) शहर आणि उद्योगाला सल्ला देताना, लेखकाने शहरातील विल्हेवाटीच्या संयंत्रातील निःस्त्रावाचा उद्योगांनी पुनरुपयोग करावा असे आग्रहपूर्वक सांगितले. ह्या प्रथेमुळे पाण्याच्या स्थिर, स्वस्त आणि स्वच्छ साधनाची तरतूद होते. सध्या शहरात उपचारण केलेले पाणी गिरणीत दर हजार गॅलनला $ ० १५ अथवा दर द. ल. गॅलनला $ १५० या दराने विकत घेण्यात येते. ही किंमत, स्वीकार्य अशा वाहितमलाच्या अपशिष्ट–निःस्त्रावाने उत्पादनास येणाऱ्या अपेक्षित ( anticipated ) खर्चापेक्षा सुमारे दसपट आहे

मर्श (७) च्या मते, वाहितमल उपचारण खर्च स्रांजणाकरता द. द. ल. गॅ. ला $ १.०० पासून उत्प्रेरित अवमल संयंत्रासाठी (उपचारणाकरता) द. द. ल. गॅ ला $ ६० च्या व्याप्तीत असतो. जेथे असे अनुपचारित पाणी उपलब्ध असते तेथे नदीच्या पाण्यातून उपचारित प्रक्रियाजल, उत्पादन करण्यास खर्च सामान्यत: द. द. ल गॅ ला $ ५० ते ६० येतो. म्हणून जेव्हा अनुपचारित जलपुरवठा उपलब्ध असतो तेव्हासुद्धा वाहितमल–अपशिष्ट–निःस्त्रावाचा पुनरुपयोग करून पैशात थोडीतरी बचत करता येईल हे अगदी स्पष्ट आहे.

दक्षिण कॅलिफोर्निया विश्वविद्यालयातील प्रा आर. सी. मर्झने ह्या विषयावरील साहित्याचे प्रकृष्ट सर्वेक्षण केले, संपूर्ण दक्षिण-पश्चिम भागातील अनेक अपशिष्ट–जलांच्या पुन:प्रापण प्रकल्पांचे स्वत: परीक्षण केले, आणि त्यांचे परिचालन करणाऱ्या कर्मचाऱ्यांच्यासमवेत चर्चा केली. त्याच्या अहवालात २२७ संदर्भ ग्रंथ आहेत; त्या अहवालातील (७) काही महत्वाचे निष्कर्ष खाली दिले आहेत :

(१) अनेक स्थानांवर पुन प्रापणित जलाचा पुरवठा नाममात्र अगर अत्यल्प खर्चात करता येईल व त्यामुळे अधिक महाग पिण्याचे पाणी महत्वाच्या उपयोगाकरता राखून ठेवता येईल.

(२) प्रदूषण नियंत्रण, पिण्याच्या पाण्याचे संधारण, आणि जनता संपर्क, उत्तम प्रकारे साधावे म्हणून ह्या. औद्योगिक अपशिष्ट–जलाच्या विस्तृत प्रमाणात पुन:प्रापणास चालना मिळावी अशी उद्योगांची इच्छा आहे.

(३) शीतन, बॉयलरचे संभरण, आणि प्रक्रिया-परिचालन, यांकरता वाहितमल नि:स्रावाचा उद्योगांकडून होणारा वापर काटकसरीचा ठरत आहे आणि (जेव्हा जेव्हा दर्जा उपयुक्त असतो तेव्हा तेव्हा) तो वाढत आहे.

(४) स्वत:च्या अपशिष्ट जलाचे पुन:प्रापण करून उद्योगाला आपल्या अपशिष्ट–उपचारणावरील खर्चच केवळ कमी करता येतो असे नसून आपल्या नाला–प्रदूषणाची राशीही कमी करता येते.

बहुतेक वाहितमल–संयंत्रातील नि:स्राव आणि नमुनेदार पृष्ठीय अथवा विहिरीतील जलपुरवठा, यांतील पांच प्रमुख फरक, कोटिंग आणि कॅलीज (८) यांनी खालील प्रमाणे, सूचित केले आहेत : गडद रंग, नायट्रोजनयुक्त द्रव्याची उच्चप्रमाणातील टक्केवारी; BOD चा अधिकतर अंश; विलीन घनपदार्थांची उच्च राशि; आणि प्रक्षालकांच्या ( detergents ) मुळे होणारी फॉस्फेटांची उपस्थिति. संयुक्त अपशिष्टे, उपचारणाच्या ज्या विशिष्ट एकत्रीकरणातून जातात त्यामुळे, रंग आणि BOD फक्त कमी होतात नायट्रोजनयुक्त व फॉस्फेट द्रव्यासह विलीन द्रव्यांचे आणखी अपचयन, मृदुकरण, आणि विखनिजीकरण करून, घडवून आणता येते. बहुतेक सर्व जलपुरवठयांवर, त्यांचा विशिष्ट औद्योगिक प्रक्रियेत उपयोग करण्यापूर्वी, कोणचेतरी उपचार करण्याची आवश्यकता असते. आपल्या प्रकरणवृत्तातील

* राज्य जलप्रदूषण-नियंत्रण मंडळांनी सर्व उद्योगांच्याकरता लागणाऱ्या पाण्याच्या संरक्षणाची संपूर्ण यादी तयार केली आहे.

शहराच्या वाहितमल–संयंत्रातील निःस्त्रावाचे (जसे सध्याच्या विहिरीतील पाणी हवे असते तसे मिळण्याकरता ) निश्चितच मृदुकरण करावे लागेल. विद्यमान खाडीतील जलपुरवठ्यात आढळून येत असलेल्या रंग व गढूळपणापेक्षा निःस्त्रावाचा रंग आणि गढूळपणा कमी असतो (को. १४–२२) मुख्यतः गिरणीतल्या अपशिष्टात सध्या दिसून येणाऱ्या क्षारतेमुळे घनपदार्थांचे एकूण संकेंद्रण उच्च असते, पण गिरणीतील दाहकांचे पुनःप्रापण करून ते कमी करता येईल. दोन्हीही अनुपचारित पाण्यांतल्यापेक्षा pH काहीसा उच्च असतो, तथापि त्याचा मर्सरायझिंग, वॅट व सल्फर रंग स्नानातल्या ( bath ) आणि इतरांसारख्या काही प्रक्रियांत फायदा होऊ शकेल.

उद्योगांनी वाहितमल–संयंत्रातील निःस्त्रावाचा व्यावहारिक पुनरुपयोग करण्यासंबंधी बीचने (९) खालील चार कसोट्या सुचविल्या आहेत :

(१) सार्वजनिक स्वास्थ्याशी संबंध येणार नाही अशा प्रक्रियेसाठी पाण्याची गरज लागणारा स्थानिक उद्योग अस्तित्वात असला पाहिजे.

(२) उद्योगाची गरज पुरी करील असे नागरी वाहितमल–उपचारण संयंत्र मोठे असले पाहिजे

(३) वापरावयाच्या जागेपर्यंतच्या वाहतुक खर्चासह निःत्रावावरील प्रक्रियेचा खर्च पर्यायी जलपुरवठ्याच्या खर्चापेक्षा कमी असला पाहिजे.

(४) उद्योगातील पुनरुपयोगी पाण्याचा दर्जा योग्य प्रमाणात सुसंगत राहील असे पाणी नागरी संयंत्राला पुरवता आले पाहिजे.

आपल्या प्रकरणवृत्तातील गिरणीत ह्या चारही कसोट्या पाळता येतील. गिरणीतील सूत–प्रक्रियेस सध्या वापरण्यात येणाऱ्या अनुपचारित पाण्याचे नमुनेदार विश्लेषण व उपचारण संयंत्रात अपेक्षित असलेले विश्लेषण को. १४–२२ त सादर केले आहे.

संपूर्ण चांचणीनंतर, हे पाणी उपयुक्त नाही अगर इतर जलपुरवठ्याशी स्पर्धाक्षम नाही असे जर गिरणी (चालकाला) आढळून आले तर हा निःस्त्राव अन्य औद्योगिक उपयोगाकरता विकता येईल.

**कोष्टक १४–२२.**
**गिरणीत वापरलेल्या अनुपचारित पाण्याचे नमुनेदार विश्लेषण, आणि संयुक्त उपचारण–संयंत्रातील निःस्त्रावाचे अपेक्षित विश्लेषण.**

| वैशिष्ठ्ये | गिरणीतील अनुपचारित पाणी | | संयुक्त उपचारण-संयंत्रातील अपेक्षित निःस्त्राव |
|---|---|---|---|
| | विहिरीतील पाणी | खाडीतील पाणी | |
| pH | ७.३ | ६.६ | ९-१० |
| गढूळपणा, ppm | ८ | ५० | १०-२० |
| काठिण्य, $CaCo_3$, ppm | ४९० | ५८ | १००-३०० ‡ |
| | | | ३००-६०० † |
| एकूण घनपदार्थ, ppm | ७५४ | १६४ | १५०० |
| तरंगते घनपदार्थ, ppm | ०.४ | ७३ | २० |
| विलीन घनपदार्थ, ppm | ७५४ | ९१ | १४८० |
| सेंद्रिय घनपदार्थ, ppm | ७६ | ४२ | १०० |
| खनिज घनपदार्थ, ppm | ६७८ | १२२ | १४०० |
| तरंगते सेंद्रिय घनपदार्थ, ppm | ० | १५ | १५ |
| तरंगते खनिज घनपदार्थ, ppm | ० | ५८ | ५ |
| विलीन सेंद्रिय घनपदार्थ, ppm | ७६ | २७ | ८५ |
| विलीन खनिज घनपदार्थ, ppm | ६७८ | ६४ | १३९५ |

‡ उपचारण-संयंत्रावर जर अम्ल उदासीनीकरण लागणार नसेल तर-

† जर गिरणीत दाहकाचे पुनःप्रापण करण्याची प्रथा नसेल आणि उपचारण-संयत्रात अम्ल उदासीनीकरणाची गरज असेल तर

## १४–११. भविष्यकालीन विस्ताराकरता नियोजन–

१५ ते २५ वर्षापर्यंत काहीही फेरफार न करता समाधानकारकपणे वाहितमल उपचारण संयंत्रे काम देतील अशा प्रकारे त्यांचे सामान्यत: अभिकल्पन केलेले असते. ह्या दीर्घ अभिकल्पन कालाच्या निवडीच्या पाठीमागे मुख्य कारण हे असते कीं, वाहितमल उपचारण संयंत्राचे संकल्पन ( conception ) आणि परिचालन ह्यांच्या दरम्यान बराच काल जातो. अनेक वेळा प्राथमिक अहवाल तयार करणे, तपशीलवार नकाशे तयार करणे, पुरेसे कर्जरोखे विक्रीस काढणे, वित्तव्यवस्थेचा तपशील तयार करणे, बांधकामाचे कंत्राट देणे आणि संयंत्राचे संरचन करणे, ह्या कार्याकरता, पाच वर्षांचा कालावधी लागतो. ज्या संयंत्रांत बदलत जाणाऱ्या औद्योगिक अपशिष्टांच्या बऱ्याच मोठ्या टक्केवारीचे उपचारण होते अशा संयंत्रांच्या बाबतीत हे विशेषप्रकारे सत्य असते. उद्योगांत बदल घडून येत असल्यामुळे, तसेच वाहितमल व अपशिष्टांच्या एकत्रित उपचारणात सुधारणा होत असल्यामुळे, अल्पकालीन अभिकल्पनाचा उपयोग करावा, आणि वाढीकरता जागा राखून ठेवावी. कोणच्याही वेळी अभियंत्यांना जलद बदल अगर वाढ करता येईल असे संयंत्राचे अभिकल्पन करावे. तथापि, सामान्यपणे कर्जरोखे २० ते ३० वर्षाच्या मुदतीचे असल्यामुळे मुदत संपण्याच्या आत नवीन कर्जरोखे जर विक्रीस काढले तर लोकांच्याकडून काही प्रमाणात विरोध होण्याचा संभव असतो. हे लक्षात ठेवून लेखकाने अशी शिफारस केली कीं, ज्या शहर व गिरणीविषयी आपण चर्चा करत आहोत त्यांच्या उपचारण संयंत्राचे अभिकल्पन दहा वर्षांच्या कालावधीकरता करावे व त्यात बऱ्याच प्रमाणात लवचिकता असावी.

सध्या शहरापेक्षा गिरणीत अपशिष्टाची राशि चौपट प्रस्त्रावित होत असल्याने गिरणीच्या परिचालनातील वाढीला अत्यंत महत्व आहे. अलिकडेच गिरणीत तिसरे रंगगृह चालू करण्यात आले आहे, परंतु गिरणीत पुढील दहा वर्षांत आणखी वाढ होईल अगर कसे याबद्दल शंका आहे. असे असले तरी, विद्यमान परिचालनात सुधारणा आणि विद्यमान सुविधांच्यामुळे, ३० टक्क्याइतकी उत्पादनात वाढ होईल असे गिरणीतील कर्मचाऱ्यांना वाटते. पुढील दशवार्षिक कालावधीत लांब मुदतीच्या उत्पादनातील घटींच्या संभाव्यतेचाही विचार करावा लागेल.

संयंत्राच्या विस्ताराखेरीज शहरातील लोकसंख्येच्या वाढीचाही आपणास विचार करावा लागेल. लोकसंख्येत जरी महत्वपूर्ण वाढ झाली आणि त्यामुळे घरगुती अपशिष्टांच्या स्वरूपावर परिणाम होणार नसला तरी त्यांच्या राशीत बरीच वाढ होईल.

शहराच्या लोकसंख्येत १८८० पासून झालेले बदल को. १४–२३ मध्ये दाखविले आहेत.

१९५० पर्यंतचे आंकडे शासकीय खानेसुमारीवरून घेतले आहेत आणि १९५० ते १९७० पर्यंतचे आंकडे वाणिज्य मंडळाच्या ( chamber of commerce ) सल्ल्याने सध्याच्या वाढीच्या प्रमाणाचे प्रक्षेपण करून, त्या प्रमाणाची गेल्या ७० वर्षांतील सरासरी वाढीच्या प्रमाणाशी तुलना करून प्राप्त केले आहेत. येथे हे नजरेस आणण्यात येत आहे कीं, एकादा उद्योग जरी शहरात सुरू झाला तरीही अल्पकालातच शहरातील लोकसंख्येच्या सरासरी वार्षिक वाढीत चूक निर्माण होईल. यावरून उद्योग आणि शहर यांच्यातील वाढी एकमेकाशी कशा संलग्न असतात हे समजून येईल.

**कोष्टक १४–२३**

**१८८० ते १९७० सालांतील लोकसंख्येतील फरक**

| वर्ष | लोकसंख्या | दर वर्षाच्या वाढीची टक्केवारी |
|---|---|---|
| १८८० | ५०८ | |
| १८९० | ८३६ | ५.१० |
| १९०० | १५३३ | ६.२५ |
| १९१० | ३४०० | ८.३० |
| १९२० | ४३१५ | २.४० |
| १९३० | ५६१९ | २.७० |
| १९४० | ६६८२ | १.७५ |
| १९५० | ७१२१ | ०.६५ |
| १९५६* | ८५०० | ३.२० |
| १९६०† | ९४०१ | ३.२० |
| १९७०† | १२४०१ | ३.२० |

सरासरी वाढीचा वार्षिक वेग, १८० - १९५६ = ३.८०%

* वाणिज्य मंडळाने केलेल्या सर्वेक्षणावरून अंदाजित केली.

† विद्यमान वाढीच्या प्रमाणावरून भाकित केली.

शलाका चाळण्या ( Bar creens ), पंप आणि कक्ष, यांच्यासारखे काही उपचारण संच २५ वर्षे टिकावेत असे सामान्यत: त्यांचे अभिकल्पन करण्यात येते. संयंत्राच्या अभिकल्पनाची निवड करताना प्रत्येक संचाचा व्यक्तिश: विचार करावा. सर्वसाधारणपणे दहा वर्षे वाढ अगर बदल भरीव प्रमाणात न करता संयंत्राचे परिचालन प्रभावीपणे करता येईल असे त्याचे

अभिकल्पन करावे. त्यावेळी, शहरातील वाहितमल आणि अपशिष्टांच्या परिस्थितीचे पुनर्मूल्यन करावे. १० वर्षांच्या परिचालन कालात वाहितमल आणि अपशिष्टांच्या गुणधर्मात अत्यल्प बदल होईल आणि ठिबकणाऱ्या निस्यंदकाच्या भोवतालचे पुनराभिसरण वाढत्या लोकसंख्येची काळजी घेईल असे जरी गृहीत धरले तरीही १० वर्षांच्या कालातील ३४ टक्के प्रवाहातील वाढ सामावून घेता येईल असे संयंत्राचे अभिकल्पन करावे. अशा रीतीने एकूण प्रवाह द. दि. २.५ द. ल. गॅलनाऐवजी ३.३३ द. ल. गॅलन होईल.




आकृति १४–९. संयुक्त उपचारण संयंत्राचा आयोजन आरेख

(१) शलाका चाळण, (२) कंकर कक्ष, (३) अंशीय फ्ल्यूम, (४) पंप, (५) समकार ( equalizer ) अवस्थापक ( settler ), (६) अम्ल पोषक – pH नोंदक, (७) ठिबकणारे निस्यंदक, (८) चुना संभरक, (९) फेरिक क्लोराइड संभरक, (१०) पुंजोकारक, (११) दुय्यम अवस्थापक टाकी, (१२) अवमल-अनुकूलन टाकी, (१३) निर्वात निस्यंदक, (१४) पुनराभिसरण पंप, (१५, १६) प्राथमिक अगर दुय्यम अवमल पंप, (१७) अवमलाकरता चुना संभरक, आणि (१९) अवमलाकरता $FeCl_3$ संभरक.

**कोष्टक १४–२४.**
**एकेरी आणि संयुक्त संयंत्राच्या किमतींची तुलना.**

| संयंत्राचा प्रकार* | किमत $ |
|---|---|
| फक्त नगरपालिका | ३५२००० |
| फक्त उद्योग | ८२१०००† |
| वेगवेगळी दोन संयंत्रे | ११७३००० |
| एकच संयंत्र ( फक्त संयंत्र ) | ३५४१८० |
| एकच संयंत्र, संपूर्ण ‡ | ६४७५७७ |

* बाबवार अंदाजावर आधारित केलेले एकेरी संयंत्राचे आंकडे.

† रूढ उपचारणाच्या खर्चावर आधारित.

‡ जमीन, रोधक नलिका, आणि अंदाजी विस्ताराचा समावेश केला आहे. ह्या किंमती फक्त ढोबळ अंदाज म्हणून उपयुक्त होतील आणि त्या संयंत्राच्या नक्की किंमती आहेत असे समजू नये.

## १४–१२. लागणाऱ्या संयंत्राची संख्या ठरविणे–

शहरी आणि गिरणीतील संयुक्त अपशिष्टे एकात्र उपचारण संयंत्रातून हाताळण्याने होणारे अनेक फायदे को. १४–१ मध्ये सूचित केले आहेत. त्यात खालील गोष्टी समाविष्ट

करता येतील : क्षारीय औद्योगिक अपशिष्टाच्या उपस्थितीत अवस्थापन द्रोण्यांत दीर्घकाळपर्यंत अवमल साठवून ठेवण्यामुळे निर्माण होणारी दुर्गंधी नाहीशी होते; तसेच औद्योगिक अपशिष्टाच्या उपस्थितीत अवमल–पाचनाचा वापर टाळता येतो व त्या ऐवजी काहीशा कमी खर्चाचा निर्वात निस्यंदन अवमल–उपचारणाचा उपयोग करता येतो.

कधीकधी अपशिष्टांच्या संयुक्त उपचारणावर आक्षेप घेण्यात येतात; परंतु त्यांतील तोटे तांत्रिक स्वरुपाचे असतात आणि ते दूरही करता येतात. अत्यंत उच्च pH आणि गिरणीतील अपशिष्टाचा अनियमित प्रस्त्राव ह्या दोन मुख्य अडचणी, संयुक्त अपशिष्टांच्याकरता एकेरी उपचारण संयंत्राचे योग्य अभिकल्पन आणि परिचालन करून, दूर करता येतील. ज्या उदाहरणात एकेरी संयंत्राचे बाबतीत असे आक्षेप उद्‌भवत नाहीत तेथे खर्चविषयक विश्लेषणाचा अंतिम निर्णयावर परिणाम होऊ शकेल. ह्या उदाहरणात अशा तऱ्हेचे खर्चासंबंधी विश्लेषण केले होते आणि येथे ते सादर केले आहे. संयुक्त उपचारण संयंत्राचा आयोजन आरेख आकृति १४–९ मध्ये सादर केला आहे. को. १४–२४ मध्ये एकेरी आणि संयुक्त उपचार संयंत्राचा अंदाजी खर्च संक्षिप्तपणे दिला आहे.

## एकेरी संयंत्र विरुद्ध वेगवेगळीं निस्तारणसंयंत्रे, यांच्या किंमतींचे विश्लेषण–

### अ– फक्त नगरपालिकेच्या संयंत्रावरील खर्च : *

१– दुय्यम संयंत्रातील (उपचारणावर) दर माणशी $ ६६.७० खर्च आला. (१९५५ मधील सरासरी किंमतीच्या अंदाजाकरता, सार्वजनिक बांधकाम खात्याचा नोव्हेंबर १९५८ चा अहवाल पा ७९ पहा). १ जानेवारी १९५६ च्या लोकसंख्येच्या अंदाजाप्रमाणे ८५०० लोकसंख्या आहे. त्यापैकी सुमारे ८० प्रतिशत् नागरिकांना मलव्यवस्थेची सेवा मिळत होती म्हणून सेवामुक्त लोकसंख्या ८५०० × ०.८० = ६८०० येते. दर माणशी $ ६६.७० प्रमाणे एकूण खर्च ६८०० × ६६ ७ = $ ४५४००० आला.

२– जो ठोकळ अंदाज सामान्यतः वापरला जातो त्याप्रमाणे द. दि १ द. ल. गॅलनपेक्षा वापर कमी असताना पूर्ण उपचारणास द. द. ल. गॅलनला $ ५००००० खर्च येईल (इञ्जिनिअरिंग न्यूज रेकॉर्ड, १७ आक्टोबर १९५७ पहा ). शहरात पांच लाख गॅलनचा दररोज खप होतो.

* यातून जमिनीची किंमत, जागेची साफसफाई, कायदा विषयक फी, अभियांत्रिकी फी, पंपिंग [illegible]वाहिनी आणि संग्राहक मलवाहिन्या वगळल्या आहेत.

म्हणून द. ल. गॅ./दि· ०.५ × ५००००० = $ २५०००० खर्च येईल. फक्त नगरपालिकेच्या अपशिष्ट जलाच्या उपचाराच्या एकेरी संयंत्राच्या संरचनेस ह्या दोन्ही अंदाजांच्या सरसरी प्रमाणे $ ३५२००० खर्च येईल.

**ब– फक्त औद्योगिक संयंत्रावरील खर्च–**

१– दर दिवशी BOD च्या दर पौंडास रिपोर्टप्रमाणे येणाऱ्या सरासरी $ १५० या खर्चांवर गणने आधारित केली आहेत दररोजचा खर्च १५० × ३७४५ पौंड BOD = $ ५६२००० येतो.

२– समतुल्य लोकसंख्येवर आधारित केलेला खर्च, ३७४५/१५७५ ( को. १४–१३ पहा ) × ६८०० माणसे— हे १६२०० माणसांच्या ( दुय्यम उपचाराचा सरासरी खर्च ) समतूल्य असतो, आणि हा खर्च १६२०० माणसे × दर माणशी $ ६६.७० = १,०८०,००० असतो.

ह्या दोन्ही अंदाजांची सरासरी $ ८२१००० हा फक्त गिरणीतील अपशिष्ट जलावरील उपचारणास लागणारा संयंत्रावरील खर्च येईल.

**क– संयुक्त उपचारणाकरता लागणारा एकाच संयंत्रावरील खर्च–**

| | १९५७ मधील आंकड्यांवर आधारलेल्या खर्चांचा स्थूल अंदाज. |
|---|---|
| सळयांची जाळी | $ १६५०० |
| कंकर कक्ष | ७६०० |
| समकार – अवस्थापक ( Equalizer settler ) | १७९२५ |
| दमक मिश्रक ( flash mixer ) | ३२०० |
| अम्ल संभरक ( feeder ) | २००० |
| pH नोंदक ( दोन ) | ३००० |
| रसायने मिसळण्याची द्रोणी | २०० |
| ठिबकणारे निस्यंदक | ८५००० |
| चुना संभरक, | |
| फेरिक क्लोराइड संभरक | ८४०० |
| संभरक आणि पंप बसविलेल्या इमारती | ५५००० |

| | | |
|---|---|---|
| रसायने मिसळण्याची द्रोणी | $ | २०० |
| पुंजीकारक ( flocculator ) | | १७५५ |
| अंतिम अवस्थापन टाकी | | १३५०० |
| निर्वात निस्यंदक, अनुकूलन टाकी, आणि रासायनिक संभरक | | ५६४०० |
| पंप | | १८००० |
| रस्ते ( drive ways ) | | २००० |
| कुंपण | | १५०० |
| नळ आणि झडपा | | ३०००० |
| इमारतीवरील प्रयोगशाळेची उपकरणे | | १०००० |
| अंशीय फ्ल्यूम आणि नोंदक | | २५०० |
| उप बेरीज | $ | ३३४६८० |
| अभियांत्रिकी (सुमारे ६.१ %) संयुक्त उपचारणाकरता | | २०५०० |
| एकेरी संयंत्रावरील (फक्त संयंत्र) एकूण खर्च | $ | ३५४१८० |

**ड अतिरिक्त खर्च–**

| | | |
|---|---|---|
| (क) विभागातील एकूण खर्च | $ | ३५४१८० |
| दर एकरी $ २०० प्रमाणे जागेची अंदाजित किंमत | | ४००० |
| दर फुटास $ १५ प्रमाणे २ मैल रोधक नळ | | १५८००० |

अपेक्षित विस्तारण : ३०% औद्योगिक, अथवा २×१.३ = २.६ द.ल.गॅ.

४६% नगरपालिकेचे अथवा ०.५×१.४६ = ०.७३ द.ल.गॅ.

एकूण ३.३३ द. ल. गॅलन

१०० (३.३३—२.५)/२.५ ही ३४ प्रतिशत् वाढ आहे

| | | |
|---|---|---|
| म्हणून १.३४ × $ ३५४१८० = | $ | ४७४६०१ |
| नवीन उपबेरीज | | ६३६६०१ |
| अतिरिक्त अभियांत्रिकी फी– ६% | | १०९७६ |
| एकेरी संयंत्राचा अंतिम एकूण खर्च | $ | ६४७५७७ |

ह्या विश्लेषणाच्या आधारावर लेखकाने अशी शिफारस केली कीं, शहरातील आणि गिरणीतील अपशिष्टे एकत्रितपणे हाताळण्याकरता एकाच संयंत्राची संरचना करावी. पूर्वी वर्णिल्याप्रमाणे एकत्रित उपचारणाचे फायदे कोणच्याही संभाव्य तोटयापेक्षा कितीतरी जास्त आहेत. तथापि, एकाच संयंत्राचे कार्यक्षम परिचालन करावयाची इच्छा असेल तर आपणास खालील दोन महत्वाच्या गोष्टींकडे लक्ष द्यावे लागेल;

(१) संयंत्राचे योग्यप्रकारे अभिकल्पन केले पाहिजे; औद्योगिक परिचालनांचा बदलणारा स्वभावधर्म संयंत्राच्या बाबतीत विचारात घेतला पाहिजे. (२) संयंत्राचे परिचालन कुशलतेने केले पाहिजे; अभिकल्पन कितीही उत्तमप्रकारे केले असले तरी त्याची देखभाल सुशिक्षित कर्मचाऱ्यांकडून सतत करण्यात आली नाहीतर कोणचेही संयंत्र कार्यक्षमतापूर्वक काम देऊ शकणार नाही.

ह्या दोन गोष्टी लक्षात ठेवून लेखकाने नगरपालिका व गिरणीच्या प्रतिनिधींना गुणवान अभियंते आणि सुशिक्षित निरीक्षक नेमून घेण्याविषयी आग्रहपूर्वक सांगितले. ह्या घटकांकडे जर दुर्लक्ष झाले अगर त्यांना योग्य महत्व दिले नाही तर प्रारंभिक खर्चांत होणारी बचत वाया गेल्यासारखे होईल.

## १४-१३. उपचारण-खर्चाच्या वाटयांचे प्रभाजन-

संयुक्त उपचारण संयंत्राचा संपूर्ण भांडवली खर्च व परिचालनाचा खर्च नगरपालिकेने करावा अशी अपेक्षा उद्योगाने करणे उचित होणार नाही. तसेच ह्या सेवांकरता नगरपालिकेने अवास्तव रकमेची मागणी करणेही गैर होईल. भांडवली आणि परिचालन खर्चाचा न्याय्य वाटा प्रत्येकाने उचलला पाहिजे. जेव्हा खर्चाच्या हिश्याचे वाटप केले जाते तेव्हा शहराला उद्योगाचे किती महत्व आहे याचा विचार करणे इष्ट असते. शहरसीमेत स्थापन केलेल्या उद्योगाकडून करप्राप्ती होत असल्याने व शहराच्या दृष्टीने ती एक मौलिक बाब मानली जात असल्याने उद्योगाकडून होणाऱ्या करप्राप्तीच्या प्रमाणाततरी भांडवली खर्चातील त्याच्या वाटयाला येणाऱ्या रकमेतून काही सूट त्याला मिळाली पाहिजे. चर्चा करण्यात येत असलेल्या या उदाहरणात, एकूण नागरी करांपैकी गिरणीकडून सुमारे ३१ प्रतिशत् कर मिळतो. (एकदा का गिरणीतील अपशिष्टाचे उदासीनीकरण केले कीं) त्या अपशिष्टाचे अन्य प्रदूषण-

कारक गुणधर्म घरगुती वाहितमलातल्यासारखेच असतात, म्हणून उपचारणातील परिचालन खर्चाकरता इतर उपभोक्त्यांना जो कर द्यावा लागतो त्यापेक्षा जास्त कर त्या उद्योगावर लादू नये. गिरणीतून अपशिष्टाची बरीच मोठी राशि प्राप्त होत असल्याने दर दशलक्ष गॅलनला येणारा परिचालन खर्च प्रत्यक्षात तिच्यामुळे कमी होतो, म्हणून अशा होणाऱ्या एकूण बचती-पोटी गिरणीची कोणच्यातरी स्वरुपात भरपाई करावी. संयंत्रातील निःस्त्रावाच्या आपल्या वाटयाबद्दल किमान, तो निःस्त्राव पुनः वापरणे, विकणे, अगर परिचालन खर्चावरील प्रभार कमी करण्यासाठी नगरपालिकेशी वाटाघाट करणे, या बाबतीत गिरणीला निर्विवाद हक्क प्राप्त होतो अशी शिफारस करण्यात आली.

*** खर्चाचे संविभाजन ( apportioning ) करण्याकरता सुचविलेली कार्यपद्धती–**

१) **भांडवलीखर्च** (प्राथमिक अंदाजावर आधारित :

| | | |
|---|---|---|
| संयुक्त उपचारण संयंत्राची किमत | $ | ६४७५७७ |
| फक्त नगरपालिकेने बांधलेल्या संयंत्राची किंमत | | ३५२००० |
| ह्या दोन्ही आंकडयातील फरक, नगरपालिका आणि उद्योगाने वाटून घ्यावयाचा खर्च आहे | | २९५५७७ |
| गिरणीने भरलेल्या नागरी कराची टक्केवारी : | | |
| $ ३४४८७५२ / $ ११२०८००४ × १०० = ३०.७ % † | | |
| गिरणीच्या वाटयातून वजा करावयाची रक्कम (०.३०७ × २९५५७७) | | ९०७५० |
| गिरणीने भरावयाची रक्कम | | २०४८२७ |
| नगरपालिकेने द्यावयाचा जादा खर्च | | ९०७५० |
| एकूण नगरपालिकेचा खर्च (३५२०००+९०७५०)‡ | | ४४२७५० |
| एकूण औद्योगिक खर्च ‡ | | २०४८२७ |

---

* अंतिम खर्च निश्चित झाल्यावरच नक्की यथानुपातन ( prorating ) करता येईल.

† ३० जून १९५७ प्रमाणे

‡ संघीय शासनाने संप्राप्त करावयाच्या खर्चाच्या टक्केवारीने दोन्ही बेरजा कमी करावयाच्या आहेत.

**२) परिचालनावरील खर्च–** (प्राथमिक अंदाजावर आधारित केला)§ :

| | | |
|---|---|---|
| ¶ अंदाजित परिचालन खर्च (उदासीनीकरण वगळून) | | $ १५/द.दि,द.ल.गॅ. |
| एकूण राशीपैकी गिरणीतून मिळालेली प्रतिशत् राशि | | ८० % |
| गिरणीने द्यावयाचा परिचालनावरील खर्च | (०.८०×१५) | $ १२/द.दि.द ल.गॅं. |
| एकूण राशीपैकी शहरातून मिळालेली प्रतिशत् राशि | | २० % |
| शहराने द्यावयाचा परिचालन खर्च | | $ ३/द. दि. द. ल. गॅ. |
| दर दिवसाचा गिरणीने करावयाचा खर्च | (द. दि. २ द. ल. गॅं. प्रमाणे) | $ ३० |
| दर दिवसाचा शहराने करावयाचा खर्च | (द. दि. $\frac{१}{२}$ द.ल. गॅ. प्रमाणे) | $ ७.५० |

गिरणीला मिळणारा अतिरिक्त फायदा :

दर दिवशी दोन द. ल. गॅलन पुनरुपयोगी पाणी; त्याच्या निर्मितीस $ ३० खर्च आला.

संयुक्त निस्तारण संयंत्रावरील भांडवली आणि परिचालन खर्च शहर व गिरणी, यांनी वाटून घ्यावा अशी शिफारस केली होती. भांडवली खर्चाच्या अंदाजी २६ प्रतिशत् खर्च गिरणीला व उरलेला शहराला करावा लागेल. संयंत्रावरील अंतिम खर्च व संघराज्याकडून मिळणारी मदत, यांवर प्रत्येकाने एकूण खर्च किती करावयाचा हे अवलंबून राहिल. परिचालन खर्चाच्या बाबतीत गिरणीवर ८० टक्के खर्चाची जबाबदारी राहिल कारण उपचारणाच्या राशीपैकी तिचा वाटा ८० टक्के आहे. तथापि, गिरणीतील अपशिष्टाची राशि मोठी असल्यामुळे द. दि. द. ल. गॅंलनला येणारा परिचालन खर्च बराच कमी होईल, ह्या मुद्यावर गिरणीच्या बाजूने विचार करावा लागेल. शिवाय, रोज २ द. ल. गॅलन निर्मलीकरण केलेला निःस्त्राव गिरणीच्या मालकीचा राहील आणि जादा किंमत न घेता त्याचा पुनरुपयोग करण्यास तो गिरणीस उपलब्ध करून दिला पाहिजे. उपचारित निःस्त्रावापैकी गिरणीचा वाटा पुनः वापरावा अगर विकून टाकावा हे ठरविण्याचा अधिकार गिरणीस दिला जावा.

---

§ दरवर्षी दरमाणशी $ १.२९ राष्ट्रीय सरासरी आहे. म्हणून १६२०० (औद्योगिक सममूल्य) माणसे × $ १.२९ म्हणजेच $ २०९०० ही गिरणीची वार्षिक (सरासरी) आहे.

¶ किमान सहा महिने संयंत्र चालविल्यानंतरच परिचालनाचा नक्की खर्च निश्चित करता येईल.

## १४-१४. उपचारण-संयंत्राच्या जागेची निवड-

संयुक्त उपचारण संयंत्रास उपयुक्त होईल अशी जागा खालीलप्रमाणे असावी : (१) रोधक नळयोजना अति लांब न होता निकासी (प्रवाह) सहज सोडता येईल इतकी निकट ती जागा असावी. कारण निकास नलिकांतील आणि अन्य पार्श्वनलिकांतील वाहितमल आणि अपशिष्ट जल रोधकांतून ( संग्राहक ) वाहात जाते आणि त्यांचा आकार मोठा असतो व ते फार खर्चाचे असतात. (२) निवासी क्षेत्रापासून, निकासात अडथळा न येईल इतकी, ती जागा दूर असावी. (३) पंपिंग खर्च कमी व्हावा म्हणून ती जागा पुरेशा खालच्या पातळीवर असावी. (४) ती जागा, ज्या नाल्यात पुरेसे तनुकरण जल उपलब्ध होईल अशा नाल्याच्या नजिक व तिचा उतार नाल्याकडे आहे, अशी असावी. (५) त्या जागेकडे मोटार अगर ट्रक सहज नेता यावा. (६) ती जागा विस्तार करता येण्याइतकी मोठी असावी व ती कमी पैशात विकत घेता येईल अशा क्षेत्रात असावी. (७) विद्यमान व संभाव्य औद्योगिक जल-उपभोक्त्यांपासून ती जागा इतकी दूर नसावी की ज्यामुळे पुनरुपयोगाकरता निःस्राव पंपाने नळातून वाहून नेण्यास फार खर्च येईल.

शाखा D त अपशिष्ट प्रस्त्रावित करून व तेथून ते नदीत सोडण्यासाठी संग्राहक मलवाहिन्या आणि पंपिंग केंद्रे आपल्या प्रकरणवृत्त शहरात बसविलेली असल्याने, सध्याची व्यवस्थाच चालू ठेवावी. तथापि, विद्यमान नागरी मलव्यवस्था संयंत्रघरांच्या अगदी निकट आहे आणि विस्ताराकरता तेथे पुरेसे क्षेत्र मिळण्याजोगे नाही. शिवाय शहराच्या उत्तरपूर्व विभागाचा काही भाग, गुरुत्वाकर्षणाने विद्यमान मलव्यवस्थेत मलनिःस्राव सोडण्यास अवश्य असणाऱ्या उंचीवर नाही. म्हणून कमी पातळीवरील काहीशा दूरच्या क्षेत्रातील नवीन जागेची निवड करावी लागेल हे उघड आहे. मात्र पाण्याचा पुनरुपयोग करण्याच्या दृष्टीने समस्या निर्माण होऊ नये म्हणून ती जागा गिरणीपासून फार दूर नसावी. सध्याच्या इमहॉफ टाकीच्या (एकत्रित अवस्थापन टाकी व अवमल पाचित्र) दक्षिण पूर्वेस आणि शाखा D व नदीच्या संगमाच्या उत्तरेस संयंत्राचे स्थान असावे, असे लेखकाने सुचविले होते. संयंत्रासाठी २० ते ५० एकर जमीन विकत घ्यावी.

अधिक प्रकृष्ट छाननीवरून आणि शेजारच्या संभाव्य जागांच्या हवाई फोटोंच्या अध्ययनानंतर विशिष्ट जागेची निवड करण्यात आली. शाखेकडे असलेला किंचितसा उतार सोडला तर ही जागा सपाट आहे; तीत झाडेझुडपे आहेत; वीज पुरवठा जवळच उपलब्ध आहे; "उपयुक्त संयंत्र स्थानासंबंधी" दिलेले सर्व विनिर्देश ह्या जागेवर पुरे होतील असे दिसते.

सध्याच्या शहरसीमेपासून ही जागा दक्षिणपूर्वेस अदमासे २ मैलावर आहे, आणि म्हणून रोधक नलिकांची लांबी जास्तीत जास्त २ मैल होईल. जर संयंत्र शहराच्या अधिक जवळ नेले तर निवासी राहणीत आणि विकासात अडथळे निर्माण होतील असे लेखकास वाटते. शहरापासून जर ते फार दूर नेले तर, रोधक आणि परतणाऱ्या निःस्त्रावाच्या नळांवरील खर्च मालकांना डोईजड होईल.

तथापि, जर प्रदेशवर्णनात्मक सर्वेक्षण केल्यावर उंच पातळीमुळे आणि एका भागात वाहितमल पंप करावा लागणार असल्यामुळे ही जागा सोयीची होणार नाही असे दिसून आले तर, नदीच्या संगमाच्या अधिक जवळ D शाखेच्या आणखी खालच्या दिशेने नवीन जागेची निवड करावी लागेल.

ह्या प्रकरणात वर्णन केलेल्या व्यावहारिक प्रश्नांत जरी प्रत्येक अंगप्रत्यांगाचा उल्लेख करणे अशक्य असले तरी, औद्योगिक अपशिष्ट–संयंत्राच्या बाबतीतील दृष्टिकोन निश्चित करण्यापूर्वी अवश्य असलेली कार्यपद्धति आणि विचारसरणीचे दिग्दर्शन करण्यास, त्याचा उपयोग होईल. ह्या विशिष्ट प्रश्नांच्या बाबतीत लेखकाने संयुक्त उपचारण अधिमान्य केले आहे, परंतु काही वाचक हा प्रश्न सुसंगत कारणे देऊन अन्य प्रकारे सोडवू शकतील व एका नमुनेदार कार्यपद्धतीचा अभ्यास व मूलभूत विचारसरणीचे उद्दीपन ( stimulation ) ह्या प्रश्नांपासून वाचकाला मिळालेले सर्वांत महत्वाचे लाभ आहेत.

**संदर्भ–**

१– गेयर, जे, सी., दि इफेक्ट ऑफ इंडस्ट्रियल वेस्ट ऑन स्युवेज प्लँट ऑपरेशन," स्युवेज वर्क्स जर्नल, ९,६२५ (जूलै १९३७).

२– म्युनिसिपल स्युवर ऑर्डिनन्सेस, मॅन्युअल ऑफ प्रॅक्टिस क्र. ३, फेडरेशन स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स असोसिएशन, वॉशिंग्टन डी. सी., १९४९, १९५७.

३– नेमेरो, एन. एल., "वॉटर वेस्ट्स ऑफ इंडस्ट्री," पत्रक क्र. ५, इंडस्ट्रियल इंजिनिअरिंग कार्यक्रम, नॉर्थ कॅरोलायना राज्य महाविद्यालय, (फेब्रुवारी १९५६).

४– नेमेरो, एन. एल., "फायबर लॉसेस अॅट पेपर मिल्स., इफेक्ट्स ऑन स्ट्रीम अँड स्युवेज ट्रीटमेंट प्लँट्स," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २३, ७, ८८० (जुलै १९५१).

५– Schroepfer, जी. एम., "स्युवर सर्व्हिस चार्जेस," स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स; २३, १२; १४९३ (डिसेंबर १९५१).

६– युनायटेड स्टेट्स पब्लिक हेल्थ सर्व्हिस, "स्टँडर्ड मेथड्स फॉर दि एक्झॅमिनेशन ऑफ वॉटर, स्युवेज, अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स," १० वी आवृत्ति, १९५५.

७– ए सर्व्हे ऑफ डायरेक्ट युटिलायझेशन ऑफ् वेस्ट वॉटर्स, राज्य जल प्रदूषण नियंत्रण मंडळ, सॅक्रॅमेंटो, कॅलिफोर्निया, प्रकाशन क्र. १२.

८– दि ट्रीटमेंट ऑफ स्युवेज प्लँट एफ्लुअंट फॉर वॉटर री यूज इन प्रोसेस अँड बॉयलर फीड, ग्रेव्हर वॉटर कंडिशनिंग कंपनी, न्यूयॉर्क, तांत्रिक पुनर्मुद्रण T – १२९ (ऑक्टोबर १२,१९५४).

९– वीच, एन. टी.," इंडस्ट्रियल यूजेस ऑफ रीक्लेम्ड स्युवेज एफ्ल्युअंट्स," स्युवेज वर्क्स जर्नल, २०,१, ३ (जानेवारी १९४८).



# : १९ : अंशत: उपचार केलेले औद्योगिक अपशिष्ट आणि घरगुती वाहितमल यांच्यावरील संयुक्त उपचार–

बहुतेक औद्योगिक अपशिष्टांत असे काही घटक असतात की जे काढून टाकल्याने उरलेल्या अपशिष्टांवर घरगुती वाहितमलासह उपचार करणे शक्य होते. उत्तम प्रकारचे शिक्षण घेतलेल्या अभियंत्याला हा मार्ग स्वीकारण्यासाठी योग्य परिस्थिति अवगत होते, परंतु अल्प ज्ञान असलेल्या अभियंत्याला नागरी मलव्यवस्थेतून आणि उपचारण संयंत्रातून अशी सर्व औद्योगिक अपशिष्टे वेगळी करण्याची मागणी करावी लागते. जेव्हा घरगुती वाहिमलात अपशिष्ट मिसळण्यात येते तेव्हा, ज्यातील काही विशिष्ट घटकच फक्त अनुपचारणशील आहेत असे अपशिष्ट आणि संपूर्णतया अनुपचारणशील असलेले अपशिष्ट याच्यातील फरक फार सूक्ष्म असतो. हा फरक अधिक स्पष्टपणे निर्धारित करणे हा या प्रकरणाचा उद्देश आहे.

**पूर्वोपचारणानंतर संयुक्त उपचार करण्याचे एक व्यावहारिक उदाहरण–**

उच्चप्रमाणात औद्योगिकरण झालेल्या एका शहरातील दुय्यम प्रकाराच्या उपचारण संयंत्रात तेथील परिसरातील सर्व अपशिष्टे गेली २५ वर्षे हाताळण्यात येत आहेत. आता निस्तारण संयंत्र अतिभारित झाले आहे व औद्योगिक अपशिष्टांच्या संबंधी निर्णय घेणे अगत्याचे आहे. अतिभारित अवस्थेमुळे संयंत्राची क्षमता कमी झाली आहे आणि वंगणामुळे स्थिर तोटचा अगर निस्यंदक चोंदून जात आहेत. पिसांच्यामुळे वितरण व्यवस्था चोंदून जाते आणि पाचित्रात बांध बसतो. विषावत रसायनांच्यामुळे पाचित्रातील जैवी क्रिया थंडावते, ( वंगण व पिसांच्या बांधामुळे ) पाचन मंदावते अगर अजिबात होत नाही. संग्राही नाल्यात नि:स्त्रावी बांधावरून अतिरिक्त तरंगते पदार्थ वाहून जातात, आणि या सर्व घटनांमुळे आणखी अन्य अडचणी उत्पन्न होतात. उपचारण संयंत्राची एकंदर कार्यक्षमता कमी आहे आणि त्याविषयी काहीच भाकित करता येत नाही.

विद्यमान उपचारण संयंत्रात, शलाकांची जाळी, कंकर कक्ष, गोलाकार नेमिचलित (rim driven) निर्मलकारक, स्थिर तोटयांचे ठिबकणारे निस्यंदक, दुय्यम गोलाकार

निर्मलकारक, स्वतंत्र अवमल पाचक, आणि वालुका शुष्कन संस्तर, बसविले आहेत. रोजचा सरासरी प्रवाह ३.८८ द. ल. गॅलन आहे, रोजच्या तरंगत्या घनपदार्थांचा भार ७२९६ पौंड आहे व रोजचा BOD चा भार ११५३३ पौंड आहे. सकाळी ८ पासून सायंकाळी ५ पर्यंतच्या नऊ तासात BOD चे ४७.५ टक्के, सरासरी प्रवाहाचे ४४.१ टक्के, आणि तरंगत्या घनपदार्थांचे ४१.२ टक्के भारण घडून येते.

उद्योग आणि त्यांच्यामुळे होत असलेल्या प्रदूषणाच्या भारांची यादी पुढे दिली आहे :

१) संश्लिष्ट (synthetic) रंगकामाच्या परिष्करण (finishing) वस्त्रनिर्मिति गिरणीतून संप्राप्त होणाऱ्या (contrib te) अपशिष्टात, परिचारण संयंत्रातील एक तृतीयांश प्रवाह आणि एकूण औद्योगिक प्रवाहापैकी ८० टक्के प्रवाह असतो; संयत्रातील एकूण BOD पैकी एकचतुर्थांश आणि एकूण औद्योगिक BOD पैकी सुमारे ६२ टक्के BOD असतो; परंतु एकूण तरंगत्या घनपदार्थांपैकी फक्त ४ टक्के घनपदार्थ त्यात असतात.

२) धोबी कामातून, संयंत्रातील एकूण BOD व तरंगत्या घनपदार्थांपैकी ६.२ टक्के संप्राप्त होतात. ह्या अपशिष्टातील चिंध्या, लिंट हे संयंत्रातील प्रवाहाच्या एक टक्का असतात व त्यांच्यामुळे मलवाहिन्या (चोंदून) बंद होतात.

३) जुडाई (rendering) संयंत्रातून एकूण संयंत्रातील BOD पैकी ४.५ टक्के संप्राप्त होतो. ह्या अपशिष्टातून बरेच वंगण आणि दुर्गंधी निर्माण होते, आणि त्यातील प्रवाह आणि तरंगत्या घनपदार्थांपैकी १.९ टक्के संप्राप्त होतात.

४) कुक्कुटपालन संयंत्रातील अपशिष्टात, रक्त, पिसे, प्रथम आमाशय (paunch) खत असतात आणि त्यातून एकूण संयुक्त अपशिष्टापैकी १.० टक्का प्रवाह, १.४ टक्के BOD व १.७ टक्के तरंगते घनपदार्थ संप्राप्त होतात.

५) खाटिकखाना व मांस पॅकबंदी संयंत्रातून २.८ टक्के BOD, व १.३ टक्के तरंगते घनपदार्थ संप्राप्त होतात पण प्रवाह फक्त ०.२८ टक्केच संप्राप्त होतो.

६) एका विद्युत् गिलिट काम करणाऱ्या कंपनीतून २.२ टक्के प्रवाह, ०.६९ टक्के BOD, व ०.८७ टक्के तरंगते घनपदार्थ संप्राप्त झाले. ह्या अपशिष्टांच्या अनेक नमुन्यांत क्रोमियम उच्च प्रमाणात सकेंद्रित झाल्याचे दिसून आले.

७) घरगुती गिऱ्हाइकांमुळे संयंत्रातील ८४ टक्के घनपदार्थ, ६०.४ टक्के प्रवाह, आणि ५७ टक्के BOD संप्राप्त होतो.

ह्या देशातील अनेक नगरपालिकांना संयंत्रांच्या अतिभारित क्षमतेच्या गंभीर समस्येला तोंड द्यावे लागते. अशा समस्येच्या बाबतीत व्यावहारिक तोड काढण्यात पूर्वी घेतलेल्या निर्णयाचा महत्वाचा कार्यभाग असतो; अनेक वर्षे एका विशिष्ट प्रकारे अपशिष्टाची विल्हेवाट करण्याची लोकांना संवय झालेली असते आणि एकंदर पद्धतीत करण्यात येणाऱ्या बदलाकडे त्यांचा विरोधी कल असतो. तसेच संयंत्राच्या वित्तव्यवस्थेच्या प्रारंभिक पद्धतीप्रमाणेच नंतरच्या वित्तव्यवस्थेसंबंधी प्रथा प्रस्थापित करण्याकडे त्यांचा कल असतो. उलटपक्षी पूर्वीप्रमाणे त्याच सामान्य व्यवस्थेत उपचारण चालू ठेवण्याचे मात्र सुधारित क्षमतेसह सर्वसंबंधित पक्ष स्वागत करतील. लोकांचा एकंदर दृष्टिकोन चुकीचा होता व तो तसाच राहिला आहे हे त्याना पटवण्याचा प्रयत्न करण्याचे बाजूला ठेवले तरी, अपशिष्ट-उपचारण सुविधांचे अभिकल्पन करण्याची जोखीम स्वयंही अवघड असते.

ही तत्वे लक्षात ठेवून, संयुक्त उपचारणाचा वापर पुढेही चालू ठेवून समस्या चांगल्याप्रकारे सोडविता येतील. मात्र इतर सर्व बाबी अनुकुल असल्या पाहिजेत असे लेखकाला वाटते. चर्चिले जात असलेल्या उदाहरणात, नागरिक आणि खाजगी मंडळे, ही दोन्हीही या विचारसरणीस अनुकूल असल्यामुळे, आणि ती अधिक काटकसरीची असल्यामुळे, त्या विचारसरणीचा स्वीकार करण्यातील महत्वाचे परावर्तक ( deterrents ), विषाक्त अपशिष्टांची उपस्थिति आणि संयंत्राच्या सुपरिचालनातील अडथळा आणणाऱ्या अपशिष्टांची उपस्थिति, हेच फक्त होते. गिलिटकामाच्या संयंत्रातील क्रोमियम अपशिष्ट हेच अशी अडचण निर्माण करील असे दिसत होते एकूण प्रवाहातील ह्या अपशिष्टाची टक्केवारी अत्यल्प असल्यामुळे, अपशिष्टातून विषाक्त क्रोमीयमचे निष्कासन करण्याकरता समाधानकारक व्यवस्था करता येईल असा लेखकाला विश्वास होता.

ह्या समस्येची तांत्रिक सोडवणूक पूर्णपणे करण्याकरता खालील तीन उपाय योजावे लागले : (१) विद्यमान विभिन्न उपचारण–संयंत्रांच्या संचांच्या क्षमता निश्चित करणे, (२) प्रत्येक व्यक्तिगत कारखान्यात औद्योगिक अपशिष्टांसह योग्य पूर्वोपचारणकरून आंत येणारा अपशिष्ट-भार कमीत कमी करणे, आणि (३) विद्यमान संयंत्राचे पुनर्मूल्यन करून भविष्यकालीन अपशिष्ट-भारांची प्रभावीपणे हाताळणी करण्यास अवश्य असलेले आणखी उपाय सुचविणे.

## १५–१. संयंत्राची विद्यमान क्षमता निश्चितपणे जाणून घेणे–

विद्यमान संयंत्रातील प्रत्येक उपचारण संचाचे योग्यताक्रम–निर्धारण ( rating )

कोष्टक १५–१ मध्ये सादर केले आहे. १०० टक्के योग्यता याचा अर्थ, निष्कासनाची अनुकूलतम कार्यक्षमता असताना तो संच आता कमाल क्षमतेइतका भारित झाला आहे, असा आहे. १०० टक्क्यांपेक्षा जास्त योग्यताक्रम म्हणजे त्या टक्क्यांनी तो संच अतिभारित झाला आहे आणि १०० टक्क्यांपेक्षा कमी म्हणजे ते विशिष्ट संयंत्र पूर्ण क्षमतेइतके वापरले जात नाही असे सूचित होते.

संग्राहक नाल्याच्या संरक्षणाकरता किमान ८५ प्रतिशत् क्षमतेची आवश्यकता असल्याने प्रदूषकाच्या विद्यमान भारणाच्या हाताळणीकरतासुद्धा कंकर कक्षच (मलवा निर्मिति) फक्त पुरे होते.

कोष्टक १५–१.

**सध्याच्या संयंत्रांच्या संचांची क्षमता.**

| संच | क्रमनिर्धारित क्षमता सरासरी * | क्रमनिर्धारित क्षमतेची टक्केवारी |
|---|---|---|
| मलवा निर्मिति ( detritors ) (दोन) | द. दि. ८.०० द. ल. गॅलन | ४८.५ |
| प्राथमिक अवस्थापन द्रोणी | द. दि. ३.१८ द. ल. गॅलन | १२२ |
| दुय्यम अवस्थापन द्रोणी | द. दि २.०० द. ल. गॅलन | १९४ |
| ठिबकणारे निस्यंदक (प्राथमिक अवस्थापनानंतरचे भारण— दर दिवशी ९२४० पौंड) | ९० टक्के कार्यक्षमता (द. दि. २२१० पौंड) | ४१८ † |
| | ८५ टक्के कार्यक्षमता (द. दि. ५६०० पौंड) | १६५ † |
| | ८० टक्के कार्यक्षमता (द. दि. ११३०० पौंड) | ८२ † |
| पाचित्र | ६५००० घनफूट | ५१८ |
| अवमल शुष्कन संस्तर | दरमहा ९ इंच अवमलाचे एक भारण (द. दि. ८२५ घनफूट अवमल) | २०२ |
| | (द. दि. २२६० पौंड शुष्क घनपदार्थ | २४६ |

* सामान्य स्वीकृत अभिकल्पन भारणांवर आधारित.

† प्राथमिक अवस्थापन टाक्यात २० प्रतिशत् अपचयन होते असे गृहीत धरून.

## १५-२. प्रवेशी भार कमी करणे–

प्रत्येक औद्योगिक संयंत्राला भेट देण्यात आली व उपचारण संयंत्रात प्रस्त्रावित होणाऱ्या भाराचे निर्धारण करण्यास मदत करण्यात आली. अनिष्ट अपशिष्ट कमी करण्याचे अथवा ते काढून टाकण्याचे उपाय सुचविण्यात आले. कार्यपद्धति अथवा निस्तारण प्रथांतील अदलाबदल केलेल्या सूचनाविषयी उद्योगांनी आस्था दाखविली. वस्त्रनिर्मिति उद्योग सर्वांत जास्त राशींना कारणीभूत असल्याने त्यांनी पाण्याचा पुनरुपयोग करण्याच्या शक्यतेचा अभ्यास करण्यासाठी अन्वेषण करण्याचे मान्य केले. प्रयोगशाळेतील अनेक महिन्यांच्या अभ्यासानंतर पाण्याचा पुन: वापर करण्यासाठी कोणतीही व्यावहारिक पद्धत आढळून आली नाही, म्हणून परिष्करण गिरण्यांतून भारात फारसा बदल होईल अशी अपेक्षा करण्यात आली नाही. उलट, वस्त्रनिर्मिति– परिचालनापैकी विणकाम विभागात साबण, प्रक्षालक ( detergents ) इत्यादीत बदल करण्यात आले. त्यामुळे गिरणीतून बाहेर जाणारा BOD बराच खाली आला. सध्याच्या वंगण टाकीच्या पाशात नवीन अडणे बसविण्याचे जुडाई संयंत्राचे बाबतीत मान्य करण्यात आले, आणि त्याशिवाय मलवाहिनीत वंगण निसटून जाऊ नये म्हणून वंगण टाकीत दुसरा पाश व नवीन नळ बसविण्यास व ते चालू करण्यास अनुमती देण्यात आली. उपचारण संयंत्रातील ठिबकणाऱ्या निस्यंदकाच्या स्थिर तोटद्या चोंदून जाण्यात वंगणाचा भरीव वाटा होता. संयंत्रातील अन्य क्षेत्रापासून हत्याक्षेत्र वेगळे करून खाटिक कारखाना आणि पॅकबंदी संयंत्रातील प्रस्त्रावातून रक्ताचे संपूर्ण निरसन करण्यात आले. अशा प्रकारे खते, गोंद, आणि जनावरांचे विशिष्ट खाद्य, यांच्याकरता वापरण्यात येणाऱ्या रक्त–अपशिष्टांची स्वतंत्रपणे विल्हेवाट करण्यासाठी तळघरातील मोठाल्या पिपांत ती सोडून देण्यात आली. नागरी मलवाहिनीत प्रस्त्रावित करण्यापूर्वी सर्व वंगण व तक्तपोशीवरील घाण पाणी वंगण टाकीत सोडण्यात आले आणि अधूनमधून वंगण टाकी उघडून स्वच्छ करण्याचे आदेश देण्यात आले. संयंत्राच्या तळघराबाहेर प्रथम आमाशय खत (paunch) " पेच वाहकाने " ( screw conveyor ) टाकी बसविलेल्या ट्रकमध्ये टाकले व शेतावर नेण्यात आले. अशा प्रकारे सर्व घन खताचे मलवाहिनीतून निरसन करण्यात आले.

कुक्कुट पालन संयंत्रात त्याच समस्येचे आणखी एक अंग दिसून आले. उपचारण संयंत्राजवळील निस्यंदक तोटद्या पिसांनी चोंदून जात आणि घनत्वाच्या तुलनेने त्यांचे पृष्ठीय क्षेत्र जास्त असल्याने अवस्थापन टाकीत ती खाली बसण्यास प्रतिरोध होत होता. तथापि पूर्णपणे भिजून गेल्यावर काही पिसे खाली बसली आणि पाचित्रात गेली. तेथे त्यांचा विघटनास प्रतिरोध होऊ लागल्याने पाचन क्रियेस अडथळा येऊ लागला. म्हणून कुक्कुट पालन संयंत्रात तीन सूक्ष्म जाळयांची एक मालिका बसविण्यात आली. पूर्वी संयंत्रातून निसटून जाऊन निःस्रावी

मलवाहिनीत शिरणारी पिसे आणि अन्य घनपदार्थ काढून टाकण्याकरता ह्या जाळ्या रोजच्या-रोज धुण्यात येतात. जाळ्याना चार सिमेंटची गटारे जोडलेली होती व ती पत्र्यांनी झांकून टाकली होती. वेड( wade ) प्रकाराच्या निकास नाल्या (नळकामासंबंधी पुरवठ्याच्या कोणच्याही नियमपुस्तिकेत पहा) गटांच्या प्रत्येक टोकाशी बसविल्या होत्या. पिसांचा प्रस्राव किमान राखण्यास प्राथमिक मदत व्हावी हे त्यांचे काम असते.

धोबी कार्यालयात भारी तारांच्या जाळीच्या कापडासह धातूची एक चौकट आणि इमारतीच्या मागील बाजूस बांधलेल्या जलरोक द्रोणीत ( catch basin ) बाधक पट्टयांची ( baffle plates ) मालिका बसविली होती. संयंत्रातून बाहेर पडणाऱ्या तरंगत्या घनपदार्थांचे बरेचसे निष्कासन होण्यास जरूरीप्रमाणे वेळोवेळी हे कापड बदलण्यात येते. कापडाचे तुकडे आणि टुवाल यांच्यासारखे मोठे तुकडे पकडून (बाजूला) ठेवण्याकरता संयंत्रात अतिरिक्त जाळ्याही बसविण्यात आल्या.

धातूवरील गिलिट करण्याच्या संयंत्रात गिलिट कक्षातील निःस्राव नालीवर आपोआप चालणारे pH नोंदक बसविले होते. pH चे ७ च्या जवळपास मूल्य स्थिर राखण्याकरता अमोनियम हायड्रॉक्साइड ($NH_4OH$) मिसळले आणि त्यामुळे गिलिट कामातून नगर मलवाहिनीत अतिरिक्त अम्लता शिरण्यास प्रतिबंध झाला. शिवाय, गिलिट–स्नान परिचालनाचा अभ्यास करण्यात आला आणि (विशेषतः सायनाइडे आणि क्रोम असलेल्या) धातु–स्नान परिवाहास प्रतिबंध व्हावा म्हणून योग्य त्या दुरुस्त्या करण्यात आल्या.

तसेच, एका लहान रसायन कंपनीने मलवाहिनीतून वादळी जलाचे निष्कासन होण्याकरता प्रस्राव नलिकेत मामुली बदल केले. (अपशिष्ट–उपचारण संयंत्रातील तुलनेने पातळ आणि संदूषणरहित वादळी पाण्यावरील उपचारण, ही सामान्यतः बिनकाटकसरीची कार्यपद्धति असते आणि तिचा, परिणाम उपचारण–संयंत्राची कार्यक्षमता कमी होण्यात होतो). पुरेशा प्रमाणात पातळ केल्याशिवाय कोणचेही विषाक्त रसायन मलवाहिनीत प्रस्रावित न करण्याचेही त्यानी मान्य केले. प्रक्रिया अपशिष्ट–जलातून ह्या परद्रव्यांचे निष्कासन होण्यास सुविधा मिळावी म्हणून दोन विलगक वापरण्यात आले. तक्तपोशी धुण्याने निर्माण होणाऱ्या स्निग्ध एस्टर प्रकारच्या द्रव्याच्या निष्कासनासाठी एकाचे अभिकल्पन केले होते; दुसऱ्यात सर्व प्रक्रिया जलांचे विलगन करण्याकरता दोन टप्प्यांची यंत्रणा वापरली होती.

व्यक्तिगत उद्योगांच्याबरोबर वारंवार चर्चा केल्यामुळे पूर्वोपचारण संबंधीच्या त्यांच्या वृत्तीत सुधारणा झाली. ह्या सभांमध्ये एकंदर अपशिष्ट–उपचारणाचे उद्देश दाखवून देण्यात आले आणि शहरातील अपशिष्ट–उपचारणास दिलेल्या भेटीमुळे अंतर्ग्रस्त समस्या समजून घेण्यास उद्योगांना बरीच मदत झाली.

**कोष्टक १५–२.**

**उपचारण–संयंत्रावरील एकूण भारण.**

| गुणधर्म | पूर्वोपचारणाच्या आधी* | पूर्वोपचारणानंतर† |
|---|---|---|
| प्रवाह, दर दिवशी दशलक्ष गॅलनात | ३.८८ | ३.३६ |
| BOD दर दिवशी पौंडात | ११५३३ | १०१३० |
| तरंगते घनपदार्थ, दर दिवशी पौंडात | ९२७६ | ८१२९ |

* जून–सप्टेंबर १९५४ मधील सरासरी सहा नमुना घेण्याचे दिवस.

† जून–सप्टेंबर १९५५ मधील सरासरी वीस नमुने घेण्याचे दिवस.

**कोष्टक १५–३.**

**उद्योगांनी चालविलेल्या पूर्वोपचारणांचे निष्कर्ष.**

| संयंत्र | प्रवाह, दर मिनिटास गॅलन | | BOD, दर दिवसास पौंड | | तरगते घनपदार्थ, दर दिवसास पौंड | |
|---|---|---|---|---|---|---|
| | पूर्वोपचाराच्या आधी | पूर्वोपचाराच्या नंतर | पूर्वोपचाराच्या आधी | पूर्वोपचाराच्या नंतर | पूर्वोपचाराच्या आधी | पूर्वोपचाराच्या नंतर |
| १. संश्लिष्ट रंग व सफाईकामाची गिरणी | ८५७ | ८३८ | ३०४८ | २७३६ | ३७६ | ५०९ |
| २. धोबी काम | ५० | १०० | ७१९ | २२२ | ५७६ | ४३३ |
| ३. जुडाई (rendering) संयंत्र | ५१ | ८६ | ५१४ | १९९५* | १७९ | १३२३* |
| ४ कुक्कुटपालन संयंत्र | २८ | ८० | १६२ | १८७ | १५९ | १२२ |
| ५. खाटिकखाना व पॅकबंदी संयंत्र † | ६.९५ | | ३२२ | | ११८ | |
| ६. गिलिट कामाचे संयंत्र | ५९ | ६९ | ८० | ४७ | ८१ | २५ |

* कार्यक्षमता कमी झालेली नसून पूर्वोपचारणाआधी नमुने घेण्यामुळे वाढ झाली आहे.

† अंतिम सर्वेक्षणाच्यावेळी सुधारणा पूर्णपणे केलेल्या नव्हत्या.

## १५–३. विद्यमान संयंत्राचे पुनर्मूल्यांकन आणि त्यात वाढ करण्याकरता सूचना–

ह्या समस्येच्या तांत्रिक सोडवणुकीमधील तिसऱ्या टप्प्याचा, सर्व उद्योगांनी पूर्वोपचारण साधने बसविल्यानंतर नागरी उपचारण–संयंत्रावर येणाऱ्या अंतिम भारांच्या मूल्यांकनाशी, संबंध होता. प्रत्येक संप्रावक ( contributing ) उद्योगांतील अपशिष्टांचे, त्यांत असणाऱ्या संदूषकांचे भार निश्चित करण्याकरता, अनेकवेळा दीर्घकाल विश्लेषण करण्यात आले. शिवाय, नागरी उपचारण संयंत्रात जाणाऱ्या एकूण भाराचे मापन करण्यात आले (को. १५–२ व १५–३ पहा).

कोष्टक १५–३ वरून वाचकाला दिसून येईल कीं, पूर्वोपचारणानंतर विशिष्ट संयंत्रातील अपशिष्टाच्या भारात काहीशी वाढ झाली. जरी सैद्धांतिकरीत्या ही वाढ व्हावयास नको असली तरी प्रत्यक्षात ती अनेक वेळां घडून येते, कारण औद्योगिक परिचालनात विविधता असते. म्हणून ह्या आंकड्यांच्या गटावरून असे दिसते की नक्की भारणे निर्धारित करण्यासाठी असंख्य नमुने बऱ्याच कालावधीत घेण्याची गरज असते. प्रत्यक्ष निर्वाचनात जरी काही थोडे निष्कर्ष दिशाभूल करणारे आहेत असे वाटले तरी त्यामुळे अभियंत्याने निरुत्साही होण्याचे कारण नाही. शिवाय, ह्या विशिष्ट उदाहरणाचा मुख्य उद्देश उपद्रवकारक अपशिष्टे काढून टाकणे, नहून भारण कमी करणे, हा होता. निष्कासन ( removal ) आणि अपचयन ( reduction ) हे दोन्हीही अवश्यमेव एकाच वेळी घडून येतीलच असे नाही.

पूर्वोपचाराची साधने बसविल्यानंतर ह्या नूतन प्रदूषण–भाराच्या मापनांत दर दिवशी १४०३ पौंडाइतकी BOD त घट झाल्याचे दिसून आले. उपचारणातील BOD च्या दर पौंडास सरासरी $ १५० या भांडवली खर्चांच्या प्रमाणात ही घट म्हणजे भरींव बचत आहे असे मानावे लागेल. तसेच ह्या मापन केलेल्या भारात, पॅकबंदी संयंत्राचे नूतनीकरण पूर्ण केल्यानंतर लागलीच काढून टाकावयाच्या ३२२ पौंड BOD चा आणि ११८ पौंड तरंगत्या घनपदार्थांचा समावेश होता. पूर्वी होणाऱ्या अनेक उपद्रवांवर उद्योगांनी उपाय योजले होते. पिसे, रक्त, विषाक्त रसायने आणि ज्वालाग्राही द्रव्ये नागरी अपशिष्ट-जलातून काढून टाकल्यामुळे विद्यमान उपचारण–संयंत्राच्या कार्यक्षमतेत वाढ झाली. संयंत्रात अधिक वाढ न करतासुद्धा आता त्यातून सुमारे ८० प्रतिशत् BOD, ७५ प्रतिशत् घनपदार्थ, व ६६ प्रतिशत् रंग एकूण अपशिष्ट–जलातून काढून टाकणे शक्य झाले, कारण पूर्वोपचारण करून उपद्रवी अपशिष्टांचे निरसन करण्यात आले. निश्चितच संयंत्र अतिभारित झाले होते व अशी वस्तुस्थिती असतानासुद्धा ही फलनिष्पत्ति झाली.

निर्मलकारकाचा व पाचित्राचा वाढीव आकार, निस्यंदकातील कंकराचे वृद्धिगत क्षेत्र आणि अंतिम अवमलाच्या हाताळणीच्या साधनांतील वाढीच्या स्वरुपात प्रदूषणाचे जास्तीत जास्त निष्कासन साध्य करण्याकरता आणि संग्राही पाण्याच्या उत्तम वापराचे संरक्षण करण्याकरता संयंत्राच्या क्षमतेत वाढ करावी असे सुचविले होते.

ह्या वाढीकरता अभिकल्पन, सरचन, आणि परिचालन केल्यानंतर, वरील कार्याची क्षमता ९० टक्क्यापेक्षा जास्त वाढली. संयंत्राचे नवीन भाग, तुलनेने कमी खर्चात, बांधण्यात आले आणि कमाल कार्यक्षमतेत कार्यान्वित करण्यात आले; याचे कारण बऱ्याच अंशी उद्योग व नगर-संस्थांमधील उत्तम सहकार्य हे होते.

उपरिनिर्दिष्ट उदाहरणावरून, उद्योगांशी वैयक्तिक सल्लामसलतीचे महत्व किती असते हे दिसून येते व संयुक्त उपचारणातील पूर्वोपाय म्हणून लहान कारखान्यांतील अपशिष्टे घरगुती वाहितमलाशी सुसंगत राखण्याच्या आवश्यकतेचे निदर्शन होते. तथापि, ह्या पद्धतीने समस्या हाताळताना अपशिष्ट–अभियंत्याला जे परिश्रम करावे लागतात व वेळ घालवावा लागतो त्यांची किंमत कमी लेखता येणार नाही; आणि अशा तऱ्हेने इतका वेळ व शक्ति खर्च करणे पैशाच्या दृष्टीने अभियंत्याला पुष्कळवेळा परवडत नसल्याने ह्या मार्गाचा काटेकोरपणा दुर्दैवाने अनेकवेळा प्रत्यक्षात साध्य करता येत नाही.



## : १६ : पूर्ण उपचार केलेली अपशिष्टे नागरी मलव्यवस्थेत सोडणे–

संपूर्ण उपचारण करून उद्योगातील अपशिष्टे नागरी मलव्यवस्थेत प्रस्त्रावित करणे इष्ट असल्याचे उद्योगकर्त्यांना आढळून येईल अशी परिस्थिती अनेक वेळा असते. अवशिष्ट द्रव अपशिष्टांची अंतिम हाताळणी आणि विल्हेवाट करण्याची जबाबदारी घेणारा अन्य कोणी मिळाला तर उद्योगाला अर्थातच ते फायदेशीर होते, कारण संयंत्रात बिघाड होण्याची नेहमीच शक्यता असते आणि त्यामुळे उद्योगाच्या उपचारण–संयंत्रातील अपशिष्टे संग्राहक नाल्यात प्रत्यक्षपणे प्रस्त्रावित करण्यास मान्यता मिळत नाही. म्हणून नागरी उपचारण–संयंत्र नाल्याच्या संरक्षणाचे आणखी एक साधन म्हणून काम देते. बऱ्याच अंतरावरील योग्य जागी उपचारित अपशिष्ट नदीत पंप करून सोडण्यापेक्षा ते जवळच्या नागरी मलवाहिनीत गुरुत्वाकर्षणाने सोडणे उद्योगाला अधिक सोयीस्कर असणे शक्य असते. नगरपालिकेचा कल आणि तिच्या मलव्यवस्था सेवेवर आकारावयाचा दर ह्यांचा, नागरी मलवाहिनी आणि उपचारण–संयंत्राचा उपयोग करण्याविषयीच्या उद्योगांना घ्याव्या लागणाऱ्या निर्णयात, महत्वाचा वाटा असतो. जर नागरी जीवनात उद्योग हा एक अविभाज्य भाग आहे ही वस्तुस्थिति मानली आणि नागरी मल-वाहिनींच्या वापराकरता नाममात्र व वाजवी आकार घेण्यात आला तर शहरातील स्वास्थ्य-विषयक सुविधांचा उपयोग करण्यास उद्योगांना उत्तेजन मिळेल. औद्योगिक अपशिष्टांच्या विल्हेवाटीची साधने वैयक्तिक पायावर निर्धारित केली पाहिजेत हे पुन: एकदा आम्ही आग्रहपूर्वक सांगतो. प्रत्येक उदाहरण अनन्य असते आणि स्थाननिश्चिति अथवा पूर्वनिर्णय, यांसारख्या बाबीसुद्धा, आपल्या अपशिष्ट–उपचारणाच्या अंतिम मार्गाची निवड करताना, उद्योगावर प्रभाव पाडू शकतात.

**संपूर्णपणे उपचारण केलेले अपशिष्ट नागरी मलव्यवस्थेत प्रस्त्रावित करण्यात येत असलेले एक उदाहरण–**

विद्युत् आणि यांत्रिकी व्यापारी -यंत्रे बनविणाऱ्या व स्वत:च्या विद्यमान संयंत्राजवळ नवीन संयंत्र उभारत असलेल्या एका उद्योगाचा या चर्चेकरता उपयोग करूया. नवीन संयंत्राची जागा, सोय, निकट शेजार, व उपलब्धता यांच्यामुळे, निवडण्यात आली होती. पण जसे अनेक वेळा घडते तसे, अपशिष्टांच्या विल्हेवाटीच्या समस्येचा (त्यावेळी) जवळ जवळ काहीच

विचार करण्यात आला नव्हता. जरी पूर्वी असे दुर्लक्ष होणे ही नित्य घडणारी बाब असे तरी सुदैवाने अधिक कंपन्या अपशिष्टाच्या उपचारणाला भविष्यकालीन संयंत्रांच्या जागा निवडताना योग्य ते महत्व देत आहेत; कारण नवीन संयंत्राकरता जागेची निवड करण्यापूर्वी अपशिष्टांच्या विल्हेवाटीसंबंधी सर्व बाबींचा जर विचार केला नाही तर येणारा अनुभव महागडा असतो याची त्यांना जाणीव होऊ लागली आहे.

एका लहान गावात ते संयंत्र बसविले आहे आणि तेथील तो एकमेव मोठा उद्योग आहे. जुन्या संयंत्रातल्यासारखेच उत्पादन अनिवार्यतया नवीन संयंत्रातून होईल परंतु ते विस्तृत प्रमाणावर होणार आहे; विद्यमान संयंत्रातून दररोज सुमारे १५०० यूनिट उत्पादन होते आणि दोन धारक (holding) खाजणांच्या मालिकेत सर्व अपशिष्टे उपचार न करता प्रस्त्रावित केली जातात व तेथून ती एका छोटया खाडीत सोडून दिली जातात. नवीन संयंत्रांत मात्र नागरी मलव्यवस्था आणि नागरी प्राथमिक संयंत्राचा उपयोग करण्यात येईल. उद्योगाच्या जागेपर्यंत त्याच्या उपयोगाकरता जरूर तितक्या जादा मलवाहिन्या टाकण्याचे नगरपालिकेने आगाऊ मान्य केले आहे आणि मलवाहिनींच्या संरचनेच्या खर्चाच्या कर्जफेडीकरता तरतूद करून पैसे भरण्याची उद्योगाने कबुली दिली आहे. संपूर्ण अपशिष्ट उद्योगाच्या जागेवरून नागरी उपचारण-संयंत्रात गुरुत्वाकर्षणाने वाहून जाऊ शकते. वास्तविक त्या क्षेत्राचे प्रदेशवर्णन असे आहे कीं, सर्व खाडया नाले आणि भूजलसुद्धा शहराच्या दिशेने वाहतात. शहरसीमेजवळ खोदलेल्या भूमिगत विहिरींतून नागरी जलपुरवठा होतो, व त्याचा मार्ग औद्योगिक संयंत्राची जागा आणि नागरी वाहितमल-उपचारण संयंत्र, यांच्यामधून सरळ-सरळ जातो. जर उद्योगाने नागरी मलव्यवस्थेच्या सुविधा वापरावयाच्या नाहीत असे ठरविले तर आपल्या अपशिष्टाचे संपूर्ण उत्पादन सुमारे चार मैलांवरील पुरेसे तनुकरण होत असलेल्या दुसऱ्या संग्राहक नाल्यात २०० ते ३०० फूट उंचीवर पंप करून त्याला सोडावे लागेल.

उद्योग यंत्रमंडळाला सध्याच्या संयंत्रात निर्माण होत असलेल्या अपशिष्टांची राशि आणि दर्जा निश्चित करण्याची जरुरी वाटली, कारण त्यावरून कंपनीला भविष्यकालात नवीन संयंत्रातून उत्पादन करण्यात येणाऱ्या अपशिष्टांचा अंदाज घेता येईल आणि नंतर ती अपशिष्टे शहरातील अपशिष्ट-जल उपचारण व्यवस्थेत सोडण्यापूर्वी कराव्या लागणाऱ्या उपचारणाची मात्रा आणि प्रकारांची निश्चिती करता येईल.

## १६-१. नमुने घेण्याचा कार्यक्रम-

सध्याच्या अपशिष्टांचे नमुने घेणे हा या कार्यक्रमाचा पहिला टप्पा आहे. विद्यमान







आकृति १६–१. नमुने घेण्याकरता आणि मापनाकरता बांधलेला बांध आणि पेट्या दाखविणारी क्र. १ ची नळव्यवस्था (गिलिट कक्षातील अपशिष्ट).







**आकृति १६–२. क्रमांक २ ची नळव्यवस्था (अम्लमार्जन–कक्षातील अपशिष्टे).**

संयंत्रातील सर्व अपशिष्टे दोन नळांत प्रस्त्रावित केली जातात म्हणून नमुने घेण्याकरता आणि प्रवाह–मापनाकरता नळांवर बांध आणि पेटयांचे संरचन करण्यात आले; ह्या बांधांची व पेटयांची छायाचित्रे आ. १६–१ व १६–२ मध्ये दाखविली आहेत. नळ क्र. १ (आ. १६–१)




**आकृति १६–३. अपशिष्ट–जलप्रवाह, बंधारा क्रमांक १.**

मधील अपशिष्टे प्रामुख्याने गिलिटकक्षात निर्माण झाली तर अम्लमार्जन कक्षातून नळ क्र. २ (आ. १६–२) मधील अपशिष्टे आली. अवमल प्रस्त्राव आणि उत्पादनांतील बदलांचा नमुन्यात अंतर्भाव होता. आठवडयातील रविवारखेरीज प्रत्येक दिवशी २४ तासांच्या कालात प्रत्येक नळातील नमुने घेण्यात आले. तथापि, १९५८ मधील २ महिन्यांच्या कालावधीतील निरनिराळ्या आठवडयातील दिवसांची खालीलप्रमाणे निवड करण्यात आली : सोमवार, ११/१७; मंगळवार, ९/२३; बुधवार, १०/८; गुरुवार, ११/६; शुक्रवार, १०/२४; शनिवार, ११/१५. गिलिट कामाच्या प्रत्येक नळाकरता नमुना घेण्याच्या या दिवसांतील यंत्रांच्या उत्पादनाचे आंकडे को. १६–४ मध्ये दिले आहेत.

२४ तासांच्या कालातील दर अर्ध्या तासास प्रत्येक बांधपेटीवरून त्या क्षणी प्रस्त्रावित होणाऱ्या अपशिष्टाच्या वेगास अनुसरून आयतनी ( in volumes ) नमुने गोळा करण्यात आले; प्रवाहाची नोंद करण्यात आली आणि आ. १६–३ ते १६–६ मध्ये लेखाचित्रीय पद्धतीने ( graphically ) दिग्दर्शित केल्याप्रमाणे नमुना घेण्याच्या संपूर्ण कालावधीत दर तासाला नमुने संमिश्र केले (composited). तसेच अम्लमार्जन आणि शाई फिरविण्याच्या (blacking) कक्षातील ५५ गॅलन – पिपांच्या गटवार ढिगांची नोंद करण्यात आली. ह्या कामास २९ सप्टेंबर १९५८ रोजी सुरवात केली व १८ नोव्हेंबर १९५८ ला ते पूर्ण करण्यात आले; त्याचे निष्कर्ष को. १६–१ मध्ये सादर केले आहेत.

**कोष्टक १६–१.**

**५५ गॅलन–पिपांत, अतिरिक्त अपशिष्ट–गट–प्रस्त्राव.**

| अम्लमार्जन कक्षामधील निकेल पट्टी (Ni अधिक Cn) | | अम्लमार्जन कक्षामधील * सायनाइड (Cn अधिक Fe) | | शाई फिरविण्याच्या कक्षामधील सायनाइड (तल कठोरीकरण– Case hardening) (Cn) | |
|---|---|---|---|---|---|
| पिपे | दिनांक | पिपे | दिनांक | पिपे | दिनांक |
| १ | ९/२१ | १ | १०/१३ | ६ | १०/७ |
| १ | ९/३० | १ | १०/१८ | ६ | १०/२१ |
| २ | १०/३ | २ | १०/२४ | ७ | ११/१३ |
| १ | १०/६ | १ | १०/३१ | | |
| १ | १०/७ | १ | ११/३ | | |
| १ | १०/८ | १ | ११/७ | | |
| २ | १०/९ | २ | ११/८ | | |
| २ | १०/१३ | १ | ११/१३ | | |
| ३ | १०/१७ | २ | ११/१५ | | |
| १ | १०/२० | १ | ११/१५ | | |
| १ | १०/२१ | १ | ११/१८ | | |
| २ | १०/२४ | | | | |
| १ | १०/२७ | | | | |
| २ | १०/२९ | | | | |
| २ | ११/५ | | | | |
| १ | ११/६ | | | | |
| २ | ११/७ | | | | |
| १ | ११/१५ | | | | |

* ढीग सामान्यत: शनिवारी करण्यात आले.




आकृति १६–४. अपशिष्ट–जलप्रवाह, बंधारा क्र. २.




आकृति १६–५. अपशिष्ट–जलप्रवाह, बंधारा क्र. २.




आकृति १६–६. अपशिष्ट–जलप्रवाह, बंधारा क्र. २.

कोष्टक १६–२.

दोन अपशिष्ट–पंक्तींच्या नमुन्यांचे विश्लेषणविषयक निष्कर्ष = धात्वंश* आणि pH

| दिनांक | बांध क्र. १ (गिलिट काम), सरासरी राशि, १०० गॅ./मि. | | | | | | | बांध क्र. २ (अम्ल मार्जन), सरासरी राशि, ५० गॅ./मि. | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | Cu | Cr | Zn | Cn | Fe | Ni | pH | Cu | Cr | Zn | Cn | Fe | Ni | pH |
| सोमवार, ११/१७/५८ | ३.२ | १२.४ | १५ | १७.९ | १.१ | ५.५ | ७.६ | ०.८ | ०.२८ | < १ | १.८ | ०.६ | ६.० | ८.२ |
| मंगळवार, ९/२३/५८ | २.८ | ३२ | ७.५ | ११.४ | २.५ | ६.३ | ९.४ | १.६ | ० | < १ | २.३ | ५.० | ६.० | ८.६ |
| बुधवार, १०/८/५८ | ३.८ | २२ | ७.० | २०.८ | ७.६ | ५.७ | ९.८ | ०.८ | ०.२ | < १ | २.३ | ३.२ | ७.५ | ८.० |
| गुरुवार, ११/६/५८ | ५.२ | ११.६ | २० | २६.८ | २.८ | ८.५ | ८.० | ०.४ | ०.१ | < १ | ३.१ | २.६ | १३ | ८.६ |
| शुक्रवार, ११/१४/५८ | ४.२ | २० | १३.५ | ३०.५ | २.८ | ७.५ | ६.५ | ०.४ | ० | < १ | १.३ | ४.८ | ११ | ७.८ |
| शनिवार, ११/१५/५८ | ७.८ | ५.६ | २१५ | १४.३ | ४.२ | ३५ | २.६ | २.२ | ०.२४ | १.७ | ३.७ | १.१ | ३२ | ३.० |
| सरासरी | ४.५ | १८.६ | ४६.३ | २०.३ | ३.५ | ११.३ | ७.३ | १.० | ०.१२ | < १.० | २.४ | २.९ | १२.६ | ७.३ |
| व्याप्ति | २.८ | ५.६ | ७.० | ११.४ | १.१ | ५.० | २.६ | ०.४ | ० | १ | १.३ | ०.६ | ६.० | ३.० |
| | ते | ते | ते | ते | ते | ते | ते | ते | ते | ते | ते | ते | ते | ते |
| | ७.८ | ३२ | २१५ | ३०.५ | ७.६ | ३५.० | ९.८ | २.२ | ०.२८ | १.७ | ३.७ | ५.० | ३२ | ८.६ |

* दर दशलक्षास भागात (ppm).

## १६–२. अपशिष्टांचे विश्लेषण–

उद्योगाने स्वतःची प्रयोगशाळा स्थापन करावयाची व अर्हताप्राप्त निरीक्षकांकडून स्वतःच विश्लेषण करावयाचे, असे ठरविले होते. म्हणून लेखकाने एका रासायनिक प्रयोगशाळेचे अभिकल्पन करून ती सुसज्जित करून दिली. उद्योगाने नेमलेल्या अर्हतासंपन्न रसायन-तज्ञांकडून सर्व रासायनिक विश्लेषणे करून घेतली. "स्टॅंडर्ड मेथड्स फॉर एक्झॅमिनेशन ऑफ वॉटर"– जल परीक्षणाच्या मानक पद्धती, या युनायटेट स्टेट्सच्या सार्वजनिक स्वास्थ्यसेवा विभागाच्या नियमपुस्तिकेस अनुसरून सर्वधातूंचे विश्लेषण करण्यात आले. जड धातूंच्याकरता तात्पुरती ( provisional ) पद्धति वापरण्यात आली, आणि भरडांचे ( meals ) आयनीकरण प्रेरित करण्याकरता नमुन्यांच्या प्राथमिक उपचारणाची सुधारित पद्धत वापरण्यात आली.

प्रत्येक उत्पादन पंक्ती ( line ) तून pH, तांबे, क्रोमियम जस्त, सायनाइड, लोह, आणि निकल यांच्या करता २४ तासांच्या संयुक्त नमुन्यांचे विश्लेषण करण्यात आले. हे विश्लेषणात्मक निष्कर्ष को. १६–२ मध्ये सादर केले आहेत. शिवाय, अम्लमार्जन कक्ष आणि शाई फिरवण्याचा कक्ष, यांतील अपशिष्टांच्या तीन ५५ गॅलन पिपांतून नमुने घेण्यात आले आणि फक्त सायनाइड करता त्यांचे विश्लेषण करण्यात आले. त्याचे निष्कर्ष आ. १६–३ मध्ये दिले आहेत.

**कोष्टक १६–३.**

**अम्लमार्जन आणि शाई फिरविण्याच्या कक्षांतील पिपांमधील सायनाइडचे विश्लेषण (ppm)**

| नमुना क्रमांक | निकेलची पट्टी | शाई फिरविण्याचा कक्ष | अम्लमार्जन कक्ष |
|---|---|---|---|
| १ | ४१३४० | ३८२२० | ५३०४० |
| २ | १९९८० | ३८९४० | ३४३२० |
| ३ | | ६१३६० | |

**कोष्टक १६–४.**

**अपशिष्टांचे नमुने घेण्याच्या दिवसांतील गिलिटकामाच्या पंक्तीतील यंत्रसंचांची संख्या**

| दिनांक | (निकेल) कथील | क्रोम | जस्त | पिप-कथील (Barrel nickel) | तांबे |
|---|---|---|---|---|---|
| सोमवार, ११/१७/५८ | २४०० | ९४० | १५६० | १६५० | ७४० |
| मंगळवार, ९/२३/५८ | १९९० | १७२० | १०८० | १८७० | १३४० |
| बुधवार, १० ८/५८ | उत्पादनाची माहिती उपलब्ध नव्हती | | | | |
| गुरुवार, ११/६/५८ | २२९० | १२८० | १६७० | १७०० | १५०० |
| शुक्रवार, १०/२४/५८ | २३३० | १३८० | १६४० | १८०० | ३८४० |
| शनिवार, ११/१५/५८ | उत्पादन झाले नाही. | | | | |

## १६–३. संयंत्रातील उत्पादनाचा अभ्यास–

नमुने घेण्याच्या दिवसांतील उत्पादनाची पातळी निश्चित कळण्याकरता उत्पादनाचे तपशीलवार अध्ययन करण्यात आले. त्या माहितीवरून उत्पादन व अपशिष्टाचा प्रस्त्राव, यांच्यामधील संबंध प्रस्थापित करता येतो; नंतर वाढत्या संयंत्र विनिर्मितीतून निर्माण होणारी भविष्यकालीन राशि आणि प्रदूषण भार, यांचे भाकित करणे तुलनेने सोपे जाते. संयंत्रातील रोजचे सध्याचे सर्वसाधारण उत्पादन १३०० ते १७०० यंत्रसंचांच्या व्याप्तीत असते. गिलिट-कामाच्या दरएक पंक्तीतून उत्पादन झालेली सममूल्य यंत्रसंख्या को १६–४ मध्ये दिली आहे.

## १६–४. अपशिष्ट कमी करण्याकरता सुचविलेले संयंत्रातील ( in plant ) फेर बदल–

अपशिष्टाच्या निःस्त्रावातील धातूंची अशुद्धता कमी करण्याचे उपाय निश्चित करण्याकरता संयंत्रातील उत्पादनाचे सर्वेक्षण करण्यात आले. संयंत्रात ५ गिलिट कामाच्या (को. १६–४ मध्ये दाखविल्याप्रमाणे) पंक्तींचे परिचालन होते; व त्यातून जी अपशिष्टाची राशि संप्राप्त होते ती कमी करण्याच्या दृष्टीने प्रत्येक संयंत्रपंक्तीत काही बदल करण्याची जरुरी आहे, ही वस्तुस्थिती सर्वेक्षणावरून दिसून आली. लेखकाने बदलासंबंधी केलेल्या सूचनांपैकी काही समर्पक सूचनांची रूपरेखा पुढील परिच्छेदांत दिली आहे :

१. **ब्राइट निकेल चक्र** (आ. १६–७ पहा).

(अ) जेव्हा धातूचा भाग गिलिटाच्या स्नानजलातून बाहेर काढण्यात येतो तेव्हां उद्भवणाऱ्या बहिष्कर्षणांची ( drag out ) राशि कमी करण्याकरता निकेल–गिलिटकामाच्या पंक्तीतल्या शेवटच्या २ फुटांच्या विभागात पाण्याचा धुकेरी फवारा उच्च दाबाखाली मारावा. धुकेरी फवारणीत कामातून ( work ) (यंत्रभाग) अम्ले आणि धात्विक आयनांचे क्षालन ( rinse ) करण्याकरता दाबयुक्त पाण्याच्या सूक्ष्म फवाऱ्याचा उपयोग करण्यात येतो. फवारणीत तुलनेने पाण्याची राशि कमी लागते, तरीही पाण्याचा प्रवाह अथवा स्नानाच्या परिणामाप्रमाणेच निव्वळ परिणाम होतो.




**आकृति १६–७. धंद्यातील यंत्र–संयंत्रातील निकेल–चक्र प्रक्रियेचा आयोजन आरेख पार्श्वदर्शन–**

(आ) निकेल पत्र्याला मुखवटा ( make up ) म्हणून स्थैतिक क्षालनाचा उपयोग करावा. (क्षालन सतत करण्याऐवजी) स्थैतिक ( static ) क्षालनाने अपशिष्टात क्षति झालेल्या धातूंच्या संकेंद्रणात जसजसे स्थैतिक क्षालनस्नान बनत जाते तसतसे कामाच्या क्षालनाची क्षमता वाढत्या प्रमाणात कमी होत जाते; नंतर क्षालन जलाचे काही प्रमाणात संकेंद्रण करता येते आणि मुखवटाजल ( makeup water ) म्हणून गिलिटकामाच्या स्नानात परतवण्यात येते.

(इ) थंड पाण्याच्या क्षालनात उच्चदाबाखाली धारा फवारणीचा ( jet spray ) उपयोग करावा. धारक टाकीत थंड पाण्याच्या क्षालनाचे पुनराभिसरण करावे, आणि तेथून शक्य तितक्या वारंवार मुखवटाजल म्हणून ते स्थैतिक क्षालनाच्या टाकीत सोडून द्यावे. मलवाहिनीकडे जाणारा एक प्रवाह धारक टाकीत असला पाहिजे. ह्या प्रथेमुळे अपशिष्ट–जल मलवाहिनीत शेवटी निरुपयोगी म्हणून सोडून देण्यापूर्वी त्याचा जास्तीत जास्त उपयोग करता येतो.

(ई) सायनाइड निमज्जनाच्या ( dip ) जागी अम्लनिमज्जन वापरावे. अपशिष्ट जलाच्या जैवी उपचारणात सायनाइडे केवळ हानिकारकच असतात असे नव्हे तर जेव्हा ती हायड्रोजन सायनाइड वायूच्या स्वरुपात असतात तेव्हा ती माणसांनासुद्धा धोकादायक व घातक होऊ शकतात. सायनाइडच्या संयुगांचे संकेंद्रण जरी अल्प असले तरीसुद्धा ते माशांना विषकारक होते. कामाला चकाकी आणणे आणि संदूषक जलांचा शेवटचा अंश काढून टाकणे हा सायनाइड–निमज्जनाचा उद्देश असतो. परंतु अनेक उदाहरणांत अम्ल–निमज्जने बदली म्हणून पुरेशी होतात असे सिद्ध झाले आहे. शिवाय ती अधिक काटकसरीची असतात.

२. **जस्त–चक्र** (आ. १६–८ पहा).

(अ) "बहिष्कर्षणाची" (drag out) राशि कमी करण्याकरता जस्ताच्या गिलिट-कामाच्या नळीच्या शेवटच्या दोन फुटांच्या विभागात उच्च दाबयुक्त धुकेरी फवारा सोडावा.

(आ) शीतजल क्षालनाऐवजी स्थैतिक क्षालन वापरावे आणि जस्ताच्या गिलिट–स्नाना-करता मुखवटा म्हणून स्थैतिक क्षालन पाण्याचा पुनः उपयोग करावा.

(इ) थंड पाण्याच्या क्षालनात लहान उच्च दाबयुक्त फवारे वापरा आणि जस्ताच्या गिलिट–टाकीच्या दिशेने प्रत्येक परिवाहित करावा. (ह्यात प्रतिधारा प्रवाहाचे तत्व आचरण्यात येते.) जर क्षालन जलाचा प्रवाह पुरेसा लहान असेल तर गिलिटकामाच्या टाकी करता तो अखेरीस मुखवटाजल म्हणून काम देऊ शकतो. जर जस्ताच्या टाकीत परिवाहासाठी जागा नसेल तर मलवाहिनीत प्रवेश देण्यासाठी गिलिटकामाच्या टाकीजवळच्या थंड पाण्याच्या क्षालन टाकीवर एक परिवाही नळ बसविता येईल.




**आकृति १६–८. व्यापार यंत्रसंयंत्रावरील जस्त–चक्र, प्रक्रिया टाक्या; वरून पाहिले असता.**

३. **क्रोम सायकल.**

(अ) स्थैतिक क्षालनाकडे पायाडे हालविण्यापूर्वी उच्च दाबाच्या पाण्याचा धुकेरी फवारा सोडावा. त्यामुळे क्रोमच्या गिलिटकामाच्या स्नानातून "बहिष्कर्षण कमी होते.

(आ) क्षालन जलवाहिनीत सोडण्या ऐवजी क्रोमेट गिलिट कामाच्या टाकीत आठवड्यातून दोनदा परतवावा.

**४. संयुक्त तांबे व निकेल चक्र.**

(अ) जेथे अत्याधुनिक स्वयंचलित निकेल–चक्र (वापरात) असेल तेथे चक्रातील निकेलचा भाग काढून टाकावा.

(आ) ज्या तक्तपोशीवर पडणारे द्रव नंतर मलवाहिनीत सोडण्यात येते त्या तक्तपोशीवरून "बहिष्कर्षण" घडणार नाही अशा प्रकारे नूतन ताम्र–चक्र अभिकल्पित करावे. अडचणीविना कार्यवाही व्हावी याकरताच केवळ हे करावयाचे असते आणि त्याकडे व्यवस्थापकांचे पुष्कळवेळा दुर्लक्ष होते.

(इ) क्षालनापूर्वी "बहिष्कर्षण" कमी व्हावे म्हणून ताम्र-सायनाइड गिलिटकामाच्या टाकीच्या अखेरीस उच्च दाबयुक्त पाण्याचा धुक्यासारखा फवारा वापरावा.

(ई) गिलिट–स्नानाच्यानंतर स्थैतिकक्षालन विद्यमान प्रवाही क्षालनाऐवजी बसवावे.

(उ) गिलिट–स्नानाकरता मुखवटा म्हणून स्थैतिक क्षालनाचा वापर करावा.

**५. पीप– ( barrel ) निकेल चक्र.**

(अ) सध्या वापरात असलेल्या दोन सतत वाहणाऱ्या क्षालनांपैकी एकाच्या जागी अम्ल-निकल गिलिट-टाकीच्या मागोमाग स्थैतिक क्षालक बसवावा.

(आ) अम्ल-निकल गिलिट-टाकीकरता मुखवटा म्हणून स्थैतिक क्षालन टाकीतील अंतर्वस्तूंचा पुन: वापर करावा.

**६. कज्जलीकरण कक्ष – (Blacking room)**

वितळवलेल्या सायनाइड तल–कठोरीकरण ( case hardening ) टाकीच्या जागी कार्ब्यूरो नायट्रायडिंग विद्युत् भट्टी बसवावी. त्यामुळे तलकठोरीकरण प्रक्रियेतील सायनाइडमुळे होणाऱ्या प्रदूषणाचे निरसन होईल.

### ७. निकलाचे पट्टिकाकरण ( stripping ).

निकलाचे पट्टिकाकरण अगदी कमी करता येईल तितके कमी करावे अगर ते संपूर्णपणे वगळावे. अपशिष्टातील सायनाइडच्या उच्च टक्केवारीचे हे मूलस्थान असते. ( को. १६-१ व १६-३ पहा ).

## १६-५. नागरी अपशिष्ट-जलावरील उपचारांचे संयंत्र-

अवमलाच्या पाचनाची स्वतंत्र सोय असलेले नगरपालिकेजवळ प्राथमिक उपचारण संयंत्र आहे. निस्तारण संयंत्रातील घटक खाली दिले आहेत :

३० इंची अंतःस्त्राव नळ; १ इंची शलाका जाळी (यांत्रिकी सफाई, ३० मिनिटांचा समय-स्विच); दोन सहाय्यक भुजांना साफ करण्याच्या शलाका जाळ्या (सध्या वापरात नाहीत); चाळाची चक्की (दररोज ३ वेळा वापरण्यात येते, पीठ प्रवाहात परत सोडले जाते); दोन कंकर कक्ष (स्वच्छ करण्याकरता प्रत्येक महिन्यातून एकदा बंद ठेवले जातात); प्रवाह मापनासाठी पार्शल फ्ल्यूम; दोन आडव्या अवस्थापन द्रोण्या (समांतर रेषेत परिचालन होते); क्लोरिनीकारक (द. दि. ७५० पौंड क्षमता, उन्हाळ्यात प्राक् क्लोरिनीकरण करण्यात येते); दोन न हालणारी झांकणे असलेले पाचित्र (दररोज त्यातील अंतर्वस्तू ३५ मिनिटे फिरविण्यात येतात, दर दोन आठवड्यांनी अवमल काढून टाकण्यात येतो); वायुधारक गॅस बॉयलर, अधिक सहाय्यक तेलाचा बॉयलर (जेव्हा आणि जर पाचित्रातून गॅस मिळाला नाही तर) फक्त हिवाळ्यात वापरण्यात येतात; दोन ऊर्ध्व प्रकाराचे अपशिष्ट-जल पंप (क्षमता : द. दि. ४ द. ल. गॅलनचे ३, द. दि. २ द. ल. गॅलनचा १; कार्यक्षमता * १०० टक्के); दोन अवमल पंप (दुहेरी संच दररोज सकाळी पाचित्रात पंप करतात). संयंत्रातील निःस्त्राव B वर्गाच्या नाल्यात सोडण्यात येतो (स्नान अगर मनोरंजनाकरता उत्तम उपयोग).

---

* सामान्य परिचालन कार्यक्षमता ६० ते ८० प्रतिशत्.

**कोष्टक १६–५**

**नागरी निस्तारण संयंत्रातील* अपशिष्ट जलाचा अंतःस्त्राव**

| महिना | १९५६ | | १९५७ | | १९५८ | | १९५७ | १९५८ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | सरासरी प्रवाह द. दि द.ल. गॅलन | तरंगते घन पदार्थ ppm | सरासरी प्रवाह द. दि द.ल. गॅलन | तरंगते घन पदार्थ ppm | सरासरी प्रवाह द. दि द. ल गॅलन | तरंगते घन पदार्थ ppm | BOD, † ppm | BOD, ‡ ppm |
| जानेवारी | ५.२५ | १३८ | ५.५२ | ६६ | ५.२० | ९५ | २८ | २५ |
| फेब्रुवारी | ५.१९ | १३५ | ५.३९ | ७८ | ५ ०६ | ८७ | २९ | १०८ |
| मार्च | ८ ४७ | ७० | ६.०६ | ८२ | ७.३१ | ४५ | ३० | ७७ |
| एप्रिल | ८.६७ | ५३ | ६.३६ | ७२ | ८.३० | ७५ | ३२ | ३२८ |
| मे | ६.३९ | ८१ | ५.५५ | ९५ | ७.१२ | १२४ | ३९ | १३२ |
| जून | ५.३३ | ८० | ४ ९८ | ८९ | ६.४७ | ५९ | ४४ | ८८ |
| जुलै | ०.७१ | ९४ | ४.६९ | ११२ | ५.२३ | ०८ | ४२ | ८० |
| ऑगस्ट | ४.०७ | १२९ | ४.२६ | ९९ | ४.५७ | ९९ | ६४ | १४२ |
| सप्टेंबर | ३.८० | १२८ | ३.९४ | १७४ | ४.४४ | ९० | ४४ | १३१ |
| ऑक्टोबर | ४.१७ | १३९ | ३ ५९ | १३५ | | | ७१ | |
| नोव्हेंबर | ३.८४ | १२३ | ३.३६ | १३८ | | | ६१ | |
| डिसेंबर | ४.८३ | ९५ | ४.५८ | १५० | | | ७४ | |
| सरासरी | ५.४० | १०५ | ४.८६ | १०८ | | | ४६ | |

* वादळी जलाचा बऱ्याच प्रमाणात समावेश आहे.

† एकापेक्षा जास्त वेळा दर महिन्यात नमुने घेतले.

‡ दर महिन्यात नमूनें एकदा घेतले.

कोष्टक १६–६

नागरी निस्तारण संयंत्रातील अवसादन संचांची कार्यक्षमता १९५७

| स्वास्थ्यविषयक गुणधर्म | कमाल | किमान |
|---|---|---|
| प्रवाह, दर दिवशी दशलक्ष गॅलन | ६.७८ | ३.२८ |
| अनुपचारित तरंगते घनपदार्थ, ppm | ३५६ | ५२ |
| अंतिम तरंगते घनपदार्थ, ppm | १२६ | २४ |
| तरंगत्या घनपदार्थांचे निष्कासन % | ७५ | ३५ |
| अनुपचारित BOD, ppm | ७३.५ | २४.५ |
| अंतिम BOD, ppm | ५८.५ | १४.७ |
| BOD चे निष्कासन, % | ६३ | २० |

कोष्टक १६–७

नागरी निस्तारण संयंत्रामधल्या अवमलातील घनपदार्थांचे विश्लेषण, १९५८

| महिना | अनुपचारित अवमल | | पाचित अवमल | |
|---|---|---|---|---|
| | एकूण घनपदार्थ % | बाष्पशील द्रव्ये % | एकूण घनपदार्थ % | बाष्पशील द्रव्ये % |
| जानेवारी | ३.८५ | ८५ | ७.९ | ५६ |
| फेब्रुवारी | ५.० | ८४ | ७.७ | ५६ |
| मार्च | ३.५ | ९४ | ८.५ | ६० |
| एप्रिल | ३.५ | ८३ | ९.५ | ५९ |
| मे | ४.६ | ८५ | ८.० | ५९ |
| जून | ३.८ | ८० | १०.१ | ५४.५ |
| जुलै | ४.५ | ८३ | ८.० | ५९ |
| ऑगस्ट | ४.४५ | ७६ | ८.८ | ५५ |
| सप्टेंबर | ४.६ | ८१ | ९.५ | ५८ |

## कोष्टक १६–८

### नागरी निस्तारण संयंत्रातील पाचित्रात उत्पादित झालेला वायू–

| साल | वायूचे एकूण उत्पादन – घनफूट |
|---|---|
| १९४८ | ६२५३८८३ |
| १९४९ | ६४७५२३६ |
| १९५० | ६४६४५१६ |
| १९५१ | ६३५०२७३ |
| १९५२ | ५६९९८३९ |
| १९५३ | ६२२०९३७ |
| १९५४ | ५९९४२७९ |
| १९५५ | ५९६४३०० |
| १९५६ | ५४६३१०८ |
| १९५७ | ५५६२३२१ |

## कोष्टक १६–९

### अवमल *पाचन होणाऱ्या अनुपचारित अवमलातील धातूंच्याकरता विषाक्त सीमा–

| धातु \ संदर्भ संख्या | १ | २ | ३† | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| क्रोमियम | ५.० | ५.० | ०.०५ | | | १.० | | १.५ | |
| सायनाइड | २.० | १.० | ० | ०.१ | १-१.६ | | | | |
| तांबे | १.५ | १.० | ०.३० | ०.२ | | १.० | ०.७ | | |
| लोह | ५ ० | | | | | | | | |
| जस्त | – | ५.० | ०.३ | ०.३ | | | | | > ५.० |
| निकल | – | | २.० | | | | | | |

* संकेंद्रणे ppm मध्ये दिली आहेत. ह्या प्रकरणाच्या अखेरीस संदर्भांची सूची दिली आहे.

† नाले आणि मलवाहिन्यांच्या करता –

कोष्टके १६–५, १६–६, १६–७ आणि १६–८ मध्ये ह्या संयंत्राच्या अलिकडील परिचालनाची माहिती दिली आहे. अवमलाच्या पाचित्रांच्या संबंधी काळजीपूर्वक विचार करावा; भारणाच्या विद्यमान परिस्थितीकरता त्यांचे भरपूर अभिकल्प केलेले असल्याचे दिसून येते; सुमारे ५१००० घ. फू. एकूण राशीची त्यात तरतुद करण्यात आलेली आहे. सक्रिय पाचनाकरता १७५०० घ. फु. ची गरज लागावी; उरलेले ३३५०० घ. फु. अवमल साठवण्याकरता अगर सुमारे ५३ दिवस पाचन झालेल्या अवमलाच्या साठ्यासाठी उपयोगात आणता येतील. ह्या संयंत्राच्या स्थानाजवळ हिवाळ्यातील प्रदीर्घ महिन्यात परिचालनाला हे थोडेसे काळजीदायक होते, कारण त्यावेळी उघड्या शुष्क संस्तरांवर अवमल पंप करता येत नाही. अपशिष्ट जलातील विषाक्त धातूंच्या अस्तित्वामुळे सक्रिय पाचन मंद होते आणि परिस्थिती आणखी गभीर बनते.

## १६–६ धातूंच्या विषाक्त सीमा–

ह्या विषयावरील साहित्यावरून असे दिसून येते की, धातूंची अल्प संकेंद्रणे सुद्धा अवमल पाचन क्रियेत बाधा आणू शकतात. को. १६–९ वरून असे दिसते कीं, सामान्यत: Cu, Cn अथवा Cr, 1 ppm पेक्षा आणि Zn अथवा Ni, 2 ते 5 ppm पेक्षा जास्त वाहितमल संयंत्रातील अंत:स्त्रावात असू देऊ नयेत.

## १६–७ औद्योगिक अपशिष्टांवरील उपचार –

**१ ला टप्पा :–** अनुच्छेद १६–४ मध्ये केलेल्यां शिफारसीप्रमाणे अपशिष्टातील बहिष्कर्षण आणि धातूंचे अतिसंदूषण कमी करावे. सर्व क्रोमियम, सायनाइड, आणि अम्ल वा क्षारीय औद्योगिक अपशिष्टे पृथक करावी आणि संयंत्रातून औद्योगिक अपशिष्ट–उपचारण संयंत्रात वेगवेगळ्या नळयांतून सोडावी. तेले आणि वंगण, तसेच घनपदार्थ काढून टाकण्यासाठी तरंगक प्रकारचा संच वापरावा. ही टाकी समानीकरणाचे साधन म्हणूनही काम देईल. तरंगणकारक–समानीकारकातील तरंगते पदार्थ संकेंद्रण टाकीत सोडण्याऐवजी जाळून टाकता येतील. अशा रीतीने तेल आणि वंगणाचा साका काढून जाळून टाकता येईल अगर अन्य संचात संकेंद्रित करता येईल.




आकृति १६–९ अपशिष्ट--उपचारणातील अनुक्रम पहिला टप्पा अतूट रेषांनी दाखविला आहे आणि दुसरा टप्पा तुटक रेषांनी दाखविला आहे.

संकेंद्रण टाकीत अवमल पंप करावा. तेथून तो पूनिकुंड ( Septic tank ) स्वच्छ करण्याच्या ट्रकमधून कचरा टाकण्याच्या जागेवर नेण्यात येतो. संकेंद्रण टाकीतील अधिद्रव ( Supernatent ) उपचार संयंत्राच्या चक्राच्या सुरवातीस परतवण्यात यावे.

**दुसरा टप्पा :–** जर नगरपालिकेने ठरवलेल्या अगर अनुच्छेद १६–६ मध्ये लेखकाने दिलेल्या मानकांस अनुसरून औद्योगिक उपचारण संयंत्रातील नि:स्त्राव नसेल तर आ. १६–९ मधील आयोजन आरेखात रूपरेखीत केल्याप्रमाणे अन्य उपायांनी अपशिष्टावर आणखी उपचार करावेत. सुरवातीलाच संपूर्ण उपचारण संचाचे तपशीलवार अभिकल्पन करावे, आणि नूतन

संयंत्राची संरचना करण्यापूर्वी नगरपालिका आणि राज्य शासनाला दोन्ही टप्प्यांची ( अभि-कल्पने ) सादर करावी. तसेच, नमुने घेण्याचा आणि विश्लेषणाचा कार्यक्रम पुरा झाल्यावरच आणि जर त्या विश्लेषणावरून २ ऱ्या टप्प्याच्या उपचारणाची आवश्यकता आहे असे दिसून आले तरच २ ऱ्या टप्प्यातील कामात समाविष्ट असलेल्या संचांचे संरचन करण्यात येईल अशी करारात नोंद केलेली असावी. को. १६–९ मध्ये दाखल केलेल्या संकेंद्रणापेक्षा ते ज्या अप-शिष्टांत जास्त आहे ती अपशिष्टे नागरी मल व्यवस्थेत सोडण्यात येणार नाहीत असे अनुबंधित ( Stipulate ) करावे.

## नमुने घेण्याचा आणि विश्लेषण करण्याचा कार्यक्रम–

नमुने घेण्याच्या व विश्लेषण करण्याच्या संपूर्ण कार्यक्रमाकरता खालील नमुने गोळा करावेत.

नमुना केंद्र १ – औद्योगिक अपशिष्ट उपचारण संयंत्राजवळील तपासकुंडीतून घेतलेल्या नमुन्यातील औद्योगिक संयंत्रातला रोजचा संमिश्र निःस्त्राव.

नमुना केंद्र २ – नागरी उपचारण संयंत्रातील वाहितमल अंतःस्त्रावाचे रोजचे समिश्रण.

नमुना केंद्र ३ – नागरी उपचारण संयंत्रातील पाचित्रात सोडण्यापूर्वीचा रोजचा संमिश्र अनुपचारित अवमल.

नमुना केंद्र ४ – नागरी उपचारण संयंत्रातील पाचित्रातील आठवड्याचा संमिश्र अवमल.

हे नमुने गोळा केल्यानंतर खालील विश्लेषणे करावीत.

(अ) सायनाइड, (आ) जस्त, (इ) क्रोमियम, (ई) निकल.

१, २ व ३ या केंद्रांच्या जवळील प्रवाहाच्या राशींची रोज नोंद करावी. ३ ऱ्या केंद्रा-जवळ गोळा केलेल्या अनुपचारित संमिश्र अवमलातील एकूण सेंद्रीय घनपदार्थांचे निर्धारण करावे.

### संदर्भ :–

१ सुवेज वर्क्स जर्नल, २१,३,५२२ (मे १९४९)
२ सुवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २२,९,११५७. (सप्टेंबर १९५०)
३ पाचव्या दक्षिण नागरी व औद्योगिक अपशिष्टासंबंधी संमेलनाचे कामकाज, २१६ (१९५६)

४ गिलिटकाम, ४२,७१ (१९५५)
५ वॉटर अँड सॅनिटरी इंजिनिअर, ४,२४९ (१९५३)
६ कॉनेक्टिकट राज्य जल आयोग, ८ वा अहवाल, १९३८–१९४०
७ सुवेज वर्क्स-जर्नल, १३,६,१२४८ (मार्च १९५०)
८ सुवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २२ ३,३३६ (मार्च १९५०)
९ केमिकल ॲब्स्ट्रॅक्टस, ४४,५, २१५२ (१९५०).



: १७ :

# अनुपचारित अपशिष्ट नाल्यात सोडणे

मानवी आणि औद्योगिक अपशिष्टे प्राप्त करणे आणि ती दूर वाहून नेणारी वाहिनी म्हणून काम करणे हा जलनालीच्या कायदेशीर उपयोगापैकी एक उपयोग आहे. पूर्व उपचार न केलेले बरेचसे अपशिष्ट सामाऊन घेऊ शकतील आणि त्यात लक्षणीय बिघाड न होता (अपशिष्टांचा) भार दीर्घ काल वाहून नेऊ शकतील अशा संग्राही जलनाल्यांची अजूनही अनेक उदाहरणे आहेत; तथापि त्यांची संख्या कमी होत आहे. जरी त्यांच्या बाबतीत वसाहतींना सामान्यपणे औद्योगिक अपशिष्टावर उपचार करावयाची गरज नसली तरीही ( नाल्यामुळे तनुकरण होते अगर कसे अथवा त्याचा कोणता उपयोग करण्यात येत आहे ह्या गोष्टींचा विचार न करता) अनुपचारित अपशिष्टे नाल्यात बेछूटपणे सोडून देण्यास परवानगी देऊ नये. संग्राही नाल्याची विद्यमान अवस्था आणि भविष्यकालीन उपयोगासंबंधी कार्यक्षम आणि प्रमाणपत्रित स्वास्थ्य अभियंत्यानी तपशीलवार सर्वेक्षण केल्यानंतरच अनुपचारित अपशिष्टे त्यात सोडून देण्यास अनुमती द्यावी. तसेच पाण्यावर क्षेत्राधिकार असलेल्या राज्यसंस्थेची मान्यता अनुपचारित अपशिष्टे प्रस्त्रावित करण्यापूर्वी घेण्यात यावी.

जसजशी लोकसंख्या वाढत जाते व लोकांच्या गरजा पुऱ्या करण्याकरता उद्योगांचा विस्तार केला जातो तसतसा नद्यांत अनुपचारित अपशिष्टे प्रस्त्रावित करण्याच्या संधी कमी होऊ लागतात, कारण पाण्याच्या वापराकरता अधिक स्पर्धा निर्माण होते. आणि नाल्यांच्या उपयोगात वाढ होते. अपशिष्टाच्या उपचारणाची गरज (आणि तिची व्याप्ती) वाढते आणि प्राय: लोकसंख्येतील वाढीपेक्षा ही वाढ अधिक जलद होते.

अपशिष्टावर उपचार न करता अनेक वर्षे परिचालन केल्यानंतर ते कमी करण्याच्या प्रथेपेक्षा प्रारंभीच अपशिष्ट–उपचारणाचे उपाय योजणे उद्योगाला मानसशास्त्रदृष्ट्या अधिक

ट लक्षात घेऊन कंपनीच्या अपशिष्ट–उपचारणाच्या गरजांकडे पाहण्याचा कलाकडे दुर्लक्ष करून भविष्यकालीन प्रदूषण कमी करण्याच्या उपायांचा संयंत्र अभियंत्याला अत्यावश्यक असते.

मालकीच्या जागेत निर्माण होणाऱ्या व सार्वजनिक जलनाल्यांत जाणाऱ्या त सामान्यत: कायद्याने उद्योगावर जबाबदारी पडते. उपद्रवकारक अपशिष्ट तरतूद न करणाऱ्या उद्योगावर समाज अनुकंपा दाखवीत नाही. म्हणून ष्टे जवळच्या नाल्यात तशीच सोडून देण्याचे ठरविण्यापूर्वी कायदेशीर इलाज च्या संभाव्यतेचा त्या उद्योगाकडून काळजीपूर्वक विचार होणे श्रेयस्कर

## ारित अपशिष्ट नाल्यात थेट प्रस्त्रावित केल्याचे एक

गावात अम्ल-मार्जन प्रक्रिया ( लोणची तयार ) करणारी कंपनी हे. कारखान्यातील आणि नागरी अशी दोन्हीही अपशिष्टे जवळच्या नाल्यात ाल. वसंत ऋतूत मासे मरणे ही तेथील दर वर्षाची समस्या बनून राहिली ा उपचारणाकरता अपूर्णतया अभिकल्पित केलेली आणि परिचालन अकार्य– असलेली इमहॉफ टाकी नागरी व्यवस्थेत उपयोगात आणली आहे. अम्ल– तयार) करणाऱ्या कंपनीच्या अपशिष्टावर उपचार करण्यात येत नाहीत. आणि अम्ल–मार्जन कंपनी, या दोघानीही पुरेसे सुधारित उपाय योजण्या– आहे. आमच्या अभ्यासातील प्रमुख बाब अम्ल–मार्जनाच्या (लोणच्याच्या) पशिष्टे हाताळणे ही आहे.

## १ अम्ल-मार्जन प्रक्रिया आणि तीतील अपशिष्टे–

ोसमात, " मे ते जुलै या महिन्यात एक ते चार इंच लांबीच्या काकड्या न कंपनीत पाठविण्यात येतात आणि ५००० गॅलन क्षमतेच्या उघड्या लाकडी ) साठवून ठेवण्यात येतात. गैरमोसमी अगर वापर न करण्याच्या काळात गॅलन चुनामिश्रित पाण्याने भरून ठेवण्यात येतात. चुन्यामुळे त्या " शर्करित " ) होतात आणि त्यामुळे लाकूड फुगून जोड गच्च बसतात. हरित मोसमात भरता याव्या म्हणून तो रिकामा केली जाते आणि त्यातील चुनामिश्रित

पाणी मलवाहिनीत सोडून दिले जाते. अशा प्रकारे चुनाजल हा वसंतऋतूतील प्रस्त्रावित अप-शिष्टाचा पहिला प्रकार असतो.

नंतर बरण्यात १५ टक्के लवण द्रावण भरण्यात येते. त्यात काकड्या घातल्यानंतर काकड्या बुडून राहण्यासाठी बरण्यावर झाकणे लावली जातात. बरण्यात काकड्या भरल्यानंतर सुमारे एक आठवड्याने सक्रिय किण्वन क्रिया सुरू होते व ह्याबरोबरच वायुउत्पादन होते व फेस येऊ लागतो. अदमासे एक आठवड्यापर्यंत अत्युच्च प्रमाणात किण्वन होते आणि नंतर ती क्रिया हळूहळू बंद पडते. काकड्या सुमारे ३ महिने लवणात राहू देण्यात येतात आणि नंतर आकारानुसार त्या वेगळ्या केल्या जातात व परत बरण्यात भरण्यात येतात. अपयुक्त (spent) लवण मलवाहिनीत सोडले जाते व हे अपशिष्टाचे द्वितीय उत्पत्तिस्थान बनते.

लवण-बरण्यातून वेगळ्या केलेल्या काकड्या लाकडी टाक्यात भरण्यात येतात. त्यांना रंग चढावा, त्या फुगाव्यात आणि मुराव्यात म्हणून त्यात हळद (टयूमेरिक) व तुरटी मिसळण्यात येते. शिवाय लोणच्याची हालचाल सारखी व्हावी म्हणून पंप करून हवा टाकीत सोडण्यात येते. ही क्रिया सुमारे ८ तास चालू राहते आणि नंतर हळदीचे व तुरटीचे पाणी मलवाहिनीत सोडून देण्यात येते. हे अपशिष्ट जलाचे तिसरे महत्वाचे निर्मिती स्थान बनते काकड्यांची प्रक्रिया गोड लोणच्यासाठी असो वा आंबट लोणच्यासाठी असो त्यांच्यावर करण्याचे उपाय येथपर्यंत सार-खेच असतात. यानंतर मात्र ते भिन्न प्रकारचे असतात.

जर फोडींचे गोड लोणचे घालावयाचे असेल तर फिरत्या कात्र्या आणि जाळीचे पाश बसविलेल्या टाकीत त्या नेण्यात येतात. फिरत्या कात्र्यांनी लोणच्याच्या (काकड्यांच्या) काचऱ्या होतात व त्याचवेळी पाण्याच्या धारेत त्या धुतल्या जातात. धावन जल, बिया, व लोणच्यातले कांही छोटे तुकडे जाळ्यातून मलवाहिनीत जातात आणि हे अपशिष्टाचे चवथे उद्‌भवस्थान बनते; आणि त्यात तरंगत्या सेंद्रीय द्रव्याची सर्वात जास्त राशि असते. नंतर काप व लहान फोडी शिरका (व्हिनेगार) आणि साखर घातलेल्या बरण्यात भरण्यात येतात. सुदैवाने लोणचे काढून घेत-ल्यावर हे द्रावण सामान्यत: अपशिष्ट म्हणून फुकट जाऊ दिले जात नाही.

खाऱ्या लोणच्याच्या फोडीसुद्धा पाण्यात धुण्यात येतात आणि त्यावेळी धावन जलातून कांही बिया आणि तुकडे वाया जातात. हे लोणचे नंतर शिरका (व्हिनेगार) वनस्पती आणि अगदी थोडी साखर घातलेल्या बरण्यात भरून ठेविले जाते. ह्या बरण्यांतून सामान्यपणे कांहीही द्रव्य वाया जात नाही कारण त्यातील द्रव पुन: पुन: वापरण्यात येतो.

नंतर, खारी व गोडी लोणची बरण्यात पॅकबंद करण्यात येतात. त्यावेळी जरूरीप्रमाणे साखरपाक अथवा शिरका (व्हिनेगार) मिसळण्यात येते. बडीशेपी ( dill ) लोणच्याकरता

लवण बडीशेपी द्रावण त्यात घालण्यात येते. मोहोरबंद बरण्या पाण्याने धुण्यात येतात. हे धुतलेले पाणी अपशिष्टाचे पांचवे प्रमुख उत्पत्तिस्थान असते आणि त्यात साखर, मीठ, व्हिनेगार आणि बडीशेप यांचे अंश असतात.



**आकृति १७–१ अम्ल–मार्जन (लोणच्याच्या) कारखान्यातील निःस्त्रावातील अपशिष्टाच्या प्रवाहाची राशि व pH यांचे मापन लेखक करत आहे.**

नंतर बरण्या पाश्चरीकारकात ठेवण्यात यतात. तेथे विशिष्ट संपर्ककालापर्यंत त्यांच्यावर उकळते पाणी ओतण्यात येते. हे गरम पाणी फुकट जाते, आणि जरी त्याचे उच्चप्रमाणात संदूषण झालेले नसले तरी त्याची राशि बरीच असते आणि त्याच्या तपमानामुळे संग्राही पाण्याची हानि करणारे ते एक द्रव्य बनते.

विसंक्रमणाचा (sterilization) टप्पा ओलांडल्यानंतर बरण्यांवर चिठचा डकवून त्या पॅकबंद केल्या जातात व जगभर उपभोक्त्यांच्याकडे पाठविण्यात येतात.

संयंत्रातील अपशिष्टांचे संक्षेपात वर्णन करावयाचे झाल्यास आपणास असे म्हणता येईल की काकडीचे अम्ल–मार्जन (लोणचे) करण्यातून पाच महत्वाची अपशिष्टे पैदा होतात;

त्यापैकी कोणाच्याही एकाचा परिणाम संग्राही पाण्याचे मोठ्या प्रमाणात प्रदूषण होण्यात होती. चुना, मीठ, तुरटी आणि हळद, लोणच्यातल्या फोडी आणि सायरप (शिरका व साखरपाक) ही ती अपशिष्टे आहेत. सर्व वर्षभर मीठ आणि तुरटी आणि हळद यांची अपशिष्टे सामान्यपणे दररोज प्रस्त्रावित करण्यात येतात क्षारीय चुनापाणी अथवा अम्ल (शिरका) आणि साखर ह्या अपशिष्टांवरून अम्ल–मार्जनाच्या कारखान्यातील अपशिष्टातील परिणामी pH व BOD निर्धारित होतो.

## १७–२ नाला व अपशिष्ट यांचे सामान्य सर्व्हेक्षण–

२३ व ३० ऑगस्ट आणि ६ सप्टेंबरला सध्याच्या प्रदूषण परिस्थितीविषयक अपशिष्टाचे व नाल्यातील सर्वेक्षण ३ दिवस करण्यात आले. अम्ल मार्जन (लोणच्याच्या) कारखान्यातून सोडून देण्यात आलेल्या सर्व अपशिष्टांची नोंद शहरातील इमहॉफ टाकीतील निःस्त्रावाचे (त्या दिवसांपैकी एका दिवशी) विश्लेषण आणि अम्ल–मार्जन अपशिष्टाच्या प्रस्त्राव केंद्राच्या जागेपासून अनुप्रवाही दिशेने नदीतील १२ मैलावरील बिंदूपर्यंतची संग्राही प्रवाहाची परिस्थिती यांचा या सर्वेक्षणात अंतर्भाव होता. अम्ल–मार्जन (लोणच्याच्या) कारखान्याच्या अनुप्रवाही दिशेने झालेल्या प्रदूषणाची व्यापकता प्रस्थापित करण्यासाठी खालील नमुना बिंदूंची निवड करण्यात आली.




**आकृति १७–२ अम्ल–मार्जनाच्या (लोणच्याच्या) कारखान्यातील आणि शहरातील अपशिष्टे ज्या नाल्यात सोडण्यात आली त्या नाल्यातील सर्वेक्षण दलाने नमुना–बिंदू म्हणून निवडलेल्या जागा दाखविणारा नकाशा–**

१) अम्ल मार्जनाच्या (लोणच्याच्या) कारखान्यातील प्रस्राव नळीवर बसविलेली फ्ल्यूमरेटी व "व्ही" च्या आकाराची खाच असलेला बंधारा (आकृति १७–१ पहा); २) नदीच्या संगमाच्या जरा वरच्या बाजूला असलेली शाखा; (२ अ) नदीच्या संगमाच्या जरा वरच्या बाजूला असलेली शाखा; (२ ब) शाखेच्या संगमाच्या किंचित वरील बाजूच्या नदीचा सुरवातीचा लहान प्रवाह; (३) शहरातील इमहॉफ टाकीच्या परिवाहाच्या किंचित वरच्या बाजूकडील नदी; (४) शहरातील इमहॉफ टाकीचा प्रवाह.. (५) शहरातील इमहॉफ टाकीच्या परिवाहाच्या किंचित खालील नदी., (६) इमहॉफ टाकीच्या परिवाहाच्या खाली २ मैलावरील नदी. आ. १७–२ मधील लहान नकाशावर हे नमुना–बिंदू दाखविले आहेत

कोष्टक १७–१ मध्ये, नदीच्या सुस्तपणाची काहीशी कल्पना वाचकाला यावी म्हणून नदीतील प्रवाहाच्या अंदाजी राशी आणि वेग सादर केले आहेत. तीन दिवसांच्या सर्वेक्षणातील निरनिराळ्या नमुनाबिंदूवरील अम्ल मार्जन कारखान्यातील संमिश्र अपशिष्ट, इमहॉफ टाकी–तील निःस्राव आणि संग्राही पाणी यांच्या विश्लेषणांचे निष्कर्ष को १७-२ व १७–३ व १७-४ मध्ये दिले आहेत. अम्ल मार्जन कारखान्यानी तीन दिवसातील अपशिष्टांच्या राशी आणि प्रकार को. १७–५ मध्ये दिले आहेत. शहर व अम्ल–मार्जन कारखान्याने अंशदान केलेले (contributed) तौलनिक प्रदूषभार सक्षिप्तपणे कोष्टक १७–९ मध्ये दाखविले आहेत.

**कोष्टक १७–१**

**नदीतील प्रवाहाचा सरासरी वेग**

| केंद्र क्रमांक | सरासरी वेग | | पासून अंतर | | पासून प्रवासाचा काल | |
|---|---|---|---|---|---|---|
| | फूट/सेकंद | मैल/तास | शहरातील इमहॉफ टाकी, मैल | अपरप्रवाही केंद्र, मैल | शहरातील इमहॉफ टाकी, तास | किंचित अपर प्रवाही केंद्र, तास |
| ४ | २.५ | १.७ | ० | २ | ३.४ | ३.४ |
| ७ | ०.३ | ०.२०५ | ८ | ६ | ९.८ | ६.४ |
| ८ | ०.२९ | ०.१९८ | १२ | ४ | २९.८ | २०.० |

## कोष्टक १७–२

२३ ऑगस्टच्या अपशिष्टाची आणि संग्राही प्रवाहाची रासायनिक आणि स्वास्थ्यविषयक वैशिष्ठ्ये–

| केंद्र क्रमांक * | १ | २अ | २ब | ३ | ४ | ५ | ७ | ८ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| राशि, द.से.स. घनफूट | ०.७१६ | | | | ०.४६२ | ६.३८ | ३६.२ | ४०.५ |
| २४ तासातील एकूण गॅलन † | ९६७·७५ | | | | ३०० ००० | | | |
| विलीन ऑक्सिजन ppm | ४.० | १.० | ६.० | १.४ | ० | १.० | ० | ५.० |
| क्लोराईड, ppm NaCl म्हणून | ३००० | | | ५३०० | | ३५०० | ६०० | ० |
| pH | ५.४ | ४.६ | ६.२ | ४.६ | ६.६ | ५.९ | ६.२ | ६.५ |
| रंग | पिवळा | किंचित पिवळा | किंचित पिंगट | किंचित पिवळा | करडा | दुधाळ किंचित | किंचित ताम्र tanin | किंचित ताम्र |
| गंध | लोण–च्याचा | लोण-च्याचा | नाही | लोण–च्याचा | शिळा वाहितमल | लोणच्या सारखा | नाही | नाही |
| तपमान °C | २४.८ | | | २३ | २३ | २४ | २३.५ | २३.५ |
| BOD (२०°C, ५ दिवस), ppm | ७८० | | | | ४९ | | | |
| तरंगते पदार्थ, ppm | ९६ | | | | १४८ | | | |
| एकूण घनपदार्थ, ppm | ८६७० | | | | ३५० | | | |
| विलीन घनपदार्थ एकूणाची टक्केवारी | ९९ | | | | ५८ | | | |

* ह्या दिवशीचे केंद्र ६ चे आकडे उपलब्ध नाहीत.

† अंदाजी

**कोष्टक १७–३**

**३० ऑगस्टला अपशिष्ट व संग्राही प्रवाहाची रासायनिक आणि स्वास्थ्यविषयक वैशिष्ट्य–**

| केंद्र क्रमांक | १ | ४ | ६ | ७ | ८ |
|---|---|---|---|---|---|
| राशि, द. से. स घनफूट | ०.८१८ | ०.४६२ | | ऑगस्ट २३ पेक्षा प्रवाह कमी होता | |
| २४ तासांतील एकूण, गॅलन * | ६८०४० | ३००००० | | | |
| विलीन ऑक्सिजन, ppm | ० | ० | ० | ० | ४-७ |
| NaCl च्या स्वरूपात क्लोराइड, ppm | २८३२ | | ७०८ | ३२५ | २९५ |
| pH | ४.० | | ५.२ | ६.५ | ६.२ |
| रंग | पिवळा | | करडा पिंगट | किंचित टॅनीन–सारखा | टॅनीन सारखा |
| गंध | लोणच्या सारखा | | नाही | नाही | नाही |
| तपमान °C | २४ | | २७ ५ | २५ | २४ |
| BOD (२०°C, ५ दिवस) ppm | २०४० | | | | |
| तरंगते घनपदार्थ, ppm | २२४ | | | | |
| एकूण घनपदार्थ ppm | २४२७४ | | | | |
| विलीन घनपदार्थ, एकूण घनपदार्थांच्या टक्केवारीत | ९९ | | | | |
| एकूण बाष्पशील द्रव्य, एकूण घन–पदार्थांच्या टक्केवारीत | ४.६ | | | | |
| एकूण राख % | ९५.४ | | | | |
| तरंगते बाष्पशील द्रव्य, एकूण तरंगत्या घनपदार्थांच्या टक्केवारीत | ५९ | | | | |
| तरंगती राख, एकूण तरंगत्या घनपदार्थांच्या टक्केवारीत | ४१ | | | | |

* अंदाजित.

## १७–३ मत्स्य–संहारा संबंधीच्या परिणामांचे मुल्यांकन–

ज्या प्रदूषणाने वसंत ऋतूत मासे मेले त्या प्रदूषणाचे कारण व व्याप्ती शोधून काढणे हाच ह्या प्रारंभिक सर्वेक्षणाचा हेतू होता. शहराच्या ८ मैल खाली निरीक्षण केलेला नदीतील

किमान प्रवाह द. से. १२,७ घन फूट होता व शहराच्या खाली १२ मैलावर तो द. से. स. २९.४ घनफूट होता. यू. एस. भूवैज्ञानिक सर्वेक्षणाने पुरविलेल्या माहितीप्रमाणे शहराच्या १२ मैल खाली नदीतील सरासरी प्रवाह द. से. स. ५५.३ घन फूट होता पण किमान प्रवाह द. से. स. फक्त २.१६ घ फूट होता. सरासरी प्रवाह व किमान प्रवाह यातील फरक बराच आहे आणि तो काळजीपूर्वक नोंद घेण्यायोग्य आहे. मत्स्यजीवन सुरक्षित राखण्याच्या दृष्टीनें जूनच्या प्रवाहास विशेष महत्व आहे आमच्या सर्वेक्षणात नोंद केलेला नदीतील किमान प्रवाह द. से. स १२६५ घन फूट अथवा नोंद केलेल्या किमान जूनच्या प्रवाहाच्या अंदाजे ६ पट जास्त होता. ह्याचा अर्थ असा की, नदीच्या प्रवाहाखेरीज बाकीची परिस्थिती समान असताना आमच्या सर्वेक्षणात निरीक्षण केलेले प्रदूषणाचे सकेंद्रण ६ पट जास्त असू शकले असते. वसंत ऋतूतील किमान अतिमंद प्रवाहाचा मत्स्यसंहाराच्या बाबतीत महत्वाचा कार्यभाग आहे.

**कोष्टक १७–४**

**६ सप्टेंबरची अपशिष्टे आणि संग्राही प्रवाहाची रासायनिक व स्वास्थ्य विषयक वैशिष्टये**

| केंद्र क्रमांक | १ | ४ | ७ | ८ |
|---|---|---|---|---|
| राशि दर सेकंदास घनफूट | ०.८४० | ०.४६२ | १२.७ | २९.४ |
| २४ तासातील एकूण गॅलन* | ९०६०० | ३००००० | | |
| विलीन ऑक्सिजन, ppm | २ | ० | २.७ | ० |
| pH | ६ ३ | ६.४ | ५ ८ | ५.१ |
| रंग | पिवळट पिंगट | करडा पिंगट | किंचित टॅनिनसारखा | किंचित टॅनिनसारखा |
| गंध | लोणच्याचा | नाही | नाही | नाही |
| तपमान °C | २४ | २४ | २२.५ | २२.५ |
| BOD, (२०°C ५ दिवस) ppm | ३९० | ९९ | | |
| तरंगते घनपदार्थ, ppm | १२४ | १६२ | | |
| एकूण घनपदार्थ, ppm | १०२६८ | ४०८ | | |
| विलीन घनपदार्थ, एकूणांच्या टक्केवारीत | ९९ | ६०.४ | | |

* अंदाजी

वसंत ऋतूत नाल्यात फार मोठ्या प्रमाणात मासे मरून जातात व त्याला अनेक कारणे असतात. कमी अगर उच्च pH अथवा त्यामध्ये एकाएकी फरक होण्यामुळे माशांवर परिणाम होतो हे सर्वांस माहीत आहे. लवणाची उच्च संकेंद्रणे, अति उच्च तपमान अथवा त्यात जलद-गतीने होणारा फरक, विषाक्त रसायने, माशांचे रोग, आणि विलीन ऑक्सिजनचा अभाव, तसेच अनेक अन्य परिस्थितींचाही त्यांच्यावर प्रभाव पडतो. मत्स्यहानीस कारणीभूत असण्याची जास्तीत जास्त शक्यता असलेल्या घटकांचा आणि त्यांना जबाबदार असलीच तर अशी कोणती अपशिष्टे असतील त्यांचा शोध घेण्याचा आमच्या सर्वेक्षणाचा उद्देश होता.

pH – एलिसने (१) असे म्हटले आहे कीं, मासे आणि सामान्य जलीय जीवांना ६.५ पासून ८.४ पर्यंत pH ची मूल्ये अधिक पसंत असतात आणि ५.० पेक्षा कमी वा ९.० पेक्षा जास्त pH ची मूल्ये असणे निश्चितपणे हानिकारक अथवा मारकही होते. अल्प काळात ह्या मूल्यांत फरक पडल्यास आणि त्या बरोबरच विलीन ऑक्सिजनच्या तपमानात किंचित वाढ अगर घट झाल्यास ते अनेक उष्ण-जल माशांना व ट्राऊट माशाना जीव घेणे होते. Sticmke आणि Eakenfelder (५) यांना असे दिसून आले की, माशांची प्रतिक्रिया, त्यांच्या विकासाचा टप्पा अगर मोसम यांना अनुसरून; वेगवेगळी होते हिवाळ्यात pH चे जे मूल्य असताना मासे मरत होते. त्या मूल्यापेक्षा जास्त मूल्य असताना वसंत ऋतूत ते मरण पावले.

जरी लोणच्याच्या कारखान्यातील निःस्रावाचा pH ३.९ इतका कमी आणि ८.८ इतका उच्च असा बदलता असला तरी शहरातील पूतिकुंडांच्या परिवाहाच्या खालील बाजूच्या संग्राही प्रवाहाचा pH, ५.१ पेक्षा खाली गेला नाही आणि तीन दिवसांच्या सर्वेक्षणाच्या कालात बहु-तेक केंद्रावर तो ह्या मूल्यापेक्षा बराच जास्त होता (परंतु तो ७ पेक्षा जास्त नव्हता). एका दिवसापासून दुसऱ्या दिवसापर्यंत ह्या नमुना घेण्याच्या बिंदूच्या जवळ pH मध्ये भरीव प्रमा-णात फरक झाला नाही माशांच्या मृत्यूच्या बाबतीत pH हा स्वयमेव निर्धारक घटक असल्याचे ह्या निष्कर्षांवरून दिसून येत नाही. तथापि जूनमध्ये व प्रवाह कमी असताना, तनुकरणास लाग णाऱ्या पाण्याच्या राशीत बरीच घट होत असल्याने pH हा अंशहित (Contributing) घटक होण्याची शक्यता आहे,

कोष्टक १७–५

लोणच्याच्या कारखान्यातून दररोज प्रस्त्रावित होत असलेली अपशिष्टे

| दिनांक | हळद व तुरटी, † गॅलन (pH 3.2) | लवण जल, † गॅलन (pH 3.2) | चुना, गॅलन (pH 9.9) | शिरका आणि साखर, गॅलन (pH < 9.0) | शीतन जल, गॅलन | धावक जल | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | बरणी धावक, गॅलन | कापलेल्या तुकड्यां-च्या लोणच्याचा धावक, गॅलन |
| ८–२३–५२ | ३७२० | ४०७० | ४५००० | २०५५ | नाही | नाहीं | नाही |
| ८–३०–५२ | ४५५७ | ४००० | नाही | ११७० | नाही | नाही | नाही |
| ९–६–५२ | ८०२५ | नाही | ३०००० | नाही | नाही | नाही | १८५० |
| संयंत्राच्या पर्यवेक्ष-काने निर्दिष्ट केल्या प्रमाणे रोजचा सरा-सरी सामान्य प्रस्त्राव | ७५०० | १००० | ५००० | १६०० | २७८०० | ९६०० | १२००० |
| कमाल | ८५०० | ६००० | ५०००० | २३०० | | | |
| किमान | ४७०० | ० | ० | ७०० | | | |

* टाकीतून सोडून दिलेल्या (प्रस्त्रावातील द्रव्यावरून) अंदाजित

† वर्षभर बहुशा रोजच्या रोज प्रस्त्रावित केला.

कोष्टक १७–६

**शहरातील वाहितमल आणि लोणच्याच्या कारखान्यातील अपशिष्टांनी संप्रापित केलेले सापेक्ष प्रदूषण भार.**

| प्रदूषक | सरासरी राशि, गॅलन/दिवस | BOD | | | तरंगते घनपदार्थ | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | ppm | पौंड/ दिवस | एकुणाची टक्केवारी | ppm | पौंड/ दिवस | एकुणाची टक्केवारी |
| शहर | ३०००००* | ७४‡ | १८५ | १९.६ | १५५ | ३८८ | ७८.८ |
| लोणच्याचा कारखाना | ८५१४२ † | १०७० | ७६० | ८०.४ | १४८ | १०५ | २१.२ |

* पाण्याच्या खपावर आधारित केले.

† प्रवाहाच्या प्रत्यक्ष मापनावर आधारित.

‡ उपचारणानंतर–

## लवणाचे संकेंद्रण –

एलिसने (१) असेही म्हटले आहे कीं, पाण्याच्या प्रवाहाच्या विशिष्ट चालकतेने (Conductance) परावर्तित केल्याप्रमाणे खारट पाण्यातील फरक माशांना संकटदायी होऊ शकतात. एल्ड्रिचचा (२) असा दावा आहे कीं, गोड्या पाण्यातील मासे आणि अन्य जल जीव लवणातील अनेक खनिजांचे मर्यादित संकेंद्रणच फक्त सहन करू शकतात. ५००० ते १०००० ppm संकेंद्रण जर २४ तासांपेक्षा अधिक वेळ टिकून राहिले नाही तर बहुतेक जातीच्या माशांना कायमची बाधा होत नाही. जेव्हा खनिज अंतर्वस्तू सातत्याने उच्च प्रमाणात असतात तेव्हां शेवटी ५०० ते १००० ppm संकेंद्रण असताना त्यांचा परिणाम माशांचा मृत्यू होण्यात होतो. लवणात आढळून आलेल्या विभिन्न रसायनांच्या विषाक्ततेचा संभाव्य क्रम KCl, $K_2SO_4$, $MgCl_2$, तसेच $CaCl_2$ आणि शेवटी NaCl, असा असतो. लवणामुळे रानकोंबड्यांना पाणी शोधण्यास (अन्य ठिकाणी) जावे लागते. ज्या स्थानावर आणि प्रवाहात सातत्याने लवण सोडण्यात येते तेथील वनस्पती लवकर नाश पावतात. अँडर्सनने (४) आग्रहाने असे प्रतिपादन केले आहे की, परिसारक दाब (Osmotic pressure) पडण्याइतके उच्च

संकेंद्रण असणारी सर्व लवणे विषाक्त असतात. सोडियम असेटेट, ब्रोमाइड, क्लोराईड, फॉर्मेट व नायट्रेट यांच्या सारख्या कांही लवणात ग्रामाणुतेच्या स्वरूपात ( In terms of molarity ) अंदाजे तितकीच सीमांत ( threshold ) संकेंद्रणे असतात. अँडर्सनला असे आढळून आले की जेव्हा ईरी सरोवरास ३७८० ppm NaCl मिसळले गेले तेव्हा प्रतिकूल परिसारक दाब पड-ण्यास लागणारे सीमांत संकेंद्रण झाले होते

लोणच्याच्या कारखान्यातील निःस्त्रावातील लवण संकेंद्रण जरी ३००० ppm असले तरी संग्राही नाल्यात ते बरेच कमी होते. नदीकाठच्या शहराखाली ८ मैलावर एका दिवशी ते फक्त ६०० ppm आणि अन्य दिवशी ३२५ ppm असल्याचे दिसून आले. ह्या परिणामावरून असे दिसते कीं, मासे मरण्यास कारणीभूत होईल इतके ( आमच्या सर्वेक्षणाच्या दिवसात तरी ) नदीतील लवणाचे संकेंद्रण उच्च नव्हते. तथापि प्रवाह कमी असतो त्यावेळी जेव्हा मासे मरतात त्यावेळचे क्लोराइडचे संकेंद्रण बिनचुक निर्धारित करण्यासाठी नमुने घ्यावे लागतील.

## तपमान--

डिमिक आणि मेरीफील्ड (५) यांनी असा निष्कर्ष काढला आहे की, आपल्या प्रयोगात नोंद केलेल्या ८९ °F (३२°C) ह्या उच्चतम तपमानात ट्राऊट, सालमन, अगर श्वेत मत्स्य ह्यांच्यापकी कोणचेही मासे आढळून आले नाहीत आणि इतक्या जास्त प्रमाणात असलेले तप-मान माशांना बहुतेक करून जीवघेणे ठरते. उलटपक्षी मोठ्या तोंडाचा बास, काकडी-बीज सूर्यमत्स्य, नीलजिल श्वेत क्रॅपी, वृषभशीर्ष, मार्जार मत्स्य, आणि कार्प हे मासे हतबल होत अस-ल्याचे दिसून आले नाही.

नमुना घेण्याचे दिवस जरी उन्हाळ्यातील अतिउष्ण दिवस नव्हते तरी पाण्याच्या तप-मानावर हवेचा काय परिणाम होतो हे नक्की जाणून घेण्यास सर्वेक्षण गटास पुरे होईल इतक्या उष्णतेचे ते होते. लोणच्याच्या अपशिष्टाची उष्णता कधीही २५ °C इतकी वाढत नसल्याने आणि इमहॉफ टाकीच्या पातमुखा (out fall) खालच्या बाजूच्या नदीतील पाण्याचे तपमान सामान्यतः लोणच्याच्या अपशिष्टाच्या तपमानापेक्षा कमी असल्याने, माशांच्या मरणास तपमान हा एकमेव घटक प्रामुख्याने जबाबदार आहे या कल्पनेचा निरास झाला.

## विषाक्त रसायने--

लोणच्याच्या कारखान्यातील प्रक्रिया आणि वाहितमलातील स्वास्थ्यविषयक घटक, यांच्यासंबंधी योग्य त्या प्राधिकाऱ्यांसह पुनर्विलोकन केल्यावर जर कमी संकेंद्रण असले तर

विषाक्त होण्याची शक्यता असलेली कोणचीही रसायने दिसून आली नाहीत आणि त्यांच्यामुळे संग्राही (receiving) पाण्यात pH मध्ये फरक झाला नाही.

## मत्स्यरोग -

सर्वेक्षणात मृत माशासंबंधी पुरावा मिळाला नाही. नदीकिनाऱ्यावरील कोळयांच्याशी केलेल्या चर्चेत मृत माशांवर डाग अथवा ज्यामुळे नैसर्गिक कारणांनी मत्स्यरोगांचे दिग्दर्शन होईल अशा अन्य खुणा अगर चिन्हे उघडकीस आणता आली नाहीत. कोळयांनी असेही सांगितले कीं, लाल अगर अन्यथा विक्षोभित झाले आहेत असे कल्ले असलेले मासे त्यांना आढळले नाहीत. पाण्यात कोणतीही विषाक्त रसायने अगर क्षोभकर घटक नव्हते या वस्तुस्थितीस दुजोरा मिळाला.

## विलीन ऑक्सिजनचा अभाव -

डिमिक व मेरीफील्ड (५) आणखी असेही सांगतात कीं, सामान्य ऑक्सिजनचे संकेंद्रण कमी असलेल्या पाण्यात माशांचा श्वसनवेग वाढतो आणि त्या परिस्थितीत माशांना होणाऱ्या विषकारक द्रव्याची विषाक्तता बरीच तीव्र असण्याची शक्यता असते. ऑगस्ट व सप्टेंबर मध्ये (ज्या महिन्यात हे मासे सामान्यत: जास्त नजरेस पडतात असे) जिवंत सालमन अगर ट्राऊट मासे ५.२ ppm पेक्षा कमी विलीन ऑक्सिजन असलेल्या पाण्यात त्यांना आढळून आले नाहीत. म्हणून माशांना सुखदायक होईल असा किमान ५ ppm विलीन ऑक्सिजन आहे असे त्यांनी सूचित केले. साऊथगेटने (६) असे ठरविले कीं, मत्स्यजीवनास आधार म्हणून विलीन ऑक्सिजनचे किमान सकेंद्रण किती असावे या संबंधी भरपूर माहिती सध्या उपलब्ध असूनही कोणतेही सामान्य निवेदन करणे शक्य नाही. उदाहरणांर्थ, हे सर्वश्रुत आहे कीं. माशांची ऑक्सिजनची गरज, तपमान, मत्स्यजाति आणि वय, पाण्यातील विलीन द्रव्य, आणि अन्य घटक, यांच्याप्रमाणे बदलते.

तथापि, मत्स्यविज्ञान शास्त्रज्ञांची (Ichthyologists) सामान्यपणे अशी समजूत असते की, माशांना राहाण्यायोग्य असे पर्यावरण असण्याकरता ४ ppm विलीन ऑक्सिजन तेथे असला पाहिजे. माशांच्या काही जाती २ ppm इतक्या कमी विलीन ऑक्सिजनवरही जगू शकतात. पण हे शपथपूर्वक सांगेल असा एकादा तज्ञ सापडणे कठीण आहे.

आमच्या नदीसर्वेक्षणातून, केवळ निरास प्रक्रियेतूनच नव्हे तर निरीक्षणावरूनही, असे दिसून आले कीं, लोणच्याच्या कारखान्यापासून अनुप्रवाही दिशेने नदीत १२ मैलावर विलीन

ऑक्सिजनचा अभाव होता. ह्यावरून संग्राही नदीतील सेंद्रिय भारण प्रमाणापेक्षा जास्त असल्याचे सिद्ध झाले.

नदीच्या पाण्यात स्वाभाविकपणे अस्तित्वात असलेले जीवाणू आणि इमहॉफ टाकीतील निःस्त्रावातून मलवाहिनीत कृत्रिमपणे मिसळलेले जीवाणू, यांना जगण्याकरता आणि वाढ होण्याकरता अन्नाची जरूरी असते. लोणच्याच्या कारखान्यातील अपशिष्टामधून व स्वयंवाहित मलातून ह्या अन्नाचा पुरवठा होत होता. परंतु हे अन्न खाताना जीवाणूंनी अन्नाचे ऑक्सिकरण (पचन) करण्यासाठी नदीच्या पाण्यातील विलीन ऑक्सिजनचा उपयोग केला आणि त्यामुळे ज्या वेगाने नैसर्गिकरीत्या त्याचा पुरवठा होणे शक्य होते त्यापेक्षा अधिक जलद पाण्यातून ऑक्सिजनचे निष्कासन झाले. मानवाला जशी ऑक्सिजनची गरज असते तशी विलीन ऑक्सिजनची माशांनाही असते.

पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे आमच्या सर्वेक्षणात, तीन्हीही दिवशी, लोणच्याच्या कारखान्यातील प्रस्त्रावापासून अनुप्रवाही दिशेने १२ मैलापर्यंत नदीत मासे जिवंत राहण्यास ऑक्सिजन अपुरा होता असे आढळून आले. तथापि तीन पैकी दोन दिवशी शहरापासून १२ मैलावरील त्या बिंदूपाशी भरपूर विलीन ऑक्सिजनची नदीत पुनःप्राप्ती झाली.

जेव्हा जूनमध्ये पाणी अधिक गरम असते व त्यात भरपूर ऑक्सिजन विरघळू शकत नाही आणि जेव्हा जीवाणु चयापचय (metabolism) अधिक वेगाने होत असतो, जेव्हा ऑक्सिजनचा अभाव अधिक तीव्र होतो. म्हणून अंडजनन करण्यासाठी (spawning) जूनमध्ये नदीत मासे अपरप्रवाही दिशेने जाणे, शहरातील आणि लोणच्याच्या कारखान्यातील संयुक्त प्रदूषणात सापडणे, आणि ऑक्सिजनच्या अभावामुळे अक्षरशः गुदमरून जाणे, हे कसे घडते ह्याची कल्पना सहज करता येते.

नदीतील ऑक्सिजनचा वापर करण्याच्या लोणच्यातील अपशिष्टांच्या संभाव्य शक्तीची सूचना BOD च्या चाचणीवरून मिळते. सर्वेक्षणाच्या निष्कर्षांवरून असे दिसून आले की, लोणच्याच्या तीन दिवसांच्या संमिश्र अपशिष्टातून ८५१४२ गॅलनमध्ये दर दिवशी १०७० ppm भार पडला आणि शहरातील मल निःस्त्रावातून ३०००० गॅलनमध्ये तो दर दिवशी ७४ ppm होता. टक्केवारीत याचा अर्थ २३ व ३० ऑगस्ट आणि ६ सप्टेंबर रोजी अन्वेषण केलेल्या लोणच्याच्या अपशिष्टातून संग्राही पाण्यावर ऑक्सिजनच्या मागणीच्या ८०.४ प्रतिशत भार पडला आणि उरलेल्या १९.६ टक्क्याचे शहरातील वाहितमलातून भारण झाले असा होतो. प्रदूषणाचे अनेक अन्य सूचकांक होते परंतु विलीन ऑक्सिजनची दुर्लभता ही विचाराची प्रमुख बाब असल्याने ह्या उदाहरणात BOD हीच कसोटी लागू होईल असे दिसते.

## १०-४ प्राथमिक निष्कर्ष आणि सूचना

म्हणून प्रदूषणाच्या अन्वेषणाच्या प्रथम टप्प्यात खालील गोष्टी दिसून आल्या. विलीन ऑक्सिजनच्या अत्यल्प राशीमुळे, अंशतः तरी माशांचे मरण ओढवले हे उघड आहे. मंद प्रवाह्याच्या काळात क्लोराइड आणि अल्प pH यांचे संकेंद्रण हेही त्यांच्या मृत्यूस कारणीभूत झाले. तरी अशी प्रदूषणकारक परिस्थिती चलती राहू दिली तर पुढील वर्षी वसंत ऋतूत ह्या गोष्टींची पुन: तपासणी करावी.

शहरातील वाहितमल आणि लोणच्याच्या कारखान्यातून प्रस्त्रावित होत असलेली अपशिष्टे ऑक्सिजनच्या या त्रुटीस अंशत: कारणीभूत झाली. अधिक ठामपणे सांगायचे झाल्यास शहरातील वाहितमल ऑक्सिजनच्या सुमारे एक पंचमांश त्रुटीस जबाबदार होता आणि लोणच्याचा कारखाना चारपंचमांश त्रुटीस जबाबदार होता. क्लोराइडे आणि अम्ले प्रामुख्याने लोणच्याच्या कारखान्यातून आली.

प्रदूषण जेव्हा उदाहरणात विलीन ऑक्सिजनच्या अभावरूपे होते तेव्हां शहराच्या खालच्या बाजूने किमान १२ मैल अंतरापर्यंत नदीत दूरवर ते अस्तित्व होते. काही दिवशी ते या बिंदूच्या पलीकडेही पसरले असावे.

आम्ही ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन खालील शिफारशी केल्या: नगरपालिकेने इमहॉफ टाकीची स्वच्छता करावी, एका बाजूकडून प्रवाह दुसऱ्या बाजूकडे वळविण्याच्या यंत्रणेची दुरूस्ती करावी, उपचाराच्या साधनांची क्षमता आणि भारणे यांची गणने करावी, आणि त्यांच्या कार्यक्षमतेचे काळजीपूर्वक अध्ययन करावे. जर सध्याच्या व्यवस्थेवर फार भार पडत असेल तर ती टाकून द्यावी आणि उपचारणाची अधिक आधुनिक आणि कार्यक्षम पद्धत व सक्षम पर्यवेक्षण यांची वाहितमलावर उपचार करण्यासाठी, योजना करावी.

लोणच्याच्या कारखान्याने आपल्या परिचालन आणि घरेलू बंदोबस्ताच्या ( housekeeping ) प्रथांचे विश्लेषण करावे आणि नदीतील प्रदूषक द्रव्यांचा प्रस्त्राव कमी करण्याचा प्रयत्न करावा. अपशिष्टातील प्रत्येक घटकाच्या BOD मूल्यांचा एकाच वेळी पूर्णपणे अभ्यास करावा आणि अपशिष्ट–उपचारणाच्या कोणत्या तरी प्रकाराची प्रतिष्ठापना करावी.

वर रूपरेखित केलेली अन्वेषणे नगरपालिका व लोणच्याच्या कारखान्यात पूर्ण केल्या–नंतर प्रवाह अल्प असणाऱ्या जूनच्या नंतरच्या काळात कारखान्यातील लवणाच्या साठवणासंबंधी विचार करावा. त्या कालातील प्रवाह–परिस्थितींच्या निरीक्षणावरून माशांच्या मर-

णाचे कारण निश्चितपणे समजून येईल. एकाद्या समस्येचे निरसन करताना दूरच्या कालात प्रकल्प परिणामकारक ठरेल अगर कसे याबद्दल शंका असल्यास त्यावर पैसा खर्च करण्याच्या आधी समस्येचे नक्की कारण समजून घेणे नेहमी सर्वोत्कृष्ट असते

## १७-५ लोणची तयार करण्याच्या कारखान्यातील सर्वेक्षणाचे निष्कर्ष आणि तपशीलवार सूचना –

लोणच्याच्या कारखान्यातील विशेष सर्वेक्षण आक्टोबरमध्ये करण्यात आले; त्यापुढच्या वसंतऋतूत नदीतील माशांचे जीवन सामान्य व्हावे म्हणून योजण्यात येणाऱ्या उपायांपैकी एक उपाय म्हणून नदीतून घनपदार्थ काढून टाकण्याकरता संयंत्रातील अपशिष्टांच्या चाळणाची शिफारस करण्यासाठी प्रथमतः हे सर्वेक्षण करण्यात आले. अपशिष्टाचे अनेक नमुने गोळा करून pH, तरंगते घनपदार्थ, आणि BOD करता, त्यांचे विश्लेषण करण्यात आले. को. १७-७ मध्ये प्रातिनिधिक विश्लेषणें सादर केली आहेत.

को. १७-७ मध्ये दिलेल्या माहितीवरून असे दिसून येते की, कांही प्रमाणात सर्व अप–शिष्टे अम्लीय आहेत. या अम्लामुळे मासे मृत्यूमुखी पडू शकतील आणि केवळ त्या कारणा–करता सुद्धा उदासीनीकरण केल्याशिवाय ती अपशिष्टे मलवाहिनीत सोडण्यास मनाई करावी तुरटी आणि टयुमेरिक बरण्यातील अपशिष्टातून आणि स्वादाच्या यंत्रातील आणि पेटीतील निःसारणातून, अतिसंकेंद्रित झालेले घनपदार्थ, आलेले होते हेही स्पष्ट झाले. केवळ या दोन अप-शिष्टांचे नियंत्रण करण्यानेसुद्धा संयंत्रातून नदीत जाणाऱ्या अपशिष्टांतील घनपदार्थ बरेचसे कमी होतील. ऑक्सिजन रिक्तीकरणाच्या ( depletion ) दृष्टिकोनातून, फोडी अस–लेल्या लोणच्याच्या धावन नळकांडयातील अपशिष्टाखेरीज सर्व अपशिष्टे अत्यंत प्रदूषणकारी असतात. कांद्याच्या साखरपाकाच्या अपशिष्टात ऑक्सिजनची मागणी असाधारणपणे उच्च होते आणि पुरेसे उपचारण केल्याशिवाय ते नदीत सोडण्यास कधीही परवानगी देऊ नये. ह्या अपशिष्टात ५ दिवसाचा BOD २० $^{0}$C तपमानात १८००० ppm पेक्षा जास्त (अथवा सामान्य घरगुती वाहितमलातल्यापेक्षा ९० पट प्रदूषणकारी) होता. या प्रत्येक अपशिष्टाच्या राशीवरून नाल्यातील ऑक्सिजनची मागणी निर्धारित होते.

**कोष्टक १७–७**

**लोणच्याच्या कारखान्यातील अपशिष्टांचे विश्लेषण –**

| क्रमांक | उत्पत्तिस्थान | तरंगते घन-पदार्थ, ppm | pH | BOD, ppm |
|---|---|---|---|---|
| १ | अखंड (काकडीच्या) लोणच्यातील तुरटी व हळद अपशिष्टे | १०२४ | ४.१ | ४२० |
| २ | स्वाद यंत्र व पेटीतील निस्त्रावित द्रव्ये | ७९८० | ३.२ | २५०० |
| ३ | कांद्यापासूनचे सांयरप अपशिष्ट | ८६८ | ९.५ | > १८००० |
| ४ | निःसारणापूर्वीचे प्रत्यक्ष बरणीतील काप–लोणच्याच्या लवणजल–धावनातील अपशिष्ट | १२२ | ४.३ | २८८० |
| ५ | कापलोणच्याच्या धावन–नळकांड्याचे अपशिष्ट | २५४ | ५.८ | १६० |
| ६ | कापलोणच्याच्या धावन जलातील अपशिष्ट ( प्रथम धावन ) | ६४७ | ४.० | १७७० |
| ७ | कापांपासूनचे तुरटी व टर्यूमेरिक अपशिष्ट | ११८५ | ३.२ | १८९० |

संयंत्रावरील प्रथांचे निरीक्षण करून आम्ही असे ठरविले कीं, उपकरणांत, पद्धतीत, आणि परिचालनात थोडीशी सुधारणा करून घनपदार्थ असलेला अपशिष्टे मलवाहिन्यांच्या बाहेर ठेवता येतील अशा अनेक जागा आहेत. अपशिष्टावरील उपचारणाच्या भांडवली खर्चाचा विचार करण्यापूर्वी या सुधारणा कराव्यात.

संयंत्रावरील प्रथामध्ये, मलवाहिनीत प्रस्त्रावित होणारे घनपदार्थ कमी करण्याकरता खालीलप्रमाणे फरक सुचविण्यात आले :

१) लोणच्यातले लहान तुकडे आणि साले अडकून राहण्यास मदत व्हावी म्हणून साखर पाकाच्या टाकीतील निःसारणी बुचांच्या छिद्रांवर कायमची जाळी बसवावी.

२) तुरटी आणि टर्यूमेरिक व प्रथम धावन बरण्यांच्या बूच पेटचा दुरुस्त कराव्या आणि त्यांची लांबी वाढवावी.

३) तुरटी आणि हळद यांच्या पाण्याने बरण्या फार भरू नयेत आणि बूच पेटचात लोणचे उडून जाऊ नये म्हणून हवेवर नियंत्रण ठेवावे.

४) सर्व बूच पेट्यांना चार बाजू असाव्यात आणि त्यांवर गच्च बसणारी झाकणे असावीत.

५) जमिनींवर पडलेल्या लोणच्याच्या (फोडींचा) झाडून एक ढीग करावा व तो उचलून कचऱ्याच्या पिपात टाकावा, पण मलवाहिनीत धूवून अगर लोटून खाली सोडून देऊ नये, अथवा बरण्यांच्या सभोवतालच्या फटीत सारू नये.

६) लोणचे बरणीतच भरले जाईल आणि जमिनीवर सांडणार नाही याची खात्री असण्याकरता बरण्या भरताना विशेषतः फोडींच्या लोणच्याच्या बाबतीत अधिक काळजी घ्यावी.

७) मौल्यवान (आणि उच्च प्रमाणात प्रदूषणकारक असलेले) स्वादाचे घनपदार्थ आणि निःसार मलवाहिनीच्या बाहेर राहाण्यास मदत व्हावी म्हणून स्वाद यंत्रातील किसलेल्या स्वादा करता बसविलेल्या जाळीदार लाकडी संग्राहक पेटीच्या खाली एक धातूचे तबक अथवा द्रोणी बसवावी.

८) लोणच्याच्या फिरत्या कर्तन धावकातील नालीच्याखाली सूक्ष्म जाळीची चाळण असलेली नवीन पेटी बसवावी. दररोज एकदा अगर दोनदा चाळण स्वच्छ करावी आणि त्यातील घनपदार्थ पुनः वापरावेत अगर फेकून द्यावेत.

९) टयूमेरिक आणि तुरटीच्या बरण्यातून लोणच्याच्या फोडी (जाळी वापरून) जाळीदार पेट्यात नेऊन टाकताना अधिक काळजी घ्यावी.

१०) घनपदार्थ वर राहावेत म्हणून फरशीवरील विशेषतः निचऱ्यासाठी वापरण्यात येणाऱ्या फरशीवरील सर्व छिद्रे (स्वादाच्या किसणीच्या खालच्यासारखी) जाळीने झाकावीत.

११) लोणच्याच्या वर्गकारकाच्या खाली निक्षेपित झालेले सूक्ष्म जाळीदार (stringy) द्रव्य ( जे आता फरशीतील मोठाल्या उघड्या निःसारण द्वारात आणि तेथून मलवाहिनीत जाते ते ) पुनः प्राप्त करावे. द्वार बंद करावे आणि त्याच्या बदली जाळी बसविलेले, आत हात जाऊ शकेल असे द्वार अगर लहान विकासनलिका द्वार ठेवावे.

१२) मलवाहिनीकडे जाणाऱ्या चरात फरशीतून बऱ्याच बीया आणि लोणचे थेट जात असल्याने काप–लोणच्याच्या धावकाजवळील नालीची द्वारे जाळीने झाकावीत.

१३) दोन क्रमांकाच्या संयोजन कक्षाच्या फरशीच्या जाळीवर चाळण्या बसवाव्या. फुटक्या बरण्या आणि त्यातील धावन जलातून मुख्यतः फरशीवर जात असलेले निःसारण द्रव्य सध्या जाळीमधून मलवाहिनीच्या फ्ल्यूमनळात संप्रवाहित ( Flush ) करण्यात येते.

विशेष सुधारणा करण्यासंबंधीच्या या शिफारशी अपशिष्ट उपचारणातील उपायांच्या मागील विचारसरणी सोदाहरण सिद्ध करण्याच्या दृष्टीने उपयोगी पडतील.

त्यापैकी बहुतेक सुधारणा अंमलात आणल्यावर संयंत्रावरील सर्व कर्मचाऱ्यांना नाल्यातील प्रदूषणाचा व्याख्यानाद्वारे अर्थ सांगावा. या व्याख्यानाने संयंत्रातील सुधारणांच्या परिणामकारकतेची खात्री राहील; इतकेच नव्हे तर प्रत्येक कर्मचारी प्रदूषणाच्या बाबतीत जागरूक राहील. हा दुसरा परिणाम शहराला तसेच संयंत्राच्या बाबतीतही लाभदायक होईल. हे सर्व साध्य केल्यानंतर चाळणाच्या आणि इतर अपशिष्ट–उपचारणांच्या मोठ्या प्रथांचे अन्वेषण करावे.

अभ्यासाच्या पहिल्या कालावधीत आपण काय मिळवले हे आता संक्षेपाने पाहूया; प्रक्रिया अपशिष्ट–जलाची चांचणी pH, तरंगते घनपदार्थ आणि ५ दिवसांच्या BOD करता केली आणि असे दिसून आले कीं, सर्व अपशिष्टे अम्लीय होती; तुरटी व टयूमेरिक अपशिष्टे आणि स्वादाचे निःसारण आणि " सुटी द्रव्ये " (losings) यांच्यात जास्त प्रमाणात तरंगत्या घनपदार्थांचे संकेंद्रण झाले होते; काप–लोणच्याचे धावक–अपशिष्ट खेरीज करून सर्व प्रक्रिया अपशिष्ट–जलात BOD उच्च प्रमाणात होता; साखरपाक अपशिष्टे सर्वांत जास्त शक्तिशाली होती आणि त्यातील BOD घरगुती वाहितमलातल्या सामान्य BOD पेक्षा ९० पटीहून जास्त होता.

नदीतील तरंगणाऱ्या घनपदार्थांच्यामुळे होणारे प्रदूषण कमी करण्याकरता आम्ही घन पदार्थ पुनः प्राप्त व्हावे म्हणून अनेक पद्धती सुचविल्या आणि प्रत्येकावर नाल्यातील प्रदूषणामुळे होणाऱ्या परिणामाच्या महत्वाची जाणीव राहण्यासाठी एक शैक्षणिक कार्यक्रम प्रस्तावित केला. कोणचेही अपशिष्ट–उपचारणाचे दुसरे उपाय हाती घेण्यापूर्वी उपचारविषयक आणि शैक्षणिक कार्यक्रम घडवून आणावेत अशी आम्ही शिफारस केली.

## १७–६ बदलांचे कारखाना व नाला यावरील परिणाम–

नंतरच्या वसंत ऋतूत लोणच्याच्या कारखान्याच्या अपशिष्टातील घनपदार्थ काढून टाकण्याविषयीच्या शिफारशीवर केलेल्या प्रगतीचे तपशीलवार सर्वेक्षण लेखकाने केले. त्यावरून असे दिसून आले की, २, ३, ४, ५, ७, ९, १०, ११ व १२ या (अनुच्छेद १७–५) शिफारशींचे पुरेशा समाधानकारकपणे अनुसरण करण्यात येत होते, त्यावेळी १, ६, ८ आणि ११ या शिफारशीत रूपरेखित केलल्या परिस्थितीत सुधारणा करण्याकरता आणखी सूचना देण्यात आल्या.

निकटच्या भविष्यकाळात पहिल्या शिफारशीत सुधारणा करावयाची होती. अन्य शिफारशीच्या बाबतीत खालील सूचना देण्यात आल्या. कापलोणच्याच्या तथाकथित रिकाम्या पेटचा योग्य बाजू वर करून गाडीत परत पाठविण्यासंबंधी ६ व्या शिफारशीच्या बाबतीत अधिक काळजी घ्यावी. ८ वीत, धावकाच्या खालील जाडी, लोणच्याचे तुकडे त्याखाली असलेल्या नालीत जाऊ नयेत म्हणून सदैव ताठ असावी. तसेच तुषारकक्षावर काढता घालता येणारे लाकडी झाकण घातल्याने पाण्याच्या राशीत बरीच बचत होईल. १३ वीत सुचविण्यात आलेल्या जाळ्या बसविल्या नव्हत्या तथापि, धावन कालाचे निरीक्षण केल्यानंतर लेखकाला अजूनही असे वाटते कीं, जाळीतून वाहून नदीत जाणारे लोणच्याचे अनेक तुकडे व स्वाद वर राहावेत म्हणून त्या जाळ्या बसवाव्यात.

या शिवाय उच्चप्रमाणात प्रदूषणकारक असलेल्या शिरका–साखर पाकाची राशि कमी करण्यासाठी दोन बदल सुचविले होते. बरणीतील साखरपाकाचा अधिक तर अंश वर राहाण्यासाठी चूपण तोटी असलेला एक पंप वापरावा आणि अतिरिक्त साखरपाक पुन: वापरता यावा आणि त्यामुळे शक्तिशाली अपशिष्ट कमी व्हावे, इतकेच नव्हे तर खर्चातही बचत व्हावी म्हणून त्या अतिरिक्त पाकाचे उत्प्रेरित कार्बन वापरून निर्मितीकरण करावे. संयंत्र व्यवस्थापकाने स्टार्चचा आधार न घेता निष्कर्षित (Extracted) टयुमेंरिकच्या वापराची शक्यता स्वत: सुचविली. त्यामुळे टयुमेंरिक अम्लातील सेंद्राय अंश कमी होण्यास मदत होईल अशी आशा वाटते.

कंपनीच्या अपशिष्टे कमी करण्याविषयीच्या शैक्षणिक कार्यक्रमाचा एक भाग म्हणून लेखकाने अपशिष्टाच्या नदीवर होणाऱ्या परिणामावर संयंत्रावरील कर्मचाऱ्यांच्यापुढे २० मिनिटे व्याख्यान दिले. वसंत ऋतूतील महिन्यात लवणाचा सावकाश आणि योग्यवेळी प्रस्राव करण्यासंबंधीची एक कार्यपद्धतीही आखण्यात आली.

संयंत्रापासून शहराच्याखाली १५ मैलापर्यंत लेखक आणि या विषयाची आस्था असलेल्या अनेक अधिकाऱ्यांनी क्षेत्रीय दृक् सर्वेक्षण केले. माशांच्या मृत्यूचे चिन्ह अगर लोणच्याच्या अपशिष्टाच्या खुणा नदीत दिसून आल्या नाहीत.

नदीचा वापर करणाऱ्या कोळ्यांचे मत, पुढच्या तीन आठवड्यांत अंडजनन करण्याकरता वर जाणाऱ्या लाल पोटाच्या पर्च माशावर प्रदूषणाचा परिणाम दिसून येईल, असे असल्यामुळे प्रदूषण कमी करण्याचा खालील कार्यक्रम या कारखान्याकरता आखण्यात आला :

१) लोणच्याचे तुकडे जलप्रवाहात जाण्यास प्रतिबंध व्हावा म्हणून जारीने प्रयत्न करावेत.

२) शिरका-साखरपाक संपूर्णपणे पुन्हा वापरण्याच्या पद्धतींचे अन्वेषण करावे अथवा निदान उन्हाळ्यात तरी ते नदीत वाहून जाण्यास प्रतिबंध करण्याचा प्रयत्न करावा.

३) लवण-प्रस्त्राव शक्य तितक्या जास्त काळ रोखून धरावा. नंतर तो अधिमान्यतः पावसाळ्यात नदीत हळू हळू सायफन करावा आणि त्यावेळी चुनापाणी व संयंत्रातील अन्य अपशिष्टे, यांचे पुरेशा प्रमाणात तनुकरण केलेले असावे.

४) लोणच्याचे तुकडे नदीत जाऊ नयेत म्हणून आणखी सुचविलेले सुधारणा करण्याचे उपाय अंमलात आणावेत.

५) नाल्यातील प्रदूषण कमी करण्यासाठी अमलात येत असलेल्या उपायांची जनतेला माहिती देत जावी.

लेखकाच्या माहितीप्रमाणे लोणच्याच्या अपशिष्टाचा नदीत प्रस्त्राव होण्याने मासे मरण पावले नाहीत. शेवटी प्रत्यक्ष अपशिष्ट-उपचारण योजना प्रत्यक्षात अंमलात आणण्याची गरज पडेल. तोपर्यंत नदीचा उत्तमप्रकारे उपयोग करण्यास हानिकारक होणार नाहीत अशा रीतीने अनुपचारित अपशिष्टे नदीत सोडण्यात येत आहेत.

## संदर्भ :-

१) एलिस, एम. एम., " इंडस्ट्रियल वेस्ट्स अँड फिश लाईफ, " स्युवेज वर्क्स जर्नल मधील उतारा, १८,४,७६४ (जुलै १९४०)

२) एल्ड्रिच, ई. एफ., इंडस्ट्रियल वेस्ट ट्रीटमेंट प्रॅक्टीस. न्यूयॉर्क, मॅक् ग्रॉहिल बुक कं. इन्कॉ., १९४२, पान ३३५.

३) स्ट्रीम्के, ई., आणि डब्ल्यू. डब्ल्यू. एक्केन्फेल्डर, इंजनिअरिंग रिसर्च बुलेटिन क्र. ३३, नॉर्थ कॅरालायना स्टेट कॉलेज, रॅले, एन. सी. (जानेवारी १९४७,)

४) अँडर्सन, बी. जी., " दि टॉक्सिसिटी थ्रेशोल्ड्स ऑफ व्हेरियस सोडियम सॉल्ट्स डिटर्मिन्ड बाय दी यूज ऑफ डॉफ्निया मॅग्ना " स्युवेज वर्क्स जर्नल, १८. १, ८२ (जानेवारी १९४६)

५) डिमिक, आर. ई., आणि एफ. मेरीफील्ड, " दि फिशस ऑफ Willamette रिव्हर सिस्टिम इन रिलेशन टू पोल्यूशन " स्युवेज वर्क्स जर्नल, १९, ५, ९५८ ( सप्टेंबर १९४७)

६) साऊथ गेट, बी. ए., " ट्रीटमेंट अँड डिस्पोजल ऑफ इंडस्ट्रियल वेस्ट वॉटर्स, " लंडन. हिज मॅजेस्टीज स्टेशनरी ऑफिस, १९४८, पान २५.



: १८ :

# अंशत: उपचार केलेली औद्योगिक अपशिष्टे नाल्यात सरळ सरळ सोडून देणे

शहराच्या हद्दीबाहेरील जागांवर सुरू केलेल्या उद्योगांना अनेक वेळा पाणीं इतके जास्त लागते कीं त्यांना आपला स्वत:चाच पाणीपुरवठा विकसित करावा लागतो आणि त्याचप्रमाणे आपल्या अपशिष्टांची विल्हेवाट लावावी लागते. पुरेशा जागेची तरतूद करण्यासाठी आणि नागरी करातून सुटका करून घेण्यासाठी उद्योगाला द्यावे लागणारे हे एक मोलच आहे. अर्थात अशीही काही तुरळक उदाहरणे आहेत जेथे जवळपासच्या उद्योगातील अपशिष्टे सामाऊन घेण्यासाठी शहरी मलव्यवस्था विस्तृत करावी लागली; परंतु सामान्यत: जवळच्या विहिरीतून अगर नदीतून आपल्या संयंत्र–प्रक्रियेला लागणारे पाणी उद्योगाकडून वापरले जाते आणि प्रवाहाचा वापर अगर त्याच्या परिस्थितीचे काळजीपूर्वक विश्लेषण करून आपली अपशिष्टे त्याच प्रवाहात प्रस्त्रावित करण्यात येतात. मोठ्या संयंत्रातील अपशिष्टे इतकी जास्त प्रदूषित झालेली असतात की, नाल्यात सोडण्यापूर्वी त्यांच्यावर कोणते तरी उपचारण करावे लागते. अपशिष्ट जलाच्या मोठ्या राशीवर उपचार करणे खर्चाचे असल्याने संग्राही पाण्याच्या संरक्षणाच्या अनेक पर्यायी पद्धतींचे उद्योगांनी अन्वेषण करावे. जरी अशा अभ्यासास काळखाऊ सर्वेक्षणाची, विश्लेषणाची आणि मूल्यमापनाची जरूरी असली, तरी अपशिष्ट–उपचारणावर अमाप पैसा खर्च केल्याशिवाय उद्योगाला या उपायांना बगल देता येणार नाही. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास, उद्योगाला आपल्या अपशिष्टाविषयी जितकी अधिक माहिती असेल तितका प्रत्यक्ष उपचारणावरील खर्च कमी लागेल.

## अंशतः उपचार करून अपशिष्ट नाल्यात प्रस्त्रावित करण्याचे एक व्यावहारिक उदाहरण :–

वाहित मलोपचाराची सुविधा नसलेल्या गिरण्यांच्या एका लहान कारखाने असलेल्या गावातील एक मोठी वस्त्रनिर्माण करणारी गिरणी नदीकाठावर उभारली आहे. ज्या नाल्यात गिरणीतील अपशिष्ट सोडण्यात येत होते त्याचे C वर्गीकरण केले होते कारण त्या नाल्याचा सर्वोत्तम वापर होण्यासाठी मासे जिवंत राहणे आवश्यक होते. गिरणीच्या अनुप्रवाही दिशेस दोन धरणे बांधून पाणी अडविले होते आणि परिणामतः उपद्रवी परिस्थिति निर्माण झाली होती. संयंत्राच्या थोडे वर नाल्यातून गिरणीस पाण्याचा पुरवठा करण्यात येत होता. तेथील जलाशय जेव्हा पूर्ण भरे तेव्हा त्यात सुमारे एक हजार दशलक्ष ( Billion ) गॅलन पाणी साठत असे. नाल्याच्या वर्गीकरणाप्रमाणे त्याची परिस्थिती गिरणीने राखावी असा शासनाचा आदेश होता. त्यामुळे नाल्यात थेट अपशिष्ट सोडण्यापूर्वी त्यावर संयंत्रात उपचार करण्याखेरीज गत्यंतर नव्हते. या उदाहरणातल्याप्रमाणे मोठ्या प्रमाणात असलेल्या अपशिष्टांवर व्यापक उपचार करणे हे अनेक वेळा आर्थिकदृष्ट्या आत्मघातकी होऊ शकते. म्हणून खर्च किमान व्हावा आणि त्याचवेळी शक्य तितकी उच्च कार्यक्षमता प्राप्त व्हावी, यासाठी आयोजन, संशोधन, आणि विश्लेषण व्यापक प्रमाणात करावे लागते. गिरणीतील अपशिष्टाचा BOD कमी करण्याचा उपाय म्हणून जैवी उपचारण व वातन करण्याच्या शक्यतेचे निर्धारण करण्यासाठी शासनाने गिरणीला सहा महिन्याची सवलतीची मुदत दिली होती.

या समस्या लक्षात ठेवून वस्त्रनिर्मिती गिरणीने लेखकाला अन्वेषणावर देखरेख ठेवण्यास व प्रायोगिक संयंत्रावरील सहा महिन्यांच्या अभ्यासातील निष्कर्षांचे विश्लेषण, अर्थबोधन ( interpretation ) आणि मूल्यांकन करण्यास पाचारण केले. व्यवस्थापकांना निश्चित शिफारशी करता याव्या म्हणून लेखकाने इनप्लँट आणि नदीसंबंधीही अभ्यास केला आणि खालील गोष्टीचा व्यवस्थापकावर परिणाम व्हावा म्हणून त्यांच्याशी चर्चा केली.

---

* यापुढील कोष्टक १८–१ पान नंबर ३२२ वर पाहणे.



आकृति १८–१ प्रवेशी अपशिष्टाच्या pHचे अपशिष्ट–उपचारण–अभियंता निरीक्षण करत आहे.

( पान ३२४ वर पाहणे )

**कोष्टक**

**प्रायोगिक संयंत्राच्या सहा महिन्याच्या**

| अपशिष्ट-प्रवाह वेग द. मि. स. गॅलन | धारक द्रोणीतील अवरोधन, तास | वातन टाकीतील अवरोधन, तास | अंतिम अवस्थापन द्रोणीतील अवरोधन, तास | हवेचा वेग, द. मि. स घनफूट | दर BOD पौंडास अदाजी घनफूट हवा | चार तासात गोळा केलेल्या संमिश्रांची संख्या | २०°C तपमानातील अनुपचारित अपशिष्टाचा BOD ppm |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | २७ | १२ | ८ | ९० | ५४०० | ६८ | ८३४ |
| २ | १० | १२ | ८ | ९० | ५४०० | १६ | ८४० |
| २ | १० | १२ | ८ | ६० | ३६०० | १८ | ७९८ |
| ३ | ६ | ८ | ५ $\frac{1}{2}$ | ६० | २६५० | १९ | ८४२ |
| ४ | ५ $\frac{1}{4}$ | ६ | ४ | ६० | २४०० | २२ | ७५० |
| ६ | ३ | ४ | २ $\frac{3}{4}$ | ८६–९५ | २१३० | ३० | ८२२ |
| ४ | ५ $\frac{1}{4}$ | ६ | ४ | ६० | २०६५ | १६ | ८७२ |

* सुमारे ९.० इतका pH कमी करण्याकरता–

१८–१

**परिचालनाची संयुक्त माहिती–**

| प्राथमिक अवस्थापित अपशिष्टाचा BOD | | वातनित अपशिष्टाचा BOD | | अंतिम अवस्थापित अपशिष्टाचा BOD | | (वातन करण्यापूर्वी) दररोज वापरलेली $CO_2$–पौंड * | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ppm | लघुकरण % | ppm | लघुकरण % | ppm | लघुकरण % | किमान | सरासरी | कमाल |
| ३७४ | ५६.५ | १९८ | ७६.३ | २१० | ७४.८ | ० | २ | १० |
| ७१० | १५.५ | १९३ | ७७.१ | १९६ | ७६.९ | ० | १० | ६२ |
| ७११ | १०.९ | १९४ | ७५.९ | २३१ | ७१.७ | ३ | १७ | ५२ |
| ७०१ | १५.५ | ३३० | ६०.९ | ३३३ | ६०.४ | १२ | ४८ | १२१ |
| ७०० | ६.७ | ३५० | ५३.८ | ३४६ | ५३.९ | २७ | ४७ | ७६ |
| ७३० | ११.२ | ४०२ | ५१ ७ | ४१९ | ४९.० | ४३ | ६५ | ९४ |
| ७५५ | १३.४ | ५८३ | ३३.१ | ५६९ | ३४.८ | नाही | नाही | नाही |

अपशिष्ट–उपचारण हे उत्पादनाचे एक अभिन्न अंग आहे असे समजावे कमीत कमी खर्चात उपभोक्त्याला समाधान देईल असा पदार्थ निर्माण करणे हे उद्दिष्ट असते. तसेच अप–शिष्टाच्या विल्हेवाटीत किमान खर्चात संग्राही नदीचा दर्जा टिकून राहण्यासाठी निःस्त्रावाची प्रदूषणकारी अवस्था कमी करणे हा उद्देश असतो. अपशिष्ट–उपचारणाला बाजत्रीपेक्षा जास्त खर्च येणे अगर गरजेपेक्षा तो जास्त असणे हे योग्यप्रकारे धंदा चालविण्याच्या नियमाविरूद्ध होते; त्याचप्रमाणे अपशिष्टाच्या अपुऱ्या उपचारणावरून धंद्यातील असमाधानकारक निर्णय–शक्तीचे दर्शन होते, कारण लोकविरोधामुळे विक्रयास प्रतिरोध निर्माण होतो आणि ते एक वाईट सामाजिक दृश्य बनते. म्हणून अपशिष्ट–उपचारण योजनेत नदीतील प्रदूषणकारी भार पुरेशा प्रमाणात कमी करता येईल असा, किमान वातन, उदासीनीकरण आणि टाकीची धार–कता यांचा अंतर्भाव करण्यात आला पाहिजे.

प्रदूषण कमी करण्याच्या या तीन उपायांशिवाय वातन होत असताना काही सूक्ष्म जीव विकसित करता येतील; अपशिष्टातील सेंद्रीय द्रव्याचे विघटन करण्यास त्याची मदत होईल. परंतु या जीवाणूना योग्य प्रकारचे पर्यावरण लागते; हवा व pH हे त्यातील दोन महत्वाचे घटक असतात. परंतु पुरेशी विलीन हवा टिकविणे आणि जवळ जवळ उदासीन pH टिकवून ठेवणे यासाठी खर्च करावा लागतो. उदाहरणार्थ, लागणाऱ्या अवरोधन कालाच्या प्रमाणावरून धारक टाक्यांचा आकार ठरविता येतो.

**कोष्टक १८–२**

**वस्त्र निर्मिति गिरणीतील अपशिष्टे * सोडण्यात आलेल्या नदीतील नमुन्यांचे निष्कर्ष –**

| केंद्र क्रमांक आणि स्थान | प्रवाह द. लि. प्र. दि. गॅलन | विलान ऑक्सिजन | | तपमान °C | २० °C तपमानातील ५ दिवसांचा BOD, ppm | pH | दुसऱ्या केंद्रापर्यंत प्रवाहास लागणारा वेळ | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | ppm | संपृक्ति % | | | | मिनिटे | सचांयित मिनिटे |
| ( नमुना घेण्याचे दिवस, ११ ते १४ ऑक्टोबर † ) | | | | | | | | |
| १ जल संयंत्र | १५.४ | ८.९ | ८९ | १६ | ०.७५ | ६.८ | ० | ० |
| २ जलप्रवेशाच्या किंचित खाली | १५.४ | ३.७ | ४२ | २२ | ४०० | १०.० | ७५ | ७५ |
| ३ पहिला बंधारा | १५.४ | ० | ० | २३ | १८० | ७.४ | ३७५ | ४५० |
| ४ पूल | १५.४ | ०.३ | ३.२ | १८.५ | १६० | ७.३ | ९० | ५४० |
| ५ दुसरा बंधारा | १५.४ | ०.९ | १९ | १६ | १४२ | ७.४ | ७२० | १२६० |
| ६ पूल | १५.४ | ०.३ | ३ | १५ | १२२ | ७.[illegible] | ७५ | १३३५ |
| ७ पूल | १५.४ | १.६ | १५.७ | १५ | १०० | ७.४ | १३० | १४६५ |
| (नमुना घेण्याचे दिवस, १८ ते २१ आक्टोबर ‡ ) | | | | | | | | |
| १ जलसंयंत्र | १६.० | ८.९ | ८४ | १३ | ०.५० | ७.१ | ० | ० |
| २ अपशिष्ट प्रवेशाच्या किंचित खाली | १६.० | ३.८ | ४१ | २० | ३२० | १०.३ | ७५ | ७५ |
| ३ पहिला बंधारा | १६.० | ०.१§ | ० | १९ | २५८ | ७.९ | ३७५ | ४५० |
| ४ पूल | १६.० | ०.० | ० | १७ | २०२ | ७.६ | ९० | ५४० |
| ५ दुसरा बंधारा | १६.० | २.४ | २३ | १३.५ | १७१ | ७.४ | ७२० | १२६० |
| ६ पूल | १६.० | ०.८ | ७.४ | १२ | १३१ | ७.४ | ५ | १३३५ |
| ७ पूल | १६.० | ३.६ | ३३.३ | १२ | १४५ | ७.५ | १३० | १४६५ |
| (नमुना घेण्याचा दिवस, १६ नोव्हेंबर) | | | | | | | | |
| १ अपशिष्ट प्रवेशाच्या किंचित खाली | १४ | ८.० | ९४ | २४ | २८० | १०.७ | ० | ० |
| २ अपशिष्ट प्रवेशाच्या किंचित खाली | १४ | ४.६ | ५३.३ | २२ | २४० | १०.४ | ३० | ३० |
| ३ पहिला बंधारा | १४ | ०.० | ० | २०.५ | २०० | ८.० | ३७५ | ४०५ |
| ४ बंधाऱ्याच्या किंचित खाली | १४ | ०.० | ० | १८० | १९० | ७.२ | ६० | ४६५ |

* लागोपाठ ४ दिवस नाल्यातून घेतलेल्या नमुन्यांचे हे सर्व आकडे सरासरी दाखवितात.

† पहिल्या केंद्राच्या खालच्या बाजूस इमहॉफ टाकीतील वाहितमलाच्या क्लोरिनीकरणासह.

‡ पहिल्या केंद्राच्या खालच्या बाजूस इमहॉफ टाकीतील वाहितमलाचे क्लोरिनीकरण न करता.

§ एका नमुन्यात ०.४ ppm दिसून आला; तीन्हीत ०.० ppm दिसून आला.



आकृति १८–२ वस्त्रनिर्मिति गिरणीतील अपशिष्टांवर उपचार करण्याच्या पद्धतींची चाचणी करण्याकरता बांधलेल्या प्रायोगिक संयंत्राचे पार्श्व दृश्य –

## १८-१ कार्यपद्धती -

वस्त्रनिर्मिति गिरणीतील प्रायोगिक संयंत्रात धारक द्रोणी, वातन टाकी आणि अंतिम अव-स्थापन टाकीचा समावेश होता. या साधनांच्या योगे शिवाय जैवी ऑक्सिकरण, यांच्यायोगे-वाजवी खर्चात-नदीचे " मत्स्यविषयक " वर्गीकरण टिकवता येईल अगर कसे हे निश्चित कर-ण्यासाठी सहा महिने परिचालन करावे लागले. चार स्वतंत्र अन्वेषणांत या षण्मासाच्या अध्ययनाचे खालीलप्रमाणे विभाजन करण्यात आले.

१) प्रायोगिक संयंत्राची कार्यक्षमता.

२) संग्राही जलाची वैशिष्ठ्ये.

३) अपशिष्टांची शक्ति कमी करण्यासाठी अविलेय पांजणीकरण करण्या ( sizing ) ऐवजी विलेय पांजणीकरण करणे.

४) वैयक्तिक अपशिष्ट-नळातील राशी आणि भार.

संपूर्ण कालात प्रायोगिक संयंत्र अखंड चालू ठेवले होते. हवा आणि अपशिष्टाचे प्रमाण बदलत होते, आणि अशा उपचारणाच्या कार्यक्षमतेची कसोटी म्हणून BOD चा उपयोग कर-ण्यात आला. को. १८ १ मध्ये निष्कर्ष सादर केले आहेत. आ. १८-१ ते १८-४ मध्ये संयं-त्राची छायाचित्रे दाखविली आहेत.

आक्टोबरच्या मध्यावर दोन आठवडे नदीमधून नमुने घेण्यात आले आणि नंतर नोव्हेंबर मध्यें ते पुनः एक दिवस घेतले. नदीतील प्रवाह मुद्दाम द. दि. १५ गॅलन ठेवला होता व त्या-करता जलाशयावरील परिवाहाचे नियंत्रण केले होते. को. १८-२ मध्ये निष्कर्ष सादर केले आहेत. ऑक्सिजनचे नमन वक्र आणि BOD ची रूपरेखा आ. १८.५ मध्ये आरेखित केली आहे. नदीतील गेल्या ५ वर्षांतील सरासरी मासिक प्रवाह को. १८-३ मध्यें दिले आहेत.



आकृति २८–३ वातन टाकीतील अपशिष्टात पोषण होत असलेल्या एकूण हवेची नोंद करणाऱ्या वायुवेगमापीचे (anemometer) निरीक्षण परिचालक करत आहे.



आकृति १८–४ वरून पाहिलेली वातन द्रोणी. चित्राच्या वरच्या बाजूस अंतिम अवस्थापन द्रोणी आहे.

स्टार्चच्या बदली दुसरा पदार्थ वापरण्याविषयीचे प्रयोग लेखकाने केले: कॅर्बोक्सी मेथिल सेल्यूलोज आणि पेन्फर गोंद ३०० या स्टार्चच्या बदली वापरावयाच्या दोन पदार्थांची सर्वसाधारण वापरण्यात येत असलेल्या पर्ल स्टार्चशी तुलना करण्यात आली. को १८–४ मध्ये निष्कर्ष दिले आहेत व आणखी निष्कर्ष को. १८–५ मध्ये दिले आहेत.

**कोष्टक १८–३**

**वस्त्र निर्मिति गिरणीतील अपशिष्ट सोडण्यात आलेल्या नदीच्या प्रवाहाची राशि–**

| महिना | दररोजचा सरासरी प्रवाह | | | द. दि. द. ल. गॅलन | |
|---|---|---|---|---|---|
| | १९५४ | १९५३ | १९५२ | १९५१ | १९५० |
| जानेवारी | १६७.२ | ७३.४ | ५४.७ | ४४.५ | ७३.८ |
| फेब्रुवारी | ५५.० | ९८.५ | ७०.० | ५२.९ | ६२.५ |
| मार्च | ७१.० | ८०.० | १५१.१ | ७६.४ | ७०.६ |
| एप्रिल | ७७.१ | ४८.६ | ९३.८ | ६२.७ | ६८.६ |
| मे | ५६.० | ६९.६ | ५६.० | ३७.३ | ४९.३ |
| जून | ३७.३ | ६७.५ | ३८.८ | ४८.२ | ६८.० |
| जुलै | २६ ० | ३०.९ | ३०.५ | २५.२ | ६३.१ |
| ऑगस्ट | २८.६ | २६.५ | ४०.८ | २८.३ | ३५.९ |
| सप्टेंबर | १०.६ | २३.८ | २७.७ | ३४.२ | ४८.४ |
| ऑक्टोबर | ८.३* | २४.७ | २६.५ | २२.० | ४७.७ |
| नोव्हेंबर | ११.६* | २७.७ | ३२.० | ३६.८ | ३८.१ |
| डिसेंबर | २३.३* | ७०.१ | ४१.४ | १४५.१ | ८१.० |
| रोजची सरासरी | ४६.९ | ५३.४ | ५५.३ | ५१.१ | ५८.९ |

* अंदाजी

कोष्टक १८–४

स्टार्चच्या ऐवजी दुसरा पदार्थ वापरण्याविषयी केलेल्या प्रयोगांचे निष्कर्ष –

| पांजणीकरण संयुग ‡ | तयार करण्याची पद्धत | प्रयोगशाळेतील BOD चे अध्ययन | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | BOD (५दिवस, २०°C) | | BOD १०दिवस. २०°C | |
| | | ppm | % लघुकरण | ppm | % लघुकरण |
| पर्ल स्टार्च (१००%) | ऱ्होझाइमसह १६०°F तपमानात ४ तास तापविले; अंतिम द्रावण ०.१% | ८०० | | ८७४ | |
| ६५% पर्ल स्टार्च ३५% कॅर्बॉक्सीमेथील सेल्यलोज | तीच | ३३६ | ५८.३ | ५२५ | १० |
| पेन्फर गोंद ३०० (१००%) | तीच | ३६९ | ५३.९ | ५११ | ४१.५ |
| ६५% पर्ल स्टार्च, ३५% कॅर्बॉक्सिमेथील सेल्यूलोज | २०५ °F तपमानात २० मिनिटे तापविण्यात आली. एंझाइम्स मिसळली नव्हती. अंतिम द्रावण ०.१ % | २८३ | ६४ ६ | २६५ | ६९.७ |
| पेन्फरगोंद ३०० (१०० %) | तीच | ३२१ | ६०.० | ३१८ | ६३.७ |

**कोष्टक १८–५**

**स्टार्चच्या ऐवजी दुसरा पदार्थ वापरण्याच्या संबंधात आणखी केलेल्या प्रयोगांचे आणखी निष्कर्ष**

| पांजणीकरण संयुग | २० °C तपमानातील BOD* ppm | | | |
|---|---|---|---|---|
| | ५ दिवस | १० दिवस | १५ दिवस | २० दिवस |
| ६१ % पर्ल स्टार्च<br>३५ % CMC (०.१% द्रावण) | ३८६ | ४८३ | ६०० | ४५० † |

* सरासरी: ४ बाटल्या ( २ तनुकरणे, दुहेरी नमुने) दररोज.

† BOD च्या व्याप्तीत नमुने अपुरे.

**कोष्टक १८–६**

**गिरणीतील अपशिष्ट–नळाच्या निर्गमद्वाराजवळ BOD करता चाचण्या –**

| अपशिष्ट-नळ | दिनांक | प्रवाह, द. दि. द ल. गॅलन | BOD | | पांजणीकरण संयुग, प्रकार आणि % |
|---|---|---|---|---|---|
| | | | ppm | पौंड/दिवस | |
| क्र. ४ चे अपशिष्ट ( विपांजणीकरण नळ) | ८/२२/२३/५५ | २.४९ | १०४० | २१६०० | स्टार्च (१००%) |
| क्र. ४ चे अपशिष्ट ( विपांजणीकरण नळ) | १२/९/५५ | ७२.४९* | ८१३ | ७ १६९०० | शुद्ध स्टार्च (६०%) CMC आणि स्टार्च +पेन्फर गोंद ४०% |

* नक्की प्रवाह निश्चित केला नव्हता.

कोष्टक १८–७

२२–२३ ऑगस्टला २४ तासांकरता मापन केलेल्या अपशिष्ट प्रवाहाच्या† आणि BOD भाराच्या मापनांचे निष्कर्ष –

| क्रमांक | अपशिष्ट नळ | प्रवाह | | BOD | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | द. दि. द. ल. गॅलन | एकूणाचो % | ppm | एकूणाचो % | पौंड/दिवस |
| १ | रंग | १ ७३५ | २८.२ | ३२० | १३ ०२ | ४६३५ |
| २ | स्टार्च | ०.९५० | १५.४५ | ४४० | ९.८१ | ३४८५ |
| ३ | कियर (विरंजन) | ०.९७१ | १५.८० | ७२० | १६.४० | ५८३० |
| ४ | विपांजणीकरण | २.४९० | ४०.५० | १०४० | ६०.८० | २१६०० |
| व्यक्तिगत मापन केलेल्या (४ नळांची बेरीज) एकूण | | ६.१४६ | | | | ३५५५० |
| मापन केलेल्या निःस्त्रावाच्या बेरजा | | ६.०९ | | ६३० | | ३२००० |

कोष्टक १८–८

मासे पकडण्याच्या ( C ) * वर्गाकरता दर्जाची मानके

| घटक | विनिर्देश |
| --- | --- |
| तरंगणारे घनपदार्थ, तेले, अवस्थापनशील घनपदार्थ, अवमल निक्षेप | सहज दिसणारी आणि वाहितमलाशी संबंध असलेली अपशिष्टे आणि संग्राही पाण्यातील या घटकांच्या राशी, प्रस्त्रावित केलेल्या अपशिष्टाबरोबर समुचित प्रमाणात तनुकरण आणि मिश्रण होण्याची संधी मिळाल्यावर, ज्यामुळे मापता येण्या– इतक्या वाढतात अशा औद्योगिक–––––अगर अन्य अपशिष्टांना (परवानगी) नाही. |
| pH | ६.० व ८.५ च्या दरम्यान मर्यादांत राहू शकतो, मात्र दलदल युक्त पाण्यात तो ५.० व ८.५ च्या दरम्यान असावा. |
| विलीन ऑक्सिजन | २ ppm पेक्षा कमी नसावा. |
| विषाक्त अपशिष्टे, हानिकारक पदार्थ, रंगीत अगर अन्य अपशिष्टे, अथवा तापविलेले द्रव्य | जर हे पदार्थ एकटे अगर अन्य पदार्थाशी अथवा अपशिष्टाशी संयोग झालेले असे या वर्गाशी जोडलेल्या विशिष्ट पाण्याकरता जलप्रदूषण नियंत्रण प्राधिकारिणीने निर्धारित केल्याप्रमाणे मासें जिवंत राहण्यास हानिकारक होतील अथवा पाण्याच्या अन्य उत्तम उपयोगास बाधा होईल अशा पुरेशा राशीत अगर तप– मानात असतील तर, त्यांना परवानगी नाही. |

* शासकीय नियमाप्रमाणे मासे जिवंत राहण्यास, औद्योगिक आणि शेतीच्या वापरास व कमी दर्जाचे पाणी लागणाऱ्या अन्य कार्यास हे पाणी उपयुक्त असते.

## गिरणीतील अपशिष्ट –

नळांतून नमुने घेण्यात आले आणि फक्त स्टार्च वापरली तेव्हा आणि स्टार्च बदली (अन्य) पदार्थ वापरले तेव्हा त्यांचे विश्लेषण केले व त्याचे निष्कर्ष को. १८. ; त सादर केले आहेत.

सर्व चारी अपशिष्ट नळसमूहांचे आणि एकत्रित निःस्त्रावाचे २२ ऑगस्ट या सामान्य परिचालनाच्या दिवशी २४ तास सर्वेक्षण करण्यात आले; प्रत्येकाचा प्रवाह आणि BOD को. १८–७ मध्ये दिले आहेत. नदीच्या ह्या दर्जाच्या मानकांचे वर्णन को. १८–८ मध्ये केले आहे.

## १८–२ नद्यांचा अभ्यास –

गिरणीच्या खालच्या बाजूस नदीच्या ऑक्सिजन वक्रावरून असे दिसून आले कीं ३ ऱ्या केंद्रावर पहिल्या बंधाऱ्याजवळ नमनाचा (sag) तळ होता (आ. १८–५ पहा). त्या बिंदूच्या खाली नदीत कांहीशी सुधारणा दिसून आली. आरेखित केलेल्या निष्कर्षावरून असे निदर्शनास येते कीं, गिरणीच्या पातमुखा ( outfall ) पासून पहिल्या बंधाऱ्यापर्यंत नदीचा पसारा चिंताजनक ( critical ) होता. हे अंतर फक्त सुमारे २ मैल होते आणि सरासरी प्रवाह काल सुमारे ४५० मिनिटे अथवा साडेसात तास होता असे दिसून आले. ह्या दोन मैलांच्या लांबीत BOD झपाट्याने कमी होत गेला आणि त्यावरून ऑक्सिजनचा वापर जलद गतीने होत असल्याचे दिसून आले. आठ दिवसाच्या सर्वेक्षणातून निर्धारित केलेला सरासरी BOD ( आकृति




**आकृति १८–५ या प्रकरणात चर्चिलेली नदीतील विलीन ऑक्सिजन आणि BOD ची रूपरेखा –**

१८–५), गिरणीतील निःस्त्रावाच्या जागेच्या किंचित खाली, ३६० ppm होता आणि बंधाऱ्याजवळ तो फक्त २१९ ppm होता. याचा अर्थ असा होतो कीं, ह्या चिंताजनक पत्रात BOD चे १४१ ppm इतके लघुकरण घडून आले. जर नदीतील प्रारंभिक BOD, १४१ ppm पर्यंत कमी करता आला आणि त्याच शीघ्र गतीने सेंद्रियकरण कमी करता आले तर पहिल्या बंधाऱ्याजवळ सैद्धांतिकरित्या यातील काहीही शिल्लक राहणार नाही.

दररोज ०.३ ते ०.६ इतक्या विऑक्सिजनीकरणाचा संबंध गिरणीतील पातमुख आणि पहिला बंधारा, यांच्या दरम्यानच्या सेंद्रीय विघटनाशी लावता येईल. तिसऱ्या केंद्राजवळ ऑक्सिजनचा पूर्णपणे अभाव असल्याने, जरी त्या क्षेत्रातील पुनर्वातनचा वेग अचूकपणे निर्धारित करता आला नाही तरी. कांही गोष्टी गृहीत धरून गणन करून तो अत्युच्च होता हे उघड झाले. या अंदाजी $\overline{K}_1$ व $\overline{K}_2$ मूल्यांचा वापर केल्याने ६० ते ७० प्रतिशत् BOD चे लघुकरण झाले आणि २ ppm विलीन ऑक्सिजन टिकून राहण्यासाठी त्याची आवश्यकता होती असे दिसून आले. हे लेखाचित्रिय पद्धतींने आ. १८–५ मध्ये अभिव्यक्त केले आहे. पहिल्या बंधाऱ्याच्या किंचित वरच्या बिंदूजवळ शून्य BOD मिळावा म्हणून BOD वक्राशी एक समान रेघ काढली. दुसऱ्या केंद्राजवळ सुमारे १२० ppm BOD ( ३६० ppm च्या ऐवजी) हवा आहे, म्हणजेच BOD चे ९७ प्रतिशत लघुकरण घडून यावयास हवे. म्हणून संख्यात्मकरित्या आणि लेखाचित्रियरीत्या अशा दोन्ही पद्धतीने असे दाखविता येईल की. तिसऱ्या केंद्राजवळ २ ppm विलीन ऑक्सिजन टिकून राहण्यासाठी BOD त ६० ते ७० प्रतिशत घट करता आली पाहिजे. प्रवाह मंद असण्याच्या काळात उच्च प्रमाणात ऑक्सिजनीकरण झालेले स्वच्छ तनुकृत पाणी असणे हे BOD चे काही प्रमाणात लघुकरण होण्याच्या समतुल्य असते असे मानता येईल. उदा. विऑक्सिजनीकरणाचा वेग सामान्य असताना पहिल्या दिवशी ५ दिवसांचा सुमारे BOD ५ पौंड विलीन ऑक्सिजनचा वापर करील. पूर्वी कथन केल्याप्रमाणे, सध्याचा रोजचा १५ द. ल. गॅलन किमान प्रवाह असताना नदीचा अभ्यास करण्यात आला. स्वच्छ पाणी असणाऱ्या कोणच्याही अतिरिक्त प्रवाहामुळे नदीतील एकूण ऑक्सिजनच्या भांडारात साहजिकच वाढ होईल. प्रत्यक्षातील आकड्यांचा उपयोग करून केलेल्या खालील संगणनावरून वरील बाजूच्या स्वच्छ पाण्याच्या साठ्याच्या मौलिकतेची आणि परिणामतः गिरणीच्याखाली उपलब्ध असलेल्या मंद प्रवाहात होणाऱ्या वाढीची स्पष्टता ज्ञात होईल.

नदीतील तनुकरणाचा BOD च्या लघुकरणावरील परिणाम खालीलप्रमाणे असतो (ऑक्सिजन) दर गॅलनमध्ये ८.३४ पौंड पाणी असते ही गोष्ट ध्यानात ठेवून सध्याच्या नदीतील परिस्थितीत ( अप्रवाही साठा १०००००० गॅलन, उन्हाळयातील किमान प्रस्त्राव द. दि.

१५ द. ल. गॅलन) आपणाला असे दिसून येईल कीं,

द. दि. १५ द. ल. गॅ. × ८.३४ पौं. / गॅ. × अपरप्रवाही ८ ppm DO
= ∽ १००० पौंड $O_2$ / दिवस उपलब्ध होईल.

दर दिवशी ०.१ ह्या विऑक्सिजनीकरणाच्या सामान्य वेगाने हा $O_2$, पुनर्वातन सोडून २०°C तपमानातील ५ दिवसाचा द. दि. ३३०० पौंड BOD असलेल्या प्रदूषण भाराची, काळजी घेईल. (गंभीर प्रवाह असताना येथे पहिल्या दिवशी ५ दिवसाच्या BOD पैकी फक्त ३० टक्क्याचेच समाधान होईल असे गृहीत धरले आहे.)

तनुकरणात वाढ करून नदीची परिस्थिती बदलण्याने (अपरप्रवाही साठ्याकरिता १५००००००० गॅलन, उन्हाळ्यातील किमान प्रस्राव द. दि. २२.५ द. ल, गॅलन) आपणास नदीत, द दि. २२.५ द. ल. गॅ. × ८.३४ पौं / गॅ. × अपरप्रवाही ८ ppm BOD
= ∽ १५०० पौंड $O_2$ / दिवस, उपलब्ध होतो.

दररोजच्या विऑक्सिजनीकरणाच्या ०.१ या सामान्य वेगाप्रमाणे पुनर्निवातन सोडून, हा $O_2$ सुमारे ५००० पौंड BOD असलेल्या प्रदूषणाच्या भाराची काळजी घेईल. म्हणून प्रवाह–मानकांची पूर्तता करण्याकरता लागणाऱ्या ७० प्रतिशत् (२३००/३३००) लघु-करणाऐवजी फक्त २३०० ५००० अथवा सुमारे ४६ टक्के लघुकरण करण्याची गरज पडेल. ह्याचाच अर्थ असा कीं, ह्या तनुकरणाचा परिणाम ढोबळपणे BOD च्या २४ प्रतिशत् लघु–करणाच्या समतुल्य होईल.

## १८–३ प्रायोगिक संयंत्रावरील निष्कर्ष–

धारक, वातन, आणि अंतिम अवस्थापन द्रोण्या एकत्रित केलेल्या संयंत्रात ३५ ते ३७ टक्के BOD चे निष्कासन झाल्याचे दिसून आले. सहा महिन्याच्या कालावधीत चार तासाचे एकूण १८९ संयुक्त नमुने गोळा करण्यात आले आणि त्यांचे विश्लेषण केले. धारक द्रोणीतील निर–णीच्या अपशिष्टाचा अवरोधन काल, अपशिष्टावर लागू केलेल्या वातनाची राशि, आणि pH च्या लघुकरणाची मात्रा (को. १८-१), यांच्यावर BOD च्या निष्कासनाची टक्केवारी अव–लंबून होती. १० तासापर्यंत अपशिष्ट साठवून ठेवून आणि द. मि. स ६० घन फूट या वेगाने वातन करून BOD चे एकूण लघुकरण ७१ टक्के करता आले. विल्हेवाटीचे इतर उपाय न करतासुद्धा उपचारणाची ही पद्धत स्वीकारणीय होऊ शकेल. तथापि, इतक्या मोठ्या प्रमाणात हवा आणि $CO_2$ चे उत्पादन करण्याकरता साधने बसविण्यास आणि त्यांची देखभाल करण्यास

जबर खर्च येईल. $CO_2$ चे प्राप्तिस्थान म्हणून बॉयलरमधील दूग्ध ( Fhu ) गॅस वापरता येण्याच्या आणि अपशिष्टांचे ऑक्सिजनीकरण करण्यासाठी कमीं वातन काल वापरण्याच्या शक्यतेचा गिरणीच्या चालकांनी जरूर अभ्यास करावा. जेव्हा अपशिष्ट २४ तास साठवून ठेविले तेव्हा वातनापूर्वी अगदी थोडा $CO_2$ लागला. नव्हे $CO_2$ ची जरूरीच लागली नाही असे आढळून आले. $CO_2$ शी उदासीनीकरण न करता ५ तासांचा धारक काल ठेवून व ६ तास वातन करून केलेल्या एका प्रयोगात BOD चे सुमारे ३५ प्रतिशत् लघुकरण झाले ( को. १८–१ ). अपशिष्टांच्या विल्हेवाटीकरता ६० ते ७० टक्के BOD चे लघुकरण करता येईल अशा अनेक योजना खालील प्रमाणे सुचविण्यात आल्या. प्रायोगिक संयंत्रणाच्या अभ्यासावर ह्या योजना आधारित केल्या आहेत.

१) २७ तास खांजण + ४०%करडया रंगाच्या मालावर बदली म्हणून विलेय सज्जीकरण ( sizing ),

BOD लघुकरण (५६.५%) + (१४.५%)* = ७१%

२) २७ तास खांजण + ४ तास वातन,

BOD लघुकरण (५६.५% ) + (१५% ) = ७१.५%

३) ३ तास धारक द्रोणी + ४ तास वातन + ४०%करडया रंगाच्या मालाच्या ४० टक्क्यावर बदली म्हणून विलेय सज्जीकरण,

BOD लघुकरण (१३.५%) + (३६.५% )+ (१४.५%) = ६४.५%

४) १० तास धारक द्रोणी + १२ तास वातन,

BOD लघुकरण (१०.९% ) + (६०.१%) = ७१%

५) धारक द्रोणी ६ तास + ८ तास वातन + करडया रंगाच्या मालाच्या ४० टक्क्यावर बदली म्हणून विलेय सज्जीकरण

BOD लघुकरण (१५.५%) + (४४.९) + (१४.५%) = ७४%

६) क्र. ३ व क्र. ४ च्या अपशिष्टांचे वियोजन* + २४ तास धारक खांजण + ४–१२ तास वातन,

BOD लघुकरण (५६.४×६१%) + (२३.५×६१%) = ~~७~~५०%

---

* विलेय सज्जीकरणाच्या लघुकरणावरून अंदाज केला.

* वियोजनाचे उपचारण करावयाच्या अपशिष्टाची राशि दर दिवशी सुमारे ६.२ द. ल. गॅलन पासून ३.४ द ल. गॅलन पर्यंत कमी होते पण १२ तासापर्यंत उरलेल्या अपशिष्टांच्या वातनाने BOD चे एकूण लघुकरण फक्त ८० टक्के. अथवा ०.८०×६१% = एकुणाच्या ५० टक्केच होते. लघुकरण ७० टक्के प्राप्त करणे आवश्यक असल्याने क्र. १ आणि क्र. २ या दोन्ही अपशिष्टांचे सुद्धा कांही प्रमाणात उपचारण केले नाही तर वियोजन व्यवहार्य होणार नाही.

७) १५००००००००० गॅलन अपरप्रवाही साठ्यात वाढ, म्हणजेच ३ महिन्याच्या उन्हाळ्याच्या मोसमात द. दि २२.५ द. ल. गॅलन किमान प्रवाह+जैवो-ऑक्सिकरण द्रोण्यापर्यंत दगडी फरशी बसविलेले चर (२७ तास अवरोधन)

BOD समतुल्य लघुकरण (२४%)+(५६.५%)
= ७० ८०.५ %

वरील पर्यायी पद्धतींचे काळजीपूर्वक विश्लेषण केल्यानंतर ७ क्रमांकाची योजना अधिक गुणी असल्याचे दिसून येते. अपरप्रवाही बाजूकडे पुरेशा प्रमाणात स्वच्छ पाणी उपलब्ध असल्याने ( को १८-३ ), मंद प्रवाहाच्या काळात नदीला पूरक म्हणून हे पाणी साठवून ठेवता येईल. हे कार्य वाजवी खर्चांत साध्य करता येईल आणि त्याचा भविष्यकालीन परिचालन खर्च अगदी कमी येईल, कदाचित खर्चच येणार नाही. नदीतील मंद प्रवाहाच्या कालात ह्या योजनेत केवळ तनुकरणच करता येईल असे नसून २७ तासपर्यंत ऑक्सिकरण द्रोण्यात अपशिष्टे रोखून धरण्याने BOD मध्ये ५६.५ टक्के लघुकरणही होईल. तनुकरणाने प्राप्त झालेल्या २४ टक्के BOD चे समतुल्य लघुकरणात मिळविल्यानंतर एकूण उपचारणात BOD च्या सुमारे ८० टक्के लघुकरणांच्या समतुल्य लघुकरण प्राप्त होईल.

को. १८-३ मध्ये दाखविल्याप्रमाणे स्वच्छ पाण्याचा काटकसरीने साठा करणे शक्य आहे असे आढळून आले, कारण पाच वर्षांच्या काळातील जानेवारी ते जुलै या महिन्यापैकी कोणत्याही ३ महिन्यांच्या काळातील साठ्यातून नदीत दररोज २२.५ द. ल. गॅलन पेक्षा जास्त प्रवाह टिकून राहण्याकरता लागणाऱ्या पाण्यापेक्षा जास्त पाणी उपलब्ध होते. पाच वर्षांच्या काळात जानेवारीपासून जुलैपर्यंतच्या काळात कोणत्याही महिन्यातील सरासरी प्रवाह द. दि. २६ द. ल. गॅलनपेक्षा कमी झाला नव्हता.

## १८-४ विलेय सज्जीकरणाचे प्रतिष्ठापन-

६५ टक्के पर्लस्टार्च आणि ३५ टक्के कॅर्बॉक्सिमेथिल सेल्युलोज (CMC) यांच्या मिश्रणामुळे शुद्ध पर्लस्टार्च वापरून प्राप्त होणाऱ्या ५ दिवसाच्या २०°C तपमानातील BOD पेक्षा ६४.६ टक्के कमी BOD मिळाला (को १८-४) शिवाय एक्झाइम्सची जरूरी पडली नाही. कारण गरम पाणी वापरून कपड्यावरील सज्जीकरण सहज धुवून टाकता येते. ३०० व्या श्रेणीतील पेन्फर गोंदाने ५ दिवसाच्या BOD चे ६० टक्के लघुकरण झाल्याचे दिसून आले. १० दिवसानंतर सुद्धा शुद्ध स्टार्च जेव्हा वापरण्यात येतो तेव्हा प्राप्त झालेल्या BOD च्या

मूल्यांच्यापेक्षा ६३.७ ते ६९.७ टक्के ती मूल्ये कमी असतात. २०°C तपमानातील ५–, १०–, आणि २०– दिवसांची BOD ची अंदाजी मूल्ये अंतिम प्रयोगात तपासण्यात आली (को. १८–५). विलेय सज्जीकारकातील ऑक्सीकरणात कोणच्याही प्रकारे विलंब (Lag) झाल्याचे दिसून आले नाही. प्रयोग शाळेतील BOD च्या निष्कर्षांना क्षेत्रिय अभ्यासात (को. १८–६) पुष्टी मिळाली; तथापि, त्यांचा फक्त एकच दिवसाच्या प्रत्यक्ष चाचणीशी संबंध आला. स्टार्च व CMC, अथवा ३०० व्या श्रेणीतील पेन्फर गोंद वापरण्याच्या फायद्यासंबंधी लेखकाच्या मनात अजिबात संदेह नाही. त्याचा वापर करून निश्चितपणे BOD चे लघुकरण



आकृति १८–६. वस्त्रनिर्मिति गिरणीतील अपशिष्ट, दगडाची फरशी बसविलेल्या उथळ चरातून, जैवी ऑक्सिकरण द्रोणीकडे वाहून जात आहे; तेथे ते किमान २४ तास साठवून ठेवण्यात येईल.

प्राप्त करावयाचे आहे. तथापि, विलेय सज्जीकारांना किंमत जास्त पडत असल्यामुळे येणारा परिचालन खर्च आणि टाकाऊ द्रव्याची वाढती टक्केवारी, यांचा बदलावर परावर्तक (deterrent) परिणाम होतो जर ह्या हरकतीवर मात करता आली तर कमी प्रदूषणकारक अपशिष्ट प्रस्त्रावित करता येईल.

या संयंत्रातून चार मुख्य अपशिष्टे तयार होतात; रंग, स्टार्च, कियरी (अथवा विरंजक) व डीसाईझ (को. १८-७). डीसाईझ अपशिष्ट हे त्यातील मुख्य गुन्हेगार अपशिष्ट असते व ते ६० ८ टक्के BOD भार आणि ४०.५ टक्के प्रवाहास साहाय्यक असते. अन्य तीन अपशिष्टे तुलनेने कमी BOD भार आणि प्रवाहास कारणीभूत होत असल्याने विशेषत: BOD चे उच्च प्रमाणात लघुकरण करावे लागत असल्याने, वियोजन शक्य होईल असे दिसत नाही. चाचणीच्या दिवशी (बांधपेटीने) मापन केलेला एकूण प्रवाह द दि. ६.०९ द. ल. गॅलन होता. एकूण BOD भारण रोज ३२००० व ३५५०० पौंडाच्या दरम्यान होते. अपशिष्ट अतिरंगीत व गरम होते, आणि त्याचा संयुक्त pH सुमारे ११ किंवा त्यापेक्षा जास्त होता. प्रवाहाची मानके (को. १८-८) नदीत टिकून राहण्यासाठी अपशिष्टावर उपचार करणे निश्चितच आवश्यक होते.

## शिफारशींची यादी खाली दिली आहे --

१) अपरप्रवाही बाजूवर १.५ अब्ज गॅलन पाण्याच्या साठ्याची तरतूद करावी. उन्हाळ्यातील परिचालनाच्या काळात त्यामुळे तीन महिन्याकरता द. दि. किमान २२.५ द. ल. गॅलन मंद प्रवाहाची तरतूद होईल.

२) किमान २४ तास साठवणाची तरतूद केलेल्या जैवी ऑक्सीकरण द्रोणीत दगडी फरशी बसविलेल्या उथळ चरातून गिरणीतील संपूर्ण अपशिष्ट वाहून न्यावे. द्रोणी ४ फुटापेक्षा खोल असू नये आणि कमीतकमी लघुपथ प्राप्त होईल अशी तिची संरचना असावी. ह्या दोन्हीही शिफारशींचे संयंत्रात पालन करण्यात आले होते जैवी ऑक्सीकरण द्रोणीत अपशिष्ट वाहून नेणारा उथळ दगडी फरशीं बसविलेला चर आ. १८-६ त दाखविला आहे आणि आ. १८-७ मध्ये द्रोणी भरण्यापूर्वी पहिल्या ऑक्सीकरण द्रोणीकडे जाण्याचा मार्ग दाखविला आहे.

३) पूर्ण वेळ काम करणाऱ्या अर्हताप्राप्त अभियंत्याला (ज्याला विशेषत: पाणी व अपशिष्ट यांच्यावरील उपचारणाचा अनुभव आहे) अपशिष्टाच्या उपचारणावरील पर्यवेक्षकाच्या हुदयावर नेमावे. अनुपचारित अपशिष्ट आणि ऑक्सीकरण द्रोणीतील निःस्रवण, या दोन्हींच्या तसेच नदीतील परिस्थितीसंबंधी प्रदूषणकारक वैशिष्ट्यांच्या रोजच्या नोंदी या अधि-

कान्याने ठेवाव्यात. गिरणीतील एका फाइलीत ही माहिती ठेवावी आणि दर महिन्याला ती जल प्रदूषण नियंत्रण मंडळाकडेही पाठवून द्यावी.

४) विलेय सञ्जीकारकांच्या वापरातील उणिवांच्यावर मात करण्याच्या उपायांचे सतत अन्वेषण करावे. ह्या सञ्जीकारकांच्या वापरामुळे प्राप्त झालेल्या BOD च्या अतिरिक्त न्यूनकरणाची, नाल्यातील जादा संरक्षण म्हणून, निकटच्या भविष्य काळात जरूरी भासेल.



आकृति १८–७ २४ तास वस्त्रनिर्मिति गिरणीतील अपशिष्ट साठवून ठेवण्याकरता बांधलेली जैवी ऑक्सीकरण द्रोणी. तिच्या उथळपणाकडे लक्ष द्या. ती ४ फुटापेक्षा जास्त खोल नाही. पार्श्वबाजूस वस्त्रनिर्मिति गिरणीची धुराडी आहेत.

५) वेळ उपलब्ध होईल आणि कर्मचाऱ्यामुळे शक्य होईल त्याप्रमाणे, दुय्यम उपचार-णाकरता लागणारी हवा व $CO_2$ च्या संबंधी अधिक माहिती मिळविण्याकरता प्रायोगिक संयं-त्राचे परिचालन चालू ठेवावे.

६) पहिल्या धरणामधून प्रवाह सर्वकाळ अखंड चालू राहील असा प्रयत्न करावा. पहिल्या तीन शिफारशी तात्काळ अंमलात आणाव्या.

अपशिष्टाचे अम्लीकरण करण्याकरता ( acidulate ) कार्बनडायऑक्साइडचा उपयोग न केल्यामुळे BOD चे लघुकरण कमी झाले. जेव्हा अनुपचारित उदासीन न केलेले सफाई गिरणीतील अपशिष्ट (finishi g-mill wastes ) फक्त ५ तास साठवून ठेवले आणि ६ तासापुरतेच त्याचे वातन केले तेव्हा, BOD चे सरासरी २८.५ प्रतिशत् लघुकरण घडून* आले. तसेच BOD च्या जवळजवळ १/३ (भागाचे) ११ व १२ च्या दरम्यान pH असताना, ऑक्सीकरण झाले हा एक प्रकारे चमत्कारच ( revelation ) होय. ऑक्सीकरणाच्या संबंधात कांही शंका होत्या ते ऑक्सीकरण रासायनिक होते की जैवी होते ही त्यातील मुख्य शंका होती. जेव्हा १० तास धारण काल आणि १२ तास वातन कालापर्यंत प्रायोगिक संयंत्रातील प्रवाह कमी करण्यात आला तेव्हा, प्रारंभिक pH सरासरी ११.३ होता; अशी वस्तुस्थिती असताना सुद्धा BOD चे ३८ प्रतिशत् लघुकरण झाले प्रवाह तितकाच असताना पूर्वी केलेल्या ( को. १८–१ ), ७१ प्रतिशत् BOD चे लघुकरण प्राप्त होण्याकरता दर दिवशी १७ पौंड $CO_2$ ची जरूरी लागली. ह्या गिरणीकरता $CO_2$ च्या पुरेशा राशीचा पुरवठा होण्यासाठी उपकरणे बस-विण्यास अंदाजे १५०००० डॉलर खर्च येईल. त्या शिवाय, $CO_2$ निर्माण करण्याकरता लाग-णारी शक्ति व इंधनाचा रोजचा खर्च सुमारे २७५ डॉलर होईल. या गिरणीसारख्या मोठ्या गिरणीला सुद्धा हा खर्च डोईजड होईल. तथापि अनेक उदाहरणात, पुरेशा अवरोधन कालाची तरतूद करून कार्यक्षमता थोडी कमी झाली तरी, गिरणींला उदासीनीकरणावरील भारी खर्च टाळता येईल; तसेच, पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे उदासीनीकरणाकरता दग्ध गॅस वापरणे हा BOD चे अतिरिक्त लघुकरण करण्याचा एक कमी खर्चाचा मार्ग अनेक वेळा असतो.

धारक द्रोणीत ११.३ वरून ११.१ पर्यंत pH किंचित खाली आला, परंतु वातकात ( कोष्टक १८–१० ) तो १०.० पर्यंत अधिक जलद गतीने उतरला. अपशिष्टातील दाहक क्षारतेशी हवेतील $CO_2$ मुळे होणाऱ्या प्रक्रियेतून निर्माण होणारे कार्बोनेट्स कमी झालेल्या pH ला जबाबदार असणे शक्य आहे. ( जलविश्लेषणात केलेल्या जीवाणूगणनेसारख्याच ) एकूण जीवाणुगणनेवरून असे दिसून आले कीं, दर मि. लि. ला ५ दशलक्षापेक्षा काहीसे जास्त अणुजीव ( microorganisms ) वातन द्रोणीत होते. ही संख्या १४ दशलक्षापासून १००००

* को. १८–१ व १८–९ ची सरासरी.

**कोष्टक १८-९**
**प्रायोगिक संयंत्रावर केलेल्या अभ्यासातील ज्यादा निष्कर्षांचा सारांश–**

| अपशिष्ट-प्रवाह द. मि. स गॅलन | धारक द्रोणी, तास | वातन द्रोणी, तास | हवेचे प्रमाण | | ४ तासांच्या संयुक्तांची संख्या | अनुपचारित अपशिष्टाचा BOD, ppm | २० °C तपमानातील ५ दिवसाच्या BOD चे लघुकरण | | | वापरलेला $CO_2$ पौंड/दिवस |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | दर मिनिटास घ.फूट | फू./पौंड BOD | | | प्राथमिक अवस्थापन टाकी % | वातन टाकी % | अंतिम अवस्थापन टाकी % | |
| ४ | $५\frac{1}{4}$ | ६ | ६० | २३७० | ३४ | ७६० | ६.७ | २२.१ | १९.१ | नाही |
| २ | १० | १२ | ६० | ४६५० | ४८ | ७६५ | ८.३ | ३८.८ | ३७.५ | नाही |

**कोष्टक १८-१०**
***वातनकालातील पर्यावरणाची परिस्थिती–**

| ४ तासाच्या सरासरी केलेल्या संयुक्तांची संख्या | तपमान °F | | | pH ची पातळी | | | | जीवाणु गणना (Plate counts) एकूण जीवाणू/वातन द्रोणीतील मिलि | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | माध्य | कमाल | किमान | अनुपचारित | प्रथम अवस्थापन | वातनित | अंतिम अवस्थापन | माध्य | कमाल | किमान |
| ४८ | ६४ | ७० | ५५ | ११.३ | ११.१ | १०.० | ९.८ | ५३५१८५३ | १४०००००० | १०८०० |

* दर मिनिटास २ गॅलन अपशिष्टाचा प्रवाह; pH चे समायोजन केले नव्हते.

इतक्या अल्प संख्येपर्यंत बदलती होती. जीवाणूंच्या संकेंद्रणाच्या या अस्तित्वावरून pH ११.३ इतका उच्च असताना जीवाणू जीवंत राहू शकतात आणि सेंद्रीय पदार्थांचे चयापचयन प्रत्यक्षात होऊ शकते हे ठळकपणें दिसून येते. pH ची मूल्यें उच्च असताना विलीन सेंद्रिय पदार्थांचे ऑक्सीकरण करण्यासाठीं जीवाणूंचा उपयोग करून घेण्याच्या शक्यतेकडे दुर्लक्ष करू नये.

ह्या निष्कर्षाच्या आधारावरून लेखकाच्या शिफारशींची अंमलबजावणी करून एक पूर्ण मापाचे संयंत्र उभारण्यात आले



: १९ :

# पूर्णतः उपचार केलेली अपशिष्टे नाल्यात सोडणे

संग्राही नाल्यात अपशिष्टे थेट प्रस्त्रावित करण्यापूर्वी त्यावर संपूर्ण उपचार सध्या क्वचितच केले जात असले तरी त्यासंबंधी हळूहळू अधिक विचार करण्यात येऊ लागला आहे. नाल्यातील पाण्याच्या तनुकरण राशींत वाढ होत नाही; उलट प्रदूषण भारात मात्र दुर्दैवाने वाढ होत आहे. लोकसंख्येचे विस्फोटन आणि उद्योगांचा विस्तार, यामुळे आपणास अपशिष्टांवरील उपचारणांच्या गरजांची व्यापक प्रमाणात अपेक्षा करावी लागेल. सध्या कांही विशेष उदाहरणातच आणि वस्त्र निर्मिती, लगदा आणि कागद, लोह व रसायने, यांच्या सारख्या मोठाल्या आर्द्र उद्योगात संपूर्ण उपचारण करावे लागते.

" संपूर्ण उपचारण " या अभिव्यक्तीच्या अर्थाबद्दल कांही शंका आहेत. भौतिक, जैवी, आणि / अथवा रासायनिक उपायांनी सुमारे ८५ ते ९० प्रतिशत् BOD निष्कासित करण्याच्या दुय्यम उपचारणासच संपूर्ण उपचारण असे सामान्यतः मानले जाते. या व्याख्येप्रमाणे, आपण फक्त दोनच प्रदूषणकारक घटक काढून टाकतो. तरंगते घनपदार्थ आणि विलीन सेंद्रीय पदार्थ (त्यात कलील घनपदार्थांचाही समावेश आहे) हे ते घटक होत. मग या व्याख्येत, रंग व तरंगते पदार्थ, तेले व क्षारता (उच्च pH), अथवा अम्ले व सेंद्रिय द्रव्ये, यांच्या निष्कासनाने संपूर्ण उपचारण घडून येते हेही अन्तर्निहित आहे काय ? संज्ञेचा मूळ अर्थ हाच आहे काय याबद्दल लेखक साशंक आहे; आणि या दिवसात जेव्हा " संपूर्ण उपचारण " अपुरे होत असल्याने आणि काही उदाहरणात ते निश्चितच पूर्णपणे होत नसल्याने, आपल्या परिभाषेचे पुनर्मूल्यांकन करणे इष्ट आहे. उदा. उद्योगात अगदी थोडे कदाचित अजिबात नसलेले, असे सेंद्रिय पदार्थ असले तरी अन्य दोन अगर तीन प्रकारचे प्रदूषण नाहीसे करावे लागते. लेखकाच्या मताप्रमाणे, विद्यमान संज्ञेच्या व्याख्येप्रमाणे त्यालासुद्धा संपूर्ण उपचारण मानावे लागेल. जेव्हा या विषयावरील विचारसरणीत

" तृतीय उपचारणास " मान्यता देण्यात येते व त्याचा अंतर्भाव करण्यात येतो तेव्हा, सध्याच्या व्याख्येप्रमाणे ' संपूर्ण उपचारण ' ही अभिव्यक्ति अजिबात संतोषजनक होणार नाही. सध्या तृतीय उपचारणात, तरंगते घनपदार्थ, विलीन सेंद्रिय घनपदार्थ, आणि विलीन अकार्बनिक घनपदार्थाच्या संदूषणाच्या तीन अगर अधिक प्रकारांच्या निष्कासनाची तरतूद केलेली असते.

आपल्या अपशिष्टावर संपूर्ण उपचारण करण्यासाठी उद्योगाला सामान्यपणे अपशिष्टाची मोठी राशि प्रस्त्रावित करावी लागते. हा उद्योग शहराच्या बाहेर आणि नगरपालिकेपासून कांही अंतरावर उभारलेला असतो. पाण्याच्या दर्जाचे उच्च मान सतत ठेवावे लागणाऱ्या नाल्यावर त्याची उभारणी केलेली असते. ज्या उपचारणात अपशिष्ट–जल उद्योगाला आणि कांही उदाहरणात नागरी पाणी पुरवठ्याकरता पुनः वापरता येईल असे उपचारण केलेले असते त्याला " संपूर्ण उपचारण " असे मानणे या लेखकाला अधिक मान्य आहे- सर्व तरंगते विलीन आणि कलील घनपदार्थ, ज्यात अकार्बनिक आणि सेंद्रीय अशा दोन्हीही अंशाचा समावेश असतो, अशांचे बरेचसे पूर्णपणे निष्कासन करणे हा सामान्यपणे त्याचा अर्थ होईल. अशी कार्यवाही सध्या क्वचितच होत असल्याने तरंगत्या घनपदार्थांच्या आणि विलींन सेंद्रिय द्रव्याच्या बऱ्याचशा अंशाचे निष्कासन करणे म्हणजे " संपूर्ण उपचारण " अशी व्याख्या केल्यास तिला मान्यता देणे भाग पडेल.




आकृति १९–१. काटेचमचे (tableware) तयार करण्याच्या संयंत्रातील अपशिष्ट सोडण्यात येणाऱ्या नाल्याचा नकाशा; त्यात प्रदूषणाची ठिकाणे बाणांनी दाखविली आहेत–

**संग्राही नाल्यात अपशिष्टे थेट सोडण्यापूर्वी त्यावर सध्या मान्य असलेले संपूर्ण उपचारण करणाऱ्या उद्योगाचे एक उदाहरण :–**

चांदीचे गिलिट केलेले आणि गंजरहित काटेचमचे तयार करणारे एक संयंत्र, अनेक दुग्ध व्यवसाय कार्यालये असलेल्या ग्रामीण क्षेत्रातील एका लहान गावात, बसविले आहे. त्या क्षेत्रातील लहान नाले आणि जवळच असलेल्या मोठ्या तलावात मत्स्य व्यवसाय, पोहणे, आणि नौकानयन करणे यासाठी हजारो लोकांना वाव मिळतो. त्या क्षेत्राचा नकाशा आ. १९–१ मध्ये दाखविला आहे. एका लहान गावाकडे वाहात जाणाऱ्या एका लहान खाडीत (अ) अपशिष्टे प्रस्त्राबित केली जातात. तेथे ती खाडी (ब या दुसऱ्या खाडीस मिळते, आणि त्यांच्या संगमामुळे (क) ही मोठी खाडी तयार होते व तलावास मिळण्यापूर्वी अनेक मैल वाहात जाते.

चांदीचे गिलिट करण्याच्या प्रक्रियेत तांबे व जस्त असलेल्या गौण धातूच्या (base metal) वापराचा आणि सायनाइडे असलेल्या गिलिटाच्या द्रावणाचा संबंध येतो. ह्या द्रव्यांचे संकेंद्रण अत्यंत अल्प असले तरीही ती जलीय जीवांना विषाक्त होतात असे मानण्यात येते. ह्या उदाहरणातील उत्पादकांना, संग्राही जलांच्या सार्वजनिक वापरास संरक्षण मिळण्यासाठी अपशिष्टावर पर्याप्त उपचार करावे लागतील याची जाणीव होती आणि म्हणून येथे सादर केलेल्या समस्येच्या सल्लागार अभियंत्यांना विश्लेषण करावयास सांगण्यापूर्वी त्यांनी कांही प्रमाणात उपचार केले होते. या तपशीलवार केलेल्या अभ्यासापूर्वी अस्तित्वात असलेल्या संयंत्रातील अपशिष्टाच्या विल्हेवाट करण्याच्या व्यवस्थेचा सुलभ केलेला एक आराखडा आ. १९–२ मध्ये दाखविला आहे.

## १९–१ अपशिष्टांच्या उपचारणांतील पहिले टप्पे –

येथे विवरण केलेल्या समस्येच्या पूर्ण सोडवणूकींचा स्वीकार करण्यापूर्वी सुमारे दहा वर्षे ह्या संयंत्रातील अपशिष्टांच्या विल्हेवाटीचे विकास कार्य सुरू झाले होते. द्रव अपशिष्टांच्या

---

* जल प्रदूषण नियंत्रण संघाची पत्रिका आणि ओनीडा. सिल्व्हर वेअर, लिमिटेड यांच्या सौजन्याने. स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्टस, २६,७,८४३ (जूलै १९५४); २६ ८, १००२ (ऑगस्ट १९५४); २६,९,११३० (सप्टेंबर १९५४); या अंकांत ओनीडा, न्यूयॉर्क येथील ओनीडा मर्यादित, यांनी गिलिटकामातील अपशिष्टांच्या विल्हेवाटीचे वर्णन केले आहे.

खालील दोन वर्गात विभाजन करण्यास उपयोगी पडणारी अपशिष्ट–संग्राहण व्यवस्था प्रथम कार्यान्वित करण्यात आली. स्वच्छ अपशिष्टे आणि (चांदी असलेल्या अम्लीय अथवा क्षारीय अपशिष्टांचा समावेश असलेली) संदूषित अपशिष्टे.




आकृति १९–२ सल्लागारांच्या गटाने विश्लेषणे करण्यापूर्वी अस्तित्वात असलेल्या काटे–चमचे तयार करणाऱ्या संयंत्रातील अपशिष्टांची विल्हेवाट करण्याच्या सुविधांचा आरेख–

चांदी असलेली पातळ सायनाइड अपशिष्टे मोठाल्या टाक्यात गोळा करण्यात आली आणि चांदी परत मिळवण्याकरता धात्विक जस्ताशी त्यांचा संपर्क साधण्यात आला. ह्या टाक्यातील अधिद्रव (Supernatent) निष्कासन करण्याच्या खांजणात, नि:सारित करण्यात आला. त्या खांजणात अम्लीय व क्षारीय अपशिष्टेसुद्धा सोडण्यात आली होती. जरी ही व्यवस्था अपूर्ण होती तरीही सुमारे दहा वर्षे त्यामुळे नाल्याचे अतिसंदूषण होण्यास प्रतिबंध झाला; म्हणून ती व्यवस्था समाधानकारक असे म्हणावे लागेल.

नंतर कंपनीने सल्लागार नेमले आणि अपशिष्टांच्या विल्हेवाटीच्या संपूर्ण सुविधांची तरतूद करण्यासाठी त्यांना मदत करण्यास सांगण्यात आले. उपचारणाच्या विद्यमान पद्धती वापरून निरनिराळ्या पातमुखांतून ( out falls ) प्रवाहीत होणारी वेगवेळ्या प्रकारची अपशिष्टे पुरेशा प्रमाणात हाताळण्यात येत आहेत अगर कसे हे निश्चित करण्यासाठी वियोजन व्यवस्थेचे

पुनर्विलोकन करण्याची आवश्यकता आहे असे सल्लागारांनी ठरविले. साबण, केरोसीन, आर्थो-सिलिकेटस, बोरॅक्स, इत्यादी अम्ले अथवा चांदी नसलेली अनेक प्रकारची द्रव्ये, तसेच सायना-इड आणि भारी धातू क्षारीय अपशिष्टांत असल्याचे त्यांना आढळून आले. तथापि ही सेंद्रीय आणि अन्य संदूषक द्रव्ये क्षारीय अपशिष्टाच्या उपचारणात अडथळा आणत नव्हती असेही त्यांना दिसून आले. म्हणून, मूळची वियोजन व्यवस्था वास्तवतः बुद्धिपूर्वक अभिकल्पित केली असल्याने संयंत्रातील अपशिष्टांच्या विल्हेवाटीच्या संपूर्ण व्यवस्थेचा विकास मोठ्या प्रमा-णात वाढला.

आ. १९–१ मध्ये दाखविल्याप्रमाणे, कारखान्याच्या खंदकातील पाण्यात कांही संदूषक द्रव्य असल्याचे आढळून आले. खंदकात निसटून जाणारी संदूषक अपशिष्टे शोधून काढण्यासाठी प्रदर्शक (tracer) म्हणून फ्ल्यूरेसिन रंग वापरण्यात आला. प्रवाह कमी असल्यावेळच्या परि-स्थितीत खंदकातील पाण्याच्या एका भागाबरोबर ३ भाग (अ) खाडीतील पाण्याचे तनुकरण होत असल्याने, खंदकातील पाणी संगदोषरहित असणे महत्वाचे होते. म्हणून अपशिष्ट उपचार-णाच्या नवीन योजनेत, खंदकातील पाण्यातून सर्व संदूषित अपशिष्टे काढून टाकण्यात आली व ती खांजणात जाणाऱ्या योग्य त्या अपशिष्ट-नलिकात सोडण्यात आली. हा बदल केल्यानंतर खंद-कातील पाण्याचे केलेले विश्लेषणही को. १९–१ मध्ये सादर केले आहे.

## कोष्टक १९–१

### कारखान्याच्या खंदकातील पाण्याचे बदल करण्यापूर्वीचे आणि नंतरचे विश्लेषण–

| नमुना क्रमांक | मुक्त सायनाइड, ppm | | तांबे, ppm | | जस्त, ppm | |
|---|---|---|---|---|---|---|
| | पूर्वी | नंतर | पूर्वी | नंतर | पूर्वी | नंतर |
| १ | ०.६४ | ०.०८ | १.४ | ०.५० | १.६ | ०.० |
| २ | १.०४ | ०.१३ | २.० | ०.२० | १.८ | ०.१० |
| ३ | १.२८ | ०.१३ | १.२ | ०.१४ | १.६ | ०.० |
| ४ | ०.४८ | | १.२ | | १.६ | |

तसेच अपशिष्टांचे सरासरी वेगही मापण्यात आले. अपशिष्टांच्या प्रवाह वेगाला, विशेषत: तात्कालिक वेगाला, ( एका गटात एकाच वेळी मुक्त केलेली राशि), अपशिष्टाच्या विल्हेवाटीच्या कोणच्याही अभिकल्पनात अतिशय महत्व असते, कारण अखंड अगर बॅच प्रकाराची उपचार व्यवस्था वापरावयाची हे बऱ्याच प्रमाणात प्रवाहाच्या स्वरूपावरून ( pattern ) निश्चित होते. चांदीयुक्त अपशिष्टांच्या करता बॅच उपचार करण्याचे ठरविण्यात आले, कारण त्यातील धातूंत फार विविधता होती व प्रवाह-वेग तुलनेने कमी होते. अम्लीय अपशिष्टांची गोष्ट वेगळी होती. " निकेल-चांदीच्या " (तांबे, जस्त व निकल यांच्यापासून तयार केलेला मिश्र धातू, ज्याला जर्मन सिल्व्हर असेही म्हणतात) ब्राइट-डिप संचात, आणि टाकाऊ द्रव्यातील पुनः प्रापणात, त्यांचा उद्भव झाला होता. दोन संचातील प्रवेशी नलिकावरील जलमापन यंत्रानी तात्कालिक प्रवाहाची नोंद करण्यात आली आणि ह्या उदाहरणात, अखंड उपचार करणे हा सर्वात उत्तम उपाय असल्याचे दिसून आले.

**कोष्टक १९-२**

**तीन प्रकारांच्या अपशिष्टांचे प्रवाह वेग –**

| अपशिष्ट | प्रवाह वेग | | शेरा |
|---|---|---|---|
| | गॅलन/तास | गॅलन/दिवस | |
| चांदीयुक्त | | ५००० | |
| अम्लीय | ४५०० | ४०००० | सकाळी ७ ते दुपारी ४ पर्यंत प्रवाह वेग स्थिर होता. रात्री अनिवार्यत: वेग शून्य होता. |
| क्षारीय | १२५०० | १६०००० | सकाळी ७ ते दुपारी ४ पर्यंत दर ताशी प्रवाह वेग १२५०० गॅलनवर स्थिर होता. रात्रपाळीत आणि दिवस पाळीत एकूण प्रवाह बदलत होता. तो उत्पादनावर अवलंबून होता. |

शनिवारी सकाळी क्षारीय अपशिष्टांचे मापन करून प्रवाह वेग प्राप्त करण्यात आला. चार तासांच्या कालावधीत उत्पादन जेव्हा प्रत्यक्षपणे चालू नव्हते तेव्हा संयंत्रातून निथळलेले सर्व जल सोडून देण्यात आले व त्यावेळी संयंत्राच्या प्रत्येक विभागातील कर्मचाऱ्यांनी एका विशिष्ट खोलीपर्यंत टाकी भरण्यास लागणाऱ्या वेळेची नोंद केली. प्रवाह मोजण्याची ही पद्धत तुलनेने सोपी आणि कमी खर्चाची असल्यामुळे फायदेशीर असते. तथापि प्रत्यक्ष उत्पादनाच्या तंतोतंत परिस्थितीची–जलदाब, झडपा उघडणे, अपव्यय (wastage), विलंब (lag), काल, इत्यादींची – नक्कल करणे जड जाते आणि वर वर्णन केलेल्या कार्यपद्धतीचा वापर करण्यात काही अंशी चुका होणे अंगभूत असते. या उलट, निरनिराळ्या शेकडो नळ्यातून अपशिष्टे सोडून देण्यात येत आहेत हे विचारात घेतले असता ह्या पद्धतीला अन्य पर्याय फारसे नाहीत असे दिसून येते. विनिर्मितींत कमी जास्ती होणाऱ्या संभाव्य परिणामांचे, वैयक्तिक नमुने घेऊन, सहज मुल्यांकन करता येते.

संयंत्रातील अपशिष्टे आधीच वेगवेगळी करण्यात आली असल्याने, एकूण अपशिष्टे मिळणाऱ्या नळावर वाहितमलाच्या टप्प्याच्या उंचीचा नोंदक अगर बांध वापरता आला असता आणि अन्वेषकाला संपूर्ण प्रवाहाच्या वेगाचे मापन त्यावरून करणे शक्य झाले असते. वियोजन केलेल्या तीन्ही अपशिष्टांचे प्रवाह वेग संक्षिप्तपणे को. १९-२ मध्ये दिले आहेत.

मुक्त सायनाइड, एकूण सायनाइड, आणि भारी धातू (विशेषत: तांबे, जस्त, निकल व चांदी) यांच्याकरता अपशिष्टांचे विश्लेषण करण्यात आले; अन्य शद्वान, विषाक्त द्रव्यांचा आणि सभाव्य पुन: प्रापण करता येण्यासारख्या द्रव्यांच्याकरता त्यांचे विश्लेषण करण्यात आले अपशिष्टांच्या विभिन्न प्रस्त्रावांची रचना को. १९–३ मध्ये दिली आहे.

## १९–२ सायनाइड-निष्कासन पद्धतीची निवड

खाडीतील तुलनेने कमी असलेल्या तनुकारक घटकामुळे (सुक्या मोसमात-सुमारे-१०:१) मुक्त सायनाइड १ ppm पेक्षा जास्त नाही आणि एकूण सायनाइड ३ ppm जास्त नाही अशा उपचारणित नि:स्त्रावाचा प्रस्त्राव करणे भाग पडेल अशी सल्लागारांना जाणीव झाली. त्यांनी पूर्वी केलेल्या संशोधनावरून असे दिसून आले की, क्लोरीन अगर हायपोक्लोराइट्सनी सायनाइडचे ऑक्सीकरण करणे, अशा प्रकारच्या परिस्थितीत (१, २) सायनाइडच्या निष्कासनाची सर्वात जास्त शक्यता असलेली पद्धत आहे. ओझोन अगर आयनविनिमयासारख्या पद्धतींच्यापेक्षा उपकरणांना लागणारा भांडवली खर्च कमी येणे हा ऑक्सीकरणापासून होणारा विशिष्ट फायदा असतो. चर्चाविषयाच्या बाबतीत, ऑक्सीकरण पद्धतीत आणखी एक फायदा

## कोष्टक १९–३

### विलेपनकामाच्या कारखान्यातील अपशिष्टातील सायनाइड, धातू, आणि अन्य अशुद्ध पदार्थ

| अपशिष्ट | घटक, ppm | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | चांदी | | | तांबे | | | निकल | | | जस्त | | | मुक्त सायनाइड | | | एकूण सायनाइड | | |
| | किमान | कमाल | सरासरी | किमान | कमाल | सरासरी | किमान | कमाल | सरासरी | किमान | कमाल | सरासरी | किमान | कमाल | सरासरी | किमान | कमाल | सरासरी |
| चांदीयुक्त | ६ | २००० | २७० | ३ | ९०० | १२ | ० | ३० | ५ | ० | २५ | ९ | ३ | २८०० | ११६ | ९ | ३९४० | १५० |
| अम्ल | | | १.१ | ३० | ५९० | १३५ | १० | १३० | ३३ | ५ | २२० | ६५ | | | | | | |
| क्षारीय | | | ०.२ | ३.२ | १९ | ६.१ | ०.४ | ३.२ | १.९ | ०.५ | ५.१ | २.२ | | | | ७.८ | ९१.५ | २१.७ |

| क्षारीय अपशिष्टातील अंतर्वस्तू | सरासरी संकेंद्रण, ppm | अम्ल अपशिष्टांतील अंतर्वस्तू | सरासरी संकेंद्रण, ppm |
|---|---|---|---|
| साबण | २७० | $H_2SO_4$ | १७४० |
| बोरॅक्स | ४९ | $H\ O_3$ | २०२० |
| ऑर्थोसिलिकेट्स | ४० | $HCl$ | २४३ |
| कॉस्टिक पोटॅश | ७० | $NaOH$ | १४ |
| हायड्रोजन क्लोराइड | ७ | $Na_2Cr_2O_7$ | ४.८ |
| $NH_4Cl$ | ११ | | |
| ओकाइट | १२ | | |
| $K_2$ पेनसाल्ट | ३४ | | |
| ओकाइट ६५ | ६८ | | |
| पेन ३५ | ६ | | |
| ट्रायसोडियम फॉस्फेट | ४ | | |
| नॉर्थ वेस्ट क्लीनर | ३६ | | |
| केरोसीन | ४२० | | |
| सॉल्व्हेन्टॉल | ५२ | | |

असतो. सल्लागारांना माहित होते कीं, बाजारी उपयोगात ऑक्सीकरणामुळे अपशिष्टातून सायनाइडचे निष्कासन करण्याची व या उदाहरणात आवश्यक असणारा निःस्त्रावाचा दर्जा निर्माण करण्याची क्षमता असते हे सिद्ध झाले आहे.

## १९–३ चांदीयुक्त अपशिष्टावरील उपचार –

भारी धातूंच्यामुळे आणि मोठ्या प्रमाणात असलेल्या सायनाइडमुळे संदूषण झाले असल्याचे अपशिष्टाच्या विश्लेषणावरून (को. १९-३) दिग्दर्शित झाले असल्याने, सायनाइडचे निष्कासन करण्यासाठी संयंत्रात बापरण्याकरता किंवा पुनः शुद्ध करणाऱ्या कारागिरास विकण्याकरता सोयीच्या स्वरूपात चांदीची पुनःप्राप्ति करण्यासाठी आणि भारी धातूंचे निष्कासन करण्यासाठो योग्य उपचारांची योजना करावी लागली. अपशिष्टातील तुलनेने कमी पण बदलते तरंगणारे द्रव्यही स्वच्छ निःस्त्राव होण्याकरता काढून टाकावे लागले. चांदीचे निष्कासन करण्यासाठी सल्लागारांनी खालील कार्यपद्धतीचे अन्वेषण केले. १) क्लोराईडच्या स्वरूपात अवक्षेपन २) आयन विनिमय, आणि ३) जस्तावर अवक्षेपण. प्रत्येक पद्धतीतील नफातोटयांचा विचार केल्यावर असे दिसून आले कीं, क्लोराइडच्या स्वरूपात अवक्षेपण करून चांदीचे पुनः प्रापण करण्याच्या पद्धतीचे प्रथम अन्वेषण करणे अधिक समर्थनीय होईल. ह्या पद्धतीवरील लिखाणाच्या पुनर्विलोकनावरून फारच कमी माहिती मिळाली; तथापि प्राथमिक प्रयोगांच्या निष्कर्षावरून बरीच चांदी पुनः मिळविता येईल असे दिसून आले. चाचण्यांचे नमुनेदार निष्कर्ष को. १९–४ मध्ये सादर केले आहेत.

कोष्टक १९–४
चांदीच्या पुनः प्रापणावरील प्रयोगशाळेतील प्रयोगांचे निष्कर्ष

| चांदीयुक्त अपशिष्ट | pH | एकूण Cn ppm | Ag, ppm | Cu, ppm | Ni, ppm | Zn, ppm | Fe ppm |
|---|---|---|---|---|---|---|---|
| नमुना (अ) | ९.९ | १०२ | १०५ | ६.५ | ०.० | [illegible].५ | |
| नमुना (आ) | १०.३ | २०८ | २५० | ८ | ० ५ | ०.० | |
| नमुना (इ) | ११.४ | १५९ | १५० | ८ | ३.० | ९.० | |
| अ) चा अधिद्रव | | ०.० | ३.५ | ४.० | १.२ | १.३ | ०.५६ |
| आ) चा अधिद्रव | | ०.० | २.८ | १२.० | ०.२ | ३.१ | ०.५७ |
| इ) चा अधिद्रव | | ०.० | १.१ | ९.८ | ०.२ | १.९ | २.६ |

ह्या प्रयोगांच्या निष्कर्षावरून शेवटी असे दिग्दर्शित झाले की, प्रस्तावित कार्यपद्धती, सायनाइडचे ऑक्सीकरण आणि चांदीचे पुनः प्रापण, या दोन्ही करता समाधानकारक काम देईल. शिवाय, जरी हवे होते तितके भारी धातूंचे पूर्ण निष्कासन झाले नसले तरीही पूर्वी अव-क्षेपित केलेल्या अवमलाच्या सानिध्यात क्लोरिनीकरणामुळे सुधारलेले अवस्थापन गुणधर्म अस-लेला अवक्षेप प्राप्त झाला. चांदीयुक्त अपशिष्टापासून अधिद्रवासारखे सर्व अल्प प्रस्त्राव खालील थेट सोडण्याऐवजी मुख्य अनुपचारित अपशिष्टाच्या प्रस्त्रावात मिसळावयाचे असल्याने, चांदी-च्या पुनः प्रापणाच्या प्रक्रिया कालात भारी धातूंचे पूर्ण निष्कासन करण्याची आवश्यकता नव्हती.

कोष्टक १९–५

अम्लीय अपशिष्टांच्यावरील उपचारणासंबंधी प्रयोग शाळेत केलेल्या प्रयोगांचे निष्कर्ष –

| विश्लेषणाचा विषय | उपचार-णाची पद्धत | एकूण Cn, ppm | Ag, ppm | Cu, ppm | Ni, ppm | Zn, ppm | अवमल राशी % |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अनुपचारित अपशिष्ट | १ | ९.४ | ०.७ | १८ | ०.१ | ०.३ | |
| | १ | ४.२ | ०.८ | १४ | ०.( | ४.० | |
| | १ | ५.८ | १२.० | १७ | ०.८ | १०.० | |
| | २ | ५.४ | २५.० | १८ | १३.० | ८.० | |
| | २ | २५ ० | ८.० | ४.५ | २.३ | ९.० | |
| | २ | ४.० | ४०.० | १६ | १०.० | ११.० | |
| उपचार केल्यानंत-रचा अधिद्रव | १ | ०.३५ | ०.० | ०.५ | ०.६ | ०.२ | |
| | १ | ०.३० | ०.० | ०.१ | ०.० | ०.७ | |
| | १ | ०.२० | ०.० | ०.०५ | ०.१ | १.१ | |
| | २ | ०.२० | | १७.० | ०.२ | ४.८ | |
| | २ | | ०.० | १.५ | १.० | ०.५ | |
| | २ | | ०.० | २.३ | ०.९ | २.४ | |
| अम्लीय अपशिष्टा-सह उपचार केल्या-नंतरचा अधिद्रव | १ | | | | | | ४.२* |
| | १ | | | | | | ४.६* |
| | १ | | | | | | ४.५* |
| | २ | | | २४० | ९ | ९० | ४.० |
| | २ | | | २४० | ९ | ९० | ५.० |
| | २ | | | २३० | १५ | ९० | ५.० |

* फेरिक लवणाने किलाटन केले.

कोष्टक १९–६

क्षारीय अपशिष्टातील सायनाइडांच्या ऑक्सीकरणाचे निष्कर्ष.

| क्लोरीनची मात्रा† $Cl_2$ पौं./Cn पौं. | अनुपचारित अपशिष्टे, एकूण CN, ppm | एकूण CN. ppm | अतिरिक्त $Cl_2$·ppm | अमोनियम $NH_4$·ppm | सायनेट CNO, ppm |
|---|---|---|---|---|---|
| ६.५ | १३.५ | ० १७ | २.० | ०.४९ | ५ ६ |
| ७ ५ | १३.५ | ०.०८ | २.७ | ० २७ | १.३ |
| ८.५ | १३ ५ | ०.१६ | ११ ३ | ० २६ | १.३५ |

† क्लोरीनचा सैध्दान्तिक खप, १०० ६ ppm

## १९–४ क्षारीय अपशिष्टावरील उपचार :–

क्षारीय अपशिष्टावर केलेल्या प्रारंभिक प्रयोगांवरून असे दिसून आले कीं, उपचारणाच्या सर्वात खात्रीलायक पद्धतीत कांही केरोसीन, साबण वगैरे काढून टाकण्याकरता साका काढणे, नंतर क्लोरीन अगर सोडियम हायपोक्लोराइटने ऑक्सीकरण. पायसीकृत मृत्तिकांच्या अवक्षेपणासाठी अम्लीकरण, पुनश्च साका काढणे आणि भारी धांतूच्या हायड्रॉक्साइडचे चुना मिसळून अवक्षेपण, यांचा संबंध असतो. ह्या पुंजीकरणाकरता लागणाऱ्या भारी धातूंचा उद्भव अम्लीय अपशिष्टात होता; त्यात बऱ्याच प्रमाणात तांबे, निकल आणि जस्ताची सांद्रणे होती.

प्रयोग शाळेच्या प्रमाणावर केलेल्या क्षारीय अपशिष्टांच्या नमुनेदार उपचारणात दोन पद्धती वापरण्यात आल्या. पहिल्या पद्धतीत खालील टप्प्यांचा समावेश होता. १) NaOCL मिसळणे; २) सायनाइडचे सायनेटमध्ये ऑक्सीकरण होण्यासाठी वेळ देणे; ३) ६.५ इतका pH होण्याकरता $FeCL_3$ मिसळणे; ४) सायनेटचे ऑक्सीकरण होण्यासाठी वेळ मिळावा म्हणून १० मिनिटे ढवळणे; ५) एकंदर २०० ppm Fe त $FeCl_3$ मिसळणे; ६) साका काढणे; ७) ८ पर्यंत pH येण्याकरता चुन्याचा गारा मिसळणे; ८) पुजक्यांचे अवस्थापन करणे; आणि ९) निथळणे.

६.५ pH चे समायोजन करण्यासाठी ३ ऱ्या टप्प्यात $FeCl_3$ च्या द्रावणाऐवजी क्षारीय अपशिष्टे वापरली आणि ५ व्या टप्प्यात, एक भाग अम्लीय अपशिष्ट व दोन भाग

क्षारीय अपशिष्ट असे मिश्रण होण्याकरता अपशिष्टे मिसळण्यात आल्याशिवाय अन्य बाबतीत दुसरी पद्धती पहिलीसारखीच होती. २ऱ्या पद्धतीत, नंतर केलेल्या प्रयोगात, असे दिसून आले की, अम्लीय अपशिष्टे जेव्हा वापरण्यात येत होती तेव्हा, ५ व्या टप्प्यात फक्त ६० ppm $FeCl_3$ लागला. निष्कर्षावरून (को १९.५) सायनेटची सांद्रणे आणि भारी धातूंचे लघुकरण समाधानकारक झाले असल्याचे दिसून आले. जेव्हा अम्लीय अपशिष्टे वापरण्यात आली तेव्हा भारी धातूंचे समाधानकारकपणे निष्कासन झाले नव्हते. तथापि, निःस्त्रावाचे साधे निस्यंदन करून स्वीकार्य मूल्यापर्यंत भारी धातूंची सांद्रणे कमी करता आल्याचे दिसून आले. म्हणून असे सुचविण्यात आले की, क्षारीय अपशिष्टांच्या निर्मलीकरणाकरता पुंजक्यांचा पुरवठा करता यावा म्हणून जर अम्लीय अपशिष्टे वापरावयाची असली तर वाळूच्या निस्यंदकाची जरूरी लागेल. भारी धातू खाडीत अतिप्रमाणात वाहून जाणार नाहीत अशी उत्तम प्रकारे खात्री वाळूच्या निस्यंदकात मिळेल असे मानण्यात आले.

सायनेट प्रभावीपणे काढून टाकले जात आहे व हे निष्कासन ऑक्सीकरणाने होत आहे का जलविश्लेषणाने (hydrolysis) ने होत आहे हे ठरविण्याकरता क्षारीय अपशिष्टांवरसुद्धा प्रयोग करण्यात आले. ह्या प्रयोगात, ८.२ pH असताना ऑक्सीकरण करण्यात आले; pH च्या या पातळीवर ऑक्सीकरणाची दुसरी अवस्था तुलनेने मंद असते, व ते ९० प्रतिशत् पूर्ण होण्यास सुमारे २ तास लागतात, (म्हणून) उद्भासनाचा (exposure) काळ २ तासाइतका नियंत्रित करण्यात आला. निष्कर्षावरून को. १९–६) असे दिसले कीं, सायनेटचे निष्कासन बरेचसे ऑक्सीकरणाने झाले, अमोनियम आयनाकडे जलविश्लेषण करून झाले नाही.

## १९–५ नूतन अपशिष्ट–उपचार व्यवस्थेचे अभिकल्पन–

अपशिष्ट उपचारण संयंत्राच्या टप्प्याटप्प्याच्या आणि अखंड परिचालनाच्या साधकबाधक बाजूंचे तोलन करून सल्लागारांनी असे ठरविले कीं, खालील पद्धतीचे अनुसरण करावे; १) सोडियम हायपोक्लोराइटने चांदीयुक्त अपशिष्टावरील टप्प्याटप्प्यांचे उपचारण, आणि २) सोडियम हायपोक्लोराइटने क्षारीय अपशिष्टावरील टप्प्याटप्प्याचे (latch) उपचारण करून नंतर सतत अम्लीकरण करणे, साका काढणे, ते दाट करणे, आणि वालुका निस्यंदन करणे.

ह्या कारखान्यातील विद्यमान अपशिष्ट–निस्तारणाच्या सुविधांचा प्रवाह आरेख आकृति १९–३ मध्ये दाखविला आहे. A,B,C या कुडांत जेथे कारखान्यातील अनुपचारित अपशिष्टे गुरुत्वाकर्षणाने वाहून जातात, तेथे (जेव्हा संयंत्र सामान्य वेगाने चालू असते तेव्हा) ती एक




आकृति १९–३. काटेचमचे तयार करण्याच्या कारखान्यात सध्या चालू असलेल्या चांदीचे पुनःप्रापण आणि अपशिष्टावरील उपचारणाच्या व्यवस्थेचा आरेख–

तास थांबविण्यात येतात. कुंडातील परिवाह खांजणात वाहून जातो, व त्यामुळे निस्तारक संयंत्र बंद असण्याच्या परिस्थितीची काळजी घेतली जाते.

चांदीयुक्त अपशिष्टे १०००० गॅलन टाक्या $R_1$ आणि $R_2$ पैकी एकीत पंप करण्यात येतात. प्रत्येक टाकीची अवरोधन क्षमता संयंत्राच्या २ दिवसांच्या सामान्य परिचालनाइतकी असते. टाकी भरल्यानंतर pH सुमारे ८.५ इतका होण्याकरता अपशिष्टात अम्ल मिसळण्यात येते. नंतर दर पौंड $CN^-$ ला ८.५ पौंड $Cl_2$ चा पुरवठा करण्यासाठी NaOCl (सोडियम हायपोक्लोराइट) मिसळण्यात येते. प्रक्रियेकरता दोन तासांचा काल ठेवून रात्रभर अंतर्वस्तूंची हालचाल न होईल अशा त्या स्थिर ठेवण्यात येतात. क्षारकुंडात नंतर अधिद्रव निःसारित करण्यात येतो, आणि AgCl चा निक्षेप साचू दिला जातो. मधूनमधून AgCl च्या गाऱ्यातून कांही भाग धावन टाकीत (P) गुरुत्वाकर्षणाने स्थानांतरित केला जातो आणि नंतर Q या निस्यंदकावर त्याचे पुनः प्रापण करण्यात येते व निस्यंद ( filtrate ) क्षारीय कुंडात परत सोडून देण्यात येतो.

## १९-६ अम्लीय आणि क्षारीय अपशिष्टे हाताळणे –

संयंत्राचे २४ तास परिचालन होत असताना अम्लीय अपशिष्टांचा प्रस्त्राव मावेल इतक्या क्षमतेच्या ५४००० गॅलन साठ्याच्या (F) या टाकीत अम्लीय अपशिष्टे पंप करण्यात येतात ( पंप b ) ( e या पंपातून व D या pH नियंत्रक टाकीतून) आत येणाऱ्या क्षारीय अपशिष्टातील pH चे नियमन करण्याकरता या अपशिष्टाचा वापर केला जातो. ( f या पंपाने पंप करून) G मधील साका काढून टाकण्याकरता व क्षारीय अपशिष्टातील pH खाली आणण्याकरतासुद्धा हे अपशिष्ट वापरण्यात येते.

(a या पंपाने ) D या १००० गॅलन टाकीमधून क्षारीय अपशिष्टांचे स्थानांतरण करण्यात येते; D या टाकीत pH सुमारे ८.५ पर्यंत नियमित केला जातो; आणि नंतर एका ( $E_1$, $E_2$, $E_3$ ) ८०,००० गॅलन टाकींत सोडण्यात येते. टाकी जेव्हा भरते तेव्हा, सायनाइडचे पूर्णपणे ऑक्सीकरण करण्यासाठी NaOCl मिसळण्यात येते. या प्रक्रियेला सुमारे २ तास लागतात. d या पंपातून G या सायीकागात (skimmer) सतत अंतर्वस्तू स्थानांतरित करण्यात येतात. जेव्हा पुंजीकरणास अम्ले अपुरी पडतात तेव्हा, साका काढण्यापूर्वी $FaCl_3$ सुद्धा मिसळण्यात येतो. G या टाकीतून गुरुत्वाकर्षनाने H या टाकीत साका वाहून जातो; तेथे स्वयंचलित नियंत्रणाखाली सुमारे ८ पर्यंत pH चढण्याकरता चुन्याचा गारा मिसळण्यात येतो. नंतर दाट करण्याच्या (j) या उपकरणात मिश्रण वाहून जाते; त्यातील वरचा साका खांजणाच्या

क्षेत्रात पंप करण्यात येतो, अवमल तळातून प्रथम कुंडात आणि नंतर g या पंपाने N या टाकीत स्थानांतरित केला जातो, आणि स्वच्छ निःस्राव निमज्जित प्रस्राव नलिकेतून K-1 K-2 व K-३ ह्या वालुका निस्यंदकांवर पंप केला जातो. त्यांचे पश्चधावन करण्यासाठी L या स्वच्छ पाण्याच्या विहिरीतील पाणी वापरण्यात येते आणि नंतर पाणी प्रक्रियेत पुनः फिरवण्यात येते. L पासूनचा परिवाह कारखान्यातील स्वच्छ पाण्याबरोबर मिसळून खाडीत सोडण्यात यतो.



आकृति १९–४. ओनीडा संयंत्रातील अपशिष्टांच्या उपचारणाच्या नियंत्रणाची खोली. येथे उपचारण संयंत्रातील कोणच्याही क्षणी असलेल्या pH, तपमान, आणि प्रत्येक टाकीतील गॅलन ची नोंद करणाऱ्या तबकड्या आणि मापक आहेत. उजव्या बाजूकडील काचेच्या पडद्यामागे, जेथे परिचालक उभा आहे त्याच्या निकट, एक मत्स्यटाकी आहे. तीत उपचारण प्रक्रियेतील निःस्राव भरलेला आहे आणि त्यात सजीव मत्स्य आहेत.

अनेक पदार्थांचे अन्वेषण केल्यानंतर, टप्प्याटप्प्याच्या तत्वावर सायनाइडचे ऑक्सीकरण करण्याचे आणि अखंडपणे साका काढण्याचे व अवक्षेपण करण्याचे सल्लागारांनी ठरविले. निस्तारण संयंत्र १६ तासांच्या दिनचक्रावर चालते व त्यात दररोज ४८०००० गॅलनवर अंतिम उपचारण होते. टप्प्याटप्प्यांच्या वापरामुळे सायनाइडच्या ऑक्सीकरणावर मिळणारे निश्चित नियंत्रण, ह्या पद्धतीची निवड करण्यास पुरेसे तर्कसंगत आहे असे मानण्यात आले.

## १९–७. संयंत्राचे परिचालन –

१९५. च्या उत्तरार्धात अपशिष्ट उपचारण संयंत्र वापरात आणले. को. १९–७ मध्ये अंतिम निःस्त्रावाचे विश्लेषण दिले आहे. आ. १९-४ पासून १९–१० अखेरची छायाचित्रे आम्ही वर्णन करत असलेल्या ह्या संपूर्ण उपचारण-संयंत्राच्या कांही भागांची आहेत व ती ओनीडा, न्यू यॉर्क येथील ओनीडा लि. कंपनीच्या चांदीचे गिलिट केलेल्या व अगंज पोलादी काटेचमच्यांच्या संयंत्राची आहेत. कंपनीच्या सौजन्याने ती मिळाली.

कोष्टक १९–७

काटेचमच्याच्या कारखान्यातील अंतिम निःस्त्रावाचे विश्लेषण –

| दिनांक* | एकूण $C\overline{N}$, ppm | Cu, ppm | Ni, ppm | Zn, ppm |
|---|---|---|---|---|
| २/८ | ०.२० | | | |
| २/११ | १.६७ | ०.३० | ०.१८ | ०.०२ |
| २/१५ | ०.०७ | ०.१८ | ० ०९ | ०.०० |
| २/१६ | ०.२६ | | | |
| २/१७ | ०.०९ | ०.१६ | १.९० | ०.१९ |
| २/१८ | ०.३२ | ०.१६ | ०.५५ | ०.०४ |
| २/१८ | ०.०३ | | | |
| २/१९ | ०.०९ | ०.१८ | १.५३ | ०.२३ |
| २/१९ | ०.४१ | | | |
| २/२२ | ०.१३ | | | |

* ते साल १९५४ होते.



आकृति १९–५ क.टेचमच्याच्या कारखान्यातील गिलिट यंत्राची रांग. उजव्या बाजूकडील चमचे चांदीच्या सायनाइड स्नानातून आताच बाहेर आले आहेत आणि फरशीवर ठिबकत आहेत. डाव्या बाजूच्या पुरोभागातील तक्तपोशीवरील निस्त्राव संयंत्राच्या अपशिष्ट उपचारण संचात वाहून जातो.



आकृति १९-६ पुस्तकात वर्णिलेला आणि आ. १९-३ मध्ये दाट करण्याचे उपकरण (j) म्हणून दाखविलेला क्षारीय अपशिष्टावर उपचारण करण्याचा सायक्लेटर. पुरोभागातील नळ्यांमधून क्षारीय अपशिष्टे ह्या गोल टाकीत शिरतात, आणि दोन पासून सहा तासापर्यंतच्या काला करता तेथेच राखण्यात येतात. ह्या टाकीतील साका खांजणात व अवमल टाकीत पंप केला जातो आणि स्वच्छ निःस्त्राव बालुका निस्यंदकात आणखी स्वच्छ केला जातो.



आकृति १९–७ पुस्तकात वर्णन केलेली आणि आ. १९–३ मध्ये D टाकी म्हणून दाखविलेली pH चे नियंत्रण करण्याची एक हजार गॅलनची टाकी ८.५ इतके नियंत्रण करण्यासाठी ह्या टाकीमधून क्षारीय अपशिष्टे सतत पंप करण्यात येतात. डाव्या बाजूकडील तबकडीवर pH ची नोंद होते. उजव्या बाजूवरील दोन उदग्र नलिका अंतस्त्राव व नि:स्त्राव करीत आहे.



आकृति १९–८ येथे संयंत्राच्या संपूर्ण परिचालनातील अपशिष्टे निरनिराळ्या रंगाच्या नळ्यांत प्रवेश करतात व ती अलग ठेवण्यात येतात अथवा खोलीच्या बाहेर पडण्यापूर्वी अन्य अपशिष्टांत मिसळण्यात येतात. ह्या अपशिष्ट–उपचारणातील परिचालनाच्या गुंतागुंतीची कांहीशी कल्पना ह्या चित्रावरून येते.



आकृति १०–९ अग्रभागी असलेल्या पंपानी ह्या तीन टाक्यात अम्ल पंप करून साठविण्यात येते. पहिल्या टाकीत सायकार ( skimmer ) आहे. अपशिष्टांचे पूर्ण उपचारण केल्यानंतर ते ज्या नाल्यात सोडले जाते तो नाला पार्श्वभागी आहे.



आकृति १९–१० ह्या तिन्ही सायनाइड–ऑक्सीकरण टाक्यांची धारकता प्रत्येकी ८०००० गॅलन क्षारीय अपशिष्टाइतकी आहे आणि त्यांच्या आकारावरून या अपशिष्ट उपचारण संयंत्राचा प्रकल्प किती मोठा आहे हे दिसून येते. जेव्हा संयंत्र चालू असते तेव्हा तीन अथवा चार कर्मचारी संपूर्ण वेळ कामावर हजर असलेच पाहिजे.

उद्योगाकडून जेव्हा राज्य जल-प्रदूषण नियंत्रण मंडळाला सहकार्य मिळते आणि पूर्णपणे उपचारण केलेले स्वच्छ पाणीच फक्त सार्वजनिक जलव्यवस्थेत सोडले जाते तेव्हा प्राप्त केलेली निश्चित मूल्ये आ. १९-११ मध्ये चित्रित केली आहेत. हे चित्रसुद्धा त्यांनीच पुरविले आहे.



आकृति १९-११ काटेचमचे तयार करण्याच्या कारखान्यातील निस्त्राव ज्या नाल्यात सोडण्यात येतो तो नाला.

क्षारीय अपशिष्टाच्या स्निग्ध वैशिष्टयासारख्या काही अडचणी परिचालनात आल्या होत्या; सामान्यपणे हे अपशिष्ट-प्रक्रिया संयंत्र व्यवस्थित चालले आहे व त्याचे श्रेय सल्लागार*, प्रमुख रसायनतज्ञ, आणि संयंत्राच्या कार्यकारिणीला आहे. हे प्रकरणवृत्त इतरांनी अनुसरावे असे एक उत्तम उदाहरण आहे. पर्याप्त संशोधन, प्रायोगिक संयंत्राचे अध्ययन, आणि भक्कम अभि-यांत्रिकी तर्कसंगती, यांच्या सहाय्याने समस्या कितीही जटिल असली तरी पर्याप्त अपशिष्ट उपचारण संयंत्राची तरतूद करता येते हे त्यावरून दिसून येते. या उदाहरणात औद्योगिक अप-शिष्टावर पूर्ण उपचार करणे, आणि नंतर ते संग्राही नाल्यात सरळ सोडून देणे, यांचा अंतिम उकलीन अंतर्भाव होता.

संदर्भ :-

१ डॉज, बी. एफ., आणि डब्ल्यू झब्बान, " सायनाइड वेस्ट्स: ट्रीटमेंट वुइथ हायपो-क्लोराइड अँड रिमूव्हल ऑफ सायनेट्स " **प्लेटिंग**, ३८, ५६१-५७१ (१९५१); 'बॅच व्होलेटायझेशन ऑफ हायड्रोजन सायनाइड फ्रॉम अॅक्वियस सोल्यूशन्स ऑफ सायनाइड्स,' **प्लेटिंग**, ३१ ११३३, १२३५ (१९५में).

२ वॉकर, सी. ए., आणि डब्ल्यू-झब्बान, " ट्रीटमेंट ऑफ सायनाइड वेस्ट्स बाय आयर्न एक्स्चेंज " **प्लेटिंग**, ४०, १६५, २१९ (१९५३); " ट्रीटमेंट ऑफ प्लेटिंग रूम वेस्ट सोल्यू-शन्स वुइथ ओझोन, " **प्लेटिंग**, ४०, ७७७ (१३५३).



---

* बी. एफ. डॉज, सी. ए. वॉकर, डब्ल्यू झब्बान

# : २० :

# जागेची निवड

## प्रस्तावना :–

नूतन संयंत्राकरता उत्तम जागा निवडणे ही कोणत्याहीं औद्योगिक संस्थेला तोंड द्यावे लागणाऱ्या समस्यांपैकी एक समस्या असते (४). पैशाचा मोठया प्रमाणात अकारण व्यय टाळण्यासाठी आणि अनिश्चितपणे व अकारण डोकेदुखीने भरलेले दिवस काढण्याची शक्यता आगाऊ कृतीने चुकवण्यासाठी कंपनीने संयंत्राच्या परिचालनासंबंधी अन्य कोणतेही निर्णय घेण्यापूर्वी जागेचे काळजी पूर्वक विश्लेषण केले पाहिजे. **रासायनिक** आणि **विभिन्न उत्पादन (varied–products)** उद्योगांच्या बाबतीत जागेची निवड करणे ही विशेष अवघड समस्या असते. तीत आढळून येणारे खाचखळगे अनेक असतात आणि चुकीची जागा निवडण्याने गंभीर दुष्परिणाम निर्माण होतात. पाण्याविषयी पुरेसा विचार न करता अनेक वेळा जागेची निवड केली जाते. केवळ पाणी पुरवठाच नव्हे तर अपशिष्ट–निस्तारणाकरता लागणाऱ्या पाण्याच्या बाबतीतसुद्धा पाण्याच्या या दोन साधनांपैकी एकाच्याही अभावी कसल्याही स्थानावरील कोणतेही संयंत्र यशस्वीपणे चालण्यास प्रतिबंध होणे शक्य असते.

जागेची निवड करण्यास अर्थातच अनेक महत्वाच्या अन्य घटकांचा संबंध येतो. त्यातील कांही घटक खाली दिले आहेत: उपलब्ध कामगारांची संख्या व प्रकार; संघटनांची क्रियाशीलता; तेथील लोकांची उद्योगाबद्दलची आस्था; परिवहन सुविधा; पाण्याची राशि व दर्जा; विद्युत्शक्ति; शासकीय कर; इंधन (तेल, वायू, कोळसा); हवामान; कच्च्या मालाचा पुरवठा; बाजारपेठेपासूनचे अंतर; अपशिष्ट उपचारणाच्या गरजा; अरिष्टांचे धोके; निर्मितीतील

धोके; प्रचलित (prevailing) वारे; मृदावस्था; क्षेत्रीय देखावा; मनोरंजन सुविधा; व शैक्षणिक सुविधा.

यांतील कांही घटक मूर्त (tangible) असतात व त्यांचे मूल्यमापन सहज करता येते; सामाजिक मानसिक प्रवृत्तीसारख्या अन्य घटकांचे मूल्य ठरविणे अवघड जाते. ह्या प्रकरणात ह्या सर्व घटकांवर सर्वंकष चर्चा करणे आणि त्यांचे मूल्यमापन करणे लेखकाला शक्य होणार नाही, कारण तसे करावयाचे झाल्यास एक संपूर्ण ग्रंथच लिहावा लागेल. जागेच्या निवडीवर स्वच्छ पाण्याचा पुरवठा आणि अपशिष्टांची विल्हेवाट करण्यास लागणारे तनुकरण–जल, यांच्या पडणाऱ्या प्रभावासंबंधीच ह्या पुस्तकाच्या वाचकांना आस्था असणे साहजिक आहे. तथापि, संयंत्राच्या स्थाननिश्चितीच्या संपूर्ण समस्येचे योग्य सम्यक्‌दर्शन ( perception ) औद्योगिक अपशिष्ट–अभियंत्याला व्हावे म्हणून प्रत्येक घटकावरील थोडथोडया टिप्पणींचाही समावेश करण्यात येईल.

## २० १: उत्पादनाच्या खर्चावर आधारलेले मूल्यांकन–

नूतन संयंत्राच्या जागांचे मूल्यांकन करण्याच्या हॉयरने (४) दिलेल्या कामचलाऊ पद्धतीत (को. २०–१) दर १०० पौंडाच्या उत्पादनास येणाऱ्या परिचालनाच्या अंतिम खर्चावर अनेक घटकांचे परिणाम दाखविले आहेत, आणि जे घटक मुख्य खर्चास जबाबदार असतात त्यांच्यासंबंधी वस्तुनिष्ट माहिती सादर केली आहे. कोष्टकवार दृष्टिक्षेप टाकण्याने व उत्पादन खर्चावर आधारलेल्या जागांचीच फक्त तर्कसंगती लावण्याने आपणाला असे वाटेल कीं, पहिल्या क्रमांकाच्या जागेची निवड सकृद्दर्शनी यशस्वी ठरेल, परंतु, असे गृहीत धरणे नेहमीच बरोबर ठरणार नाही. उदा. आठ जागांवरील पाण्याच्या खर्चातील कमाल फरक दर १०० पौंड उत्पादनास फक्त ०.०२ डॉलर आहे व हे पाहून आश्चर्य वाटेल. म्हणून ह्या उदाहरणात अधिक तपशीलवार अभ्यास केल्यावर असे दिसून येणे शक्य आहे कीं, प्रत्येक जागेप्रमाणे पाणी पुरवठ्याचा दर्जा बदलत आहे आणि या गोष्टीचा, उत्पादनाचा दर्जा आणि खर्च यावर प्रत्यक्ष परिणाम होईल. अपशिष्टाचे निस्तारण ही उत्पादनाच्या खर्चातील प्रमुख बाब असेल अशा प्रकारची जर पदार्थ-निर्मिती करावयाची असेल तर को. २०–१ मधील तपशिलात अपशिष्ट-उपचारणांचा खर्च मिळविला पाहिजे.

तीच तुलनात्मक मूल्ये सादर करण्याची आणखी एक पद्धत आ. २०–१ मध्ये दाखविली आहे. तीन संयंत्र – स्थानांच्या सर्वेक्षणाचा (७) गोषवारा त्यात दिला आहे. त्यात वार्षिक आधारावर वेगवेगळा खर्च दंडलेखाच्या ( bar-chart )स्वरूपात दिला आहे. एकत्रित आणि

## कोष्टक २०–१

### दर १०० पौंड उत्पादनास येणाऱ्या डॉलर–खर्चावर आधारलेल्या संयंत्र–स्थानांचा अभ्यास (४)

| जागेचा क्रमांक* | दर १०० पौंड उत्पादनावरील खर्च | | | | | | | खर्चातील फरक | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | $ १०००/वर्ष | | | | |
| | वाफ | ऊर्जा | पाणी | मजूरी | एकूण वाहतूक खर्च | कर | एकूण | संघीय कर भरण्यापूर्वी | संघीय कर भरण्यानंतर | दर १०० पौंड उत्पादनावरील खर्च | वाफेचा खर्च | कर |
| १ | २.१५ | ०.७९ | ०.७५ | ५.०३ | ३.३१ | १.१६ | १३.१९ | ० | ० | ० | ० | ० |
| २ | ३.७० | ०.७२ | ०.७३ | ५.०३ | ३.१९ | १.९७ | १५.३४ | २१५ | १३३ | २.१५ | १.५५ | ०.८१ |
| ३ | ३.७७ | ०.४९ | ०.७३ | ५.०३ | ३.३२ | २.२६ | १५.६० | २४१ | १५० | २.४१ | १.६२ | १.१० |
| ४ | ३.५२ | ०.८७ | ०.७५ | ५.८३ | ३.७८ | १.६८ | १६.४३ | ३२४ | २०० | ३.२४ | १.३७ | ०.५२ |
| ५ | ४.४२ | ०.८९ | ०.७५ | ४.२७ | ३.११ | ३.०६ | १६.५० | ३३१ | २०५ | ३.३१ | २.२७ | १.९० |
| ६ | ४.६४ | ०.७९ | ०.७३ | ४.२७ | ३.२७ | ३.०६ | १६.७६ | ३५७ | २२० | ३.५७ | २.४९ | १.९० |
| ७ | ३.९४ | ०.८९ | ०.७३ | ४.७० | ३.५८ | ३.०७ | १६.९१ | ३७२ | २३० | ३.७२ | १.७३ | १.९१ |
| ८ | ४.६४ | ०.७९ | ०.७३ | ४.३८ | ३.३४ | ३.६१ | १७.४९ | ४३० | २६५ | ४.३० | २.४९ | २.४५ |
| कमाल फरक | २.४९ | ०.४० | ०.०२ | १.५६ | ०.६७ | २.४५ | ४.३० | | | | | |

* १, ५, ७ व ८ या जागांवर जलीय वाहतूक उपलब्ध नव्हती;
२, ३, ४ व ६ या जागांवर जलीय वाहतुकीची शक्यता होती.

संक्षेपित स्वरूपातील ही माहिती, नवीन संयंत्राची जागा निश्चित करण्याच्या प्रयत्नात असलेल्या उद्योगाला अतिशय उपयोगी होईल.

## २०–२. मूर्त आणि अमूर्त घटक :

मजूरांच्या पुरवठ्यांच्या महत्वावर कितीही भर दिला तरी तो अपुराच ठरेल. उत्तर युनायटेड स्टेटमधील अनेक शहरात मजुरांची दुर्मिळता असल्याने, अनेक कंपन्यांनी दक्षिणेकडे जागा घेण्यास सुरवात केली आहे; १९५४ पासून हा कल विशेष प्रमाणात दिसून येत आहे. उपलब्ध मजूरांच्या **प्रकारासही** तितकेच महत्व असते; म्हणजेच विशिष्ट पदार्थांच्या विनिर्मिती करता लागणारा असाच तो असला पाहिजे. पुष्कळवेळा त्या क्षेत्रातील महाविद्यालय अगर विश्व




**आकृति २०–१. संयंत्र स्थानाच्या सर्वेक्षणाचा सारांश (न्यू हॉफ प्रमाणे [७])**

विद्यालय याच्याशी औद्योगिक कर्मचाऱ्यांना शिक्षण देण्यासाठी सहयोग करणे शक्य असते असे उद्योगाला आढळून आले आहे. सामान्यपणे कामगारवर्ग हुशार, सहज शिकेल असा, सहकार्य देणारा आणि औद्योगिक उद्दिष्टांविषयी आस्था असलेला असणे इष्ट असते.

कामगारवर्गांच्या अडचणींच्या जुन्या माहितीचे अन्वेषण करून, त्या क्षेत्रातील संघटनांची संख्या आणि प्रत्येक संघटनेच्या संख्याशक्तिची निश्चित माहिती घेऊन, संघटनांच्या कार्यांचे ज्ञान उत्तम प्रकारे मिळवता येते. सघटनांच्या व्यवस्थापनाकडे पाहण्याच्या प्रवृत्तीलाही महत्व असते.

जागांच्या निवडीवर अमूर्त घटकांचाही प्रभाव पडतो. उद्योगाबद्दलची त्या क्षेत्रातील प्रवृत्ति, क्षेत्राचा देखावा, हवामान परिस्थिति, परिवहन आणि मनोरंजन ह्यांचा अमूर्त घटकांत अंतर्भाव होतो. त्या क्षेत्रातील लोकांच्या प्रवृत्तींचे, त्यांच्या गावातील स्थानासंबंधी नागरी अधिकाऱ्यांशी केलेल्या बोलण्यावरून आणि पत्रव्यवहारातून ज्ञान होते, अनुकूल देखाव्यात, चांगल्या स्थितीत असलेले स्वच्छ रस्ते, घरे, व्यापारी मोहोल्ले, बगिचे आणि शाळांशी संबंध येतो; शिवाय, त्या क्षेत्रात नवीन कामे चालू असल्यास तो पुरावाही त्याचे द्योतक होतो. नवीन उद्योगात हवामान परिस्थितीस वाढते महत्व असते. कारण प्रदूषित हवेपासून होणारे उपद्रव व स्वास्थ्याचे संभाव्य धोके अनेक प्रकारचे असतात.

परिवहनासंबंधी विचार करताना, मोटारीने, आगगाडीने, आणि हवाई मार्गाने किती सहज जाता येते, तसेच प्रमुख बाजार पेठांचे अंतर, यासंबंधी मूल्यमापन करावे. मनोरंजनाच्या सुविधांचा विचार करताना त्यात खेळण्यासाठी मैदानाची सोय, पोहोण्याचे तलाव, गोल्फकोर्सेस टेनिस कोर्टस, सार्वजनिक बगिचे आणि (समुद्र अगर नदी) किनारे, वाचनालये आणि सांस्कृतिक केंद्रे, यांचा समावेश करावा.

वुडने (१५) असे म्हटले आहे की, संयंत्राच्या स्थान निश्चितीस जबाबदार असणारे प्रमुख घटक. कामगार, बाजार पेठा, परिवहन, कच्चा माल, शक्ति आणि इंधन, हे असतात. पूर्वीच्या स्थानांत बदल करण्यास उद्योगांनी दिलेल्या अन्य कारणांत, विकेंद्रीकरणाचे अविरत धोरण, परिचालनाचे नियंत्रण अधिक चांगले होण्यासाठी करावे लागणारे विकेंद्रीकरण, कामगारांना मिळणारे सामाजिक व आर्थिक फायदे, आणि स्वस्त किंमत, यांचा समावेश असतो.

आपले सायरॅक्यूज संयंत्र बंद करून व त्याच्या परिचालनातील एक घटक कोर्टलंड, न्यूयॉर्क येथे हलविताना स्मिथ कोरोना मर्चंट, इन्कॉ. (१२) या कंपनीने "स्थानांतराचा निर्णय घेताना कार्यकारी समितीवर, एकत्रीकरण करून परिचालनात काटकसर करण्याची आवश्यकता

आणि सायरॅक्यूज भागाच्या तुलनेने कोर्टलंड भागात, अधिक संख्येने होणारी कामगारांची उप-लब्धी, ह्या गोष्टींचा प्रभाव पडला, '' असे म्हटले आहे. नवीन जागेवर जरी संपूर्ण अपशिष्ट-सुविधांची गरज लागणार असली तरीही हा विचार करण्यात आला ही लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

थिओकोल केमिकल कॉर्पोरेशनने दक्षिणेकडील सात जागांपैकी एका जागेवर (१०) एक नवीन इंजन संयंत्र बसवावयाचे ठरविले. समाजाची मान्यता, मजूर परिस्थिती, परिवहन समस्या आणि खोल पाणी असलेल्या बंदराची आवश्यकता, यांच्यावर ही निवड अवलंबून होती असे सांगण्यात आले. ली शीलर पेपर कंपनीने अलिकडे (११) असे जाहीर केले की, पुलास्की, न्यूयार्क येथे छायाचित्रांच्या कागदाच्या उत्पादनाकरता कंपनी एक नवीन संयंत्र बसविणार आहे. राज्य आयुक्त मक याने खालीलप्रमाणे म्हटले असल्याचे उद्धृत करण्यात आले: '' आगगाडीने परि-वहन करण्याच्या सुविधा आणि आंतरप्रांतीय राजमार्ग ८१ च्या खेरीज उत्तम दर्जाच्या पाण्याच्या पुरवठ्यामुळे या जागेची निवड करण्यात आली हे लक्षात ठेवण्याजोगे आहे. ''

''प्लँट मॅनेजमेंट अँड इंजिनिअरिंग'' या प्रकाशनाचा सहसंपादक ब्रेन्नन (९) ने असे म्हटले आहे कीं, नवीन संयंत्राच्या संरचनेचे आयोजन करणाऱ्या कंपनीच्या अधिकाऱ्यांनी आग्रहपूर्वक सांगितले कीं अत्युच्च राजमार्गामुळे उपलब्ध होणाऱ्या सोयीच्या जागेच्या निवडीच्या आकर्षणात जरूर भर पडली असली तरी त्या प्रक्रियेतील तितकेच महत्वाचे अभ्यासलेले पैलू, उपलब्ध जागा, उपयुक्त सेवांची तरतूद, हाताशी असणारा कामगार वर्ग, आणि भविष्यकालीन विस्ता-रणाची संभाव्यता, हे होते.

सॅफोर्ड (८) ला असे आढळून आले कीं, बहुतेक उदाहरणांत जागेच्या निवडीतील अभि-यंत्याच्या कार्यातील पहिला टप्पा, प्राथमिक व अंतिम अवस्थेत प्रस्तावित संयंत्रातून नाल्यात प्रस्त्रावित होणाऱ्या एकूण प्रदूषक भागाचा अंदाज घेणे आणि नंतर अनेक प्रयोगात्मक (tentative) स्थाने प्रस्थापित करणे, हा असतो.

टॉलचे (१३) असे म्हणणे आहे कीं, संयंत्राच्या जागेसाठी परिपूर्ण सपाट, पूर रहित असे विशाल क्षेत्र असावे. तेथील आधारपृष्ठ ( bearing surface ) उत्तम प्रकारचे असावे; एका बाजूला आगगाडीचा रस्ता, दुसऱ्या बाजूस जवळजवळ विशुद्ध असलेला अमर्याद जलाचा साठा असलेला नाला असावा; तिसऱ्या बाजूस उच्च दाबाचा विद्युत प्रवाह उपलब्ध असावा, आणि चौथ्या बाजूस सहज प्रवेश मिळणारा आणि प्रसिद्धीमूल्य असलेला महत्वाचा राजरस्ता असावा. मोठ्या वस्तीच्या बाहेर (पण तुलनेने निकट) अशी ही जागा असावी आणि त्या ठिकाणी आव

श्यक अशा सर्व सुविधा व सांस्कृतिक फायदे उपलब्ध व्हावेत. योग्य किंमतीत अशी जागा विकू इच्छिणारा एकच मालक असणे ही ह्या चित्रपूर्ण जागे विषयीची शेवटची अपेक्षा ! मि. टोलने असे नमूद केले आहे कीं, अशी युटोपियन जागा त्याला अद्याप आढळून आलेली नाही.

## २०-३. दीर्घ मुदतीच्या नियोजनाचे महत्व-

शहरी योजना आणि नवीन संयंत्र कोणत्या जागी बसवावे या संबंधीचा उद्योगाचा निर्णय यांच्यात एक महत्वाचा संबंध असतो (१५). पुष्कळवेळा, एका स्थळापेक्षा दुसरे स्थळ जास्त फायदेशीर असते. संयंत्राच्या जागा, स्थानिक फायदे व कर, उपयुक्त सेवा, करमणूक, परि-वहन, इत्यादी घटकातील अल्प तफावतींचा समावेश असतो. जेव्हा नगर शासनाची दृष्टी दूर-दर्शी असते तेव्हा औद्योगिक विकासाकरता निश्चित क्षेत्र राखून ठेवण्यात येते, व तेथे आग-गाडींचे सायडिंग, राजमार्ग प्रवेश, इत्यादींची परिपूर्णता करण्यात येते. त्यामुळे वेगवेगळ्या आकारांच्या कारखान्यांना जागा उपलब्ध होऊ शकतात आणि वैयक्तिक उद्योगांना आपापल्या संयंत्रांच्यासाठी लांब (spur) मार्ग, फरसबंद रस्ते बांधावे लागत नाहीत अथवा अगदी निक-टच्या विद्यमान व्यवस्थेशी, पाणी, गॅस, वाहितमलाचे नळ, अगर विजेच्या तारा जोडण्याची जरूरी पडत नाही. जागेची योग्य किंमत असली तर जागेच्या आकारावरही बंधन पडत नाही. गाडीतळ आणि धोक्याच्या क्षेत्राच्या भोवतालीच केवळ पुरेशी जमीन उपलब्ध आहे एवढेच नव्हे तर भविष्यातील विस्तारणाकरताही जमीन उपलब्ध होईल अशी विस्तृत जागा राखून ठेवावी. भविष्यकाळातील विस्तारणाची आगाऊ कल्पना करणे अर्थातच अवघड असते आणि अंतिम गर-जांकरता सामान्यतः जागा अपुरी पडते. तथापि, अशा बहुतेक अडचणींचा निरास करण्यास दूरदर्शी नागरी योजना सामान्यपणे बऱ्याच प्रमाणात उपयोगी होतात.

मोठ्या प्रमाणात अपशिष्टे निर्माण होणाऱ्या बहुतेक उद्योगाकरता शहरसीमेच्या बाहेरील जागा निवडण्यात येतात. त्यात नागरी कर टाळणे हा मुख्य उद्देश असतो; तसेच जागेची फार किंमत न देता मोठी जावा मिळवता येते. त्यावरून अशा उदाहरणात, शहरसीमेत जर संयंत्रे बसविली असती तर संयंत्रावर जे कर द्यावे लागले असते त्यातून मिळणाऱ्या रकमेइतके शहराचे उत्पन्न कमी होईल असा अर्थ नाही. शहराला अप्रत्यक्षपणे उत्पन्न मिळत असतेच, कारण आपल्या कामगारांना दिलेली मजूरी ते शहरातच खर्च करतात, आणि त्यापासून शहरातील व्यापाऱ्यांचा फायदा होतो; तसेच ज्या कामगारांची स्वतःची घरे शहरात असतात त्यांना आपल्या जंगम-मालमत्तेवर (real-estate) कर द्यावा लागतो. जर उद्योग त्या क्षेत्राच्या पूर्णपणे बाहेर गेला तर ह्या फायद्यांपैकी कोणतेही फायदे शहराला उपलब्ध होणार नाहीत. म्हणून नगरशासकाला, **जेथे विस्तारास पुरेशी जागा उपलब्ध होते तेथे, मग तीं नगरसीमेच्या बाहेर असो वा नसो,**

उद्योगाला त्या ठिकाणी आपला उद्योग सुरू करण्यास उत्तेजन देणे, हा उचित मार्ग असतो; कारण, जेथे विस्तारास वाव मिळेल अशा अन्य शहराकडे धंदा जाऊ देण्यापेक्षा अशा जागेवर उद्योगाचा विस्तार होऊ देणे शहराच्या हिताचे असते. विस्तार करण्यास जागा उपलब्ध नाही ह्या एका कारणास्तव अनेक औद्योगिक संयंत्रे बाहेर नेण्यात येत आहेत. अर्थात हे सर्व अन्य कारणांच्या बहाण्याखाली अनेक वेळा केले जाते.

लेविसला (५) असे वाटते कीं, ज्या समाजाचे नियोजन आणि शासन योग्य प्रकारे झालेले असते तेथे शहरातील आणि प्रादेशिक योग्य नियोजनामुळे त्या शहराकडे मुख्यतः ह्या वैशिष्टयामुळे, काही उद्योग आकर्षिले जातात. त्याने उद्योगांचे (६) शहरी आणि निमशहरी असे वर्गीकरण केले. शहरी गटात मोसमी कामगारवर्गाचा संबंध येत असलेल्या आणि म्हणून कामगारांची उच्च प्रमाणात उलाढाल होत असलेल्या, आणि ज्यात पाणी लागणाऱ्या, अगर न लागणाऱ्या आणि म्हणून अपशिष्टांची समस्या न उद्भवणाऱ्या लघु उद्योगांचा त्याने समावेश केला. त्याच्या निमशहरीं गटात भारी धातू व रासायनिक उद्योग परिष्करण संयंत्र refineries इत्यादींचा, म्हणजेच ज्या उद्योगांना मोठ्या प्रमाणात पाणी लागते आणि भरीव प्रमाणात अप-शिष्ट-निस्तारणांच्या समस्या निर्माण होतात, अशांचा समावेश होतो.

ज्या उद्योगात, नवीन क्षेत्रात जाऊन आपल्या स्वतःच्या वसाहती प्रस्थापित करणे शक्य होईल अशा पुरेशा संख्येत निरनिराळ्या प्रकारचे कामगार नेमून घेण्याची पात्रता असते अशा तिसऱ्या गटाचाही त्याने उल्लेख केला आहे. ह्या गटात मोठ्या प्रमाणातील दारुगोळ्याचे कार-खाने, खाणी, आणि विमाने जोडणे व त्यांची तपासणी करणे, यांचे वर्गीकरण केले आहे आणि उदाहरणादाखल गॅरी, इंडीयाना या पोलाद कारखान्यांचीं शहरे व अॅक्रॉन, ओहायओ ह्या रबर उद्योगाच्या शहरांचा त्याने नामनिर्देश केला आहे.

## २०-४. क्रांतिक घटक म्हणून अपशिष्टाची विल्हेवाट--

गत कालात औद्योगिक प्रक्रियांतील अपशिष्टांच्या निस्तारणाकडे दुर्लक्ष केले गेले, परंतु तसे आता करून चालणार नाही. उद्योगांकडून तापदायक अपशिष्टे कायदेशीरपणे प्रस्त्रावित केली जातात अशी एकटीदुकटी कांहीं थोडी उदाहरणे अद्यापही अस्तित्वात आहेत. परंतु दुसरा कोणी तरी अपशिष्टांचे बाबतीत कांही कारवाई करील या आशेने एकादे संयंत्र बांधतांना निस्तार-णाची समस्या टाळण्यापेक्षा तिला तोंड देणे अधिक श्रेयस्कर असते; नंतर त्या समस्येला तोंड देणे अतिशय अवघड जाते.

जुन्या संयत्राच्या पेक्षा नवीन संयंत्रातील अपशिष्टांच्या विल्हेवाटीतील सुविधांच्या विनिर्देशनांच्या बावतीत प्रदूषण–नियंत्रण प्राधिकरणे सामान्यत: अधिक कडक असतात. त्याची कारणे भरभक्कम आहेत: नवीन संयंत्राचे बांधकाम इतक्या जलद गतीने होत आहे की पुढील दहा वर्षांच्या कालावधीत जुन्यापेक्षा नव्या संयंत्राची संख्या जास्त होईल आणि जुन्या संयंत्राच्या बाबतीत व्यापक प्रमाणात लागणारी अपशिष्ट–उपचारणाची कार्यवाही करणे जरूर असले तरीही अंदाजपत्रकात त्याकरता रक्कम बाजूला ठेवलेली नसल्याने आणि तसा पैसाही जवळ नसल्याने, त्याप्रमाणे करता येत नाही; पण नूतन संयंत्राच्या बाबतीत त्यासाठी पैशाची तरतूद करणे सुलभ होते. तसेच नवीन संयंत्राच्या उत्पादन योजनेत अपशिष्ट–उपचारण व्यवस्थेतील योग्य जागा आणि नळांच्या संचांचा सुरवातीलाच समावेश करता येईल असे अभिकल्पन करणे नवीन संयंत्राच्या बावतीत शक्य असते. जुन्या संयंत्राच्या बाबतीत अशी परिस्थिती सामान्यत: असू शकत नाही. किमान तीव्र अडकाठी निर्माण होण्याइतक्या प्रमाणात तरी ती कठीण असते.

या विषयी केवळ प्रदूषण–नियंत्रण प्राधिकरणांच्याकडूनच नव्हे तर लोकांकडूनही दबाव आणला जातो. उदा. लोकांच्या तक्रारीच्यामुळे तेल–परिष्करण कारखान्यांना जागा निवडतांना अपशिष्ट उपचारणाच्या समस्यांच्या बाबतीत सतत जागृत राहणे भाग पडते. १३ जून १९६२ रोजी न्यू यॉर्क टाइम्स मध्ये छापलेल्या एका जवळ जवळ खोचक अशा अग्रलेखात असे लिहिले होते कीं, “ औद्योगिक मंडळाच्या व्यवस्थापकांना वन्य जीवनांच्या संरक्षणाकरता राखून ठेवलेल्या क्षेत्रांना धोका होणार नाही अगर त्यांच्यावर आक्रमण होणार नाही अशा जागांचा शोध करण्यास शिकता यावे म्हणून लोकांना आणखी किती तीव्र आणि अपयशी संघर्ष करावे लागणार आहेत ? उपरी “ डिलावेअर ” उपसागराच्या पाणकोंबड्याविषयी प्रसिद्ध असलेल्या दलदलीच्या प्रदेशात परिष्करण यंत्रणा बसविण्याच्या प्रयत्नात लोकांच्या आरडाओरडीला तोंड द्यावे लागेल हे तेल कंपनीच्या आधीच लक्षात यावयास पाहिजे होते – – – – – आणि जागेची इतरत्र पाहणी करण्याचा शहाणपणा तिने दाखवावयास हवा. ” दुसऱ्या दिवशी संपादकाला पाठविलेल्या पत्रात, यूजेन. एछ. हार्लोने अशी टिप्पणी केली की, “ पेट्रोलियमचे उपपदार्थ ( deriuatiues ), त्यातील काळे चिकट निक्षेप कोणच्यातरी दूरच्या संभाव्य किनाऱ्यावर वाहून जाईपर्यंत अनंत काल तरंगत राहतात, अनेक प्रकारच्या जीवांचे मरण ओढवते, व इतरांना तेथून निघून जावे लागते; अशीं वस्तुस्थिती म्हणजे निसर्गाच्या पुत्रांच्यावर तेल सांडून एक गंभीर आपत्ति ओढवणेच होय ! तेल उद्योगाचे हे कर्तव्य आहे की अशा तऱ्हेच्या नुकसानीस त्यांनी प्रतिबंध करावा. ”निवडलेल्या जागेपासून तेलपरिष्करण संयंत्र दूर नेण्याऐवजी तेल सांडण्याचे टाळता येईल अशी व्यवस्था करावी अशीं त्याने विनंती केली.

गौडीने (३) असे निदर्शनास आणून दिले की, जुन्या स्थानांवर अपशिष्ट–उपचारणात अडचणी निर्माण झाल्याने अनेक उद्योगांना स्थाननिश्चिती पुन: करावी लागली त्याने असेही म्हटले आहे कीं, आपल्या अपशिष्ट–निस्तारणातील समस्यांचे महत्व कमी लेखण्याचा प्रयत्न करण्याचीही उद्योगांना सवय लागली आहे आणि त्यामुळे योग्य स्थानाविषयी सल्ला देणे सल्लागारांना कठीण होऊन बसले आहे. उद्योगाने एखादे विशिष्ट स्थान निश्चित केल्यानंतर अपशिष्ट निस्तारणाच्या समस्यांची उकल करण्याचा प्रयत्न करण्यात नगरपालिका आणि उद्योग, अशा दोघांनाही बराच पैसा खर्च करावा लागत असल्याने, जेव्हां उद्योगाचे प्रथम आयोजन करण्यात येते तेव्हां त्या बाबी विचारात घ्याव्या असे गौडीने प्रतिपादन केले आहे. कॅलिफोर्नियातील औद्योगिक आणि नागरी अपशिष्टांच्या असंगत ( incompatible) उकलींची त्याने अनेक उदाहरणे दिली आहेत. सारांश, त्याचे असे म्हणणे आहे की, अपशिष्ट–निस्तारणाच्या प्रश्नावर पूर्वी देण्यात येत होते त्यापेक्षा बऱ्याच जास्त प्रमाणात लक्ष देण्यात आले पाहिजे. उद्योगाचे स्थान कोठे निश्चित करावे यासंबंधी अंतिम निर्णय होण्यापूर्वी त्या उद्योगांच्या व्यवस्थापकांच्या जवळ पूर्ण माहिती असल्यास जागेसंबंधी समन्वय समितीशीं वाटाघाट करतांना, त्या माहितीची फार मदत होईल. कांही महानगरीय क्षेत्रात अशा समितीत सार्वजनिक आणि कांही उपयुक्त सेवांचे, तसेच उद्योगाला सेवा पुरविणाऱ्या नागरी व कौंटीतील खात्याचे प्रतिनिधी असतात.

तथापि, वुडने स्थानिक समन्वय समितीचा उपयोग करण्यातील खालील तोटे दाखविले आहेत. जवळ जवळ प्रत्येक उद्योगस्थानावर आस्था असलेल्या स्थानीक आणि उद्योगातील स्पर्धेमुळे प्रकल्पावरील निर्णय घेईपर्यंत तो गुप्त ठेवणे भाग पडते. अशी परिस्थिती असली तरच सल्लागार अभियंत्याला आपल्या अशिलाची ओळख न देता निष्पक्षपणे माहिती गोळा करता येते व समन्वयक म्हणून काम करता येते.

सॅफोर्डने (८) नागरी आणि औद्योगिक वाढींतील (आणि म्हणून अधिक प्रदूषणकारक भार, पण त्याचवेळी कार्यवाहीस कमी कालावधी, मनोरंजनाच्या अधिक विस्तृत सुविधांचा वापर, आणि उच्च राहणीमान) यांना संयंत्राच्या स्थाननिश्चितीतील घटक म्हणून अपशिष्ट–उपचारणावरील भर देण्यातील महत्वाच्या आधुनिक बाबी म्हटले आहे. पैशात मोजता न येणाऱ्या या समस्येचा आणखी एक पैलू, जोपर्यंत अपशिष्ट–उपचारण समस्या समाधानकारकपणे सोडविली जात नाही तोपर्यंत तिकडे गिरणींतील उच्च स्तरावरील अधिकाऱ्यांना जरूरीपेक्षा जास्त लक्ष घालावे लागते, व आपल्या नियमित कामावर वेळ व शक्ति खर्च करण्याऐवजी ह्या समस्येवर ती करावी लागती, हा आहे. जागेचे प्रदेशवर्णन आणि आकार, यांच्या महत्वावर सॅफोर्डने भर दिला आहे कारण, अनेक उदाहरणात, समानीकरण टाक्यांत व ऑक्सीकरण खांजणे म्हणून काम देणाऱ्या उथळ द्रोण्यांत साठवण करून अथवा भरपूर प्रमाणात संचयशक्ति असलेल्या व प्रदूषण

सामावून घेईल अशा जवळच्या नाल्यातील क्षमतेप्रमाणे अपशिष्ट सोडता येईल असे साठवण करणे, ही अपशिष्ट–निस्तारणाची सर्वात सुसाध्य पद्धत आहे.

आणखी एक विचार करण्याजोगी बाब ही आहे कीं, उत्पादन–प्रक्रियांच्यातील फरक अगर नियामक मानकांचा दर्जा वाढविण्यासाठी व्यवस्थापनाने सध्या आयोजित केलेल्या अप–शिष्ट-उपचारणापेक्षा अधिक परिपूर्ण उपचारणाची जरूरी लागण्याची शक्यता असते. म्हणून भरपूर जमीन उपलब्ध असणे अधिकच अवश्यक आहे.

औद्योगिक अपशिष्ट-प्रस्त्रावाच्या संबंधात अनेक अभियंत्यांनी तोड काढण्याकरता एक काल्पनिक समस्या विचारात घेतली व टप्प्याटप्प्यांनी तिची उकल करण्याची योजना सादर केली. त्यांनी गटवार केलेल्या चर्चेत, प्रथम संयंत्राची पार्श्वभूमी देण्यात आली; नंतर कंपनीच्या व्यवस्थापनाचे हितसंबंध, राज्य प्रदूषण–नियंत्रण प्राधिकरणाच्या गरजा, व औद्योगिक वाहित–मलाविषयीच्या विशेषज्ञांच्या हितसंबंधाची चर्चा करण्यात आली. त्यानंतर अपशिष्ट–उपचारण संयंत्राच्या, अभिकल्पनात सल्लागार अभियंता ज्या प्रकारच्या सुविधांचा समावेश करील त्यांचे त्यांनी वर्णन केले. एका काल्पनिक मक्तेदाराने ते संयंत्र उभारले आहे, असे गृहीत धरण्यात आले. शेवटी परिचालकाने जो भाग घ्यावयाचा त्याची रूपरेखा देण्यात आली. औद्योगिक अप–शिष्ट–उपचारण संयंत्रात सुरवातीपासून त्याच्या परिचालनाच्या अखेरपर्यंत संबंध येणाऱ्या तप-शीलांची माहिती अवगत होण्यासाठी हा प्रबंध आमूलाग्र वाचणे (१४) वाचकांच्या दृष्टीने लाभदायक होईल.

## २०-५. क्रांतिक घटक म्हणून पाणी पुरवठा

सामान्यतः पाण्याच्या दर्जाच्या आजकालच्या आवश्यकता इतक्या कडक झाल्या आहेत कीं, पाण्यावर उपचार केल्याखेरीज ते वापरण्यास योग्य होईल अशी फारच थोडी पाण्याची नैसर्गिक उत्पत्ति स्थाने उपलब्ध आहेत.

बार्लेनें (१) असे म्हटले आहे कीं, अस्तित्वाच्या अर्थानें जर " उपलब्ध " हा शब्द वापरला तर पाणी नेहमीच उपलब्ध असते असे मानता येईल, कारण खर्च केल्यास पाणी उपलब्ध करणे नेहमीच शक्य असते. तथापि उद्योगाच्या जागेची निवड करताना " उपलब्धी " चा अर्थ केवळ अस्तित्व व निष्पत्तीच नसून त्यात विश्वसनीयताही असते. एखाद्या औद्योगिक संयंत्राला लागणारा पाणीपुरवठा जर विश्वसनीय नसेल तर तो प्रत्यक्षात निरुपयोगीच असतो. जेव्हां अपशिष्ट–निस्तारणाचा विचार केला जातो तेव्हाही हें विशेषण सारखेच लागू होते, कारण

कांही उपचार पुरे करण्यास कांही तरी तनुकरण अवश्य असते. बार्लोला असा विश्वास आहे कीं जरी पाणी पुरवठ्याचा विकास करण्याकरता भांडवल आणि परिचालनाकरता पैशाची बरीच गुंतवणूक करावी लागली तरी प्रत्यक्षात पाणी स्वस्तातच मिळते. खरे म्हणजे ते अतिशय स्वस्तात प्राप्त होते आणि या कारणामुळेच पाणी पुरवठ्याच्या संबंधात कधीकधी फारसा गंभीर पणे विचार केला जात नाही आणि जेव्हां पुरवठा कमी होतो तेव्हाच त्याचे महत्व उद्योगाला समजून येते. जागेची निवड करताना पाणी पुरवठा हा क्वचितच निर्णायक घटक असतो; तथापि ती एक महत्वाची विचारणीय बाब असते; कधी कधी पाण्याच्या उपलब्धतेच्या आधा- रावरच अधिक इष्ट जागा कोणाची आहे हे उद्योगाकडून ठरविले जाते. थोडक्यात बार्लोने असे म्हटले आहे कीं, जमिनीखाली व पृष्ठभागावर अशा दोन्ही ठिकाणी पाणी उपलब्ध असावे आणि ती जागा अशी निश्चित करावी की त्या क्षेत्रातील पाण्याचा इतर वापर करणारांवर पाण्याच्या औद्योगिक वापराचे परिणाम कमीत कमी होतील. पाण्याच्या उपलब्धतेच्या दृष्टिकोनातून जागेची निवड करताना उगमस्थानी निर्माण होणाऱ्या सर्व गुंतागुंतीचा विचार केला जावा आणि जलपुरवठ्याचे बारकाईने मूल्यमापन केले जावे आणि त्यावेळी अतिशय काळजी घेतली तरी त्याकरता अनेक वेळा पैसा व वेळ बराच घालवावा लागतो. पण योग्य निवड करण्यामुळे होणाऱ्या लाभाने जिच्यावर निवड आधारलेली असते ती माहिती अगोदर मिळविण्यासाठी येणाऱ्या खर्चाची भरपाई होते.

टोलचे (१३) असे मत आहे कीं, दक्षिणेकडे मजुरांच्या पुरवठ्यानंतर पाणी हेच सर्वात महत्वाचे साधन आहे; तरीही इतर ठिकाणाप्रमाणेच दक्षिणेत चांगल्या प्रकारची स्थाने मर्या- दित आहेत याबद्दल शंका नाही. कोणत्याही उद्योगात जर पाण्याचा वापर मोठ्या प्रमाणात होत असेल तर नाल्याच्या प्रदूषणाच्या बाबतीतील आपली जबाबदारी ओळखत नाही असा कोणताही उद्योग टोलला माहित नाही. ज्या कार्यवाहीमुळे उद्योगाला प्रदेशातील एखाद्या विशिष्ट क्षेत्राबाहेर जावे लागणार नाही किंवा पाण्याच्या अन्य उपयोगात अवाजवी अडथळा होईल इतक्या प्रमाणात आपल्या नालेनद्यांचे प्रदूषण होणार नाही आणि उद्योगाला वापरता येतील अशा पाण्याच्या जागा कमी होणार नाहीत अशा कार्यवाहीच्या एका कार्यक्रमाची त्याने शिफारस केली.

त्याला असे दिसून आले कीं, कॅरोलायनात उभारावयाची ड्यूपॉंट कंपनीची शेवटची दोन संयंत्रे भूजलाचा वापर करतात. तथापि, दोन्हीही संयंत्रे मोठ्या नद्यांच्या बाजूने बसविली आहेत. त्यांच्या बाबतीत ड्यूपॉंटच्या अभियंत्यांना त्या नद्या खात्रीचा आसरा म्हणून हव्या होत्या; परंतु ड्यूपॉंटला भूजल निश्चितच अधिमान्य होते. कारण नैसर्गिकरीत्या त्यात जरूर ते सर्व अगर बरे

असे निस्यंदन होत होते, आणि त्याचवेळी त्याच्या तपमानावरही कांही विशिष्ट प्रमाणात नियंत्रण ठेवता येत होते.

गौडीने (३) एक मुद्दा पुढे आणला आहे ज्यावर प्रस्तुत लेखकाने भर देण्याचा प्रयत्न केला आहे: तो असा की जागेच्या निवडीत बऱ्याच वेळा कंपनी प्राथमिक टप्प्याची कार्यवाही करते आणि नवीन संयंत्राचे स्थान एकाद्या विशिष्ट जागी निश्चित करण्याचा त्यावेळी कंपनी निर्णय घेते. ज्यावेळी आपणास हवे असणारे पाणी समाधानकारक दर्जाचे नाही असे औद्योगिक अभियंत्याना प्रथम माहित होते, अथवा असे की भूजल प्रदूषित केल्याशिवाय त्यांना द्रवीय अपशिष्टांचे निस्तारण करणे शक्य होत नाही; अगर असे की पाण्याच्या दराच्या सूचीवरून तयार केलेल्या पाण्यावरील खर्चांच्या तक्त्यावरून दर १००० डॉलर मूल्यांकनाकरिता ५० सेंट ज्यादा जिल्हा कर द्यावा लागतो ही गोष्ट स्पष्ट झालेली नसते; किंवा असे की भारी खर्च केल्याशिवाय पुरापासून योग्य ते संरक्षण प्राप्त करता येणार नाही. जाग येण्याच्या या शिथिलतेचे कारण, अशा समस्येशी संबंध असलेल्या वेगवेगळ्या खात्याकडून आलेल्या अभियांत्रिकी माहितीचा योग्य समन्वय न केल्यामुळे सुरवातीलाच अशी माहिती प्राप्त केली नाही, हे असते.

लोकरी कपड्याच्या गिरण्यातील व लगदा आणि कागद गिरण्यातील शीतन प्रक्रिया आणि आग निवारण याकरता अमाप पाणी लागते. त्यामुळे अशा उद्योगांना कमी खर्चात पाणी मिळवणे अगत्याचे असते. म्हणून १९४७ साली गौडीने (३) असे सुचविले कीं, जेव्हा निवडलेल्या जागेवर पाणी महाग असते तेव्हा फार पाणी लागणाऱ्या संयंत्राच्या करता पुन:प्रापण केलेल्या अपशिष्टाच्या पाण्याचा वापर करण्यासंबंधी विचार करावा त्याने वाहितमलनि:स्त्रावाचा औद्योगिक कारणासाठी पुनरुपयोग करण्यात येत असल्याची अनेक उदाहरणे दाखविली आहेत: बाल्टीमोर येथील बेंथ्लेहेम स्टील कंपनी उपचारित नागरी वाहितमलाचा शीतन जलासाठी उपयोग करते; तसेच टेक्सासमधील कॉपर्स ख्रिस्तीची वान्स्डॉला ऑईल कंपनी आणि अनेक इतर कंपन्याही असा उपयोग करतात. अशा उदाहरणावरून ही गोष्ट नजरेस येते की- जेव्हा पाण्यावरील मूळ खर्च अतिशय जास्त असतो अथवा पाण्याची टंचाई असते तेव्हा पुन:- प्रापण केवळ व्यवहार्यच असते असे नव्हे तर ते काटकसरीचेही होते.

ज्या जलाशयाच्या खालच्या पातळीवरील निर्गम द्वारातून प्रस्त्रावित होणाऱ्या पाण्यातील विलीन ऑक्सिजन किरकोळ पातळीवर असतो अशा मोठाल्या जलाशयांच्या खालच्या बाजूच्या जागा विशेषेकरून त्रासदायक असतात असा सॅफोर्ड (८) ने उल्लेख केला आहे. त्याचे असेही म्हणणे आहे की, आग्नेय भागात वापरण्यासाठी उपलब्ध असलेल्या प्रवाहाच्या राशीस बाधा आणणारा वाढत्या महत्वाचा घटक, सिंचाईच्या प्रथेतील वाढ, हा आहे. त्याने आणखी असे

म्हटले आहे कीं, संग्राही नाल्याच्या दोन्ही बाजूच्या जमिनीची मालकी स्वत:कडे असणें फायद्याचे असते: एकतर भिन्न मालकीत उद्भवणाऱ्या मागण्यांना त्यामुळे प्रतिबंध होतो आणि दुसरे समोरच्या किनाऱ्यावर नाल्यामधून विसारक नळ ( diffuser ) बसविणे शक्य होते आणि त्यामुळे अपशिष्ट-जलांच्या विसर्जनात (dispersion) वाढ होते.

## २०-६. अणुशक्तीच्या संयंत्राच्याकरता जागेची निवड-

अणुशक्तीच्या संयंत्राकरता जागेची निवड करण्याच्या एका अनन्य पण समकालीन समस्येला गॉर्मनला (२) तोंड द्यावे लागले. त्याने असे म्हटले आहे की, (१) महाग संरचना आणि सुविधांची आखणी, व अभिकल्पना, (२) भविष्यकालीन विस्ताराची तऱ्हा (३) दैनंदिन परिचालन आणि (४) संयंत्राजवळच्या आगाऊ ज्ञान न होणाऱ्या घटनांतील, कामगार आणि (इतर) लोक व मालमत्तेची सुरक्षा, यावर (संयंत्राच्या) जागेचा परिणाम फार खोलपर्यंत होत असल्यामुळे व्यवस्थापकाकडून घेण्यात येणाऱ्या निर्णयापैकी संयंत्राच्या जागेच्या बाबतीतील निर्णय अत्यंत महत्वाचा असतो. कंपनीचे धोरण वीजपुरवठा, आणि जनसंपर्क हे यातील महत्वाचे घटक असतात. म्हणून या नवीन आणि जलद विस्तार पावणाऱ्या उद्योगात इतरांच्यापेक्षा कदाचित अधिक प्रमाणात जागेच्या बाबतच्या निर्णयात नि:स्त्रावित होणाऱ्या अगर तशी शक्यता असणाऱ्या अपशिष्टांच्या वैशिष्टच व दर्जावर लक्ष द्यावे लागते. अणुभट्ट्यांच्या (nuclear reactors) आणि रासायनिक प्रक्रिया संयंत्राच्या बाबतीत, जेथे निष्पादनातील किरणोत्सर्गाची (radioactivity) पातळी उच्च असते तेथे, हे विशेष महत्वाचे असते. कांही फरकाने इंधन प्रक्रिया संयंत्रे व संरचन संयंत्रे, संशोधन प्रयोगशाळा, आणि जेथे किरणोत्सर्गी कमी पातळीवर असलेली द्रव्ये वापरली जातात अशा अन्य जागीही या गोष्टीकडे लक्ष वेधावे लागते.

गॉर्मन असे म्हणतो कीं, दुसऱ्या जागतिक युद्धात अंशत: सुरक्षेकरता तसेच जागेवर मिळणाऱ्या शक्ति व पाण्याच्या उपलब्धीकरता अणुशक्ति संयंत्रासाठी सरकारने एकाकी (isolated) जागा निवडल्या. जागेवरील कामगारांच्या सुरक्षेची पातळी चांगली होती आणि पर्यावरणीय धोक्याला लोकांना तोंड द्यावे लागले नाही. तथापि, ही शक्तिसंयंत्रे लवकरच अप्रचलित (obsolescent) झाली आहेत, कारण तांत्रिक प्रगति झपाट्याने होऊ लागली आहे.

अणवीय शक्तीचा उपयोग शांतताकार्यांसाठी करण्याकरता जे लोक कंपन्या स्थापन करीत आहेत व वीजपुरवठा करीत आहेत त्यांना आपले उत्पादन व सेवा व्यापाराच्या दृष्टीने महत्वाच्या वाटतील --- म्हणजेच योग्य प्रमाणात लोकवस्ती जवळ असेल ---- अशा जागी चालू करणे इष्ट वाटते असे दिसून येते. ही (निवड) युद्धकालातील अणुशक्ति संयंत्राच्या बाब-

तीत सरकारने निवडलेल्या जागांच्या अगदी विरूद्ध आहे. अणुशक्तिचा वापर करणाऱ्या संयंत्रा-मुळे जवळच्या वसाहतीतील लोकांना त्या क्षेत्रात (खऱ्या अथवा काल्पनिक) धोक्यांना तोंड द्यावे लागण्याच्या शक्यतेचा विचार करणे ही अशा विचारसरणीतील पहिली बाब असेल. अशा परि-स्थितीत जनसंपर्कांत नाजुक समस्या निर्माण होते. आपल्या क्षेत्रात नव्याने सुरू होणाऱ्या उद्योग धंद्यांचे सार्वजनिक अधिकाऱ्यांकडून सामान्यतः स्वागत होत असले तरी " धोकादायक " संयं-त्राच्या बाबतीत जेव्हां लोकांच्या स्वास्थ्य व सुरक्षा आणि सामाजिक पर्यावणीय परिसंपत्ती (environmental assets) यांचा संबंध येतो तेव्हा ह्या नवीन उद्योगाचा भविष्यकालात कांय परिणाम होईल याबद्दल त्यांना काळजी वाटते. पेन्सिल्व्हानियातल्या शिपिंगपोर्ट येथे अणुभट्टी चालू केल्यानंतर अशी परिस्थिती उद्‌भवली. जरी या परिचालनामुळे पर्यावरणीय संदूषण घडून आल्याचे दिसले नाही तरीही धमाकेदार आणि दिशाभूल करणाऱ्या बातम्यांनी लोकांत घबराट निर्माण झाली. एकदाका लोकांत काळजीची भावना निर्माण झाली की जबाबदार लोकांना ती दूर करण्यासाठी बराच काळ घालवावा लागतो व प्रयत्न करावे लागतात.

## संदर्भ :-

१ बार्लो, ए. सी., 'साइट सिलेक्शन,' औद्योगिक जलसंधारण परिषद, मिशिगान विश्व विद्यालयाची सार्वजनिक आरोग्य शाळा, शैक्षणिक अखंड माला क्रमांक ८३ (१९५९), पा. ४९–५६.

२ गॉर्मन, ए. ई., ' वेस्ट डिस्पोजल ॲज रिलेटेड टू साइट सिलेक्शन,' पुर्व मुद्रण ३ न्युक्लिअर इंजिनिअरिंग ॲंड सायन्स कॉंग्रेस, क्लीव्हलंड, ओहायओ, डिसेंबर १२–१६, १९५५.

३ गौडी, आर एफ,, निबंध क्र. २३०६ वरील चर्चा, अमेरिकन सोसायटी ऑफ सिव्हिल इंजिनिअर्स, कार्यवाही खंड ११२ (१९४७) पाने ५८९–५९२.

४ हॉयर, सी. ओ., 'इंडस्ट्रियल डेव्हलपमेंट इन दि साऊथ,' अमेरिकन सोसायटी ऑफ सिव्हिल इंजनिअर्स, कार्यवाही निबंध क्र. २७४६, खंड १२० (१९५५), पा. ४११–४२१.

५ लेविस, एच. एम., अमेरिकन सोसायटी ऑफ सिव्हिल इंजिनिअरांच्या कार्यवाही-तील क्र. २३०६ च्या निबंधावरील चर्चा, खंड ११२ (१९४७), पा. ५८७–५८८.

६ " मेजर इकॉनॉमिक फॅक्टर्स इन मेट्रॉपॉलिटन ग्रोथ ॲंड अरेंजमेंट, " न्यूयॉर्क आणि त्याच्या परिसरातील प्रादेशिक सर्वेक्षण, खंड १ (१९२७) पा.१९–३० आणि १०४–१०७.

७ न्यू हॉफ, ए. सी., " टेक्नीक ऑफ प्लॅन्ट लोकेशन, " व्यापारी धोरणांचा अभ्यास क्र. २१, राष्ट्रीय औद्योगिक संमेलन मंडळ, न्यू यॉर्क, १९५३.

८ सॅफोर्ड, टी. एच., " इंडस्ट्रियल वेस्ट ट्रीटमेंट अॅज ए फॅक्टर इन दि लोकेशन ऑफ वेट प्रोसेस इंडस्ट्रीज, " सातव्या ओंटारिओ औद्योगिक अपशिष्ट संमेलनाची कार्यवाही, हार्बर, ओंटारिओ कॅनडा, जून १९३०.

९ " सुपर रोड्स ब्रिंग फर्म्स इन टु दि अेरिया, " दि सायरॅक्यूज हेरॉल्ड जर्नल, सायरॅक्यूज, एन. वाय , नोव्हेंबर १९, १९६१.

१० यू. पी. आय लेख, तिथी रेखा ( date line ) वॉशिंग्टन, मियामी हॅरॉल्ड मियामी फ्लॉ., जूलै १५, १९६१.

११ लेख, दि सायरॅक्यूज हॅरोल्ड जर्नल, सायरॅक्यूज, एन. वाय., ऑगस्ट २७. १९६०

१२ " स्मिथ-कॉरोना रिजेक्ट्स ऑफर ऑफ न्यू मेंट्रॉपॉलिटन प्लँट, " दि सायरॅक्यूज हॅरोल्ड जर्नल, सायरॅक्यूज, एन. वाय., मे ४, १९६०, पा. ४९

१३ टोल, एफ. सी., " इंडस्ट्रियल एक्स्पॅन्शन अँड वॉटर यूज, " दक्षिणं नागरी आणि औद्योगिक अपशिष्ट संमेलनाची कार्यवाही, ड्यूक विश्वविद्यालय ( मार्च ३१, १९५५ ) पा. २९-३२.

१४ वॉट्सन, के. एस, आणि इतर " सम फॅक्टर्स इन दि लोकेशन ऑफ ए न्यू केमिकल प्लँट; ए पॅनेल डिस्कशन, " स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २८, १०, १२४७ (ऑक्टोबर, १९५६).

१५ वुड, सी. पी., " फॅक्टर्स कंट्रोलिंग दि लोकेशन ऑफ व्हेरिअस टाइप्स ऑफ इंडस्ट्री, " अमेरिकन सोसायटी ऑफ सिव्हिल इंजनिअर्स, कार्यवाही, प्रबंध क्र. २३०८, खंड ११२ (१९४७), पाने ५७७-५९४



## प्रस्तावना :–

औद्योगिक अपशिष्टांच्या विषयी प्रसिद्ध झालेल्या बहुतेक संदर्भांची जवळ जवळ संपूर्ण यादी वाचकांना पुरविणे हा या चौथ्या भागाचा उद्देश आहे. औद्योगिक अपशिष्टांच्या महत्वाच्या प्रकारांवर करण्याच्या उपचारांचे मूळ स्वरूप आणि पद्धती यांचे त्यात विवरण केले आहे तथापि, प्रत्येक अपशिष्टाचा तपशील अगर त्याच्या उपचारणाऱ्या पद्धतीची वाचकाला माहिती पुरविणे हा या विभागाचा उद्देश नाही, तर विद्यमान माहिती संक्षिप्तपणे देणे आणि त्यावरील वाङमयाची संपूर्ण संदर्भसूचि देणे हा आहे. अपशिष्ट-उपचारणाच्या समस्यांकरता तपशील लक्षात ठेवण्याची क्षमता असण्याची आवश्यकता नसून व्यावहारिक अपशिष्ट-उपचारण समस्यांना शास्त्रीय तत्वे लागू करून त्यावर निर्णय घेण्याची क्षमता असण्याची जरूरी असते यावर लेखकाचा विश्वास आहे. वाचकाला लागणाऱ्या तपशीलवार मांहितीकरता (त्यावरील) वाङमयाचा शोध करावा लागला तरी एकदा का या पुस्तकातील माहिती त्याने आत्मसात केली की तो तिचा उपयोग करू शकेल.

बहुतेक द्रव–अपशिष्टे, त्यांची उत्पत्ति स्थाने, गुणधर्म, आणि या पुस्तकातील मागील सहा प्रकरणात विवरण केलेल्या उपचारांच्या चालू पद्धतींचा थोडक्यात सारांश वाचकासाठी पुढील कोष्टकात दिला आहे. संदर्भ जलद मिळावा म्हणून त्याचा उपयोग होईल पण विशिष्ट उद्योगाा करता तो कोणच्याही प्रकारे परिपूर्ण असेल असे मानू नये.

ढोबळ मानाने अपशिष्टांचे–अन्न आणि औषधे, वस्त्रप्रावरणे, रसायने, द्रव्ये, आणि उर्जा-ा अशा पांच महत्वाच्या वर्गात लेखकाने विभाजन केले आहे आणि त्या वर्गापैकी प्रत्येकाकरत एकेक प्रकरण खर्ची घातले आहे याला अपवाद फक्त उर्जा उद्योग हा असून त्याला दोन प्रकरणं द्यावी लागली. बाष्प शक्तीवर चालणारे संयंत्र आणि कोळसा प्रक्रिया यांच्यासारख्या ऊर्जा उद्योगातून निर्माण होणारे अपशिष्ट हा एक प्रकार आहे आणि अणुशक्ति–संयंत्रातून निर्माण. होणारी अपशिष्टे हा अगदी भिन्न प्रकार असल्याने तो विषय या प्रकारे हाताळण्यात आल आहे. नाभिकीय ( nuclear ) अपशिष्टात अशा वैशिष्ठ्यपूर्ण समस्या निर्माण होतात कीं, केवळ त्यांच्याकरता एक स्वतंत्र प्रकरण राखून ठेवावे असे लेखकाला वाटते.

## औद्योगिक अपशिष्टांचा सारांश: त्याचे उत्पत्तिस्थान, गुणधर्म आणि उपचारण

| अपशिष्टे निर्माण करणारे उद्योग | महत्वाच्या अपशिष्टांचे उत्पतिस्थान | महत्वाचे गुणधर्म | महत्वाचे उपचार व निस्तारण पद्धती |
|---|---|---|---|
| **अन्न व औषधे** डब्यात बंद केलेले पदार्थ | फळे व भाज्या निवडणे, चिरणे रस काढणे आणि विवर्ण (bleach) करणे. | उच्च प्रमाणात तरंगती द्रव्ये, कलील आणि विलीन सेंद्रिय द्रव्ये | चाळणे, खांजणीकरण, मृदाशोषण, अथवा फवारणी सिंचाई |
| दुग्धव्यवसायातील पदार्थ | पूर्ण दूधाचे तनुकरण, साय काढलेले दूध, ताक, आणि पनीर जल ( whev ) | प्रथिने, चरबी व लॅक्टोज ही प्रमुख विलीन द्रव्ये उच्चप्रमाणात असतात. | जैवी उपचारण, वातन, ठिबकणारे निस्यंदन, उत्प्रेरित अवमल |
| आसवनित आणि विशुद्ध पेये. | धान्याचे आमज्जन (steeping) व संदाबन, अल्कोहोलच्या आसवनातील अवशेष, दारूभट्टीतील बाष्पनातील सघनक (condensate) | नायट्रोजन आणि आंबलेली स्टार्च, अथवा त्यापासून तयार केलेले पदार्थ असणारे उच्च प्रमाणातील विलीन सेंद्रिय घन पदार्थ. | पुन:प्रापण, अपकेंद्रीकरण आणि बाष्पीभवनाने केलेले संकेंद्रण, ठिबकणारे निस्यंदन, पोषकात वापर. |
| मांस व कुक्कुट पालन उद्योग | गुदामे. गुरांची कत्तल करणे, हाडे व चरबी, जुडाई (rendering), संघनित अवशेष, वंगण व धावन जल, कोंबड्याच्या पिलांचे पिकिंग ( picking ) | विलीन व तरंगते सेंद्रिय द्रव्य उच्चप्रमाणात असलेली रक्त आणि अन्य प्रथिने, व चरबी | चाळण, अवस्थापन, आणि/अथवा तरंगण, ठिबकणारे निस्यंदन |

| | | | |
|---|---|---|---|
| बीट शर्करा | स्थानांतरण, चाळण व रसकारी जले, चुना अवमूल्यापासूनची निःसारणे, बाष्पकानंतरची संघनके, निष्कर्षित शर्करा | उच्च प्रमाणातील शर्करा आणि प्रथिनयुक्त विलीन आणि तरंगते सेंद्रिय द्रव्य | अपशिष्टाचा पुनरुपयोग, किलाटन आणि खांजणीकरण |
| भेषजीय पदार्थ (pharmaceutical products) | मायसेलियम, अपयुक्त छनित (filtrate) आणि धावन जल | उच्च प्रमाणातील व्हिटॅमिनयुक्त तरंगते आणि विलिन सेंद्रिय द्रव्य | वाष्पीभवन, आणि शुष्कन संभरक |
| यीस्ट | यीस्टच्या निस्यंदनातील अवशेष | उच्च प्रमाणातील (प्रामुख्याने सेंद्रिय) घन पदार्थ आणि BOD | निर्वात पाचन, ठिबकणारे निस्यंदन |
| लोणची | चुना जल. लवण जल, तुरटी आणि हळद, साखरपाक व काकडीचे तुकडे आणि बिया | चर pH, उच्च प्रमाणातील तरगणारे घनपदार्थ, रंग आणि सेंद्रिय द्रव्य | चांगली देखभाल, चाळण आणि समानीकरण. |
| कॉफी | कॉफीच्या बियांचा लगदा करणे व आंबवणे | उच्च BOD आणि तरंगते घनपदार्थ | चाळण, अवस्थापन, व ठिबकणारे निस्यंदन |
| मासे | अपकेंद्रियातून टाकून दिलेले संदाबित मासे, बाष्पक आणि अन्य धावन जल अपशिष्टें | अत्युच्च BOD, एकूण सेंद्रिय घनपदार्थ, व गंध | एकूण अपशिष्टाचे बाष्पीभवन, शेष भाग नावेतून समुद्रात सोडून देणे. |
| तांदूळ | तांदूळ मुखणे, शिजवणे व धुणे | उच्च प्रमाणात BOD, एकूण व तरंगते (मुख्यतः स्टार्च) घनपदार्थ | चुना किलाटन, पाचन |

## औद्योगिक अपशिष्टांचा सारांशः त्याचे उत्पत्तिस्थान, गुणधर्म आणि उपचारण

| अपशिष्टे निर्माण करणारे उद्योग | महत्वाच्या अपशिष्टांचे उत्पतिस्थान | महत्वाचे गुणधर्म | महत्वाचे उपचार व निस्तारण पद्धती |
|---|---|---|---|
| सौम्य पेये | बाटल्या धुणे, फरशी व उपकरणे स्वच्छ करणे, साखरपाक साठवण्याच्या टाकीची गटारे | उच्च pH, तरंगते घनपदार्थ आणि BOD | चाळणे, शिवाय नागरी मलवाहिनीत प्रस्त्राव |
| **वस्त्र प्रावरणे** कापड | तंतूंचे पाचन, धाग्याचे विपांजणीकरण (desizing) | उच्च प्रमाणात क्षारीय, रंगित, उच्च BOD व तपमान, उच्च प्रमाणात तरंगते घनपदार्थ | उदासीनीकरण, रासायनिक अवक्षेपण, जैवी उपचारण, वातन, आणि/अथवा ठिबकणारे निस्यंदन |
| चामड्याचे पदार्थ | केस काढून टाकणे, मुरवण, चामड्यातून चुना काढून टाकणे आणि चामड्याचे बेटिंग | एकूण उच्च घनपदार्थ, काठिण्य लवण, सल्फाइडे, क्रोमियम, pH अवक्षेपित चुना, व BOD | समानीकरण, अवस्थापन, व जैवी उपचारण |
| धोबी काम | कपडा धुणे | उच्च गढूळपणा, क्षारता, आणि सेंद्रिय घनपदार्थ | चाळणे रासायनिक अवक्षेपण, तरगण आणि अधिशोषण (adsorption) |
| **रसायने** अम्ले | तनुकृत धावन जले, अनेक वेगवेगळी पातळ अम्ले | मंद pH, अल्प सेंद्रिय अंश | ऊर्ध्वप्रवाही अगर सरळ उदासीनीकरण, जेव्हा कांही सेंद्रिय द्रव्य असते तेव्हा ज्वलन. |

| | | | |
|---|---|---|---|
| प्रक्षालक ( detergents ) | साबण आणि प्रक्षालक धावन व शुद्धीकरण | उच्च BOD, आणि पायसीकृत साबण | तरंगण आणि साका काढून टाकणे, $CaCl_2$ सह अवक्षेपण |
| कॉर्नस्टार्च | बाष्पकातील संघनक, अंतिम धावनीतील साखरपाक बाटल्या भरण्याच्या क्रियेतील अपशिष्टे | उच्च BOD, आणि विलीन सेंद्रिय द्रव्य; मुख्यत: स्टार्च आणि तत्संबंधी द्रव्य | समानीकरण, जैवी निस्यंदन |
| स्फोटक द्रव्ये | TNT आणि गनकॉटनच्या शुद्धीकरणाकरता धावन, गोळ्यांचे (cartridges) धावन व अम्ल मार्जन ( prekling ) | TNT, रंगित अम्ल, गंधयुक्त व पुडीपासूनची अल्कोहोल आणि सेंद्रिय अम्ले त्यात असतात, तसेच कापूस, धातू, अम्ल, तेले, आणि साबण असतो. | तरंगण, रासायनिक अवक्षेपण, जैवी उपचारण, वातन, TNT चे क्लोरिनीकरण, उदासीन–करण |
| जंतूनाशके | २, ४ D आणि DDT सारखे धुण्याचे व शुद्धीकरणाचे पदार्थ | उच्च सेंद्रिय द्रव्य, बेन्झेन-बांगडी सारखी रचना, जीवाणू व मत्स्यांना विषाक्त, अम्ल | तनुकरण, साठवण, उत्प्रेरित कार्बन अधिशोषण, क्षारीय क्लोरिनीकरण |
| फॉस्फेटे व फॉस्फोरस | धावन, चाळण, तरंगते दगड, फॉस्फेट लघुकरण संयंत्रातील संघनक नि:स्त्राव (bleed-off) | चिकणमाती, अवपंक ( slime ) व टॉल तेले, मंद pH, उच्च तरंगते घनपदार्थ, फॉस्फोरस, सिलिका आणि फ्लोराइडे | खांजणीकरण, यांत्रिकी निर्मली–करण, परिष्कारित अपशिष्टाचे किलाटन व अवस्थापन |
| फॉर्मल्डिहाइड | संश्लेषित रेझीनच्या उत्पादनातील व रंगवलेल्या संश्लेषित तंतूतील अवशेष | सामान्यपणे उच्च BOD व HCHO असतो, उच्च संकेंद्रण झालेल्या जीवाणूंना विषाक्त | ठिबकणारे निस्यंदन, उत्प्रेरित कोळशावरील अधिशोषण |

**औद्योगिक अपशिष्टांचा सारांश. त्याचे उत्पत्तिस्थान, गुणधर्म आणि उपचारण**

| अपशिष्टे निर्माण करणारे उद्योग | महत्वाच्या अपशिष्टांचे उत्पतिस्थान | महत्वाचे गुणधर्म | महत्वाचे उपचार व निस्तारण पद्धती |
|---|---|---|---|
| **द्रव्ये**<br>लगदा आणि कागद | तंतू शिजविणे, शुद्ध करणे, धुणे, कागदी लगदा गाळणे. | उच्च अगर मंद pH, रंगीत, उच्च तरंगणारे कलील व विलीन घनपदार्थ; अकार्बनिक पूरक ( fillers ) | अवस्थापन, खांजणीकरण, जैवी उपचारण, वातन; उपपदार्थाचे पुन:प्रापण |
| फोटोग्राफीचे पदार्थ | व्यक्तकारी (developers) व स्थापकांची ( fixers ) अपयुक्त द्रावणे | क्षारीय, विभिन्न सेंद्रिय व अकार्बनिक लघुकारक द्रव्ये असणारे | चांदीचे पुन:प्रापण, शिवाय नागरी मलवाहिन्यांत अपशिष्टांचा प्रस्त्राव |
| पोलाद | कोळशाचे कोकिंग, वातन भट्टीतील दग्ध वायूचे धावन, आणि पोलादाचे अम्लमार्जन | मंद pH, अम्ले, सायनोजेन, फेनॉल, कच्ची धातू, कोक, चुना दगड, क्षार, तेल, मिलस्केल, व सूक्ष्म तरंगते घनपदार्थ | उदासीनीकरण, पुन:प्रापण, व पुनरुपयोग, रासायनिक किलाटन |
| धातूचे गिलिट केलेला पदार्थ | ऑक्साइडचे, अपलेपन (stripping), धातु स्वच्छ करणे व त्यावर गिलिट करणे | अम्ल, धातु, विषाक्त, अल्पराशि, प्रामुख्याने खनिज पदार्थ | सायनाइडचे क्षारीय क्लोरिनीकरण, क्रोमियमचे लघुकरण आणि अवक्षेपण व अन्य धातूचे चुना–अवक्षेपण |
| फौंड्रीतील लोखंडी पदार्थ | द्रवीय प्रस्त्राव करून वापरलेली वाळू काढून टाकणे | उच्च तरंगते घनपदार्थ प्रामुख्याने वाळू: काहीशी चिकणमाती आणि कोळसा | पुन: प्रापणित वाळूचे निवडक चाळण व शुष्कन |

| | | | |
|---|---|---|---|
| तेल | वेधन चिखल, लवणे, तेल आणि काही थोडा नैसर्गिक वायु, अम्लीय अवमल आणि शुद्धीकरणाताल संकीर्ण तेले | क्षेत्रीय उच्च विलीन लवणे, उच्च BOD, गंध, फेनॉल आणि शुद्धीकरण कारखान्यातील सल्फर संयुगे | विशाखन (diverssion), पुनः प्रापण, लवणाचे इंजेक्शन, क्षारीय अवमलांचे अम्लीकरण, आणि ज्वलन |
| रबर | लॅटेक्स धावन, किलाटनित रबर, अशुद्ध रबरातील निःस्त्रावित अपद्रव्ये | उच्च BOD आणि गंध, उच्च तरंगते घनपदार्थं, चर pH, उच्च क्लोराइडे | वातन, क्लोरिनीकरण, पायसीकरण, जैवी उपचारण |
| कांच | कांच घासणे व स्वच्छ करणे | तांबडा रंग, क्षारीय, अनावस्थापनीय तरंगते घनपदार्थं | कॅल्शियम क्लोराइड अवक्षेपण |
| (नाविक) सागरी सामान | खुंट धुणे, पात द्रावण (drop solutions). विलायकाची पुनः प्राप्ति, आणि तैल पुनःप्रापण जल | अम्ल, उच्च BOD | उपपदार्थाचे पुनःप्रापण, समानीकरण, पुनराभिसरण, व पुनरुपयोग, ठिबकणारे निस्यंदन |
| ऊर्जा<br>बाष्पशक्ति | शीतन जल, बॉयलरचा ब्लोडाऊन, कोळशाचे निःसारण | गरम, उच्च राशि, उच्च अकार्बनिक आणि विलीन घनपदार्थ | वातन–शीतन, रक्षासचय, अतिरिक्त अम्लीय अपशिष्टांचे उदासीनीकरण |
| कोळशावरील प्रक्रिया | कोळशाची स्वच्छता व वर्गीकरण, पाण्याने सल्फरच्या थरांचे अपक्षालन (leaching) | उच्च प्रमाणातील तरंगते घनपदार्थ मुख्यतः कोळसा; मंद pH, उच्च $H_2So_4$ आणि $FeSo_4$ | अवस्थापन, फेनतरंगण, निःसारण नियंत्रण, व खाणीची मोहोरबंधी |
| नाभिकीय शक्ति आणि किरणोत्सर्गी द्रव्ये | अशुद्ध धातूवरील प्रक्रिया, संदूषित कपडे धुणे, संशोधन-प्रयोगशाळेतील अपशिष्टे, इंधन-प्रक्रिया शक्ति संयंत्रातील शीतन जले | किरणोत्सर्गी तत्वे, ती अति अम्लीय आणि " तप्त " असू शकतात. | संकेंद्रण व सामावन (containing) अथवा तनुकरण व अविलयन (dispersion) |

: २१ :

# परिधान (apparel) उद्योग

परिधान उद्योगाचे खालील तीन वर्गांत पोटविभाग पाडता येतील: वस्त्र निर्मिति, कातडी सामान, आणि धोबीकाम. ह्या प्रत्येकाचा वस्त्रप्रावरणाशी संबंध येतो, जसे शर्ट, सूट, बूट, कामावरचे कपडे इत्यादि.

## वस्त्रनिर्मितितील अपशिष्टे

कापड गिरण्यांच्या परिचालनात, विणकाम, रंग काम, छपाई, यांचा संबंध येतो व त्या प्रत्येकातून विशेष प्रकारचे अपशिष्ट निर्माण होते. ह्या प्रक्रियांच्यापैकी काहीत तंतूंचे पांजणीकरण, कियरिंग (चढत्या तपमानातील क्षारीय पाक क्रिया), विणलेल्या कापडाचे विपांजणीकरण, विरंजन, मर्सरीकरण, रंगविणे, आणि छपाई यांचा अंतर्भाव होतो. कापड गिरणीतील अपशिष्टे सामान्यतः रंगयुक्त असतात; ती उच्च प्रमाणात क्षारीय असतात, त्यात BOD उच्च असलेले सरंगते घनपदार्थ असतात व ती गरम असतात. संश्लेषी तंतुनिर्मितीतील अपशिष्टे रासायनिक निर्मितीतील अपशिष्टांसारखी दिसतात, आणि तंतुनिर्मितीत वापरलेल्या रासायनिक क्रियापद्धतीवर त्यावरील उपचारण अवलंबून असते, ह्या अपशिष्टांच्या उपचारणात समानीकरण व साठवण हे प्राथमिक टप्पे असतात. कारण त्यांची बनावट बदलती असते. रासायनिक अवक्षेपण, ठिबकणारे निस्यंदन आणि अगदी अलिकडील जैवी उपचारण व वातन या अतिरिक्त पद्धती आहेत फार पूर्वीपासून जास्तीत जास्त पाण्याचा वापर करण्यात येणाऱ्या व प्रदूषणकारी उद्योगापैकी वस्त्रनिर्मिती हा एक उद्योग आहे आणि कमीं खर्चांच्या उपचारण पद्धतींचा विकास करण्यात फारच थोडे यश प्राप्त झाले आहे. नाल्यात सोडण्यात येणारे प्रदूषक भार कमी करण्यासाठी त्यांची ह्या उपयोगात अतिशय जरूरीं आहे.

## २१-१. वस्त्रनिर्मितीतील अपशिष्टांचा उद्भव आणि वैशिष्टये-

वस्त्रनिर्मितीतील अपशिष्टांच्यावरील (७१) अलिकडील अधिकृत प्रकाशनाप्रमाणे, प्रदूषणकारी संयुगांचे उत्पत्तिस्थान, तंतूतून काढून घेतलेली स्वाभाविक अशुद्धता, आणि कापडातून काढून टाकलेली व अपशिष्ट म्हणून प्रस्त्रावित केलेली प्रक्रिया रसायने, हे असते. अपशिष्टे निर्माण करणाऱ्या वेगवेगळ्या प्रक्रिया ज्या विशिष्ट द्रव्याप्रमाणे बदलतात अशा द्रव्यांचे काम-

**कोष्टक २१-१**

**भिन्नाभिन्न वस्त्रनिर्मिति प्रक्रियांतून निर्माण झालेले प्रदूषक भार ( गॅसेली व बर्फोर्ड यांच्या प्रमाणे (७०) )**

| खाते | प्रक्रिया | BOD पौंड/ * १००० पौंड कापड | एकूणाची टक्केवारी |
|---|---|---|---|
| विपांजणीकरण | | ५३ | ३५ |
| कटाव ( Scouring ) | दाब कियर, प्रथम कटाव | ५३ | १६ |
| | दाब कियर, द्वितीय कटाव | ८ | १ |
| | अखंड कटाव | ४२ | १५ |
| | उप बेरीज (कटावीकरण) | | ३२ |
| रंग काम | | ०.५-३२ | १५-३० |
| छपाई | रंग खात्यातील अपशिष्टे | १२ | ७ |
| | छपाईनंतर साबणाने धुणे | १७-३० | १७-३० |
| | छपाईनंतर प्रक्षालकाने धुणे | ७ | ७ |
| | उप बेरीज (छपाई) | | १५-३५ |
| विरंजन | हायपोक्लोराइट विरंजन | ८ | ३ |
| | पेरॉक्साइड विरंजन | ३ | १ |
| मर्सरीकरण | | ६ | १ |
| एकूण | | १२५-२५० | |

* प्रक्रिया केलेल्या दर १००० पौंड कापसाच्या अपशिष्टातून अंदाजे ८०० ते १००० पौंड अपद्रव्ये प्रस्त्रावित होतात.

चलाऊ ज्ञान औद्योगिक अपशिष्ट अभियंत्याला असणे आवश्यक असते. महत्वाच्या द्रव्यांचे तीन गटात उपविभाजन करता येते: कापूस, लोकर, आणि संश्लीष्ट तंतू.

## कापूस –

सफाई गिरणीत पाठविण्यापूर्वी कच्चा कापूस पिंजून, वळून, गुंडचा करून, समावलन ( warping ) करून, पांजण करून, (स्टार्च लावून) ताणून, आणि विणून अगर गुंफून त्याचे कापड तयार केले जाते. परिचालनाच्या ह्या क्रमात जलीय प्रदूषणाचा उद्भव होत नाही, कारण स्लॅशिंगच्या व्यतिरिक्त सर्व प्रक्रिया यांत्रिकी असतात. स्लॅशिंगमध्ये तणावशक्ति येण्याकरता आणि नंतर विणकाम करतांना अवश्य असणाऱ्या सफाईकरता समावलनी धाग्याचे खळ वापरून पांजणीकरण करण्यात येते. पांजणीसाठी वापरण्यात येणारी खळ सेल्यूलोजपासून तयार केलेली असते. खळ लावलेले कापड, ज्याला "ग्रे कापड" असे म्हणतात, त्यात ८ ते १५ प्रतिशत् स्लॅशिंग संयुगे असतात व ती अंतिम परिचालनात काढून टाकावी लागतात. नंतरची आर्द्र प्रक्रिया करता यावी म्हणून ग्रे कापडाचे विपांजणीकरण करण्यात येते. स्वाभाविक अपद्रव्ये काढून टाकण्यासाठी त्याचे कियरिंग करण्यात येते, शुभ्र दिसण्यासाठी ते विरंजित करण्यात येते, तंतूला चकाकी, ताकद आणि रंगाकर्षण यावे म्हणून मर्सरीकरण करण्यात येते, आणि शेवटी वापरण्यास अधिक बळकटी यावी आणि हाताला मऊ लागावे म्हणून त्याचे पुनः पूरण (filling) अगर पांजणीकरण करण्यात येते. शिवाय अॅल्युमिनम असेटेट अगर फॉर्मेट आणि जिलेटिन व

कोष्टक २१–२

रंगविण्याच्या प्रक्रियेत निर्माण होणारा BOD (गॅसेली व बर्फोर्ड प्रमाणे (७०) )

| प्रक्रिया | BOD पौंड/ १००० पौंड कापड |
|---|---|
| वॅट रंग, अखंड | १८ |
| वॅट रंग, जिग | ३२ |
| नॅप्थॉल, जिग | १४ |
| प्रत्यक्ष, जिग | ०.५ |
| सल्फर. जिग | ३१ |

विस्तारित मेणाचे मिश्रण लावून काही माल जलरोधक करण्यात येतो. ह्या प्रक्रियांपैकी प्रत्ये-कीत अनेक टप्पे असतात आणि गिरणीच्या विभिन्न विभागातील निरनिराळ्या यंत्रांवर एकाच वेळी त्या करण्यात येतात.

मासेली आणि बर्फोर्ड (७०) यांना असे दिसून आले कीं, कापसाच्या सफाईतून निर्माण झालेली बहुतेक अपशिष्टे आणि त्यांची आपापली BOD भारणे कोष्टक २१-१ आणि २१-२ मध्ये दाखविल्याप्रमाणे असतात. ब्राऊन (१३) च्या निष्कर्षावरून असे दिसते कीं, निर्माण झालेल्या अपशिष्टांच्या एकूण राशीपैकी सुमारे १६ प्रतिशत् स्टार्च अपशिष्ट असते, ५३ प्रति-शत् BOD असतो. ३६ प्रतिशत् एकूण घनपदार्थ, आणि ६ प्रतिशत् क्षारता असते. एकूण राशीपैकी दाहक अपशिष्ट सुमारे १९ टक्के, BOD ३७ टक्के, एकूण घनपदार्थ ४३ टक्के, आणि एकूण क्षारता ६० टक्के असते. (धावन, विरंजन, रंगविणे, व अंतिम सफाई) यांच्या-सारख्या सर्व अन्य प्रक्रियांच्या अपशिष्टांचे सामान्य अपशिष्ट बनलेले असते, आणि ते एकूण राशींच्या ६५ टक्के असते. BOD १० टक्के, एकूण घनपदार्थ २१ टक्के, एकूण क्षारता ३४ टक्के असते.

## लोकर –

कटाव ( scouring ) रंग, तेल, खारण ( fulling ) कार्बनीकरण, आणि धावन, या प्रक्रियाकरणापासून लोकरीच्या अपशिष्टाचा उद्भव होतो. लोकरीतील जवळ जवळ सर्व नैस-र्गिक आणि प्रापित अपद्रव्ये, गरम प्रक्षालकक्षारीय द्रावणांत कटाव करून, काढून टाकण्यात येतात. ह्या कटाव-अपशिष्टात उच्च प्रदूषणकारी अंश असल्याने काही लोकर सेंद्रिय विलेय-कांनी कटावित करण्यात येते. नंतर ते ग्रीजने भरलेले विलेयक आसव करून पुनः प्राप्त करण्यात येते आणि पुनः प्राप्य लोकरयुक्त ग्रीज मागे राहते. रंगविण्याच्या प्रक्रियेत गरम रंग द्रावण लोकरीतून पंपाने फिरविण्यात येते. किटलीत टांगलेल्या काढता घालता येणाऱ्या धातूच्या टोप-लीत ते पॅकबंद केलेले असते. तेलवण्यात पिजणतेल सामान्यपणे मिसळलेले असते आणि लोक-रीवर फवारण्यात येते. सामान्यपणे ऑलिव्ह तेल अथवा लार्डतेल-खनिज तेल यांचे मिश्रण वापरण्यात येते व ते वजनाने लोकरीच्या १ ते ११ टक्यापर्यंत बदलत असते. तेलवण्याने तंतू मधील संसजन वाढते आणि कताईला मदत होते. परंतु हे सर्व तेल नंतर अंतिम सफाईच्यावेळी कपड्यातून काढून टाकावे लागते.

मागावर सैलसर विणलेल्या लोकरीचे संकुचन करून घट्ट, दाट विणीच्या कापडात रूपां-तर करण्याच्या प्रक्रियेस खारण ( fulling ) म्हणतात. बहुतेक संयंत्रावर सोडा ॲश मध्ये

## कोष्टक २१–३

लोकर गिरणीतील अपशिष्टांतील प्रक्रिया रसायने आणि BOD ची सूचि ( मॅसेली आणि बर्फोर्ड प्रमाणे ) (७१) *

| प्रक्रिया रसायने | रासायनिक बनावट व वापर | वापरलेल्या OWF ची टक्केवारी | | | नि:स्त्रावणातील संकेंद्रण ppm | BOD* | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | कटाव व पिंजण | सफाई | एकूण | | % OWC | % OWF |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| साबण | चरबीयुक्त अम्ल, कटाव, खारण | २.१ | ५.५ | ७.६ | १५२ | १५५ | ११.७ |
| सोडा ॲश | $Na_2Co_3$, कटाव, खारण | १४.२ | २.८ | १७.० | ३४० | ० | ० |
| क्वाड्रफॉस | $Na_6P_4O_3$ धावन | ०.५ | ० | ०.५ | १० | ० | ० |
| देवदार तेल | देवदार तेल, धावन | ०.५ | ० | ०.५ | १० | १०८ | ०.५ |
| पॅरॅगॉन ५०० | ? | ०.५ | ० | ०.५ | १० | | |
| प्रॉक्सॉल T | खनिज तेल, अधिक अनायनिक पायसीकारक, पिंजण | ०.५ | ० | ०.५ | १० | २० | ०.१ |
| ॲसेटिक अम्ल ८४% | $CH_3COOH$, रंगविणे | | १.२ | १.२ | २४ | ६२ | ०.७ |
| ऑलिव्ह सब C३ | तेल, सूतकताई | ०.४ | ० | ०.४ | ८ | | |
| सल्फ्युरिक अम्ल | $H_2So_4$, कार्बनीकरण, रंगविणे | ० | ०.२ | ०.२ | ४ | ० | ० |
| क्रोमस्थापक (mordant) | $Na_2Cr_2O_7 + (NH_4)_2SO_4$ रंगविणे | ० | ०.४ | ०.४ | ८ | ० | ० |
| क्रोम | $Na_2Cr_3O_7$, रंगविणे | ० | ०.६ | ०.६ | १२ | ० | ० |
| ग्लॉबर लवण | $Na_2SO_4$ रंगविणे | ० | ०.४ | ०.४ | ८ | ० | ० |
| मानोक्लोरो बेंझेन | $C_6H_5Cl$, रंगविणे | ० | ०.२ | ०.२ | ४ | ३ | ० |

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| नॉप्को १६५६ | विलेय चरबीयुक्त एस्टर, सूतकताई | ० | ०.२ | ०.२ | ४ | १२ | ० |
| आयव्हरसॉल | साबणांचे मिश्रण; विलेयक, आणि प्रक्षालक; धावन | ० | १.६ | १.६ | ३२ | ६० | १.० |
| रिन्सॉल | प्रक्षालक; धावन | ० | २.९ | २.९ | ५८ | ७२ | २.१ |
| सुपरटेक्स E | चरबीयुक्त अम्ल साबण, क्रेसिलिक अम्ल, धावन | ० | ०.२ | ०.२ | ४ | २५ | ०.१ |
| लोकर सफाइ B | उच्च प्रमाणात कार्बोहायड्रेटे आणि एन्झाइम; सफाइ, | ० | २.३ | २.३ | ४६ | ५७ | १.३ |
| | अतिरिक्त अपद्रव्ये, उपबेरीज | १८.७ | १८.५ | ३७.२ | ७४८ | | १७.५ |
| | नैसर्गिक अपद्रव्ये, ग्रीज, स्वेदावशेष (suint) घाण | १५०.० | ० | १५०.० | ३००० | १६.७ | २५.० |
| | संपूर्ण बेरीज | १६८.७ | १८.५ | १८७.२ | ३७४८ | | ४२.५ |

* प्रतिशत् OWC हा रसायनातील आपल्या वजनावर आधारित केलेला अंतर्हित BOD असतो; प्रतिशत् OWF हा लोकरीच्या वजनावर आधारलेला रसायनामुळे निर्माण झालेला BOD असतो.

## कोष्टक २१–४

### लोकरींच्या प्रक्रियांतील संभाव्य प्रदूषणाची तुलना
### ( मॅसेली आणि बर्फोर्ड प्रमाणेः (७१) )

| | कटाव व सफाई गिरणी, BOD | | | सफाई गिरणी, BOD | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | % OWF* | % एकूण† | % ‡ लघुकरण | % OWF* | % एकूणाचे† | % § लघुकरण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| **पद्धत I** | | | | | | |
| साबणाने कटाव करा | २५.० | ५५ ४ | | | | |
| अॅसेटिक अम्लाने रंगसाठा करा | ४.९ | १०.९ | | ४.९ | २४.४ | |
| १०० % BOD तेलाने पिंजण करा | | | | | | |
| साबणाने खारवण करा | १५.० | ३३.३ | | १५.० | ७४.६ | |
| साबणाने धावण करा | | | | | | |
| कार्बनीकरण केल्यानंतर उदासीन करा | ०.२ | ० ४ | | ० २ | १.० | |
| एकूण – | ४५.१ | | | २०.१ | | |
| **पद्धत II** | | | | | | |
| १२% BOD प्रक्षालकाने कटावण करा | २२.१ | ७४.६ | | | | |
| अमोनियम सल्फेटने रंगसाठा करा | ०.९ | ३.० | | ०.९ | १२.० | |
| २०% BOD तेलाने पिंजण करा | | | | | | |
| १२% BOD प्रक्षालकाने खारण ( fulling ) करा | ६.४ | २१.६ | | ६.४ | ८५.३ | |
| १२% BOD प्रक्षालकाने धावन करा | | | | | | |
| कार्बनीकरण करून उदासीन करा | ०.२ | ०.७ | | ०.२ | २.७ | |
| एकूण – | २९.५ | | ३४ | ७.५ | | ६३ |

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
|---|---|---|---|---|---|---|
| पद्धत III | | | | | | |
| विलेयक कटाव, फक्त ग्रीजचे पुनःप्रापण करा | ० | ० | | | | |
| स्वेदवशेषक लवणे आणि घाण १२ % BOD प्रक्षालकाने धुवून काढा | १०.० | ५८.९ | | | | |
| अमोनियम सल्फेटने रंगसाठा करा | ०.९ | ५ ३ | | ०.९ | १२.९ | |
| ३% BOD तेलाने पिंजण करा | | | | | | |
| १२% BOD प्रक्षालकाने खारण करा | ५.९ | ३४.७ | | ५.९ | ८४.३ | |
| १२% BOD प्रक्षालकाने धावन करा | | | | | | |
| कार्बनीकरण करून उदासीन करा | ०.२ | १.२ | | ०.२ | २.९ | |
| एकूण — | १७.० | | ६२ | ७.० | | ६५ |
| पद्धत IV | | | | | | |
| मेथिल आणि आयसोप्रोपिल अल्कोहोलने कटावण करा; ग्रीज आणि स्वेदावशेषकांचे पुनःप्रापण करा | ० | ० | | | | |
| प्रक्षालकाने घाण धुवून काढा | १.० | १९.६ | | | | |
| अमोनियम सल्फेटने रंगसाठा करा | ०.९ | १७.६ | | ०.९ | २२.० | |
| ३ % BOD तेलाने पिंजण करा | | | | | | |
| १२% BOD प्रक्षालकाने खारण ( fulling ) करा | ३.० | ५८.८ | | ३.० | ७३.२ | |
| १२ % BOD प्रक्षालकाने धावन करा | | | | | | |
| कार्बनीकरण करून उदासीन करा | ०.२ | ३.९ | | ०.२ | ४.९ | |
| एकूण — | ५.१ | | ८९ | ४.१ | | ८० |

* भट्टीत सुकविलेल्या लोकरीवर आधारित

† त्या विशिष्ट पद्धतीतील बेरजेवर आधारित

‡ पद्धत I ( ४५.१ % OWF ) च्या बेरजेवर आधारित

§ पद्धत I ( २०.१%OWF ) च्या बेरजेवर आधारित

कोष्टक २१–५

लोकर गिरणीतील अपशिष्टांचे विश्लेषण (मॅसेली व इतरांच्या प्रमाणे (७१) )

| पद्धत | क्षारता * | | | घनपदार्थ | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | pH | $CO_3^-$, ppm | $HCO_3^-$, ppm | एकूण, ppm | स्थिर, ppm | बाष्पशील, ppm | BOD ppm |
| ग्रीज कटाव, १ ला प्याला, साबण–क्षार | ९.७ | ४८७० | ७३४० | ६४४४८ | १९१३३ | ४५३१५ | २१३०० |
| ग्रीज कटाव, १ ला प्याला, प्रक्षालक–$Na_2SO_4$ | ८.० | ० | ६४४२ | ६०५९३ | १९८८९ | ४००१२ | १५४०० |
| ग्रीज कटाव, २ रा प्याला, साबण–क्षार | १०.४ | ९१५३ | २२१४ | २५६२४ | १५१३१ | १०४९३ | ४७८० |
| ग्रीज कटाव, २ रा प्याला, प्रक्षालक–$Na_2SO_4$ | ८.३ | १६ | ४६३ | ६३६८ | २०८६ | ४४७८ | ११६० |
| ग्रीज कटाव, ३ रा प्याला, साबण–क्षार | ९ ७ | ३५५ | १५४ | ११२९ | ५५५ | ५७४ | २५५ |
| ग्रीज कटाव, ३ रा प्याला, प्रक्षालक–$Na_2SO_4$ | ७.३ | ० | ७५ | १६०९ | ५२५ | १०८३ | १७० |
| साठा रंगविणे, ॲसेटिक अम्ल | ७.३ | १८ | ८०३ | ३८५५ | २२४८ | १२६६ | २१८२ |
| साठा रंगविणे, अमोनियम सल्फेट | ६.७ | ० | १९४ | ८३१५ | ३७८२ | ४५३३ | ३७९ |
| खारणानंतर (fulling) धावन करा, १ ला साबण, खारणाकरता साबण वापरला | १०.० | २११७ | ५८४ | १९२६७ | ४७७१ | १४४८९ | ११४५५ |
| खारणानंतर धावन करा, १ ला साबण, खारणाकरता प्रक्षालक वापरला | ९ ७ | ३८० | ६० | ४८३० | ९७७ | ३८५३ | ४००० |
| कार्बनीकरणाच्या मागोमाग उदासीनीकरण, १ ले प्रवाही ( running ) निथळण | २.२ | ० | ० | १२४१ | १९३ | १०४८ | २८ |
| कार्बनीकरणाच्या मागोमाग, उदासीनीकरण, १ ले सोडा–रक्षा स्नान | ८.५ | ५१७ | २७८८ | ९७८१ | ९५५९ | २२२ | २८ |
| रंगाच्या किटल्यांत लोकरीचे प्रकाशीय विरंजन | ६.० | ० | २८१ | ९०८ | ३७६ | ५३२ | ३९० |

* अपशिष्टाच्या कोणच्याही नमुन्यात मुक्त हायड्रॉक्साइड नव्हते.

मिसळलेले साबण आणि पृथक्ककरण करणारे (sequestering) एक द्रव्य खारण प्रक्रियेत वापरण्यात येते; अतिरिक्त खारण द्रावणसुद्धा, कापड पिळून आणि/अथवा धुवून त्यातून काढून टाकले पाहिजे. लोकरीतील वनस्पति द्रव्य गरम दाट अम्लाचा उपयोग करून सुटचा, जळक्या कणात परिवर्तित करण्याकरता वापरण्यात येणाऱ्या प्रक्रियेस कार्बनीकरण म्हणतात. हे कण यंत्रात चिरडण्यात येतात व नंतर " डस्टर " या नावाच्या यंत्राने कापडातून हालवून काढून टाकले जातात. या शिवाय, कापडाचे तुकडे रंगविणे, विरंजन, आणि परत खारण करण्याची शक्यता असते पण अशा कामात प्रक्रिया केलेल्या एकूण कापडापैकी अगदी थोडच्या टक्केवारी–चाच संबंध येतो.

**कोष्टक २१–६**

**विभिन्न तंतूंच्या प्रक्रियाकरणातील BOD भार आणि संकेंद्रणे ( मॅसेली आणि इतरांच्या प्रमाणे ) (७१) ***

| तंतू | गॅलन/१०००पौंड | BOD,%OWF | सरासरी BOD,ppm |
|---|---|---|---|
| रेयॉन | ५००० | ५.०–८.० | १२००–१८०० |
| अॅसेटेट | ९००० | ४.०–६.० | ५००–८०० |
| नायलॉन | १५००० | ३.५–५.५ | ३००–५०० |
| ऑर्लॅनि | २५००० | १०.०–१५.० | ५००–७०० |
| डेक्रॉन : | | | |
| ओ फेनिल फेनॉल | १२००० | १५.०–२५.० | १५००–२५०० |
| मोनोक्लोरो बेन्झेन | १२००० | ३.०–५.० | ३००-५०० |
| बेन्झॉइक अम्ल | १२००० | ६०.०–८०.० | ६०००–८००० |
| सॉलिसिलिक अम्ल | १२००० | ५०.०–७०.० | ५०००–७००० |
| फेनिलमेथिल कार्बिनॉल | १२००० | ४०.०–६०.० | ४०००–६००० |
| कापूस | ७०००० | १२.५–२५.० | २००–६०० |
| लोकर | ७०००० | ४०.०–६०.० | ७००–१२०० |

* डेक्रॉनच्या माहितीच्या खेरीज इतर माहिती संयंत्रावरील प्रत्यक्ष सर्वेक्षणांवर आधारित केली आहे.

कोष्टक २१–७

संश्लिष्ट तंतूंच्या सफाईकामात वापरलेल्या प्रक्रियारसायनातील BOD चा कार्यभाग (मॅसेली व इतराप्रमाणे (७१) )

| प्रक्रिया रसायन * | BOD † | | |
|---|---|---|---|
| | % OWC | % OWF | % एकूण |
| १ | २ | ३ | ४ |
| | ॲसेटेट प्रक्रिया | | |
| कटाव आणि रंग | | | |
| ॲंटिस्टाट–वंगण | | १.५ | ४४ |
| २% सल्फोनीकृत तेल | ५२ | १.० | ३१ |
| १% सिंडेट ‡ | ५ | ०.१ | २ |
| २% ॲलिफॅटिक एस्टर | ४१ | ०.८ | २४ |
| २% मृदुकारक | ० | ० | ० |
| एकूण | | ३.४ | |
| | नायलॉन प्रक्रिया | | |
| कटाव | | | |
| ॲंटिस्टाट–वंगण | | १.५ | २९ |
| १ % साबण | १५० | १.५ | २९ |
| १ % चरबीयुक्त एस्टर | ५५ | ०.६ | ११ |
| रंग | | | |
| २.४ % सल्फोनीकृत तेले | ५६ | १.७ | ३२ |
| एकूण | | ५.२ | |
| | डेक्रॉन प्रक्रिया | | |
| कटाव | | | |
| ॲंटी स्टाट–वंगण | | १.५ | ९ |
| १% अनायनिक सिंडेट | ५ | ०.१ | ० |
| रंग | | | |
| ४ % ॲसेटिक अम्ल (८४%) | ५८ | २.३ | १३ |
| १०% ओ–फेनिल फेनॉल | १३८ | १३.८ | ७८ |
| संभाव्य अन्य वाहक | | | |
| ६% पी–फेनिल फेनॉल | | | |
| ४०% बेंझॉइक अम्ल | १६५ | (६६.०) | (९४) |
| ४०% सॅलिसिलिक अम्ल | १४१ | (५६.४) | (९४) |
| ३% फेनिलमेथिल कार्बिनॉल | १५० | (४५.०) | (९२) |
| एकूण | | (१७.७) | |

( कोष्टक २१-७ पुढें चालू )

| १* | २ | ३† | ४ |
|---|---|---|---|
| कटाव आणि रंग | रेयॉन प्रक्रिया | | |
| अँटिस्टाट-वंगण | | १.५ | ५० |
| ३ % सिंडेट | १४ | ०.४ | १४ |
| २ % विलेय तेल | ५३ | १.१ | ३६ |
| १० ते ३०% साधें मीठ | ० | ० | ० |
| एकूण | | ३ | |
| कटाव | ऑर्लॉन प्रक्रिया | | |
| अँटिस्टाट-वंगण | | १.५ | १२ |
| २% साबण | १५० | ३.० | २४ |
| प्रथम रंग | | | |
| ०.५% सिंडेट | ० | ० | ० |
| ३% फॉर्मिक अम्ल | २० | ०.६ | ५ |
| द्वितीय रंग | | | |
| १% द्रवकारक | १४ | ०.१ | १ |
| ३% फेनॉलिक संयुगे | २०० | ६.० | ४८ |
| ३% कॉपर सल्फेट | | | |
| २% हायड्रॉक्सी अमोनियम सल्फेट | ४ | ०.१ | १ |
| कटाव | | | |
| २% सिंडेट | ० | ० | ० |
| १% देवदार तेल | १०८ | १.१ | ८ |
| एकूण | | १२.४ | |

* रसायनाच्या आधीचा टक्क्याचा आकडा वापरलेली राशि ( OWF ) दाखविणे.

† आपल्याच वजनावर आधारलेला, रसायनात अंतर्भूत असलेला BOD हा प्रतिशत् OWF असतो; लोकरीच्या वजनावर आधारलेला, रसायनामुळे निर्माण होणारा BOD हा प्रतिशत् OWF असतो. एकूण BOD शी रसायनांचा वाटा ही प्रतिशत् बेरीज असते.

‡ **सिंडेट, संश्लिष्ट प्रक्षालक, दाखविते.**

मेंढयांच्या पाठीवरून काढलेल्या " ग्रीज लोकरीत " लोकरीच्या तंतूचा प्रत्यक्ष अंश सरासरी ४० टक्केच असतो. बाकीचा ६० टक्के भाग वाळू, ग्रीज, स्वेदावशेष ( मेंढीचा वाळलेला घाम ) आणि काटेरी बोंडे ( burr ) यासारख्या नैसर्गिक अपद्रव्यांचा बनलेला असतो. परिणामतः जेव्हा $२\frac{1}{2}$ पौंड ग्रीज लोकरीचे कटावण केले जाते तेव्हा फक्त १ पौंड कटावित लोकर मिळते; याचाच अर्थ, दर १००० पौंड कटावण केलेल्या लोकरीबरोबर १५०० पौंड अपद्रव्ये अपशिष्ट म्हणून सोडली जातात. शिवाय ३०० ते ६०० पौंड प्रक्रिया रसायनेही प्रस्त्रावित केली जातात. BOD च्या संदर्भात दर १००० पौंड कटावित लोकरीचे उत्पादन करताना २०० ते २५० पौंड BOD प्रस्त्रावित होतो.

**कोष्टक २१–८**

**विभिन्न तंतूंच्या प्रक्रियापासूनचे अंदाजित प्रदूषण भार, प्रतिशत् BOD OWF (मॅसेली व इतरांप्रमाणे (७१) )**

| तंतु | नैसर्गिक अपद्रव्ये | खळ, तेले, अँटीस्टाट्स | कटावण (scouring) | रंग, पायसीकारक, वाहक, इत्यादी | विशेष सफाई, जलरोध इ | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| कापूस | ३–५ | ०.५–१०.० | ०.५–६ ० | ०.२–८.० | ०.२–८.० | ४.४-३७ ० |
| ग्रीजयुक्त लोकर | २०.०†३०.० | ०.२- ९.० | १.५-१५.०‡ | ०.५–१०.० | ०.२–८.० | २१.९† ७२.० |
| कटावित लोकर | १.०–२.० | ०.२–९.० | १.०-१५.०‡ | ०.५–१०.० | ०.२–८.० | २.९–४४.० |
| रेयॉन | ० | ०.५–६.० | ० ५–५.० | ०.२–०.५ | ०.२–८.० | १.४–३४.० |
| ॲसेटेट | ० | ०.५–६ ० | ०.५–५.० | ०.२–५.० | ० २–८.० | १.४–२४.० |
| ऑर्लॉन | ० | ०.५–६ ० | ० ५–५.० | ०.२–१०.० | ०.२–८.० | १.७–२९.० |
| नायलॉन | ० | ०.५–६ ० | ०.५–५.० | ०.२–५.० | ०.२–८.० | १.४–२४.० |
| डेक्रॉन | ० | ०.५–६.० | ०.५–५.० | ३.०–६ ० | ० २–८.० | ४.२–७८.० |

* वाङ्मयात वर्णन केलेल्या प्रक्रियापद्धती आणि सर्वेक्षणे, यांच्यावर हे अंदाज आधारित केले आहेत.

† विलायक निःसारणाने ( solvent extraction ) जर ग्रीज व स्वेदावशेष काढून टाकले तर अदमासे २ प्रतिशत् भार कमी करता येईल.

‡ खारणांकरता (fulling) वापरलेल्या साबणांचा सुद्धा उच्च मूल्यांत समावेश आहे.

लोकर कटाव सफाईकाम करण्याच्या गिरण्यातून ९ ते १० pH व सुमारे ९०० ppm BOD, तसेच ३०० ppm एकूण घनपदार्थ, ६०० ppm एकूण क्षारता, ४ ppm एकूण क्रोमियम, व १०० ppm तरंगते घनपदार्थ असलेला, मिश्र मलनि:स्त्राव निर्माण होतो. अपशिष्ट करड्या रंगाचे असते आणि स्वभावत: ते कलील असते: BOD चे महत्वाचे निर्मितिस्थान, कटावण करताना विष्कासित केलेले लोकर–ग्रीज आणि स्वेदावशेष आणि खारणात व धावनात वापरलेला साबण, हे असते. दर १००० पौंड लोकरीवर प्रक्रिया करण्यासाठी अदमासे ७०००० गॅलन पाणी लागते, परंतु साध्या अवसादनाचा या अपशिष्टावर क्षुल्लक परिणाम होतो. यू. एस ए. मधील बहुतेक लोकर गिरण्या कटावित लोकर विकत घेतात आणि रंगविण्याचे आणि सफाइचेच फक्त काम करतात. अशा गिरण्यात संयंत्र अपशिष्टातील BOD ला लोकर–अपशिष्टातून अगदी अल्प योगदान (contribution) मिळते. लोकर गिरणीतील BOD पैकी सुमारे २४ प्रतिशत् BOD रंग प्रक्रियेतून, ७५ प्रतिशत् खारणानंतरच्या धावनातून, आणि फक्त १ प्रतिशत् कार्बनीकरणानंतर केलेल्या उदासीनीकरणातून उद्‌भवतो. अपशिष्टांच्या वैशिष्टयांचा तपशील को. २१–३, २१–४, व २१–५ (मॅसेली इत्यादींच्याप्रमाणे) मध्ये दिला आहे.

## संश्लिष्ट तंतू –

अनिवार्यत: संश्लिष्ट तंतू शुद्ध रासायनिक संयुगांचे बनलेले असतात, आणि त्यात नैसर्गिक अपद्रव्ये नसतात. त्यामुळे रंगविण्याचे कापड तयार करण्यासाठीच फक्त अल्प प्रमाणात कटावण आणि विरंजन करण्याची आवश्यकता असते. कापूस व लोकरीकरता वापरण्यात येणाऱ्या रूढ यंत्रसामग्रीने तंतू व कापडावर सहज प्रक्रिया करता येते. विद्यमान महत्वाचे संश्लिष्ट तंतू, रेयॉन, ॲसेटेट, नायलॉन, ऑर्लॉन, व डेक्रॉन हे आहेत. पुनरुत्पादित सेल्यूलोज पासून मुख्यत: रेयॉन बनविलेले असते; ॲसेटेट हा सेल्यूलोज–ॲसेटेट तंतु असतो. कोणच्याही दीर्घ–शृंखला संश्लिष्ट पॉलीमरिक अमाइडकरता वापरलेली "नायलॉन" ही जातीव (guneric) संज्ञा आहे; ऑर्लॉनि हे संश्लिष्ट पॉलीमरपासून तयार केलेल्या अभिस्थापनीय तंतूचे व्यापारी नांव आहे व त्यात ॲक्रिलिक गटांचे आधिक्य (preponderence) असते. ॲक्रिलोनायट्राइट्स आणि एथिल अथवा मेथिल ॲक्रिलेट हे त्या तंतूंच्या पैकी नवीनतम तंतू आहेत. एथिलीन ग्लायकॉल व टेरेप्थॅलिक अम्लापासून डेक्रॉन हा पॉलिस्टर तंतु तयार करण्यात येतो. ह्या तंतूवरील उपचारणातून निर्माण झालेल्या संपूर्ण प्रदूषणाचा उगम, त्यांच्यावर प्रक्रिया करण्याकरता वापरलेल्या विविध कटावण व रंगविण्याच्या रसायनांत असतो. अशा संयुगांच्या राशी आणि BOD को. २१–६, २१–७ व २१–८ ( मॅसेली व इतरांप्रमाणे ) मध्ये सादर केले आहेत.

## २१–२. वस्त्रनिर्मितीतील अपशिष्टांवरील उपचार –

वस्त्र निर्मितीतील अपशिष्टांची राशि आणि शक्ति कमी करण्याकरता प्रारंभिक कार्य–प्रणालींचे अवलंबन करण्यावर मॅसेली व बर्फोर्ड (७१) यांनी भर दिला आहे. या कार्यप्रणालीत चांगली देखभाल, प्रक्रियेवर केलेले काटेकोर नियंत्रण, प्रक्रिया–रासायनिक प्रतिस्थापन (substitution) आणि पुनःप्रापणाचा संबंध असतो. ते हे मान्य करतात कीं, उत्तम प्रकारे देखभाल केल्यानंतरसुद्धा ५ ते १० टक्क्यानीच BOD भार कमी होतो; तथापि, कापसाच्या किर्यरिंग व सायझिंगवरील अधिक घनिष्ट नियंत्रण आणि निरनिराळ्या अन्य कार्यपद्धतीत वापरलेल्या रसायनांच्या राशीमुळे जास्तीत जास्त ३ टक्क्यापर्यंत प्रदूषण भार कमी होऊ शकतात. रासायनिक प्रतिस्थापनाने प्रदूषण कमी करण्यासंबंधी गंभीर विचार करण्यात येईतो कोणच्याही उपचारण संयंत्राचीं आखणीं करण्यात येऊ नये या मॅसेली व बर्फोर्ड यांच्या निवेदनाशीही लेखक सहमत आहे. जेथे प्रतिस्थापन परिणामकारक होईल अशा कापूस–आणि लोकर गिरण्यातील प्रक्रियांची यादी या लेखकांनी तयार केली आहे.

### कापूस गिरण्या –

१) साबणाऐवजी (१४० ते १५५ टक्के BOD) मंद BOD संश्लिष्ट प्रक्षालक ( ० ते २० टक्के BOD)* वापरणे. जेथे साबण मोठ्या प्रमाणात वापरण्यात येते अशा संयंत्रात कमाल लघुकरण अंदाजे ३५ प्रतिशत् होते. ( तथापि, साबणाऐवजी सिंडेट्स वापरण्यात, ते नाल्यातील व भूजलाच्या पुरवठ्यात टिकून राहतात, हा तोटा आहे.) २) रंगाच्या ऑक्सी–करणासाठी डायक्रोमेट अॅसेटिक अम्लाच्या ( ५ ते १५ टक्के लघुकरण ) ऐवजी बाष्पव्याप्ती ( steam ranges) वापरणे; ३) सफेतीमध्ये दाहकता कमी वापरणे ( १० ते २० टक्के BOD चे लघुकरक, १० ते ३० टक्के दाहकाचे लघुकरण ), ४) उच्च BOD द्रव्यांच्या ( ५ ते १५ टक्के लघुकरण) ऐवजी मंद BOD विसरक, पायसीकारक, समतलक (levelling) इ. द्रव्ये वापरणे; ५) सध्या विस्तृत प्रमाणात वापरण्यात येत असलेल्या उच्च BOD खळीच्या ( sizes ) ( ५० ते ७० टक्के ) ऐवजी मंद BOD खळ ( कॅर्बॉक्सीमेथिल सेल्लूलोज ३ टक्के, पॉली अॅक्रिलिक अम्ल १ टक्का) वापरणे; त्यामुळे, सैद्धान्तिकरीत्या कापूस गिरणीतील

---

* रसायनाच्या दर पौंडास BOD पौंड; म्हणजेच ० ते ०.०२ पौंड BOD / पौंड प्रक्षालक.

एकूण BOD, ४० ते ९० टक्के कमी होतो; ६) रंग कामातील ॲसेटिक अम्लाऐवजी अमोनियम सल्फेट अथवा क्लोराइड ( ० टक्के BOD ) वापरणे.

## लोकर गिरण्या –

१) कटावणाच्या कामात साबणाऐवजी मंद BOD प्रक्षालक (कमाल BOD लघुकरण ५ टक्के शक्य असते) वापरणे; २) अपशिष्टातील उच्च क्षारता कमी करण्यासाठी $Na_2CO_3$ च्या ऐवजी $Na_2SO_4$ प्रक्षालक मिश्रण वापरणे; ३) अनायनिक पायसीकरणासह (२० टक्के BOD) खनिज तेले, पिंजण तेलांच्या ( १०० टक्के BOD ) ऐवजी वापरणे; कटाव व सफाई गिरण्यात सुमारे १० टक्के BOD चे प्रभावीपणे लघुकरण करता येईल आणि सफाई गिरणीत २५ टक्के. ४) खारणाकरता वापरण्यात येणाऱ्या साबणाऐवजी आणि खारणानंतर, धुण्याकरता मंद BOD प्रक्षालकाचा वापर करणे; १५ ते ३० टक्के BOD लघुकरण प्राप्त करता येते; खारणाकरता (fulling) साबणाऐवजी $H_2SO_4$ सुद्धा वापरावा ५) ॲसेटिक अम्लाऐवजी अमोनियम सल्फेट वापरण्याने कटाव व सफाई गिरणीच्या संयंत्रातील एकूण BOD, ५ ते १० टक्क्यांनी कमी होतो.

हे लक्षात ठेवावे कीं, " उच्च BOD संयुगाच्याऐवजी तथाकथित " BOD नसलेली " संयुगे वापरण्यात इतर अडचणी निर्माण होण्याची शक्यता असते: उदा. जेव्हा स्टार्चच्याऐवजी विलेयक साइझ वापरण्यात येतात तेव्हा अनेक मैलापर्यंत नदीत ती टिकून राहतात. ठराविक कालात त्यांचा पाणी पुरवठ्यात शिरकाव होतो, उपचारणास अडथळा येतो, आणि उपचारणास होणाऱ्या त्यांच्या प्रतिरोधामुळे घरगुती पिण्याच्या पाण्यात त्यांचे अस्तित्व दिसून येते. त्यामुळे संयंत्रानी अपशिष्ट उपचारणाच्या प्रारंभिक टप्प्यातील साइझ केवळ प्रतिस्थापितच करू नये असे नव्हे तर पाण्याचा वापर आणि उपचारण पद्धतीही काळजीपूर्वक तपासणे आवश्यक होते. कांही उदाहरणांत जेथे निःस्राव जल घरगुती पाणी पुरवठ्यात मिसळून जात नाही अथवा जेथे उपचारण पद्धती पर्याप्त प्रमाणात वापरण्यात येतात तेथे, वस्त्रनिर्मिति उद्योगातील विलेय साइझचे प्रतिस्थापन ( substitution ) मौलिक ठरते. मेण, पेक्टीन, अल्कोहोल यांच्या सारखीं कापसातील २ लाख टन अपद्रव्ये हल्ली दर वर्षी मलवाहिनीत सोडून दिली जात असल्यामुळे, कांही विशिष्ट द्रव्यांच्या पुन:प्रापणाचा सर्व गिरण्यांनी विचार करणे आवश्यक आहे (७१). पुन:प्रापित रसायनांची दाहक सोडा आणि स्लॅशिंग स्टार्च ही उदाहरणे आहेत. यापूर्वीच अनेक गिरण्यांतून दाहक सोडा पुनः प्राप्त केला जात आहे. परंतु त्याचे मुख्य कारण उरलेले अपशिष्ट जैवी साधनांनी अधिक प्रभावीपणे उपचारित करता येईल, हे आहे. संदूषित कियरिंग

द्रवात सुमारे निम्मा दाहक सोडा असल्याचे दिसून येते आणि उरलेला निम्मा मर्सरीकरणातून उद्‌भवतो. या दाहक सोड्याच्या पुन:प्रापणाकरता आणि शुद्धीकरणाकरता अपोहन (dialysis) आणि बाष्पीभवनाचा उपयोग करण्यात आला आहे. कियर द्रव ही दाहक सोड्याच्या तुलनेने पातळ द्रावणे असल्याने आणि त्यांत डिंक, पेप्टीन आणि हेमीसेल्यूलोज सारखी तरंगती आणि कलील अनेक अन्य अपद्रव्ये असल्याने, कॉस्टिक सोडा पुन: प्राप्त करण्यासाठी अपशिष्टाचे अपोहन अथवा बाष्पीभवन करणे व्यवहार्य असल्याचे दिसून आले नाही.

मॅसेलीने (७०) असे गणित केले आहे की, आपल्या वस्त्रनिर्मिति गिरण्यांतील केवळ स्टार्च–विपांजणाच्या अपशिष्टांतून दर वर्षी ४ लाख टन ग्ल्यूकोज पुन:प्राप्त करता येईल. हा आंकडा पांजणीकरण प्रक्रियाकालातील १० ते १५ टक्के स्टार्चच्या सरासरी वाढीवर आधारित केला होता. ग्ल्यूकोजचे पुन:प्रापण उद्योगालाच केवळ काटकसरीयुक्त फायद्याचे होते असे नव्हे तर त्यामुळे उपचारण करावयाचा BOD भारही ४५ ते ९४ प्रतिशत् कमी होईल. विपांजणी अपशिष्टाच्या बाष्पीभवनातून निर्माण झालेली वाफ गिरणीत वापरता येईल.

लोकर गिरण्यातील अपशिष्टातील लोकर ग्रीज मधील लेनोलीनचे विलायक नि:सारण करून पुष्कळवेळा पुन:प्रापण करण्यात येते. कार्बन टेट्राक्लोराइड अगर बेन्झेन सारखे स्वच्छता कारक द्रावण–विलेयक (त्याकरता) सामान्यत: वापरण्यात येते. आपल्या लोकर गिरण्यांतून लोकर ग्रीजचा ५०००० ते १००००० टन पुरवठा होणे संभवनीय आहे, आणि ग्रीजच्या पुन: प्रापणामुळे BOD चे २० ते ३० प्रतिशत् लघुकरण करता येईल.

नवीन अल्कोहोल नि:सारण प्रक्रियेचा वापर करून स्वेदावशेष सुद्धा पुन: प्राप्त करता येईल व प्रक्षालकांच्या विनिर्मितीसाठी अगर पोटॅशियमच्या लवणासाठी विकता येईल. स्वेदावशेषाच्या पुन:प्रापणामुळे BOD त २० ते ३० प्रतिशत् अतिरिक्त लघुकरण करता येते आणि त्या पद्धतीने यू. एस. मध्ये दर वर्षी ४०००० टन स्वेदावशेष निर्माण केला जातो.

लोकर गिरण्यातील अपशिष्टातून साबण हा एक मौल्यवान पदार्थही प्राप्त करता येण्याजोगा आहे. जरी या देशात किरकोळ प्रमाणात साबण पुन:संपादन करण्याची प्रथा असली तरी त्याचा परिणाम लोकर कटावण आणि सफाई गिरणीतील अपशिष्टातील BOD चे ३० ते ७० प्रतिशत् लघुकरण होण्यात होतो व पुन:प्रापित चरबी अस्तरित करण्याचे (rendering) अथवा इंधनाचे साधन म्हणून वापरता येतो.

यावरून असे दिसून येते की, मोठ्या प्रमाणात अंतर्भूत असलेल्या BOD च्या लघुकरणासह पुन:प्रापण, ही कोणच्याही अपशिष्ट–उपचारण योजनेतील एक महत्वाची पायरी असते.

तथापि, पुन:प्रापण, रासायनिक प्रतिस्थापन ( substitution ), प्रक्रियानियंत्रण, आणि चांगल्या प्रकारे देखभाल करण्याची प्रथा, या बाबी प्रदूषण नाहीसे करण्यास पुऱ्या पडल्या नाहीत तर अतिरिक्त अपशिष्ट–उपचारण पद्धतींचा अवलंब करावा लागतो.

## २१-३. अपशिष्टांवरील अंतिम उपचार –

सामान्यत: अतिरिक्त BOD च्या अंतिम निष्कासनाकरता मुख्य पद्धत म्हणून रासायनिक किलाटन आणि जैवी उपचारणाचा उपयोग करण्यात येतो. तथापि, १० ते १२ या प्रकरणांत निर्देशित केल्याप्रमाणे ह्या दोन्हीही पद्धतींना मर्यादा पडतात. pH च्या नियंत्रणाकरता चुना अगर सल्फ्यूरिक अम्लासह तुरटी, फेरस सल्फेट, फेरिक सल्फेट, अथवा फेरिक क्लोराइड किलाटक म्हणून वापरण्यात येतात. लोकर कटावण अपशिष्टांच्या किलाटनासारख्या कार्यपद्धतीत कॅल्शियम क्लोराइडसुद्धा प्रभावी असल्याचे दिसून आले आहे. जेव्हा एखाद्या विशिष्ट अपशिष्टा बरोबर त्याचा किलाटक वापरण्यात येतो तेव्हां, त्याचा स्वतःचा अनुकूलतम समविद्युत बिंदु (isoelectric point) (कमाल किलाटनासाठी pH) असतो व तो प्रयोग करून निर्धारित केला पाहिजे. एका रसायनापेक्षा दुसऱ्याने कांही अपशिष्टांचे किलाटन अधिक सुलभ होते; तसेच कांही अन्य अपशिष्टांचे काटकसरीच्या कोणच्याही ज्ञात किलाटकाने किलाटन करता येत नाही. एकाद्या विशिष्ट अपशिष्टाच्या रासायनिक किलाटकानें BOD चे लघुकरण करण्याचा अंदाज करण्यासाठी अपशिष्ट–अभियंत्याला मदत व्हावी म्हणून मॅसेलीने (७१) को. २१–९ मध्ये आधारसामग्री सादर केली आहे.

प्रस्तुत लेखकाने १) समानीकरण, २) उदासीनीकरण, ३) प्रमाणीकरण ४) रंग निष्कासन, आणि ५) ऑक्सिजनची मागणी करणाऱ्या सेंद्रिय द्रव्याचे लघुकरण, अशी ५ मार्गांनी, वस्त्र निर्मिति–रंग–अपशिष्टाचे नाल्यात सोडण्यापूर्वी उपचारण केलेच पाहिजे असे निर्देशन केले आहे ( ७९, ८०, ८१ ). असे दिसून आले कीं, $Al_2(SO_4)_3\ 18\ H_2O$ (तुरटी) ने वाहितमल–रंग–अपशिष्ट मिश्रणातून आभासी रंगाचे पूर्ण निष्कासन झाले आणि BOD चेही ६३ टक्के लघुकरण झाले. ८.३ pH असताना २०० ppm आणि ७.० pH असताना १४० ppm इतकी तुरटीची मात्रा लागली

चेंबरलेनने (२३) अशी नोंद केली आहे कीं, रसायनाने रंग–अपशिष्टांचे किलाटन करण्याऐवजी अनेक रंगाचे ऑक्सीकरण अथवा विरंजन करण्यासाठी आणि सल्फर रंगातून BOD काढून टाकण्यासाठी क्लोरीनेटेड कॉपेरसच्या स्वरूपात क्लोरीन वापरण्यात येते. किलाटन व रंग काढून टाकण्यास मदत होण्यासाठी, तसेच अपशिष्ट प्रक्रियेतील अंतिम टप्प्यासाठीसुद्धा

रसायनांच्या बरोबर क्लोरीन वापरता येते. सामान्यपणे १०० ते २५० ppm क्लोरीन याक-रता लागते. सेंद्रिय रंगाचे रंगहीन अंतिम पदार्थात ऑक्सीकरण करणे हा क्लोरीनचा मुख्य परिणाम असतो,

वस्त्रनिर्मितीतील अपशिष्टांचे जैवी साधनांनी उपचारण करण्यात, ठिबकणारे निस्यंदन, उत्प्रेरित अवमल, आणि विसरित–वृद्धिवातन (dispersed-growth aeration) ही अत्यंत यश-

**कोष्टक २१–९**

**काही अपशिष्टांच्या रासायनिक किलाटनाने BOD चे लघुकरण. (मॅसेली व इतर (७१) )**

| रासायनिक अपशिष्ट | BOD चे लघुकरण % |
|---|---|
| साबण * | ९० |
| फेनॉल | ० |
| ग्ल्यूकोज | ० |
| स्टार्च | ५७ |
| जिलेटिन * | ६५ |
| ग्ल्यू * | ३३ |
| पायसीकृत खनिज तेल | ८० |
| सल्फोनीकृत एरंडेल तेल | ८२ |
| सल्फोनीकृत वनस्पती तेल | ४४ |
| खोबरेल तेल* | ९२ |
| ओ-फेनिल फेनॉल | ० |
| सॅलिसिलिक अम्ल | १७ |
| बेन्झॉइक अम्ल | ८ |
| ॲसेटिक अम्ल | ८ |
| ऑक्झॉलिक अम्ल | ० |
| सोडियम असेटेट | ८६ |
| ॲलम–वॅक्स–पायस | ८५ |

* किलाटक म्हणून दर १००० गॅलनला ३ पौंडापेक्षा जास्त तुरटी, ५ पौंड साबण, १८ पौंड जिलेटिन, ५ पौंड डिक, १० पौंड खोबरेल तेल लागले.

स्वी ठरली आहेत. लवचिकता, कमी परिचालन खर्च, आणि अपशिष्टांचे आघात भार ( shock loads), हाताळण्याच्या क्षमतेच्या दृष्टिकोनातून ठिबकणारे निस्यंदन सामान्यपणे इष्ट असते. उत्प्रेरित अवमल उपचारणामुळे BOD चे लघुकरण अधिक प्रमाणात होते. परंतु दीर्घ अवरोधन कालाची (१२ ते ४८ तास) तरतूद करण्यासाठी मोठाल्या संचांची गरज लागते. तसेच उच्च अर्हताप्राप्त पर्यवेक्षणाची आवश्यकता असते. विसरित-वृद्धि वातनाने उत्प्रेरित-अवमल उपचारणापेक्षा BOD चे काहीसे कमी लघुकरण होते. परंतु त्यामुळे अवमल समस्या दूर होते; तसेच त्याला कमीतकमी परिचालन आणि देखभाल करावी लागते.

कोणच्याही जैवी उपचारणाच्या कार्यक्षमतेत अपशिष्टातील प्रारंभिक pH हा नियंत्रक घटक असतो जेव्हा pH, ७ व ९ च्या दरम्यान असतो तेव्हा BOD चे अनुकूलतम लघुकरण प्राप्त होते, परंतु जेव्हा pH कधी कधी ९ ते ११ च्या दरम्यान असतो तेव्हा BOD चे काहीसे लघुकरण घडून येते; या व्याप्तीची मर्यादा अपशिष्टाचा गुणधर्म व वातनापूर्वी प्राप्त झालेल्या समानीकरणावर अवलंबून असते. pH जेव्हा ११.५ पेक्षा वर जातो तेव्हा BOD चे अल्पसे लघुकरण होते अथवा मुळीच होत नाही. pH च्या नियंत्रणाच्या पद्धती खर्चाच्या असू शकतात. त्यामुळे जैवी उपचारणास मान्यता देण्यात खर्चाच्या बाबीची त्यावर मर्यादा पडते. सामान्यत $H_2SO_4$ अम्ल, संदाबित ($CO_2$) वायू अगर दग्ध वायूच्या मिश्रणाने pH खाली आणण्यात येतो. पहिल्या दोन पद्धती अतिशय परिणामकारक आहेत. पण तुलनेने त्यांना जास्त खर्च येतो. तथापि, ज्याच्यात सामान्यपणे १२ ते १४ प्रतिशत् $CO_2$ असतो अशा दाहक द्रावणातील pH कमी करण्यासाठी दग्ध वायु वापरता येतात आणि एकदाका नळ व्यवथा, मार्जक ( scrubber ) आणि आता, यांच्यावरील भांडवली खर्च करणे शक्य झाले कीं, त्याच्या परिचालनास खर्च कमी येतो आणि ते व्यवहार्थ बनते (दग्ध वायूने उदासीनीकरण करण्याच्या तत्वावरील चर्चा प्रकरण ७ मध्ये केली आहे.) दग्ध वायू वापरून उदासीनीकरण करणे केवळ शक्य असते एवढेच नव्हे तर क्षारीय वस्त्रनिर्मिति अपशिष्टावरील जैवी उपचारणात त्याचीं आवश्यकताही असते. बीचेसने (४) असे दाखवून दिले आहे कीं, रंगाच्या कांही अपशिष्टांतील pH, २ पासून ११ च्या व्याप्तीत होता व त्यात ३० ppm सल्फाइडे होती. अपशिष्टातून दग्ध वायू सोडण्याच्या अनेक पद्धतींचा अभ्यास करण्यात आला आणि त्यांना असे आढळून आले कीं, चूषित्राच्या ( aspirator ) तत्वावर परिचालन होणाऱ्या बाजारी धुम्रमार्जकाचा ( fume scrubber ) वापर करून pH, ९ वरून ६.१ पर्यंत खाली आणता आला आणि ९८ प्रतिशत् $H_2S$ निष्कासित करता आला: त्याच्या प्रायोगिक संयंत्राचे आरेख आ. २१-१ व २१-२ मध्ये दिले आहेत. अन्य कर्मचाऱ्यांना सुद्धादग्ध वायु उपचारण करणे शक्य असल्याचे दिसून आले. (१४, २७, ५३, ५४, ५६, ७७, व ११० ).

वस्त्रनिर्मितीतील उच्च प्रमाणात विरघळलेल्या सेंद्रिय अपशिष्टांच्या उपचारणाची पद्धत म्हणून विसरित–वृद्धि वातनास वाढती मान्यता मिळत आहे. १२ व्या प्रकरणात दाखविल्या–प्रमाणे कापड–किर्यारिंग द्रव, एन्झाईम विपांजणीकरण अपशिष्टे, आणि स्टार्च निथळण अप–शिष्टे, यावर केलेल्या प्रायोगिक विसरित–वृद्धि वातनाच्या निष्कर्षांवरून उपचारण संतोषजनक होत असल्याचे दिसून आले. सफाई गिरणीतील अपशिष्टांवरील ह्या उपचारणाचे प्रायोगिक




(अ)




(ब)

**आकृति २१–१. वायु–प्रायोगिक संयंत्रे : (अ) भाला चिमणी व (ब) स्रोत चिमणी.**

संयंत्रावर मिळालेले निष्कर्ष इतके चांगले होते (४९) की, ह्या प्रायोगिक संयंत्र निष्कर्षावर आधारित केलेलें पूर्ण मापाचे उपचारण संयंत्र अभिकल्पित करण्यात आले.

वस्त्रनिर्मिति सफाई गिरणीतील अपशिष्ट आणि घरगुति वाहितमल यांच्या ४० ते ६० प्रतिशत् मिश्रणावर उपचार करण्यात ठिबकणारे निस्यंदक आणि उत्प्रेरिय अवमल, यांचा संयु–




**आकृति २१–२ अपशिष्ट–जल उपचारण संयंत्राचा आरेखीय आराखडा; १) pH चे समायोजन केले जाते व सल्फाइडे काढून टाकली जातात; २) जवळ रंग–अपशिष्ट अवस्थापित अवमलाबरोबर संमिश्रित करण्यात येते; आणि ३) जवळ BOD खाली आणण्यासाठी ठिब–कणाऱ्या निस्यंदकांत संयुक्त अपशिष्टावर उपचार करण्यात येतात.**

४४ पोर्जेस, आर., आणि जी. हॉकिन्स, 'ब्रॉड फील्ड डिस्पोजल ऑफ बीट शुगर वेस्ट्स,' स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २७, १०, ११६० (आक्टोबर १९५५)

४५ पोर्टर, एल. बी., 'बीट ज्यूस प्यूरिफिकेशन बाय आयन एक्स्चेंज, शुगर, ४२, ५, २२–२३ (मे १९४७)

४६ 'प्यूरिफिकेशन ऑफ वेस्ट वॉटर्स फ्रॉम बीट शुगर फॅक्टरीज,' शास्त्रीय आणि औद्योगिक संशोधन विभाग, जल प्रदूषण संशोधनावरील तांत्रिक निबंध क्र. ३, लंडन, हीज मॅजेस्टीज स्टेशनर्स ऑफीस, (१९३६)

४७ रिचर्डस, ई. एछ., आणि डी. डब्ल्यू. कटलर, 'ब्रिटिश एक्सपेरिमेंट्स, केमिकल अँड बायॉलॉजिकल ट्रीटमेंट,' स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, ५, ५, ८७७ (सप्टेंबर १९३३)

४८ रिले, एफ. आर., आणि डब्ल्यू. ई. सॅन्बॉर्न 'आयन एक्सचेंज प्रोसेस हॅज मॅचुअर्ड,' शुगर, ४२, ७. २४–२९ (जुलै १९४७)

४९ रोजर्स, टी. एछ., 'रिपोर्ट ऑफ टेक्निकल कमिशन,' स्वास्थ्य अभियांत्रिकी अपर मिसिसिपी मंडळ, (फेब्रुवारी १९४७)

५० रोजर्स, एछ. जी., आणि एल. स्मिथ, 'बीट शुगर वेस्ट लगूनिंग,' ८ व्या औद्योगिक अपशिष्ट संमेलनाची कार्यवाही, पर्ड्यू विश्वविद्यालय ,(मे १९५३) पा. १३२

५१ रुडॉल्फ्स, डब्ल्यू; इंडस्ट्रियल वेस्ट, न्यू यॉर्क, राइनहोल्ड पब्लिशिंग कार्पो. १९५३ पा. ४७३–४७८

५२ सॅन्बॉर्न, एन. एछ; 'स्प्रे इरिगेशन एफ्लुअंट डिस्पोजल,' स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २५, ९, १०३४ (सप्टेंबर १९५३)

५३ सॉयर, सी. एन., 'बीट शुगर ट्रीटमेंट प्रोसेस,' स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २२, २, २२१ (फेब्रुवारी १९५०)

५४ साऊथगेट, बी. एस; 'रीयूज ऑफ वेस्ट वॉटर' स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २०, १, १६९ (जानेवारी १९४८)

५५ साऊथगेट, बी. एस; ट्रीटमेंट अँड डिस्पोजल ऑफ इंडस्ट्रियल वेस्ट वॉटर्स, लंडन हिज मॅजेस्टीज स्टेशनर्स ऑफिस, (१९४८) पा. ३१७

५६ स्पेंग्लर, ओ; 'जर्मन डिस्पोजल प्रॅक्टिस,' स्युवेज अॅन्ड इंडस्ट्रियल वेस्ट्स, ७, १, १३१ (जानेवारी १९३५)

५७ स्टिल्झ, डब्ल्यू. पी., 'व्हायब्रेटिंग स्क्रीन्स इन इंडस्ट्रियल वेस्ट वॉटर ट्रीटमेंट,' इंडस्ट्रियल वेस्ट्स, १, २, ६८ (नोव्हेंबर–डिसेंबर १९५५)

५८ स्टोन, पी; 'शुगर केन प्रोसेस वेस्ट, ओरिजिन अँड ट्रीटमेंट,' स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २३, ८, १०२५ (ऑगस्ट १९५१)

५९ स्ट्रीटर, एछ. डब्ल्यू., 'रिव्ह्यू ऑफ बीट शुगर वेस्ट्स,' स्युवेज अॅन्ड इंडस्ट्रियल वेस्ट्स, ५, ५, ८७६ (सप्टेंबर १९३३)

६० 'दि यूज ऑफ लाईम इन इंडस्ट्रियल वेस्ट ट्रीटमेंट,' ट्रेड वेस्ट परिपत्रक क्र. १ राष्ट्रीय चुना संघ, वॉशिंग्टन, डी. सी., (एप्रिल १९४८) पा. ९

६१ विंटझेल, टी; आणि टी. Lauritzson, 'रिटर्न ऑफ बीट शुगर फॅक्टरी वेस्ट वॉटर,' शुगर, ३९, ९, २६ (सप्टेंबर १९४४); ३९, १०, २८ (मे १९४५)

६२ वुड, ए; जे. एछ. गॉव्हिन, आणि बी. ए. फॉर्स्टर, 'ब्रिटिश प्रॉब्लेमः ट्रीटमेंट रेकमेन्डेशन्स,' स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स ४, २, ३८७ (मार्च १९३२)

## संकीर्ण अन्न प्रक्रिया-अपशिष्टे –

कॉफी, तांदूळ, मासे, लोणची व पेयांसारख्या अन्नोत्पादनातील अपशिष्टे, या प्रकरणात वर्णन केलेल्या अन्य अन्नप्रक्रिया अपशिष्टांपेक्षा कांहीशा कमी प्रमाणात प्रचलित आहेत. असे असले तरी, त्यांचे महत्व कमी नसते आणि कांही प्रमाणात त्यांचा अभ्यास करणे अवश्य असते.

## २२–१४. कॉफीच्या अपशिष्टांचा उद्‌भव आणि गुणधर्म –

आपल्या कॉफीचा बराच मोठा भाग दक्षिण अमेरिकेतून येतो व त्यातील बऱ्याचशा कॉफीवर तेथे प्रक्रिया करण्यात येत असे, पण कच्च्या कॉफीच्या बिया प्रक्रिया करण्याकरता आता या देशात वाढत्या प्रमाणात पाठविल्या जात आहेत. चांगल्या दर्जाचे धावन केलेल्या कॉफीला युनायटेड स्टेट्समध्ये कमाल भाव मिळत असल्यामुळे कॉफीच्या बहूतेक बिया धुण्यात येतात; म्हणजेच पिकलेली फळे तोडून पाण्याचा वापर लागणाऱ्या प्रक्रियेत दळण्यात येतात. " शुष्क " प्रक्रियेपासून कॉफीची ही प्रक्रिया वेगळी असते. शुष्क प्रक्रियेत झाडावरील फळे तोडून गिरणीत सुकी दळून टरफले काढून टाकण्यात येतात. धावनाकरता दर पौंड तयार कॉफीस २६० गॅलन पाणी लागते, म्हणून विशेषतः जेंव्हा संमिश्रण ( blending) आणि होरपळण्या ( roasting ) प्रमाणे धावनही एकाच संयंत्रात करता येते तेव्हा समस्या निर्माण होण्याचा संभव असतो.

कॉफीचे बुंद ( cherry ) संग्राहक डोण्यात ओतून तेथून ते पाण्याने लगदा करणाऱ्या यंत्रात वाहून नेण्यात येतात. ते वाहून नेले जात असताना खडे व इतर पालापाचोळा पाश व तरंगकांच्या सहाय्याने वेगळे करण्यात येतात. चांगले नसलेले बुंद लगदा यंत्राकडे स्वतंत्रपणे पाठविले जातात. लगदा यंत्रात टरफले आणि कॉफीच्या बियांतील गराचा बराच भाग काढून टाकण्यात येतो. टरफल काढून टाकलेले बी पाण्यातून आंबवण करण्याच्या डोणीत नेण्यात येते व (त्यावेळी) अतिरिक्त पाणी निःसारित करून जरूर पडल्यास पुनः वापरण्यात येते. आंबवणाच्या डोणीतील बी आर्द्रावस्थेत ठेवून आंबवण्यात येते. आंबवण काल १२ तासाइतका कमी अथवा २ दिवसाइतका दीर्घ असू शकतो. कॉफीच्या बीयांच्या रुपेरी सालीच्या चर्मयंत्राच्या भोवतालच्या चेरीचा गर समाधानकारकपणे काढून टाकण्यासाठी आंबवणाची गरज असते. गरातील प्रोटोपेक्टीन विरघळून जात नाही आणि चर्मपत्रातून ( parchment ) ते धुवून अगर खरडून काढता येत नाही. न आंबलेला गर आणि न सुकलेली साल बीपासून समाधानकारकपणे काढून टाकता येईल असे यंत्र विकसित करण्यात आलेले नाही, कडक चर्मपत्रास प्रोटोपेक्टीन चिकटून बसत असल्याने बीयांचे विघातक आंबवण आपोआप झाल्याखेरीज बियांचा समाधानकारकपणे वापर करता येत नाही. आंबवणाच्या प्रक्रियेमुळे स्वच्छ चर्मपत्रात बी सुकविणे शक्य होते व त्यामुळे शुद्धतेची खात्री मिळते.

कॉफीच्या प्रक्रियाकरणातील आंबवणाची उत्पत्ति खालीलप्रमाणे आहे :–

१) प्रोटोपेक्टीन $\xrightarrow{\text{प्रोटोपेक्टिनेज}}$ पेक्टीन

२) पेक्टीन $\xrightarrow[\text{पेक्टिनेज}]{\text{पेक्टेन}}$ { पेक्टिक अम्ल + $CH_3OH$ / गॅलॅक्टयुरॉनिक अम्ल + $CH_3OH$ }

३) पेक्टीन अम्ल + कॅल्शियम → कॅल्शियम पेक्टेट ( विलेय जेली )

ज्यातील कांही पदार्थ विलेय असतात असे हे द्रव्य कॉफीच्या बियांच्या चर्मपत्रापासून सहज धुवून काढून टाकता येते. आंबवणानंतर बिया धुवून पुनः पाण्यातून खुल्या शुष्कन खोल्यात ( patios ) वाहून नेण्यात येतात. बिया पाण्यातून गाळून घेऊन अनेक दिवस उघड्यावर पसरून उन्हात वाळवण्यात येतात; कांही संयंत्रात सूर्यशुष्कनाशिवाय यांत्रिकी शोषकही ( driers) वापरण्यात येतात. जेव्हा रंग व स्वाद यांची खात्री होईल इतक्या कॉफीच्या बिया सुकविल्या जातात तेव्हा त्यानंतर त्यांच्यावरील साल काढून टाकण्याकरता दळून, वर्गवारी करून आणि पोत्यात भरून त्या बाजारात पाठविण्यात येतात.

कोष्टक २२–२२

कॉफीच्या बियांची बनावट

| घटक भाग | सरासरी % |
|---|---|
| पाणी | ९–१२ |
| राख | ४ |
| नायट्रोजन | १२ |
| सेल्यूलोज | २४ |
| शर्करा | ९ |
| डेक्स्ट्रीन | १–१५ |
| चरबी | १२ |
| कॅफेटॅनिक अम्ल | ८–९ |
| कॅफीन | ०.७–१.३ |
| नायट्रोजन रहित अर्क (nitrogentfree extract) | १८ |
| अनिवार्य तेल ( egsential oil ) | ०.७ |
| जल–विलेय द्रव्य | २५–३ |

कोष्टक २२–२३

कॉफीची अपशिष्टे

| उद्‌भव | BOD, ppm | अवस्थापनशील घन–पदार्थ, ppm | एकूण घनपदार्थ, ppm | तरंगते घनपदार्थ ppm |
|---|---|---|---|---|
| लगदा | ४७००० | | | |
| आंबवण अपशिष्टे | १२५०–२२२० | ६६०–७०० | ४२६० | २०६० |
| लगदाकारक अपशिष्टे | १८००–२९२० | ६०-१२७ | ४९६० | ८४८ |
| संयुक्त लगदा व आंबवण अपशिष्टे | ६१५०–१३४००० | १६० | ३२२० | |

कॉफीच्या गिरण्यातील पाण्याचा मुख्य उपयोग (आणि अपशिष्टांचा उद्भव) या प्रमाणे १) लगदाकारकाकडे बिया वाहून नेणे, २) लगदा नाळक्यात अथवा ढिगात ओतणे ३) आंबवण्याच्या डोण्यात बिया वाहून नेणे, ४) आंबवलेल्या बिया धुणे, ५) आंबलेल्या बिया शुष्कन पॅशोंच्याकडे वाहुन नेणे, ६) खडे अडवून ठेवण्याकरता पाश आणि " तरंगक " वेगळे करण्याकरता उपाय म्हणून, बियांचे द्रवीय वर्गीकरण करण्याचे माध्यम म्हणून, व बॉयलरमधील पाणी म्हणून संकीर्ण उपयोगाकरता वापरणे हा असतो.

कॉफीची चेरी अथवा बी तयार होण्यास कारणीभूत असलेले घटक को. २२–२२ मध्ये दाखविले आहेत कॉफीच्या बियांच्या प्रक्रियेतील चार प्रमुख अपशिष्टे, लगदा, लगदाकारक अपशिष्ट, आंबवणातील धावन जल (टाकी जल) आणि साल (चर्मपत्र) ही असतात.

**कोष्टक २२–२४**

**कॉफी प्रक्रियाकरणातील अपशिष्ट–जलांच्या तपासणीचे सर्वसाधारण निष्कर्ष (१९४६) (१)**

| अपशिष्ट–जल | राशि गॅलन/टन. निर्भेळ कॉफी | एकूण राशीशी प्रमाण, % | | BOD ३–दिवस २६.७ °C तपमान | एकूण BOD शी प्रमाण, % | |
|---|---|---|---|---|---|---|
| लगदाकारक अपशिष्टे | | | | | | |
| लगदा जल | ४४९० | ३४ | ५७ | २४०० | ४५ | ८५ |
| मुख्य टाकीतील निःस्त्राव | २२२० | १७ | | ३९०० | ३५ | |
| पुनर्गमन टाकीतील निःस्त्राव | ८४० | ६ | | | ५ | |
| टाकीतील धावन अपशिष्टे | | | | | | |
| पहिली टाकी | २८० | २ | ५ | २८०० | ४ | ६ |
| दुसरी टाकी | २७० | २ | | १३०० | १ | |
| पुनर्गमन टाकी | १६५ | १ | | १९०० | १ | |
| नालीतील धावन | | | | | | |
| मुख्य | ४७०० | ३५ | ३८ | ४० | ८ | ९ |
| पुनर्गमन | ४४० | ३ | | | १ | |
| एकूण | १३४४५* | १०० | | | १०० | |

* सामान्यतः २०००० गॅलन / टन कॉफी

**कोष्टक २२–२५**

**कॉफीच्या आंबवणातील अपशिष्टे* (३)**

| गुणधर्म | किमान, ppm | कमाल, ppm | सरासरी, ppm |
|---|---|---|---|
| BOD | २९५ | ३६०० | १७०० |
| pH | ४.१ | ५.५ | ४.५ |
| गढूळपणा | ६५० | ४००० | १७५० |
| तरंगते घनपदार्थ | २३५ | २३८५ | ९०० |
| एकूण घनपदार्थ | ८८५ | ३१४० | २१०० |

* नि:स्त्रावातील निरनिराळ्या ३० नमुन्यांवर आधारित.

**कोष्टक २२–२६**

**कॉफीच्या लगद्याचा नाश ( depulping ) करण्यातील अपशिष्टे* (३)**

| गुणधर्म | किमान, ppm | कमाल, ppm | सरासरी, ppm |
|---|---|---|---|
| BOD | ३२८० | १५००० | ९४०० |
| pH | ४.१ | ४.७ | ४.४ |
| गढूळपणा | १५०० | ४००० | २९०० |
| तरंगते घनपदार्थ | ६२५ | १०५५ | ७९० |
| एकूण घनपदार्थ | १००९० | १२३४० | ११३०० |

* निरनिराळ्या दिवशी घेतलेल्या १२ नमुन्यांवर आधारित.

लगदा हे सर्वात जास्त त्रासदायक होण्याचा संभव असलेले एक अपशिष्ट आहे, परंतु सामान्यपणे पुन:प्रापण करून ते इंधन वा खत म्हणून वापरता येते, जेव्हा ताजा लगदा अनावृत स्थितींत ढीग करून ठेवण्यात येतो तेव्हा (त्यातील) साखरेकडे माशा आकर्षित होतात व

जेव्हा लगद्याचे आंबवण सुरू होते तेव्हा त्याला घृणास्पद दुर्गंधी येऊ लागते. **लगदाकारक पाण्यात** अवस्थापनशील घनपदार्थ तुलनेने उच्च प्रमाणात असतात आणि त्यात साखर व अन्य विलेय द्रव्ये असल्याने ते उच्च प्रमाणात प्रदूषणकारक असते. आंबवण (टाकीतील) अपशिष्टात लगदाकारक अपशिष्ट–जलाच्या तुलनेनें पेक्टीनच्या अनेक जेली आणि अन्य पदार्थ असतात. ते अपशिष्ट म्हणून सौम्य तसेच तुलनेने स्थिर आणि अक्षोभक असते. सुकविलेले बी कोरडे असताना दळल्यामुळे त्यातून निर्माण झालेली **सालपटे** ( parchment ) अपशिष्ट पदार्थ म्हणून महत्वाची नसतात, कारण त्यात जवळ जवळ शुद्ध सेल्यूलोज असते आणि वाफ तयार करण्यात बॉयलरमध्ये इंधन म्हणून ती वापरण्यात येतात व त्यामुळे गिरणीत लागणाऱ्या शक्तीचा पुरवठा होतो. निरनिराळ्या प्रमाणात पाण्याचा वापर करणाऱ्या कॉफीच्या तीन संयंत्रातील अपशिष्टांचे सर्वसाधारण स्वास्थ्यविषयक गुणधर्म को. २२–२३ मध्ये सादर केले आहेत. को. २२–२४ मध्ये कॉफीच्या अपशिष्टातील पाण्याच्या राशि आणि BOD दिला आहे (१). को. २२–२५ मध्ये आंबवणाच्या धावन–जलाच्या अपशिष्टांचे गुणधर्म आणि को. २२–२६ मध्ये लगद्याचा नाश करणाऱ्या ( depulping ) अपशिष्टांच्यासंबंधी हॉर्टनचा (३) अहवाल सादर केला आहे.

## २२–१५. कॉफीच्या अपशिष्टांवरील उपचार –

उच्च गतीने लागू केलेल्या आणि पुनराभिसरण केलेल्या जैवी निस्यंदकांनी कॉफीच्या अपशिष्टावर उपचार करण्याची प्रभावी तरतूद होते असे हॉर्टने (३) सिद्ध केले. (को. २२-२७ आणि त्यातील निःस्त्राव सिंचाईकरता वापरण्याचा प्रस्ताव केला त्याने असाही निष्कर्ष काढला की, एका तासाच्या अवसादनाने BOD फक्त १६ ते २९ टक्के कमी झाला परंतु मिश्र कॉफी–अपशिष्टांचा BOD रासायनिक किलाटन करून जास्तीत जास्त ५० टक्के कमी करता आला. ब्रॅडनने (१) अनेक पद्धती वापरून कॉफी–अपशिष्टांच्या उपचारणावरील खर्च आणि निष्कर्ष (को. २२–२८) मध्ये सादर केले आहेत. त्यांचे असे म्हणणे आहे की, कॉफीच्या बहुतेक गिरण्यात अपशिष्टे गाळणे आणि त्यांचे प्राथमिक अवसादन करणे वाजवी असते. कारण पुनःप्रापण करून सुकविलेला लगदा, इंधन आणि खत अशा दोन्ही प्रकारे, मौल्यवान असतो आणि खालील प्रमाणे त्याची बनावट असते.

**प्रोटीन १.३ %, तंतू १९.७ %, नायट्रोजनमुक्त अर्क ५०.१%, व राख ९ %**

**कोष्टक २२-२७**

**जैली निस्यंदकातून * पुनरामिसरण करून कॉफीच्या अपशिष्टावर केलेले संयुक्त (आंबवण व लगद्याचा नाश करणे) उपचार (३)**

| पुनराभिसरणाचा वेग दर दिवशी दशलक्ष गॅलन | दर ताशी पुनराभिसरण | ५ - दिवसांचा BOD | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | अवस्थापित अपशिष्ट ppm | करता अवस्थापनाचा उपचार केल्यानंतर | | | करता उपचार केल्यानंतरचे लघुकरण | | |
| | | | २ तास ppm | ४ तास ppm | ६ तास ppm | २ तास % | ४ तास % | ६ तास % |
| २० | ५ | २२०० | ६०० | ५५० | २५० | ७२.७ | ७५.० | ८८.६ |
| ४० | ५ | २४५० | ९२० | ६५० | ४२० | ६२.४ | ७३.५ | ८२.९ |
| ४० | ८ | २८०० | ९५० | ७०० | ४०० | ६६.१ | ७५.० | ८५.७ |
| ४० | १० | २९५१ | ९०० | ७०० | ४५० | ६९.५ | ७५.३ | ८४.७ |
| ६० | ५ | २८५० | ९६० | ६९० | ३८० | ६६.४ | ७५.८ | ६७.७ |

* ५ चांचण्यांच्या निष्कर्षावर आधारित

## संदर्भ कॉफी अपशिष्टे –

१ ब्रॅडन, टी. डब्ल्यू; 'ट्रीटमेंट अँड डिस्पोजल ऑफ वेस्ट वॉटर्स फ्रॉम प्रोसेसिंग ऑफ कॉफी,' पूर्व आफ्रिका कृषिपत्रिका, १४, ४, १७९ (एप्रिल १९४९).

२ ब्रॅडन, टी. डब्ल्यू; 'कॉफी वेस्ट वॉटर्स, ट्रीटमेन्ट अँड डिस्पोजल,' स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २२, १, १४२ (जानेवारी १९५०)

३ हॉर्टन, आर. के; एम. पॅचेलो, आणि एम. एफ. संताना, 'स्टडी ऑफ दि ट्रीटमेंट ऑफ दि वेस्ट्स फ्रॉम दि प्रिपरेशन ऑफ कॉफी,' स्वास्थ्य अभियांत्रिकी आंतर अमेरिका विभागीय संमेलनात सादर केलेला प्रबंध, कॅरकॅस, व्हेनेझ्युएला, ( सप्टेंबर २६ – आक्टोबर २, १९४६ )

४ 'इंटेरिम रिपोर्ट बाय कॉफी पोल्यूशन कमेटी, केनिया कॉलनी,' पूर्व आफ्रिका कृषि-पत्रिका –

५ वॉर्ड, पी. सी; 'इंडस्ट्रियल कॉफी वेस्ट्स इन एल साल्व्हॅडोर,' स्युवेज वर्क्स जर्नल १७, १, ३९ (जानेवारी १९४५)

## २२–१६. तांदुळातील अपशिष्टे –

खाण्याजोगा तांदूळ बनवण्यात तो भिजवताना, शिजवताना आणि धुताना केलेल्या प्रक्रियांतून अपशिष्टाची बरीच राशि निर्माण होते. हाताळलेल्या अनुपचारित तांदूळाच्या दर टनाला ही राशि सुमारे ६०,००० गॅलन असते. त्यापैकी १२ ते १४ टक्के भिजवण्याच्या आणि तितकीच राशि शिजविण्याच्या प्रक्रियेतून येते. उरलेली ७५ टक्के राशि धुवून आणि त्यानंतर केलेल्या तांदळाच्या निःसारणातून उद्भवते.

ह्यूकेलेकियनने अनेक नमुन्यांच्या सरासरीवर आधारित केलेले एक विश्लेषण को २२-२९ सादर केले आहे. कलील आणि विलेय द्रव्यांच्या स्वरूपात बहुतेक BOD असल्याने अवस्थापनाने फक्त २९ टक्केच त्याचे लघुकरण होते आणि पातळ व विचरणशील अवमल राशींचा त्यात संबंध येत असल्यामुळे (अवस्थापनाची) शिफारस केलेली नाही. किलाटक म्हणून २००० ppm चुन्याचा वापर करून BOD चे ६० प्रतिशत् लघुकरण प्राप्त करण्यात आले आहे. दर दिवशी द. घ. फुटास BOD चे भारण ०.०२ ते १० पौंड असताना, पाचनाने ९० टक्क्यापेक्षा जास्त BOD कमी करता येतो व निस्तारण–वृद्धि ( disposal growth ) वातन करून, अपशिष्ट व बियांचे गुणोत्तर १४.५:१ असताना आणि पुरेसा नायट्रोजन मिळाला असताना BOD चे ९० टक्क्यापेक्षा जास्त लघुकरण करता येते असे आढळून आले.

### कोष्टक २२–२८

**कॉफीच्या प्रक्रियेतील अपशिष्ट–जलांवर उपचार करण्याकरता (वापरलेल्या) पर्यायी योजनांवरील तुलनात्मक भांडवली खर्च (१)**

| उपचार केलेली अपशिष्ट–जले | उपचारणाची पद्धत | प्रदूषण गुणातील घट % | एकूण प्रदूषणातील घट % | दर टनास द. दि. स्वच्छ कॉफीच्या कारखान्याचा भांडवली खर्च |
|---|---|---|---|---|
| टाकीतील निःस्त्राव व धावन | झिरपणाचे खड्डे | | ४६ | ४५ |
| लगदा–जल व नाली धावन | जैवी निस्यंदन | ६४ | ५१ | १००० |
| एकूण | | | ६७ | १०४५ |
| संमिश्र अपशिष्टे | १२ दिवस आंबवण | ८५ | ८५ | ५८० |
| संमिश्र अपशिष्टे | १२ दिवस आंबवण अधिक जैवी निस्यंदन | ९४ | १४ | ४८० |
| एकूण | | | ९९ | १०६० |
| संमिश्र अपशिष्टे | १०० ppm अंदाजी BOD, असलेला निःस्त्राव तयार करण्याकरता जैवी निस्यंदक | ९४ | ९४ | १८५० |
| संमिश्र अपशिष्टे | सुमारे ४० ppm BOD असलेला निःस्त्राव निर्माण करण्याकरता जैवी निस्यंदन | ९८ | ९८ | २५०० |

कोष्टक २२-२९ (ह्युकेलेकियनच्या प्रमाणे)
तांदुळाच्या संमिश्र अपशिष्टांचे गुणधर्म

| गुणधर्म | राशि अथवा मूल्य |
|---|---|
| pH | ४.२-७.० |
| एकूण घनपदार्थ, ppm | १४६० |
| राखेतील घनपदार्थ % | २०.५ |
| तरंगते घनपदार्थ, ppm | ६१० |
| घनपदार्थातील राख % | १०.८ |
| एकूण नायट्रोजन, ppm | ३० |
| फॉस्फेटे, ppm | ३० |
| BOD, ppm | १०६५ |
| स्टार्च, ppm | १२०० |
| लघुकारक शर्करा, ppm | ७० |

## संदर्भ : तांदुळातील अपशिष्टे –

ह्यूकेलेकियन, एछ; 'ट्रीटमेन्ट ऑफ राईस वॉटर,' इंडस्ट्रियल अँड इंजनिअरिंग केमिस्ट्री, ४२, ४, ६४७ (एप्रिल १९५०)

## २२-१७. माशांची अपशिष्टे

माशाचे तेल, खाद्य, मत्स्यविलेय आणि इतर द्रव्ये यांचे उत्पादन हा युनायटेड स्टेट्स-मधील बराच मोठा उद्योग आहे. पूर्वेकडे आणि आखाताच्या किनाऱ्यांवर (gulf coast) न खाता येणाऱ्या मॅनहॅडन या माशापासून या द्रव्यांचे मुख्यतः उत्पादन होते आणि पूर्व व पश्चिम अशा दोन्ही किनाऱ्यावर ते सार्डीनच्या डबे भरण्याच्या (canning) उद्योगातील उपपदार्थ म्हणून तयार होतात.

एका मत्स्य प्रक्रिया संयंत्राचा नमुनेदार प्रवाह-तक्ता आ. २२-२ मध्ये दिला आहे. ( I. W. ही अक्षरे अपशिष्ट-जलांच्या उद्भवासंबंधी आहेत. ) (IW1) जेव्हा बोटीच्या मासे साठविण्याच्या विभागातून मासे पंप केले जातात तेव्हा **त्या विभागातील अपशिष्टे** आढळून येतात. ( I W 2 ) **अपयुक्त** ( spent ) **मत्स्य स्थानांतरण जल** ( fish transfer water ) सुमारे १०००० गॅलन क्षमता असलेल्या टाक्यात ठेवलेले असते व त्या टाक्या दररोज रिकाम्या करण्यात येतात. या अपशिष्ट जलातील अशुद्ध द्रव्ये, रक्त, अणु ( particulate ) विरघळलेले मत्स्य-घनपदार्थ, माशांचे खवले, आणि स्निग्ध गाळापासून मोठ्या प्रमाणात, बनलेली असतात. ( I W 3 ) जेव्हा अनुपचारित मत्स्य साठवण्याच्या पेटीतील चिरातून द्रव बाहेर पडते तेव्हा, माशांच्या वजनामुळे तसेच ज्या ठिकाणी पट्टावाहकाने मासे बाहेर काढले




**आकृति २२-२ मेनहॅडेन मत्स्य-प्रक्रिया संयंत्राचा सोपा केलेला प्रवाह तक्ता ( Paessler प्रमाणे 13) I W ही अक्षरे औद्योगिक अपशिष्ट दाखवितात.**

जातात त्या ठिकाणी जेव्हा द्रव बाहेर पडते तेव्हा अनुपचारित-पेटिका-क्षरण अपशिष्ट (raw-box-leakage waste) आढळून येते. या अपशिष्टात रक्त आणि विरघळलेल्या घनपदार्थांचे उच्च प्रमाणात सांद्रण झालेले असते. ( I W 4 ) शोषक-भट्टी-गंधहारक-फवारणी जल ( dryer-kiln-deodorizer spary water ) हे अपशिष्ट जेव्हा प्रक्रियाकरण्याचे वेळी शोषक भट्टीतील धुराचे अवशोषण करण्यासाठी सतत पाण्याची फवारणी करण्यात येते तेव्हा निर्माण होते. सर्व संयंत्रावर ही फवारणी प्रथां चालू आहे आणि हवेच्या प्रदूषणाच्या नियंत्रणास तिला महत्व येणे शक्य आहे.

(IW5) "**स्टिक वॉटर" अपशिष्टातील** BOD ३३ ८०० पासून ११२००० पर्यंत बदलता असतो आणि मॅनहॅडेन संयंत्रातील अपशिष्टात एकूण BOD च्या ९० टक्क्यापेक्षा जास्त प्रमाण दाखवितो. तथापि त्याची राशि मर्यादित असते आणि जेव्हा पाण्याचे तपमान कमी असते. तेव्हां अशा ऋतूत लवकरच ते प्रस्त्रावित होते. अपकेंद्रित्रातून टाकून दिलेल्या जल-आधारित द्रवाचे अनिवार्यतः ते बनलेले असते ( I'V 6 ) टाक्या भरत असताना त्या भरून वाहू लागल्यामुळे, ओसंडून गेलेले द्रव्य ( spillage ) आणि टाक्या स्वच्छ करताना टाकून द्यावा लागणारा 'तळातील गाळ' ( bottoms ) यांची 'स्टिक वॉटर' साठवण टाकी-तील अपशिष्टे बनलेली असतात.

( I W 7 ) माशाच्या प्रत्येक खेपेनंतर जेव्हा बाष्पक पाण्याने उकळून, विसळून, आणि दाहक सोड्याने पुनः उकळून व पुनः विसळून घेतले जातात. तेव्हा **बाष्पक-अपशिष्टांचा** ( evaporator wastes ) उद्भव होतो बाष्पकातून शीतन जल आणि कांही संघनकही बाष्प-कातून सतत प्रस्त्रावित होत असतात. ( I W 8 ) दाब यंत्रे, फरशी, टाक्या, अपकेंद्रित्रे, आणि इतर उपकरणे जेव्हा धुण्यात येतात तेव्हा त्यातून धावन अपशिष्टे निर्माण होतात ह्या अपशिष्टांची बनावट को. २२-३० मध्ये समाविष्ट केली आहेत (१३)

BOD चे निष्कासन कमी असल्यामुळे आणि अवमल अतिप्रमाणात तयार होत असल्याने ह्या अपशिष्टाकरता रासायनिक किलाटनाची शिफारस केलेली नाही. सर्व व्यक्तिगत अपशिष्ट स्टिकवॉटर अपशिष्टात ( I W 6 ) एकत्र करून त्यांचे बाष्पीभवन करणे ही उपचारणाची समाधानकारक पद्धत आहे तसेच बाष्पीभवनाला पर्याय म्हणून अपशिष्टे होडीतून समुद्रात सोडा वीत असे सुचविण्यात आले आहे.

**कोष्टक २२–३०**

**मत्स्य अपशिष्टांची बनावट (Paessler) प्रमाणे (१३)**

| अपशिष्ट | BOD ppm | एकूण घनपदार्थ ppm | एकूण बाष्पशील घनपदार्थ, ppm | ग्रीस, ppm |
|---|---|---|---|---|
| IW १ | ४२–२६५ | १५५७६–२०६०६ | २४८९–३३९४ | |
| IW २ | ३०५०–६७२०५ | १८४२१–६४८५७ | ५९१२–४६९०७ | १३१४–१७२३४ |
| IW ३ | ३०५००–३२५००० | ४६७४१–६१७६० | २९५३३–४६२४७ | १०६५५ |
| IW ४ | १२०–३०० | १४१७१–१८९४९ | ११०६–७९५७ | ४५ |
| IW ५ | ५६३३३–११२५०० | ३३५९७–७९२०० | २११६०९–६६४०६ | ४२२६–२४३८७ |
| IW ६ | ४७०६३ | ५२९९८ | ४५४८३ | १८१५७ |
| IW ७ | ३००–८०४३ | १३७५६–१६२६० | १६९५–१२३८९ | १६–३२९ |

## संदर्भ – मत्स्य अपशिष्टे


१ 'ब्रिटिश साल्मन फिशरीज, इफेक्ट ऑफ वेस्ट्स,' स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, २०, २, ३६२ (मार्च १९४८)

२ डेव्हिस, एछ. सी; 'फिश कॅनरी वेस्ट, इफेक्ट ऑन स्युवेज ट्रीटमेन्ट,' स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स १६, ५, ९४७ (सप्टेंबर १९४४)

३ 'फिश प्रॉडक्ट्स प्राईस कट्स सीन नेक्स्ट इयर,' रिपोर्टर, १५, ३, ५ (एप्रिल १२ १९४८)

४ गॅलघर, एफ एम, 'फिशमील फर्टिलायझर वेस्ट्स,' इंडस्ट्रियल वेस्ट्स, ४, ५, ८७ (सप्टेंबर १९५९)

५ गुड, जी. बी., 'ए हिस्टरी ऑफ दि मॅनहॅडन,' न्यूयॉर्क, ऑरेंज जुड कं. १८८०

६ हार्ट, मार्शल, आणि बेल, दि एक्स्टेंट ऑफ दि पोल्यूशन कौज्ड बाय पिल्चार्ड रिडक्शन प्लँट इन ब्रिटिश कोलंबिया,' परिपत्रक ३९, बायॉलॉजिकल बोर्ड ऑफ कॅनडा, (१९३३)

७ नोल्टन, डब्ल्यू टी; 'फिश कॅनरी वेस्ट, इफेक्ट्स ऑन स्युवेज ट्रीटमेंट,' स्युवेज अँड इंडस्ट्रियल वेस्ट्स, १७, ३, ५१४ (मे१९४५)

८ लॅसेन, एस; ई. के. बेकन, आणि एछ. जे. डन, 'फिश रिडक्शन प्रोसेस.' इंडस्ट्रियल अँड इंजनिअरिंग केमिस्ट्री, ४३, ९, २०८२ (सप्टेंबर १९५१)

९ लेविस, ओ; 'यू. एस. फिश रिसर्च गोल्स,' ऑईल पेन्ट अँड ड्रग रिपोर्टर, १६, ७, (मे १९५५)

१० "लॉस अँजेलीस लाँगबीच हार्बर पोल्यूशन सर्व्हे,' क्र. ४, लॉस अँजेलीस विभागीय जल प्रदूषण मंडळ, (१९५२)

११ 'मॅनहॅडन्स फेम, 'केमिकल वीक, ६८ (फेब्रुवारी १०, १९५१) पा. १३

१२ 'न्यू हायड्रो-बॅक लिफ्ट स्पीड्स फिश डायरेक्ट फ्रॉम बोट टू कॅनरी,' फुड इंडस्ट्रीज, २१, १, ११५९० नोव्हेंबर १९४९)

१३ पेस्लर, ए. एछ; 'वेस्ट वॉटर फ्रॉम मॅनहॅडेन फिश ऑईल अँड मिल प्रोसेसिंग प्लँट्स,' ११ व्या औद्योगिक अपशिष्ट संमेलनाची कार्यवाही,पर्ड्यू विश्वविद्यालय, (मे १९५६) पा. ३७१-३८७

१४ 'रिकव्हरिंग बाय-प्रॉडक्ट्स फ्रॉम फिश वेस्ट्स,' फुड इंडस्ट्रीज, २२ ( फेब्रुवारी १९५० ) पा. ९६

१५ 'रिपोर्ट ऑफ ए स्टडी ऑफ सार्डीन कॅनिंग वेस्ट्स अॅट सॅन कॅर्लास कॅनरी, आक्सनार्ड, कॅली,' कॅलिफोर्निया सार्वजनिक स्वास्थ्य विभाग, (१९३६)

१६ 'रिपोर्ट ऑन दि डिश्चार्ज ऑफ वेस्ट फ्रॉम सार्डीन कॅनिंग अँड रिडक्शन टू मॉंटेरे बे, कॅलि. फॉर रीजनल वॉटर पोल्यूशन कंट्रोल बोर्ड,' ३ रा अहवाल, कॅलिफोर्निया सार्वजनिक स्वास्थ्य विभाग, (१९५१)

१७ सेव्हरन्स, एछ डी; 'फिश कॅनरीज, ओडर कंट्रोल, मॉंटेरे, कॅलि.,' स्युवेज वर्क्स जर्नल, ४, १, १५२ (जानेवारी १९३२)

१८ सिमन्स, आर. डब्ल्यू; 'बाय प्रॉडक्ट युटिलायझेशन ब्रिग्ज होप टू फिश इंडस्ट्री, केमिकल अँड इंजनिअरिंग न्यूज, ३१, १८, १८६२ (मे १९५३)

१९ 'स्टराईल स्टिक वॉटर,' केमिकल वीक, ६४ (फेब्रुवारी १९४९) पा. २१०

२० 'देअर्स गुड हार्ड कॅश इन स्टिक वॉटर,' फुड इंडस्ट्रीज, २२, २, २४२ ( फेब्रुवारी १९५०)

२१ झिबा, जे., 'स्टिक वॉटर प्रोसेसिंग,' केमिकल इंजनिअरिंग ५७, ८, १३३ (ऑगस्ट १९५०)

## २२–१८. लोणच्याची अपशिष्टे --

पिकवून, रसायन वापरून, आणि मुरवण करून ( seasoning ) एकत्रितपणे काकडचा आणि अन्य भाजीपाल्यांचे परिवर्तन करण्याने ही अपशिष्टे निर्माण होतात. यात संबंधीत असलेल्या प्रक्रिया आणि अपशिष्टांच्या अधिक तपशीलवार चर्चेकरता १७ व्या प्रकरणात निर्दशित केलेल्या व्यावहारिक समस्याकडे आम्ही वाचकाचे लक्ष वेधू इच्छितो. लोणच्याच्या कारखान्यात गोड अगर आंबट लोणची तयार करण्यात येत असल्याने अपशिष्टातील साखरेच्या सांद्रणाच्या मात्रेत प्रामुख्याने फरक पडतो. दोन्ही प्रकारची लोणची तयार करणाऱ्या लोणच्याच्या संयंत्रातून खालील चार प्रकारची मुख्य अपशिष्टे अपेक्षित असतात, १) हिवाळी महिन्यातील लाकडी डोण्यांच्या 'शर्कराकरणातील' **चुना अपशिष्ट** २) १० ते २० प्रतिशत् लवणाच्या द्रावणात दोन ते तीन महिने केलेल्या लोणच्याच्या आंबवणातील **लवण अपशिष्ट**; ३) लोणचे फुगवण्यास आणि रंगण्यास कारणीभूत असणाऱ्या द्रावणापासूनची **तुरटी व टयूमेरिक अपशिष्टे** ४) लोणचे मुरवण्याकरता आणि पॅकबंद करण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या (व्हिनेगा) शिरका व साखरेच्या द्रावणापासूनची **सायरप अपशिष्टे** या प्रत्येक अपशिष्टामुळे वेगवेगळचा प्रकारचे प्रदूषण होते ही एक किंवा अधिक अपशिष्टे एकत्र येण्याने नाला–प्रदूषण समस्यावर उपाय योजणे अवघड जाते.

लवण व तुरटी आणि टयूमेरिक अपशिष्टे मोठचा संयंत्रातून सामान्यपणे जवळ जवळ सतत प्रस्त्रावित होत असतात. चुना अपशिष्ट अथवा अम्ल सायरप अपशिष्टातून अधून–मधून होणाऱ्या प्रस्त्रावावरून अंतिम अपशिष्टातील परिणामी pH व सेंद्रिय द्रव्यांच्या अंशांचे निर्धारण होते. गाळणे, उदासीनीकरण आणि समानीकरण करणें हे लोणच्याच्या अपशिष्टांवरील किमान उपचार आहेत प्रमाणाबाहेर प्रदूषण होण्यास प्रतिबंध व्हावा म्हणून चांगली देखभाल करण्याच्या प्रथेची आवश्यकता असते उपचारण संयंत्रातील अगर संग्राही नाल्यावरील आकस्मिक आघात–भार कसेही करून टाळावेत. लोणच्याच्या अपशिष्टांचे गुणधर्म व त्यावरील उपचारासंबंधी वाचकांनी १७ वे प्रकरण पहावे असा आग्रहाचा सल्ला आहे.

## संदर्भ लोणच्याची अपशिष्टे

१ बार्नेस, जी. ई; आणि एल. डब्ल्यू. वेनबर्जर, 'इंटर्नल हाऊसकीपिंग कट्स वेस्ट ट्रीटमेंट अॅट पिकल पॅकिंग प्लँट्स,' वेस्ट्स इंजनिअरिंग, २१, १, १८ (जानेवारी १९५८)

२ हॅसैल्टाईन, टी. आर. 'बायॉलॉजिकल फिल्ट्रेशन ऑफ क्रॉट अँड पिकल वेस्ट्स,' वॉटर अँड स्युवेज वर्क्स. ९४, ४, १६१ (एप्रिल १९५२)

३ नेमेरो, एन, एल; 'पिकल वेस्ट डिस्पोजल,' पिकल कंपनीकडे सादर केलेला खाजगी अहवाल, १९५२ ( लेखकाच्या नोंद वह्यांतून )

## २२-१९. सौम्य पेयांच्या बाटल्या भरण्याच्या कामातील अपशिष्टे-

अल्कोहोलिक नसलेल्या कार्बनीकरण केलेल्या व न केलेल्या अशा दोन्ही प्रकारच्या पेयांच्या उत्पादनातून, सौम्य पेयांच्या बाटल्या भरण्याच्या कामातील अपशिष्ट-निर्मिती होते. बाटल्या धुणे, साखरपाक तयार करणे, पाण्यावर उपचार करणे, आणि फरशी धुणे या कामातून अपशिष्टांचे उत्पादन होते. सामान्यतः अपशिष्टे उच्च प्रमाणात क्षारीय असतात. त्यातला BOD आणि तरंगते घनपदार्थ घरगुती वाहितमलातल्यापेक्षा किंचित जास्त असतात आणि प्रथम सूक्ष्म चाळणीतून गाळून अगर तसे न करता मलवाहिनीत ती प्रस्त्रावित करण्यात येतात.

बाटल्या धुण्याच्या यंत्रातील अपशिष्टे उच्च प्रमाणात क्षारीय असतात, कारण धावनात क्षारीय प्रक्षालक स्नानांची एक मालिकाच असते आणि जरी काटकसरीच्या, तसेच अपशिष्ट कमी करण्याच्या दृष्टीने पूर्वीप्रमाणे लेबले वापरण्यात येत नसली तरीही त्यात गवत, सिगरेटची थोटके, कागद, व बाटलीत राहिलेल्या अन्य केरकचऱ्यामुळे तरंगत्या घनपदार्थांची राशि मोठ्या प्रमाणात असते. ही परद्रव्ये, तसेच घाणेरड्या बाटल्यातील शेष पेये, बाटल्या भरण्याच्या संयंत्रातील अपशिष्टास कारणीभूत होणारे प्रमुख कारण आहे. फरशी धुणे, सायरपच्या मिश्रण व साठवण टाक्या, सायरपाचा निस्यंदक, सांडून गेलेला द्रव, इत्यादींच्यापासून अधून मधून अपशिष्ट-निर्मिती होते व ती BOD आणि तरंगत्या घनपदार्थांचे प्रमुख उद्भवस्थान असते असे मानण्यात येत नाही. पाण्याचा लागणारा दर्जा आणि प्रवेशी पाण्याच्या दर्जाप्रमाणे जलोपचारातील अपशिष्टांत फरक पडतो.

पोर्जेस आणि स्ट्रझेस्की (६) आणि बेसेलिव्हर (२) यांनी कार्बनीकरण केलेल्या पेयांतील अपशिष्टांचे गुणधर्म को. २२-३१ मध्ये सादर केले आहेत.

पोर्जेस आणि स्ट्रझेस्की यांना १९५४ मध्ये असेही दिसून आले की, युनायटेड स्टेट्समधील ४६४३ बाटल्या भरण्याच्या संयंत्रातून एक अब्ज सौम्य पेयांचे उत्पादन झाले आणि त्यांची किंमत एक अब्ज डॉलरपेक्षा बरीच जास्त होती (३). त्या वर्षात, ह्या देशातील माणशी खप

अंदाजे १५५ बाटल्यापेक्षा अधिक होता. या महान उद्योगातील अनेक नमुनेदार अपशिष्टांचे विश्लेषण पोर्जेस व स्ट्रझेस्को यांनी को. २२–३२ मध्ये सादर केले आहे.

लोकवस्तीच्या मध्यावर बहुतेक सौम्य पेयांच्या बाटल्या भरण्याची संयंत्रे बसविलेली असतात आणि त्यामुळे नगरपालिकेच्या मलवाहिन्यात (अपशिष्टे) सोडून देणे हे अपशिष्ट निस्तारणाचे सर्वोतौम साधन आहे असे दिसून येते. बाटल्यातील उरलेले परद्रव्य आणि लेबले काढून टाकण्याकरता, त्या धुण्याच्या संयंत्रातील अपशिष्टे गाळण्याची प्रथा, घनपदार्थांच्या निष्कासनाचा उपाय म्हणून कधीकधी आचरण्यात येते. अपशिष्टाची राशि कमी करण्याकरता, घाण बाटल्या अगोदर विसळण्याकरता अथवा अन्य कारणाकरता बाटल्या धुण्याच्या यंत्रातील शेवटी विसळलेले पाणी पुन: वापरण्यात येते. बाटल्या धुण्यापूर्वी वाया गेलेल्या सोडयाचे नि:सारण करणे, व बाटल्यातील केरकचरा व लेबले काढून टाकणे, यामुळे अपशिष्ट जलातील BOD आणि तरंगणाऱ्या घनपदार्थात ठळकप्रमाणात घट होते. परिचालनातून निर्माण झालेल्या अपशिष्टांच्या राशी मल–वाहिनीत जाऊ न देता निरनिराळ्या स्वरूपात निस्तारित केल्या जातात. उरलेली अपशिष्टे, जरी त्यांचा pH व क्षारता उच्च असली तरी त्यामुळे, नगरपालिकेच्या बहुतेक वाहितमल उपचारण प्रक्रियावर अगदी क्षुल्लक वा अनिष्ट नसलेला परिणाम होतो.

## कोष्टक २२–३१

## कार्बनीकरण केलेल्या पेयांतील अपशिष्टे

| गुणधर्म | संदर्भ ६ | संदर्भ २ |
|---|---|---|
| pH | १०.८ | |
| फेनॉल्थेलीन क्षारता mg/l | १५० | |
| एकूण क्षारता, mg/l | २९० | |
| ५-दिवसांचा BOD, mg/l | ४३० | |
| तरंगते घनपदार्थ, mg/l | २२० | |
| अपशिष्टाची राशि, गॅलन/१००० पेटचा | १०६०० | १५००० |
| ५–दिवसांचा BOD, पौंड/१००० पेटचा | | १५०० |
| तरंगते घनपदार्थ, पौंड/१००० पेटचा | | २०० |

कोष्टक २२-३२

**कार्बनीकरण केलेल्या पेयांतील ५ दिवसांचा BOD, एकूण घनपदार्थ, अम्लता, आणि pH (६)**

| पेय | BOD, ppm | एकूण घनपदार्थ, ppm | अम्लता खनिज, ppm | अम्लता एकूण ppm | pH |
|---|---|---|---|---|---|
| कोका-कोला | ६७४०० | ११४९०० | २४४ | १५२६ | २.४ |
| पेप्सी-कोला | ७९५०० | १२२००० | २४८ | १४६६ | २.५ |
| मिशन-ऑरेंज | ८४३०० | १४१३०० | ५७० | १५७९ | ३.० |
| वॅग्नर लिफ्ट | ६४६०० | ११०८०० | ३१६ | २२५३ | ३.४ |
| टॉम कॉलिन्स, ज्यू. कॅनडा ड्राय. | ६६६०० | १०६९०० | ३५३ | १२४६ | ३.२ |
| क्विनाईन पाणी | ६४५०० | १०१३०० | ११८१ | ३१५० | २.४ |
| सरासरी | ७१२०० | ११६२०० | ४९० | १८७० | |

## संदर्भ : सौम्य पेये भरण्यातली अपशिष्टे –

१ बेसेलीव्हर, ई. बी; 'इंडस्ट्रियल वेस्ट्स, ए कम्युनिटी प्रॉब्लेम; दि इफेक्ट्स ऑफ सर्टन टाइप्स ऑफ वेस्ट्स ऑन सिटी युटिलिटीज,' पब्लिक वर्क्स मॅगेझीन, ८३, १२, ७४; (डिसेंबर १९५२)

२ बेसेलीव्हर, ई. बी; 'इंडस्ट्रियल वेस्ट ट्रीटमेंट,' न्यूयॉर्क: मॅक् ग्रॉ-हिल बुक कं; इन्का., (१९५२) पा. १०७

३ 'इंडस्ट्रियल स्टॅटिस्टिक्स', उद्योग कर्त्यांची उत्पादन संगणना, १९५४, खंड २ रा, ब्यूरो ऑफ सेन्सस युनायटेड स्टेट्स व्यापार विभाग, वॉशिंग्टन, डी. सी.

४ मेड्बरी एछ. (ed); 'दि मॅन्युफॅक्चर ऑफ बॉटल्ड कार्बोनेटेड बीव्हरेजेस,' वॉशिंग्टन, डी. सी; अमेरिकन बॉटलर्स ऑफ कार्बोनेटेड बीव्हरेजेस, सुधारित आवृत्ति, (१९४५)

५ मॉर्गन, आर; बीव्हरेज मॅन्युफॅक्चर, लंडन: अॅट्वुड अँड कं; लि; (१९३८)

६ पोर्जेस, आर., आणि ई. जे. स्ट्रझेस्की, 'वेस्ट्स फ्रॉम दी सॉफ्ट ड्रिंक बॉट्लिंग इंडस्ट्री' जल प्रदूषण नियंत्रण संघाचे नियतकालिक, ३३, २, १६०–१७५ ( फेब्रुवारी १९६१ ). १५ व्या औद्योगिक अपशिष्ट संमेलनाची कार्यवाही, पर्ड्यू विश्वविद्यालय, ( मे १९६० ) पा. ३३१.



: २३ :

# सामग्री उद्योग

ह्या पाठातील सामग्री उत्पादन करणारे उद्योग, उपपदार्थ खाण्याजोगे नसल्याने, अन्न-प्रक्रिया उद्योगापासून; वस्त्रप्रावरण नसल्याने कापड उद्योगापासून; आणि विशिष्ट प्रकारची रसायने अथवा तत्संबंधी पदार्थ नसल्याने रासायनिक उद्योगापासून; भिन्न समजण्यात आले आहेत. सामग्री उद्योगांचे खालील तीन गट पडतात. १) काष्ट तंतू (कागदाचा लगदा व अपशिष्टे आणि छायाचित्रीय अपशिष्टे), २) धातू (पोलाद आणि अन्य धातुंच्या संयंत्रातील अपशिष्टे, धातूवरील गिलिटकाम आणि लोखंडाच्या ओतकामातील अपशिष्टे ); आणि ३) द्रव-प्रक्रिया (तेल शुद्धीकरण, रबर, कांच-उत्पादन, आणि नौका भांडार, यांतील अपशिष्टे.

## काष्ट-तंतू-उद्योग -

आपल्या अर्थ व्यवस्थेतील लगदा व कागद तयार करण्याचा उद्योग हा पांचव्या क्रमाचा सर्वात मोठा उद्योग आहे आणि त्याच्या विस्तारण वेगाचा क्रमांक तिसरा आहे (१४६). त्यातील पदार्थांची दर डोई मागणी जवळ जवळ ४०० पौंड आहे. ४० राज्यांतील १००० पेक्षा जास्त गिरण्यांत विविध प्रकारच्या कागद आणि कागदी पुठ्ठ्यांचे विस्तृत प्रमाणात उत्पादन होते आणि एकूण वार्षिक उत्पादन ३० दशलक्ष टनांपेक्षा जास्त आहे. ह्या उद्योगांत दररोज ४००० द. ल. गॅलन पाणी वापरण्यात येते आणि पाण्याचा वापर सुमारे ४० द. ल, लोकांच्या वापराइतका आहे. (हे आकडे १९५९ सालातील आहेत.)

वस्त्रोत्पादनाप्रमाणेच कागद तयार करण्याचे काम दोन अवस्थात विभागता येते. लाकडापासून लगदा बनविणे आणि अंतिम कागदी पदार्थ तयार करणे. लगदा करण्याच्या अवस्थेत सामान्यपणे वापरली जाणारी कच्च्छी द्रव्ये, लाकूड कापूस अगर कापडाच्या चिंध्या, गवत, काथ्या, एक्स्पर्टो गवत, सन, ताग, अथवा टाकाऊ गवत, ही असतात. या पदार्थांचे तंतूत रूपांतर करण्यात येते आणि ते तंतू परिष्कृत करण्यात येतात; कधी कधी त्यांचे विरंजन करण्यात येते आणि शुष्कन केले जाते.

जेथे अनेक वेळा एकाच संयंत्रात लगदा प्रक्रियेशी समाकलन केलेले असते अशा कागद गिरणीत लगदा एकत्र केला जातो आणि त्यात पूरक द्रव्ये घालून नंतर अंतिम सफाई द्रव्ये मिसळून बनलेल्या तयार पदार्थापासून तक्ते बनविण्यात येतात.

सामान्यतः पूरक द्रव्ये म्हणून चिकणमाती संगजिरे, जिप्सम वापरली जातात. वापरल्या जाणाऱ्या लगद्याचे खालील चार मुख्य प्रकार आहेत. १) दळलेले लाकूड, २) सोडा, ३) क्रॅफ्ट (सल्फेट), व ४) सल्फाईट म्हणून तंतू-उद्योगात, लगदा-गिरणीतील व कागद गिरणीतील अशी दोन अपशिष्टे निर्माण होतात. लगदा-गिरणीतील अपशिष्टे, दळण, पाचित्र पाचन, धावन, विरंजन, दृढीकरण, निर्कज्जलीकरण, व तंतुनिःशेषण, यांच्यापासून निर्माण होतात ह्या अपशिष्टात, सल्फाईट द्रव, सूक्ष्म लगदा, विरंजक रसायने, मरकॅप्टन ( एक रसायन ), सोडियम सल्फाईड, कार्बोनेटे, व हायड्रॉक्साइडे, खळ, केसीन, शाई, रंग, मेण, ग्रीज, तेले आणि तंतू असतात. रसायनांचे पुनःप्रापण, समानीकरण, अवसादन, नियंत्रित तनुकरण, किलाटन, खांजणीकरण, जैवी ऑक्सीकरण, बाष्पन फवारणी शुष्कन, ज्वलन आणि कांहीसे आंबवण करणे हे त्या अपशिष्टावरील मुख्य उपचार आहेत.

कागद गिरणीतील अपशिष्टांचा उद्भव पाण्यातून होतो. हे पाणी चाळणीच्या तारांतून, आणि कागद यंत्राच्या नमद्यातून. कुंटण्याच्या उपकरणांतून, नियंत्रण व मिश्रण टाक्यांतून, आणि जाळ्यांतून वाहून जाते. कागद-यंत्रातील अपशिष्टांत (धवल जले), सूक्ष्म तंतू, खळ, रंग, आणि इतर भारण द्रव्ये असतात. धवल जलाचे पुनःप्रापण. अवस्थापन आणि निर्वात निस्यंदन, तरंगण आणि क्लोरिनीकरण करून अपशिष्टावर उपचार करण्यात येतात.

## २३-१. लगदा आणि कागद-गिरणीतील अपशिष्टांचा उद्भव-

कागद बनविण्यातून होणाऱ्या प्रदूषणाचा मोठा भाग लगदा बनविण्याच्या प्रक्रियांतून निर्माण होतो. यांत्रिकी अथवा रासायनिक साधनांपैकी एकाने कच्च्या द्रव्यांचे तंतुमय लगद्यात रूपांतर होते. लाकूड आल्यानंतर यंत्र अगर द्रवीय साधनाने त्याची साल प्रथम काढण्यात येते

आणि शिजवण्याकरता त्याचे तुकडे करण्यात येतात. यंत्रसहाय्याने तयार केलेला लगदा ( दळलेले लाकूड) मोठ्या एमरी अथवा वालुकाश्म चाकांवर लाकूड दळून तयार केला जातो आणि नंतर पाण्याच्या सहाय्याने चाळण्यांतून पार करण्यात येतो. सामान्यत: अशा प्रकारचा लगदा उच्च प्रमाणात रंगित व कमी प्रतीचा असतो व तुलनेनें त्यातील तंतू अखूड असतात. त्याचा वापर मुख्यत: टिकाऊ नसणाऱ्या कागदाच्या वर्तमानपत्रासारख्या वस्तू तयार करण्यासाठी केला जातो. सालीच्या गाळलेल्या नि:स्त्रावात तिचे व लाकडाचे सूक्ष्म कण आणि काही विलीन घन–पदार्थ असतात. लाकडाच्या तयारीतील अपशिष्टांची अतिरिक्त उद्भवस्थाने, जाळून टाकण्यापूर्वीचे टाकाऊ पदार्थाचे आणि फरशीवरील पाण्याचे नि:सारण ही असतात.

रासायनिकतया तयार केलेले लगदे, यंत्रनिर्मित लगद्याच्यांशी तुलना केली असता, सामान्यपणे, सोडा, सल्फेट (क्रॅफ्ट) अगर सल्फाईट प्रक्रिया करून, बनविण्यात येतात. अर्ध रासायनी प्रक्रियासुद्धा हल्ली वापरण्यात येते; तिच्यासंबंधी नंतर चर्चा करण्यात येईल. (ओघाओघाने हे सांगितले पाहिजे की, सल्फेट–लगद्याचे विरंजन सहजासहजी होत नाही, आणि म्हणून त्याचा वापर सामान्यत: पिंगट अथवा इतर रंगाच्या गुंडाळण्याचा कागद तयार करण्यासाठी केला जातो).या सर्व पद्धतीत, दळलेल्या लाकडाप्रमाणे, तुकडे करून लाकूड तयार केले जाते आणि धूळ नाहीशी करण्यासाठी त्याचे चाळण केले जाते.म्हणून तुकड्यांचे पाचन करण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या रसायनांच्या बाबतीतच फक्त रासायनिक प्रक्रिया एकमेकापासून भिन्न असतात

पॉप्लरसारख्या नरम लाकडावर सोडा–प्रक्रिया करून सामान्यत: उपचार केले जातात. सुमारे ४ कॉर्डस तुकड्यांनी भरलेल्या पाचित्रात सोडा अॅश ( $Na_2CO_3$ ) आणि चुना ($Ca(OH)_2$), यांचे मिश्रण घालण्यात येते आणि वाफेवर सुमारे ६ तास संपूर्ण मिश्रण उकळण्यात येते; या पाचनाने लिग्नीन व रेझीनसारखी सेल्यूलोजयुक्त नसलेली बंधक द्रव्ये तंतूंच्या पासून विघटित अथवा अलग होतात. मात्र तंतूवरील हा उपचार कठोर असतो आणि परिणामत: त्यांची शक्ति कमी होते.

क्रॅफ्ट आणि सल्फाईट हे दोन्ही प्रकारचे लगदे तयार करण्यासाठी शंकुल ( coniferous) लाकडाचा उपयोग केला जातो. सल्फाईट प्रक्रियेत सोडियम सल्फाईड, हायड्रॉक्साईड, सल्फेट आणि कार्बोनेटच्या मिश्रणाचे ५ ते ६ तासांच्या अल्प कालावधीत पचन करावे लागते. लिग्नीन आणि सेल्यूलोजयुक्त नसलेली द्रव्ये विरघळवण्यात येतात आणि त्यातून कागद तयार करण्याचा अधिक बळकट तंतू शिल्लक रहातो. ३००°F तपमानापेक्षा जास्त तपमानात व ७० पौंड वाष्प दाब देऊन कॅल्शियम बायसल्फाईटसह शिजवून सल्फाईट लगदा तयार करण्यात येतो. पाचनानंतर रासायनिकतया बनविलेला लाकडाचा लगदा झाकलेल्या फुकगर्तेत ( blow pit ) फुंक-

ण्यात येतो; तेथील काळा द्रव मलवाहिनीत अगर पुन:प्रापण प्रक्रियाकरिता वाहू दिला जातो निःसारित लगदा नंतर धुण्यात येतो. नंतर धावन जलेसुद्धा वाया जाऊ देण्यात येतात वा पुनः वापरण्यात येतात, अगर पुन:प्रापण कार्यात सोडून देण्यात येतात. धुतलेला लगदा, त्यातील गाठी आणि अन्य विघटन न झालेले द्रव्य काढून टाकण्याकरता कोणत्यातरी परिष्करण–यंत्रातून काढून घेण्यात येतो. डेकर या नावाच्या नळकांड्याच्या आकाराच्या लगद्याच्या मार्गातील फिरत असलेल्या एका आडव्या पडद्यातून लगद्याचे अंशत: निर्जलीकरण करण्यात येते; नंतर विरंजन टाक्यांत तो लगदा सोडण्यात येतो व तेथे कॅल्शियम हायपोक्लोराईट अथवा हायड्रोजन पेरॉक्साईडच्या गरम पातळ द्रावणात मिसळण्यात येतो. सुकविलेला विरंजित लगदा नंतर विक्रीकरता अथवा कागद–गिरणीत पाठविण्याकरता तयार होतो.

कागद बनविण्याच्या प्रक्रियेत प्रथमत: (लाकूड, चिंध्या, सन, ताग, जुनी वृतपत्रे, इत्या–दींच्या) लगद्यांच्या सुयोग्य मिश्रणाची निवड करावी लागते. लगद्याचे मिश्रण विघटित करून ते उखळीत कुटून मिश्रित केले जाते व त्यात अंतिम कागदी पदार्थांचा दर्जा सुधारण्यासाठी वेगवेगळे पूरक आणि रग मिसळण्यात येतात, आणि कागदातील छिद्रे भरण्यासाठी पांजणी कर-ण्यात येते. उखळी ही एक अनिवार्यत: लांबट टाकी असते व तीत एक फिरणारे नळकांडे बस–विलेले असते. गाठी असलेल्या व गुंता झालेल्या तंतूंची फोड करून टाकीतील संपूर्ण अतर्वस्तुंचे काटेकोरपणे मिश्रण व्हावे म्हणून या फिरणाऱ्या नळकांड्यावर बोथट सुऱ्या बसविलेल्या अस-तात. रसायने मिसळण्यापूर्वी कधी कधी आणि नंतर गाठी असलेले तंतू फोडण्यापूर्वी कधीकधी "फोड उखळीत" ( breaker beater) लगदा धुण्यात येतो. धुण्याने सुरवातीला काहीसे तीव्र असे अपशिष्ट निर्माण होते पण जसजशी धुण्याची क्रिया चालू राहते तसतसे क्रमश: त्याचे तनुकरण होत जाते. कुटल्यानंतर सामान्यपणे लगद्याचे जॉर्डनमध्ये परिष्करण करण्यात येते. जॉर्डन हे एक यांत्रिकी साधन असते आणि त्यात एक पोकळ कोन असतो त्याच्या आतल्या पृष्ठभागावर प्रक्षेपी ( projecting ) सुऱ्या बसविलेल्या असतात. तशाच प्रकारच्या सूऱ्या बाहे-रील पृष्ठभागावर बसविलेल्या, शीघ्र गतीने फिरणाऱ्या एका समायोजनीय कोनावर हा पोकळ कोन बसविलेला असतो. ह्या यंत्रात इष्ट अशा अंतिम आकारात तंतू कापण्यात येतात. नंतर ते असन पेटीत ( stuffing box ) सोडण्यात येतात; तेथे ते साठवून व मिसळून कागद तयार करण्यासाठी लागणाऱ्या योग्य एकसारख्या संघनतेसाठी त्यांचे समायोजन केले जाते. शेवटी गोळे अगर श्लेष्म डाग काढून टाकण्यासाठी, लगदा गाळण्यात येतो नाही तर अंतिम कागदाचा दर्जा खालावतो.

नंतर, फोरड्रायनिअर बांध या नावांच्या सूक्ष्म तारेच्या जाळीच्या फिरत्या पट्ट्यावर, शीर्ष पेटीमधून, सारख्या प्रमाणात लगदा पसरण्यात येतो आणि रूळाकडे नेण्यात येतो. लगद्या–

तील पाण्याचा बराचसा भाग या जाळीतून निघून जातो आणि तारेवर तंतू चटईसारखे पसरले जातात. पाण्याबरोबर सूक्ष्म तंतूचा बराच अंश आणि कांही पूरकही चाळणीच्या तारामधून निघून जातात. त्याच्या रंगामुळे ह्या अपशिष्ट जलास पांढरे पाणी असे म्हणतात रूळांच्या मालिकेमधून कागदी चटई खालील प्रमाणे जाते. विषमपणा नाहीसा होण्यासाठी तारेच्या शेवटी चाळण रूळ, अधिक पाणी शोषून घेण्यासाठी चूषण रूळ, उरलेले बरेचसे पाणी कागदातून काढून घेण्यासाठी दाब व शुष्कन रूळ आणि शेवटी ज्यातून अंतिम आकाराचा कागद तयार होतो ते सफाई रूळ (कॅलेंडर्स), छपाईचा कागद, वृत्तपत्रांचा कागद, वेष्टनी कागद, चर्मपत्री कागद, लेखन कागद, टीप कागद, उतक ( tissue ) कागद, आणि अपारगम्य खाद्य वेष्टनी कागद अशा अनेक कार्यांत अंतिम उत्पादनाचा उपयोग करण्यात येतो.

लगदा–गिरण्यांतील अपशिष्टांची प्रमुख उत्पत्तिस्थाने पाचित्र द्रव, कागद-गिरण्यातील अपशिष्टांच्या उखळचा व कागद यंत्रे ही असतात. सामान्यत: तंतूची हानि ३ टक्के वा त्यापेक्षा कमी होते. तथाकथित ‘बंदव्यवस्थेत’ ( closed system ) जेथें पांढऱ्या पाण्याचे पुनराभिसरण आणि पुनरुपयोग केला जातो तेथे, तंतूची हानि ०.१ टक्क्या इतकी कमी करणे शक्य होते. तथापि, हानीची पातळी इतकी कमी असतानासुद्धा, दर दिवशी ततूंच्यावर मोटचा प्रमाणात प्रक्रिया करण्यात येत असल्याने हानि गण्य असते. दर टन पदार्थांमागे प्रस्त्रावित झालेल्या अप–शिष्ट–राशीची कल्पना को. २३–१ वरून येईल.

नरम पोत असलेले लाकूड अधिकाधीक दुर्मिळ होऊ लागल्याने अलिकडे कठीण लाक–डाचा वापर वाढू लागला आहे अर्ध रसायनी लगदाकरण या नावांने ओळखली जाणारी लगदा करण्याची आणखी एक पद्धत, मुख्यत: या लाकडाकरता विकसित करण्यात आली आहे. तुल–नेने सौम्य रासायनिक परिस्थितीत पाचन करून हा लगदा तयार केला जातो; त्यावेळी लाकूड फक्त मऊ करण्यात यते पण त्याचा पूर्णपणे लगदा होत नाही, आणि प्रत्यक्ष लगदा नंतर यांत्रिकी साधनांनी बनविण्यात येतो. कागदी पेटचा करण्याचे पुठ्ठे आणि खरबरीत वेष्टनी कागदाकरता मुख्यत: या पदार्थांचा उपयोग केला जातो. ‘अर्धरसायन’ हे नांव उदासीन सोडि–यम सल्फाईट वापरून शिजविण्याच्या पद्धतीना मुख्यत: देण्यात आले आहे. तथापि शिजविण्याने किंचित अम्ल अथवा pH ची आधार मूल्ये प्राप्त होणाऱ्या व अर्ध सल्फेट व अर्ध सोडा, यांचा वापर करण्यात येत असलेल्या शिजविण्याच्या अन्य पद्धतींनासुद्धा अर्ध रसायन लगदाकरण असे कधीकधी संबोधण्यात येते.

## २३–२. लगदा व कागद गिरण्यातील अपशिष्टांचे गुणधर्म

चार प्रकारचे लगदे तयार करताना काहीशी भिन्न अशी अपशिष्टे निर्माण होत असल्याने प्रत्येकाचा स्वतंत्रपणे विचार केला पाहिजे गेहमने (२७३) दळलेल्या लाकडाच्या अपशिष्टांचे सामान्य गुणधर्म ( को. २३–२ ) सादर केले आहेत. ओहायओ नदीच्या अभ्यासात लगदा आणि कागदाच्या सर्व प्रकार या अपशिष्टांचे नमुनेदार विश्लेषण ( को. २२–३ ) केले आहे. तसेच गेहमने ( २७३ ) विरंजन न केलेल्या आधुनिक क्रॅफ्ट (सल्फेट ) गिरण्यातील संयुक्त निःस्रावाच्या २४ तासात घेतलेल्या एकत्रित नमुन्याचे केलेले विश्लेषण (को. २४–४) दिले आहे

**कोष्टक २३–१**

**कागदाच्या दर एक टन पदार्थाचा सरासरी अपशिष्ट–प्रस्राव***

| पदार्थ | अपशिष्ट गॅलन |
|---|---|
| लगदा गिरण्या | |
| दळलेले लाकूड | ५००० |
| सोडा | ८५००० |
| सल्फेट (क्रॅफ्ट) | ६४००० |
| सल्फाईट | ६०००० |
| संकीर्ण कागद | |
| विरंजन न केलेला | ३९००० |
| विरंजनासह | ४७००० |
| कागदी पुठ्ठे | १४००० |
| गवती पुठ्ठे | २६००० |
| विकज्जलीकरण वापरलेला कागद | ८३००० |

* "इंडस्ट्रियल वेस्ट गाईड" मधून; ओहायओ नदी प्रदूषण नियंत्रण सर्वेक्षण, पुरवणी D, युनायटेड स्टेट्स सार्वजनिक स्वास्थ्य सेवा, १९४३.

मोगिओचे (२०७) असे म्हणणे आहे की, विद्यमान क्रॅफ्ट गिरण्यातून त्या कार्यक्षमपणे चालू असताना दर टन लगदा शिजविण्याच्या द्रव्याच्या समतुल्य १०० पौंडापेक्षा जास्त $Na_2SO_4$ नसलेला निःस्त्राव वाहून जातो. त्याचा असाही दावा आहे की, दर टन लगद्या-करता अविरंजीत क्रॅफ्टसाठी २०००० ते ३०००० गॅलन आणि विरंजित क्रॅफ्टसाठी ४००० ते ६००० गॅलन पाणी वापरण्यात येते विरंजित करण्याच्या पद्धतीनुसार निःस्त्रावाचे गुणधर्म काहीसे बदलते असतात. तरंगते घनपदार्थ २० ते ६० ppm च्या व्याप्तीत असतात; त्यात मुख्यतः ( एकूण घनपदार्थाच्या सुमारे ० ५ प्रतिशत् ) तंतू असतात,. विलीन घनपदार्थाच्या सांद्रणाची व्याप्ती १००० ते १५००ppm असते व त्यापैकी ६० प्रतिशत् राख असते; BOD ची मुल्ये १०० ते २७० च्या मर्यादेत अथवा दर टन पदार्थास २० ते ४० पौंड असतात, निःस्त्रा-वाचा रंग कॉफीसारखा असतो आणि त्याचे वर्णमूल्य सुमारे ५०० असते. क्रॅफ्टचा लगदा तयार करण्याची प्रक्रिया आणि जलसंतुलन याचे नमुनेदार प्रवाह-तक्ते आ. २३-१ व २३-२ मध्ये दिले आहेत.

गेह्मनं (२७३) असे म्हणणे आहे की, सोडा-लगदा-करण-प्रक्रिया क्रॅफ्टच्या सारख्याच असल्याने निःस्त्राव सुद्धा एकसमान असतात. एकच तत्वाचा फरक हा असतो कीं, लाकूड शिज-विण्याकरता NaOH अथवा $Na_2S$ चे मंद सांद्रण सोडा-प्रक्रियेत वापरले जाते. म्हणून सोड्यात शिजविलेल्या पदार्थात सल्फरचे सांद्रण कमी असते.

**कोष्टक २३-२**
**लाकूड तयार करण्याच्या अपशिष्टांचे नमुनेदार विश्लेषण**

| गुणधर्म | ppm |
|---|---|
| एकूण घनपदार्थ | ११६० |
| तरंगते घनपदार्थ | ६०० |
| तरंगणारे रक्षामय घनपदार्थ | ६० |
| विलीन घनपदार्थ | ५६० |
| रक्षाविलीन घनपदार्थ | २४० |
| BOD, ५-दिवस | २५० |

अपयुक्त (Spent) सल्फाईट द्रवाची सरासरी दर टन लगद्यास सुमारे ३०० गॅलन असते. लगदा-काष्टापैकी निम्मे घनपदार्थ असणारे उच्च प्रमाणात संक्षारक पातळ द्रावण अशा अपयुक्त-सल्फाईट-द्रव अपशिष्टाची व्याख्या केली आहे (२८). या घन पदार्थांत ६५ टक्क्याइतके लिग्नोसल्फॉनिक अम्ल, २० टक्के लघुकरण शर्करा, ८.४ टक्के शर्करा-सल्फर डाय ऑक्साईडची व्युत्पन्न द्रवे (derivatives), आणि ६.७ टक्के कॅलिशयम असू शकते. पाचित्रातून काढून घेतलेल्या अपयुक्त सल्फाईट द्रवातील घनपदार्थांचे सांद्रण ६ ते १६ टक्क्याइतके बदलते असते आणि त्यात लगद्याच्या दर टनाला ४०० पासून ६०० पौंड (किंवा त्यापेक्षा जास्त) BOD असू शकतो. सल्फरच्या संयुगात "तात्कालिक ऑक्सिजन मागणी असते व ती ५ दिवसाच्या सुमारे ११ टक्के BOD स जबाबदार असते. या शर्करा (हेक्सोजेस व पेंटोजेस) सुमारे ६५ टक्के BOD चे प्रतिनिधित्व करतात. जरी ह्या अपशिष्टातील निम्म्यापेक्षा जास्त घनपदार्थांस

**कोष्टक २३-३**

**लगदा-आणि कागद-गिरणीतील अपशिष्टांचे नमुनेदार वैश्लेषिक निष्कर्ष :**

| पदार्थ | BOD, ppm | तरंगते घनपदार्थ ppm |
|---|---|---|
| लगदा | | |
| दळलेले लाकूड | ६४५ | |
| सोडा | ११० | १७२० |
| सल्फेट (क्रॅफ्ट) | १२३ | |
| सल्फाईट | ४४३ | |
| संकीर्ण कागद | | |
| अविरंजित | १९ | ४५२ |
| विरंजित | २४ | १५६ |
| कागदी पुठ्ठा | १२१ | ६६० |
| गवती पुठ्ठा | ९६५ | १७९० |
| विकज्जलीकरण वापरलेला कागद | ३०० | |




**आकृति २३-१. क्रॅफ्ट-लगदा तयार करण्याच्या प्रक्रियेतील जल-सन्तुलनाचा प्रक्रिया-प्रवाह आरेख (वातशुष्क लगद्याच्या दर टनास राशि पौंडात आहेत; मॅक् डर्मेटप्रमाणे (१९४)**




आकृति २३–२. रासायनिक पुनर्गठन व्यवस्थेतील जल–सन्तुलन (वातशुष्क लगद्याच्या दर टनास पौंडात राशि; मॅक् डार्मेटप्रमाणे (१९४) )

लिग्नीन जबाबदार असले तरी ते फारच थोडा BOD संप्राप्त करते. सल्फाईट अपशिष्ट द्रवाचे हॅस्किन्सने (२६४) अति जटील द्रव असे वर्णन केले आहे. द्रवातील महत्वाचे घटक मुक्त आणि संयुक्त $SO_2$, बाष्पशील आम्ले, अल्कोहोल, असेटोन, फुरफुरल ( एक रसायन ), शर्करा आणि लिग्नीन हे असतात. ह्या अपशिष्टांचे अधिक तपशीलवार विश्लेषण को. २३–५ व २३–६ त सादर केले आहे.

१९४७ मध्ये क्रॉफर्डने (६६) एका नमुनेदार अर्धरासायनी लगदा करणाच्या गिरणीतील अपशिष्टांचे विश्लेषण केले होते. ह्या गिरणीत देवदार अर्ध सोडचात शिजवून त्यात कठीण लाकूड मिसळले, आणि टॅनिक अर्कक्रृत चेस्टनटचे तुकडे उदासीन अवस्थेत शिजविण्यात आले (को–२३–७). व्हिलकाँटने (२६६) अर्धरासायनी सोडा लगदाकरणातील अपशिष्टाच्या घटकांतील घनपदार्थ आणि BOD च्या विश्लेषणाची फोड (२३–८) सादर केली आहे. रुडॉल्फस आणि नेमेरो (२८१) यांनी चिपबोर्ड गिरण्यांतील पांढऱ्या पाण्याच्या अपशिष्टाचे नमुनेदार विश्लेषण (को. २३–९) सादर केले आहे. लाकडाखेरीज अन्य कच्च्या द्रव्यापासून तयार केलेल्या लगद्याच्या अपशिष्टाचे विश्लेषण काहीसे भिन्न असते. ब्लडगुडने (३१५) गवती पुठ्ठ्याच्या गिरणीतील अपशिष्टाचे आठ महिने दररोज घेतलेल्या चांचण्यांच्या सर्वेक्षणावर आधारीत विश्लेषण (को. २३–१०) सादर केले आहे.

**कोष्टक २३–४**
**क्रॅफ्ट–गिरणीतील अपशिष्टांचे गुणधर्म**

| गुणधर्म | कमाल | किमान | सरासरी |
|---|---|---|---|
| pH | ९.५ | ७.६ | ८.२ |
| एकूण क्षारता, ppm | ३०० | १०० | १७५ |
| फेनॉल क्षारता, ppm | ५० | ० | ० |
| एकूण घनपदार्थ, ppm | २००० | ८०० | १२०० |
| बाष्पशील घनपदार्थ, % | ७५ | ६० | ६५ |
| एकूण तरंगते घनपदार्थ, ppm | ३०० | ७५ | १५० |
| बाष्पशील घनपदार्थ, % | ९० | ८० | ८५ |
| BOD, ५–दिवस, ppm | ३५० | १०० | १७५ |
| रंग, ppm | ५०० | १०० | २५० |

कोष्टक२३-५

सल्फाईट–अपशिष्ट द्रवातील महत्वाच्या घटकांचे संबंध (२६४)

| घटक | अतिशुष्कतेच्या आधारावर एकूण घनपदार्थांची टक्केवारी |
|---|---|
| लिग्नीन | ५१.६ |
| शर्करा | १६.९ |
| सल्फा | ९.१५ |
| कॅल्शियम | ४.५ |

कोष्टक २३–६

नमुनेदार सल्फाईट लगदा–संयंत्रातील अपशिष्टाची बनावट

| घटक | पाचित्र द्रव, ppm | फुक–गर्जा द्रव, ppm |
|---|---|---|
| एकूण घनपदार्थ | १११००० | ३८७०० |
| बाष्पशील घनपदार्थ | १०१००० | ३४००० |
| राख | १०१०० | ४७०० |
| कॅल्शियम | ३९९० | १५५० |
| एकूण सल्फेट | ३१२०० | ८६२० |
| BOD, २०–दिवस | ४२९०० | |

कोष्टक २३-७

अर्धरासायनी पुठ्ठ्याच्या उत्पादनातील महत्वाची अपशिष्टे (६६)

| गुणधर्म | ग्लोब-पाचित्र फुक (blow) | धावन निःस्त्राव | यंत्र निःस्त्राव |
|---|---|---|---|
| राशि, गॅलन/दिवस | २४००० | २०००००० | ८६४००० |
| एकूण घनपदार्थ, ppm | १०२३०० | ४५९३ | ६५८ |
| स्थिर घनपदार्थ, ppm | ३५००० | १५४७ | १६६ |
| बाष्पशील घनपदार्थ, ppm | ६७३०० | ३०४६ | ४९२ |
| एकूण घनपदार्थ, टन/दिवस | १०.८ | ३८.३ | २४ |
| रंग, ppm | १६५००० | १२००० | ५०० |
| एकूणांची टक्केवारी | १३.८ | ८४.७ | १.५ |
| BOD, ५-दिवस. पौंड/दिवस | १९४० | १६४४० | २३० |

कोष्टक २३-८

अर्ध रासायनी सोडा-लगदाकरण अपशिष्टातील घनपदार्थ व BOD चे विश्लेषण (२६६)

| | प्रत्येक घटकास लागू असलेली टक्केवारी | |
|---|---|---|
| | एकूण घनपदार्थ, % | BOD % |
| पेंटोसॅन्स | ५.७ | १८.९ |
| $NaHCO_3$ | ११.५ | ०.० |
| $NaC_2H_3O_2$ | २६.१ | ५६.७ |
| सोडियम फॉर्मेट | ६.८ | ४.२ |
| लिग्नीन | १४.९ | * |
| पेंटोसॅन्स सोडून इतर जलपदार्थाचा जल-विश्लेषणीय ( hyodrolyzable ) अंश | ५.४ | * |
| एकूण | ७०.४ | ७९.२ |

* ५ - दिवसाच्या BOD चे मूल्य शंकास्पद.

**कोष्टक २३-९**

**चिपबोर्ड गिरणीतील पांढऱ्या पाण्याच्या अपशिष्टाचे विश्लेषण (२८१)**

| गुणधर्म | मूल्य अथवा सांद्रण |
|---|---|
| pH | ७.० |
| क्षारता, ppm $CaCO_3$ | ११८ |
| तरंगते घनपदार्थ, ppm | ८४० |
| स्थिर घनपदार्थ, % | ११.९ |
| बाष्पशील घनपदार्थ % | ८८.१ |
| एकूण घनपदार्थ, ppm | २१८० |
| राख, ppm | १९.३ |
| बाष्पशील एकूण घनपदार्थ % | ८०.७ |
| विलीन घनपदार्थ, एकूणांची टक्केवारी | ६१.५ |
| BOD ppm * | १००–४०० |

* रुडॉल्फ्स आणि अॅक्स यांचे कडून ( २७७ )

**कोष्टक २३–१०**

**एकूण गवती पुठ्ठ्यातील अपशिष्टाचे विश्लेषण (३१५)**

| गुणधर्म | रोजचे कमाल | रोजचे किमान | ८-महिन्याची सरासरी |
|---|---|---|---|
| एकूण घनपदार्थ, ppm | ४९०० | २००० | ३६९१ |
| एकूण बाष्पशील घनपदार्थ, ppm | ४१०० | ११०० | २५०२ |
| प्रतिशत् | | | ६७.७ |
| एकूण तरंगते घनपदार्थ, ppm | २१९० | ४८४ | १३६९ |
| तरंगणारे बाष्पशील घनपदार्थ, ppm | १५९० | ३२० | ९०९ |
| प्रतिशत् | | | ६६.५ |
| BOD, ppm | १३७२ | ४०९ | ९५५ |

### कोष्टक २३–११

### चिंध्या, दोर, आणि तागाच्या गिरणीतील अपशिष्टे (२८०)

| गुणधर्म | ताग | | दोर | | चिंध्या | |
|---|---|---|---|---|---|---|
| | शिजवणे | धुणे | शिजवणे | धुणे | शिजवणे | धुणे |
| pH | १२ | ११.२ | १०.८ | ८.७ | १२ | ८.१ |
| ppm $CaCO_3$ म्हणून क्षारता | २८५० | ५७४ | १८००० | ३५० | ३१६५५ | २६४ |
| BOD, ppm | ३३८१ | ३८५ | १२१२५ | १२५० | २९२२५ | ५२६ |
| एकूण घनपदार्थ ppm | ७२०० | १३०० | ४५००० | ११०० | ९६००० | २२०० |
| एकूण बाष्पशील घनपदार्थ % | ५६ | ५६ | ५६ | ६४ | ६४ | ५४ |
| विलीन घनपदार्थ % | ८२ | ६५ | ९५ | ५९ | ९३ | ७३ |
| एकूण नायट्रोजन, ppm | १२६ | ६ | १५७ | २१ | १२७० | ४४ |
| BOD: एकूण नायट्रोजन | २.७:१ | ६५ : १ | ८८ : १ | ६०:१ | २३ : १ | १२:१ |

### कोष्टक २३–१२

### ताग, दोर, आणि चिंध्या शिजविणाऱ्या थंड पाण्यात विरघळणाऱ्या द्रवातील घनपदार्थाची फोड (२८०)

| शिजलेल्या अपशिष्टाचा प्रकार | थंड पाण्यातील एकूण घनपदार्थ, ppm | बाष्पशील द्रव्य, % | थंड पाण्यातील बाष्पशील द्रव्याचे घटक, बाष्पशील द्रव्याच्या टक्केवारीत | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | $CO_2$ | ग्रीज | लिग्नीन | HAC म्हणून बाष्पशील अम्ले | मिश्र पॉलीसॅकेराइड्स | प्रथिन, एकूण N X६.२५ |
| ताग | ५५४० | ६८.८ | ३०.० | ० | २१.८ | ४०.९ | १०.९ | ४.५ |
| दोर | ३७००० | ५४.३ | २५.४ | ० | ३९ ४ | १४.८ | १०.६ | ६.४ |
| चिंध्या | ८५८०० | ५८.४ | २४.६ | ७.६ | २४.३ | १०.४ | ३.६ | ३.८ |

चिंध्या, दोर आणि तागाच्या गिरणीतील शिजवणारे द्रव, व उखळीतील धावनजल अपशिष्ट, यांचे महत्वाचे स्वास्थ्यविषयक गुणधर्म रुडॅल्फस व नेमेरीने (को. २३–११) सादर केले आहेत, आणि शिजवण्याच्या द्रवांचे आणखी रासायनिक विश्लेषण को. २१–१२ त केले आहे. १९४६ मध्यें लगदा आणि कागद गिरण्यांच्या विस्कॉन्सिन राज्यातील सर्वेक्षणावरुन सर्व प्रकारच्या लगदा व कागद बनविण्याच्या यंत्रातील अपशिष्टातील व्यापक वेगळेपणा दिसून आला (को. २३–१३).

## २३–३ लगदा–आणि कागद – गिरणीतील अपशिष्टे

लगदा आणि कागद गिरणीतील अपशिष्टांवर खालील पद्धतीनी उपचार करण्यात येतात: (१) पुनः प्रापण (२) तरंगणारे द्रव्य काढून टाकण्याकरता अवसादन व तरंगण, (३) रंग नाहीसा करण्याकरता रासायनिक अवक्षेपण, (४) ऑक्सिजनची मागणी करणारे द्रव्य काढून टाकण्याकरता उत्प्रेरित अवमल, (५) साठवण, अवस्थापन, समानीकरण करण्यासाठी आणि कधी कधी सेंद्रीय द्रव्याचे जैवी अवक्रमण (degradation) करण्यासाठी खांजणीकरण.

जरी बऱ्याच प्रमाणात संशोधन आणि अनेक प्रायोगिक संयंत्रावर अन्वेषण करुन त्यांचे अहवाल सादर करण्यात आले असले तरी, कागद गिरणीतील अपशिष्टावरील उपचारण अद्यापी बाल्यावस्थेत आहे. उत्पादन केलेल्या पदार्थावरील खर्चाच्या मानानें उपचारणावरील खर्च बराच जास्त येत असल्याने सर्व संभाव्य बाबींचा सांगोपांग अभ्यास केल्यानंतरच प्रत्यक्ष उपचार करण्याची उपकरणें बसविण्यात येतात. म्हणून खर्चावर पडणाऱ्या मर्यादेमुळे उपचारणापेक्षा पुनःप्रापणावरच जोर देणें उद्योगाला भाग पडते.

कागद गिरणीतील **पुनः प्रापण प्रक्रियांत** बंद अगर अंशतः बंद "सर्व-बचत" (सेव्ह ऑल) यंत्रणेचा वापर करण्याशी संबंध येतो. हे "सेव्हऑल" बसविण्यात येतात ते फक्त अपशिष्ट–उपचारणाचा एक उपाय म्हणून नव्हे तर तंतू व पोषकांच्या पुनःप्राप्तीच्या एक संरक्षणाचा उपाय म्हणूनही. निस्यंदन, अवसादन अथवा तरंगण प्रक्रियांवर सेव्ह–ऑलचे मुख्य प्रकार आधारलेले असतात. निस्यंदनाच्या साधनात कोणत्या तरी प्रकारच्या नळकांड्यांच्या आकाराच्या फिरत्या सच्छिद्र जाळ्या बसविलेल्या असतात व त्यांच्यावरुन चटईच्या स्वरुपात तरंगणारे पदार्थ निघून जातात आणि नंतर ते डोलावरुन खरडून काढून कागद बनविण्याच्या संचयी व्यवस्थेत परतविण्यात येतात. कोनाच्या आकाराच्या अगर अन्य अवसादन टाक्यांचाही तरंगणाऱ्या पदार्थांच्या विशिष्ट गुरुत्वातील फरकांचा उपयोग करुन ते वेगळे करण्याकरता अनेक वेळा उप–

